श्रीमदाद्यशंकराचार्यकृत

# सुबोधस्तोत्रसंग्रह

• •

मराठी अनुवाद आणि विवेचन


लेखक :

महामहोपाध्याय

**प. पांडुरंगशास्त्री गणेशशास्त्री गोस्वामी**

न्यायाचार्य, आयुर्वेदाचार्य, साहित्यविशारद

सीनिअर शास्त्री – डेक्कन कॉलेज, पुण.




मूल्य दहा रुपये

अध्यात्मपरिषद सांगली ग्रंथमाला : ९



* *

प्रथमावृत्ति – शके १८८४
मे १९६२

* *

पृष्ठसंख्या ४००

* *

मूल्य रु. १०–००

* *

प्रकाशक
पांडुरंगशास्त्री गोस्वामी,
टेभन कॉलेज, पुणे ६

* *

मुद्रक
ज. श्री. टिळक
केसरी मुद्रणालय
५६८, नारायण
पुणे २

# विषयानुक्रम

# लेखकाचें हृद्गत

मानवी जीवनाच्या श्रेष्ठत्वाचें मूल्यमापन त्यानें बांधलेल्या भव्य इमारती, मिळविलेली अपार संपत्ति, गाजविलेला पराक्रम आणि निर्मिलेली संतति यावर केलें जात नसतें. अंतःकरणामध्यें असलेलें सात्विक समाधान हेंच त्याच्या मूल्यमापनाचें खरें साधन आहे. अंतःकरणांतील सात्विक समाधानाचा जितका अधिक उत्कर्ष झालेला असेल तितकें त्याचें मानवी जीवन श्रेष्ठ कोटीचें गणलें जाईल. अंतःकरणांत विलसत असलेल्या शुद्ध सात्विक समाधानांतच मानवाच्या मानवतेची पराकाष्ठा समावलेली असल्यामुळें सृष्टीच्या आदिकाला पासून विद्यमान काळापर्यंत साधुसंत, ऋषि, मुनि, तपस्वी, महात्मे, विरक्त, विद्वान् आणि सिद्धपुरुष सात्विक समाधानाच्या क्षेत्राचें सतत मार्गदर्शन करीत आलेले आहेत.

अंतःकरणांत सात्विक समाधानाचा आविर्भाव होण्याकरितां मानवाला अंतर्मुख होऊन अध्यात्मज्ञानाच्या क्षेत्रांत पदार्पण केल्याशिवाय दुसरा काहीं निश्चयानें फलद्रूप होईल असा उपायच नाहीं. भगवान्, सिद्ध मुनि, गौतमबुद्ध यांनीं तर आपल्या आचरणानेंच ही गोष्ट लोकनिदर्शनाला आणून दिलेली आहे. साम्राज्यवैभवांत सुख असतें तर त्यांनीं आपल्या अधिकारांत असलेलें जन्म सिद्ध साम्राज्य सोडलेंच नसतें. स्वरूपसौंदर्य, लावण्य आणि तारुण्य इत्यादि गुणांनीं संपन्न असलेल्या भार्येच्या सान्निध्यांत खरें सुख मिळण्याची आशा असती तर त्यांनीं आपल्या प्रिय पत्नीचा त्याग केलाच नसता. पोटीं जन्माला येणारीं मुलेंबाळें हीं आपल्या सुखसमाधानाच्या दृष्टीनें उपयोगाला येतील असें जर त्यांच्या विचाराला पटलें असतें तर त्यांनीं आपल्या एकुलत्या एक असलेल्या आणि मातेच्या कुशींत सुखानें शयन करणाऱ्या त्या अबोध अर्भकाचा त्याग केला नसता. ज्या अर्थीं त्यांनीं या सर्व गोष्टींचा त्याग केला त्या अर्थीं त्यांना या सर्व गोष्टींत आत्मसमाधानाचें दर्शन घडेल असें वाटलें नाहीं आणि म्हणूनच या सर्वांच्या मोहांतून ते धैर्यानें बाहेर पडले आणि अंतर्मुख होऊन अध्यात्माच्या क्षेत्रांत त्यांनीं पदार्पण केलें.

आत्मस्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार केवळ तार्किक बुद्धीनें होत नसतो. 'नैषा तर्केण मतिरापनेया' केवळ तर्कानें आत्मज्ञान होत नसतें. तें सद्गुरूंनीं

नीट समजावून सांगितलें तरच सुलभ रीतीनें जाणता येतें 'प्रोक्तान्येन सुज्ञानाय प्रेष्ठ' असें वेदच ज्या अध्यात्मज्ञानाचें वर्णन करीत आहे तें अध्यात्मतत्त्व वेदाचें साहाय्य न घेता, सद्गुरूचें साहाय्य न घेता केवळ स्वतःच्याच बुद्धिवैभवानें आपण जाणू शकू असें जर कोणी म्हणेल तर तो एक त्याचा भ्रमच ठरेल बुद्धदेवानें वेदाचें-उपनिषदाचें साहाय्य घेतलें नाहीं स्वतःच्या बुद्धीनेंच विचारक्षेत्रात प्रगति केली, बरेंच समाधान मिळविलें पण त्याना पूर्ण समाधान प्राप्त झाल्याचें निदर्शनाला येत नाहीं 'सर्वं दुःख दुःखम्', 'सर्वं शून्य शून्यम्' असा त्यानीं निष्कर्ष काढला, पण विचाराअंतीं हा निष्कर्ष बुद्धीला पटणारा नाहीं व त्यानें आत्यंतिक समाधानाचा लाभहि होणार नाहीं बुद्धदेवाच्या वरील सूत्रातील सर्व शब्दाच्या अर्थाचा संकोच करून आत्म्याव्यतिरिक्त सर्व क्षणिक आहे शून्य आहे, दुःखरूप आहे असेंच म्हणता येईल आत्माहि क्षणिक, शून्य आणि दुःखरूप असेल तर मग 'कृत्ति कमण्डलुर्मौण्ड्य चीरं पूर्वाह्णभोजनम्। सङ्घो रक्ताम्बरत्व च शिश्रिये बौद्ध-भिक्षुभि' आसन, कमंडलु, मुंडण, तांबडीं वस्त्रें व वल्कलें, सत्य, अहिंसा इत्यादि व्रतें वैकल्यें हीं कोणाकरिता व का करावयाचीं? तात्पर्य, बौद्धसमत आत्मस्वरूप हें वेदविरुद्ध व युक्तिविरुद्धहि असल्यामुळें बुद्धीला पूर्ण समाधान देण्यास अपुरें आहे

भगवान् श्रीकृष्णाच्या दैनंदिन कार्यक्रमाचें वर्णन करताना भागवतकार म्हणतात, भगवान् श्रीकृष्ण रोज पहाटेच ब्राह्ममुहूर्तावर उठत असत हातपाय धुऊन आत्मचिंतन करीत असत प्रसन्न अंतःकरणानें आत्मस्वरूपाचें चिंतन करताना 'आत्मा हा अज्ञानाच्या पलीकडे आहे, तो ज्ञानमय आहे चिन्मय आहे, आनंदमय आहे या जगात तो एकच एक आहे तोच सर्वत्र भरला आहे त्याच्यावाचून दुसरें काहीं नाहीं तो अनन्य म्हणजे निरुपाधिक आहे तो स्वयंप्रकाश आहे तो अविनाशी आहे तो स्वस्वरूपात प्रतिष्ठित असल्यामुळें अविद्येचा लेशहि त्याला स्पर्श करू शकत नाहीं या विश्वाच्या उत्पत्तीला आणि प्रलयाला कारणीभूत असलेल्या त्याच्या विशिष्ट शक्तीमुळेंच त्याचें विश्वोत्पत्तीच्या पूर्वकाळचें व विश्वप्रलयाच्या उत्तरकाळचें अस्तित्व सिद्ध होतें, म्हणूनच तो केवळ सत्तास्वरूप आहे सत्ता म्हणजे भाव किंवा अस्तित्व हेच त्याचें स्वरूप आहे तो आत्मा सदा सर्वकाळ आनंदस्वरूप

आहे ' असें आत्मस्वरूपाचें चिंतन श्रीकृष्णहि नित्य करीत होते कारण त्याशिवाय या व्यावहारिक जीवनात सात्त्विक समाधानाचा साक्षात्कार होणार नाहीं, असें त्याना आपल्या आचरणानें प्रत्यक्ष दाखवावयाचें होतें हेंच वेद विहित यथार्थ आत्मस्वरूप असल्यामुळें याच्या साक्षात्कारानेंच खऱ्या सुखाचा व समाधानाचा जिवाला लाभ होऊ शकतो

गय नाहुष, भरत, शिबी, हरिश्चद्र इत्यादि किती तरी राजाचीं चरित्रें अशीं आहेत कीं, त्यानीं अक्षरश सर्व पृथ्वीचें निष्कटक साम्राज्यवैभवहि लोभाच्या आणि आसक्तीच्या आहारीं न जाता कर्तव्यप्रमाणें लेखून व्यावहारिकदृष्ट्या प्राप्त झालेल्या कर्तव्यात तिळमात्रहि प्रमाद होता कामा नये, म्हणून त्याची व्यवस्था सुयोग्य अधिकारी व्यक्तीवर सोपवावी व आपण कोठें तरी एकान्तात शात चित्तानें आत्मश्रवण होण्याकरिता सनक सनदनोसारख्या अधिकारी तत्त्व वेत्त्याकडून आत्मस्वरूपाचें श्रवण करावें व त्याचें मनन आणि निदिध्यासन करीत अथवा परमेश्वराच्या एखाद्या सगुणस्वरूपाचें चिंतन करीत आयुष्याचा उर्वरित काळ घालवावा अशींच त्या राजेलोकाचीं जीवनचरित्रें सत्यस्वरूपानें रेखाटलेलीं आहेत कारण त्याशिवाय मानवी जीवनाचें श्रेष्ठत्व आणि साफल्य तसेंच अत करणातील शुद्ध सात्त्विक समाधान याचा आविष्कारच होणें शक्य न हतें देवाचा म्हणनेच शुद्ध आत्मस्वरूपाचा दिव्य साक्षात्कार झाल्याशिवाय सर्व दु खाचा अतहि होणें शक्य नाहीं पासोडीची, चादरीची किंवा एखाद्या मृगाजिनाची घडी करावी त्याप्रमाणें आकाशाचीहि घडी एखाद्या वेळीं आपणाला करता येईल, पण या ससारात आत्मस्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार झाल्या वाचून कोणाच्याहि दु खाचा पूर्णपणें अत झाला आहे असें मात्र आढळून येणार नाहीं हा श्रुति विहित आणि सर्वानुभवसिद्ध असा अबाधित सिद्धान्त आहे 'यदा चर्मवदाकाश वेष्टयिष्यन्ति मानवा । तदा देवमविज्ञाय दु खस्यान्तो भविष्यति ' असें वेदहि सागत आहे

वेदविहित अध्यात्मतत्त्वज्ञानाशिवाय इतर कोणत्याहि तत्त्वज्ञानात विचारवनाना पूर्ण समाधानाचें दर्शन होणें कठीण आहे एकमेव अद्वितीय अशा नित्यनिरतिशय आनदस्वरूप असलेल्या पूर्ण परब्रह्मात बुद्धि विलीन होणें यातच विचाराची पूर्णता आहे याकरिता पूर्ण परब्रह्माचा जीवनक्रमात नित्य विचार होत रहाणें अत्यत आवश्यक आहे 'पूर्णमद पूर्णमिद पूर्णात्पूर्ण-

मुदच्यते । पूर्णस्य पूर्णमादाय पूर्णमेवावशिष्यते ' अद म्हणजे हें सुदूरवर्ति जगाच्या मुळाशीं असलेलें अथवा तें सुप्रसिद्ध सदानदस्वरूप परब्रह्म, तें पूर्ण आहे इद म्हणजे हें अगदीं आपल्याभोंवतीं असलेलें विविध नामरूपानीं प्रतीतीला येणारें विश्व हेंहि पूर्ण परब्रह्मच आहे 'पूर्णात्' म्हणजे कारणस्वरूप असलेल्या परब्रह्मातून जें उदच्यते म्हणजे उदयाला येतें, अविर्भूत होतें तेंहि पूर्ण म्हणजे ब्रह्मस्वरूपच आहे जगाच्या मुळाशीं ब्रह्म जगाच्या अतीं ब्रह्म ब्रह्मातून उत्पन्न होणारें जगहि ब्रह्म जगाचें यथार्थ स्वरूप जाणलें म्हणजे बुद्धींत जें शिल्लक राहील तेंहि ब्रह्मच यामप्रमाणें ब्रह्माचा विचार करता करता बुद्धीहि ब्रह्मस्वरूपच होते व विचार करणाराहि पण ब्रह्मस्वरूपच होतो अशी पूर्ण एकत्वाची अवस्था प्राप्त झाल्यानतर तेथें शोक, मोह, दुःख, दैन्य पार मावळून जातें 'तत्र को मोह क शोक एकत्वमनुपश्यत ' या अवस्थेंतच नित्य निरतिशय आनदाचा व पूर्ण समाधानाचा लाभ आहे हा पूर्णत्वाचा सिद्धान्त उपनिषदानींच ठाम माडला आहे गीता आणि ब्रह्मसूत्रें हीं उपनिषदामध्यें सागितलेल्या तत्त्वाचा अनुवाद मात्र करीत आहेत तात्पर्य, उपनिषदेंच यथार्थ तत्त्वज्ञानाचा साक्षात्कार घडवून देऊ शकतात उपनिषदेंच यथार्थ आत्मस्वरूपाचें दर्शन घडवू शकतात यात सशय नाहीं तसेंच आत्मस्वरूपाच्या यथार्थ दर्शनातच आत्यतिक समाधानाचा अथवा नित्य निरतिशय आनदाचा आविष्कार आहे त्यातच मानवी जीवनाचें साफल्य आहे

उपनिषदें, गीता आणि ब्रह्मसूत्रें या तिघाना प्रस्थानत्रय अशी सज्ञा आहे 'आत्मसमाधानाय, आत्मसाक्षात्काराय वा प्रस्थीयते अनेन इति प्रस्थानम् उपदशोपाय गीतोपनिषद्ब्रह्मसूत्ररूप ' अत करणाच्या आत्यतिक समाधानाकरिता अथवा आत्मसाक्षात्काराकरिता ज्या मार्गाचा उपयोग केला जातो त्या मार्गाला प्रस्थान असें म्हणतात प्रस्थान म्हणजे आत्मस्वरूपाच्या उपदेशाचें साधन उपनिषदें, गीता आणि ब्रह्मसूत्रें हींच तीं तीन साधनें होत, म्हणून याना प्रस्थानत्रय म्हटलें जातें उपनिषदें ज्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार करून देऊ शकतात त्याचप्रमाणें उपनिषदावर आधारलेलीं अधिकारी सताचा वचनेंहि आत्मस्वरूपाचा साक्षात्कार घडवून देऊ शकतात रहूगण राजाला जड भरतानें केलेला उपदेश हें या बाबतींत उत्कृष्ट उदाहरण आहे सत ज्ञानेश्वर, सत तुकाराम, सत एकनाथ आणि समर्थ रामदास इत्यादि सताच्या वचनातहि

आत्मस्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार घडवून देण्याचें सामर्थ्य असल्याचें दृष्टीस पडतें

उपनिषदांच्या वचनातून किंवा संताच्या उपदेशांतून आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घेण्याची जर बुद्धीमध्यें शक्ति नसेल, तर त्या बुद्धीला ती शक्ति प्राप्त करून घेण्याकरिता ईश्वराची कृपा संपादन करणें हाच एक उत्तम मार्ग होय 'यावन्नानुग्रह साक्षाज्जायते परमेश्वरात्। तावन्न सद्गुरु कश्चित्सच्छास्त्र नोपलभ्यते' जोंपर्यंत ईश्वरकृपा नाहीं तोंपर्यंत सद्गुरूहि उपलब्ध होत नाहीं व तोंपर्यंत सच्छास्त्र म्हणजे अध्यात्मज्ञानाचें प्रतिपादन करणारीं उपनिषदें किंवा संतवचनेंहि बुद्धीमध्यें प्रकाशू शकत नाहींत ईश्वर हा दृश्य स्वरूपात ईश्वर म्हणून सामान्य मानवाच्या प्रतीतीला येत नसला, तरी ईश्वराच्या कृपेचें कार्य दृश्य रूपानें मानवी जीवनात घडून येत असल्याचें दृष्टो स्पत्तीस येतें ही ईश्वरकृपा प्राप्त होण्याकरिता आपल्या हातून काहीं तरी ईश्वराराधनरूपाचें कार्य व्हावें लागतें ईश्वराराधनेचे अनेक प्रकार आहेत त्यातच ईश्वराची स्तुतिस्तोत्रें भक्तिभावानें म्हणत रहाणें हाहि एक प्रकार आहे स्तुति स्तोत्राचा अर्थ हृदयात प्रकाशणें अत्यत आवश्यक आहे त्या अर्थातच ईश्वराचा साक्षात्कार असतो अनंत प्रेमाचा आविष्कार असतो विषयवैराग्याचा पुरस्कार असतो आणि परिणामीं सर्व दु खाचा परिहारहि असतो अशा रीतीनें स्तोत्रवाङ्मय हें मानवी जीवनात अत्यंत उपयुक्त असतें

भगवत्पूज्यपाद श्रीमान् आद्यशंकराचार्य यानीं अशीं अनेक स्तोत्रें रचलेलीं आहेत त्यातील काहीं स्तोत्रें भक्तिपर आहेत काहीं वैराग्यपर आहेत काहीं उपदेशपर आहेत आणि काहीं स्तोत्रें वेदान्तपर आहेत पुष्कळशा स्तोत्रा तून भक्ति, वैराग्य, उपदेश आणि अध्यात्म या चार विषयाचा एकत्र समागम घडून आलेला पहावयास सापडतो या ठिकाणीं वैराग्य म्हणजे उद्विग्नता नव्हे ही गोष्ट लक्षात घ्यावी विषयाचे दोष लक्षात घेऊन अत करणाचा विषया- पासून परावृत्त होऊन रहाण्याचा जो प्रयत्न असतो तेंच खरें वैराग्याचें लक्षण होय वैराग्य ही एक प्रकारची अत करणाची शुद्धि होय विषयवासनानीं मलिन झालेलें अत करण वैराग्यानें शुद्ध होत असतें शुद्ध अत करणातच उपदेश रुजतो उपदेशाच्या मुळाशीं एक प्रकारची कळकळ असावी लागते ती आचार्यांच्या स्तोत्रवाङ्मयात आपल्याला पूर्णपणें पहावयास सापडेल चर्पट-

पंजरिकास्तोत्र, द्वादशपञ्जरिकास्तोत्र, गुर्वष्टक, अनात्मश्रीविगर्हण इत्यादि स्तोत्रें कनककळीच्या उपदेशाचीं निदर्शक आहेत. वैराग्यपंचक, कौपीनपंचक, धन्याष्टक इत्यादि स्तोत्रें अंतःकरणांत वैराग्यभावाचा आविष्कार करतात. वैराग्यानें वासना रहित झालेल्या अंतःकरणरूपी क्षेत्रांतच भक्तीचे अंकुर दृढावदारपणानें प्रकट होतात. त्याच अंकुरांना ईश्वरकृपेचें फळ लागतें व त्याच फळांतून आत्मसाक्षात्काराचा व आत्मसमाधानाचा रस चाखावयास मिळतो. आचार्यांच्या भक्तिपर स्तोत्रांत शिव, विष्णु, कृष्ण, गोविंद, राम, गणपति तसेंच देवी भवानी, पार्वती, ललिता, त्रिपुरसुंदरी इत्यादि अनेक देवदेवतांचीं स्तोत्रें पहावयास सांपडतात. या देवता जरी अनेक असल्या तरी त्या सर्वांतून एकच शुद्ध सच्चिदानंदघन परिपूर्ण परमात्मतत्त्व हें मोठ्या खुबीनें गोवलेलें पहावयास सांपडतें.

पुष्पाचे आकार प्रकार विविध असले, तरी स्वादु रसाचा मध जसा सर्व फुलांतून ओतप्रोत भरलेला असतो, त्याचप्रमाणें आचार्यांच्या स्तोत्रांतील देवदेवता भिन्न भिन्न स्वरूपाच्या असल्या तरी एकमेव अद्वितीय सच्चिदानंदघन परमात्मतत्त्व त्या सर्व स्तोत्रांत ओतप्रोत भरलेलें पहावयास सांपडतें, हा आचार्यांच्या स्तोत्रांचा विशेष आहे. आचार्यांचीं वेदान्तस्तोत्रें तर अगदीं रसायनासारखींच आहेत. रसायनें ज्याप्रमाणें खावयास गोड असून तीं परिणामीं तुष्टि आणि पुष्टि देतात त्याचप्रमाणें आचार्यांचीं वेदान्तस्तोत्रें, वेदांतासारखा विषय रूक्ष आणि कंटाळवाणा असला तरी, ऐकावयाला आणि म्हणावयाला गोड लागतात. तसेंच बुद्धीचा कायापालट करून त्या बुद्धीला आत्मसमाधानाचें दिव्य तेज आणि सामर्थ्य प्राप्त करून देतात, असें हें आचार्यांचें स्तोत्रवाङ्मय सर्वतोपरी मानवी जीवनाला उपकारक आहे यांत संशय नाहीं. श्रीज्ञानेश्वर महाराजांनीं म्हटल्याप्रमाणें आचार्यांच्या वाणींत कवित्व, रसिकत्व आणि परतत्त्व या तिन्ही गुणांचाहि साधकाला साक्षात्कार होतो. असें हें स्तोत्रवाङ्मय मूळ संस्कृत भाषेमध्यें असल्यामुळें मराठी भाषेच्या अभ्यासकांनाहि त्याचा लाभ व्हावा या हेतूनें हा 'सुबोधस्तोत्रसंग्रह' लिहिला आहे. यांत पंचचाळीस स्तोत्रें श्रीशंकराचार्यांनीं केलेलीं आहेत व एक स्तोत्र श्रीतोटकाचार्य यांनीं केलेलें आहे. आणखी कांहीं आचार्यांचीं महत्त्वाचीं स्तोत्रें राहिलेलीं आहेत. उदाहरणार्थ, सौन्दर्यलहरी, शिवानंदलहरी, योगतारावली, प्रश्नोत्तर रत्नमाला, दशश्लोकी इत्यादि. त्यांचा अंतर्भाव मी या ग्रंथांत आर्थिक अडचणी

मुळें करू शकलों नाहीं हीं सर्व स्तोत्रें सुबोधस्तोत्रसंग्रहाच्या दुसऱ्या भागात मी वाचकाच्या हातीं देण्याचा प्रयत्न करीन उदार धनिकांनीं या बाबतींत अवश्य साहाय्य करावें

या सर्व स्तोत्रांचा संस्कार मला पहिल्या प्रथम गुरुवर्य श्रीकेवलानंद सरस्वती पूर्वाश्रमीचे प नारायणशास्त्री मराठे, संस्थापक प्राज्ञपाठशाळा मंडळ वाई यांच्या सान्निध्यात झाला त्याच्याच अनुग्रहानें मी ही महाराष्ट्र भाषा-भाषिकांची अल्पस्वल्प सेवा करू शकत आहें गुरुवर्य श्रीकेवलानंद स्वामींच्या सान्निध्यात असताना अंत करणात रुजलेलीं भक्तीचीं व अध्यात्मतत्त्वाचीं बीजें परमपूज्य अनन्तश्रीविभूषित करपात्रीजी स्वामीमहाराज यांच्या सान्निध्यात फलद्रूप झालीं गुरुवर्य श्रीकरपात्रीजी यांच्या सान्निध्यामुळें माझें श्रीक्षेत्र काशी येथील वास्तव्याचेंच न हे तर जन्माचेंहि सार्थक झाल्याचें मला समाधान लाभलें आहें माझ्या या कृतीचें सर्व श्रेय त्यानाच आहे 'सकाळ'च्या पत्र व्यवहारात एका गृहस्थानें पुण्यातील नगर वाचनालयाचें ग्रंथालय व इतरहि ग्रंथालयें शोधली त्याना या स्वरूपाचा ग्रंथ सापडला नाहीं, म्हणून त्यानीं आपला खेद व्यक्त केला होता त्याचें तें पत्रच या कृतीला निमित्त झालें आहे, म्हणून मी त्याना — नाव स्मरत नाहीं पण मन पूर्वक धन्यवाद देतों मला या कामीं ' डेक्कन कॉलेज रिसर्च इन्स्टिटयूट पूना ' या संस्थेचा फार उपयोग झाला ' काव्येषु नाटकं रम्यं तत्रापि च शकुन्तला, तत्रापि च चतुर्थोऽङ्क, तत्रश्लोकचतुष्टयम् ' असें जसें एका कवीनें म्हटलें आहे तसेंच मलाहि म्हणता येईल कीं, " देशेषु भारत श्रेष्ठ , महाराष्ट्रश्च भारते तत्रापि पुण्यनगर वर तत्रापि डेक्कनम् " नामैकदेशग्रहणे नाममात्र ग्रहणम् म्हणजे नावाचा एक अंश उच्चारला तरी सगळ्या नावाचा उच्चार केल्यासारखें होतें या न्यायानें वरील डेक्कन या शब्दाचा अर्थ डेक्कन कॉलेज एवढा होतो सर्व देशात भारत श्रेष्ठ आहे त्याचें वैदिक वाङ्मय आणि आध्यात्मिक संस्कृति हेंच त्याचें वैशिष्ट्य आहे भारतातहि महाराष्ट्र श्रेष्ठ आहे ' माझा मराठाचि बोलु कवतिकें । परी अमृतातेंहि पैजा जिंके ' अशी महती ज्या प्रदेशातील भाषेची श्रीज्ञानेश्वरमाउलीनें गाइलेली आहे, त्या महाराष्ट्र प्रदेशाचें महत्त्व कांहीं आगळेंच आहे त्यातहि पुण्यनगरी महाराष्ट्राचा अलंकार आहे विद्यावैभवानें भारताचेंच नव्हे, तर जगाचेंहि मन तीं आपल्याकडे खेचून घेत आहे त्या पुण्यनगरींतहि डेक्कन कॉलेज ही संस्था

आपलें असाधारण बुद्धिवैभव विश्वाच्या प्रतीतीला आणून देत आहे या डेक्कन कॉलेजच्या ग्रंथसंग्रहाचा मला फार उपयोग झाला शरदृतूतील पूर्ण चंद्राची चंद्रिका ही जशी चंद्रविकाशी कमलांना प्रफुल्लित करते त्याचप्रमाणें जिज्ञासू जनांच्या बुद्धीला विकसित करणारें येथील विद्वज्जनांचें सान्निध्यहि मला फार उपकारक झालें यामुळें मी डेक्कन कॉलेज या संस्थेचा आणि तेथील विद्वज्जनांचा ऋणी आहे

माझा हा ग्रंथ केसरी संस्थेनें जर मनावर घेतलें नसतें तर मी वाचकवर्गाच्या हातीं केव्हां देऊं शकलों असतों याचा मला संदेहच आहे याला कारण विशेषेंकरून माझी आर्थिक परिस्थिति हेंच होय मुद्रणक्षेत्रात पाऊल टाकल्यापासून आलेले अनुभव जमेस धरता मला असें निश्चित म्हणता येईल की, केसरी संस्थेचें जर पाठबळ नसतें तर मला हा ग्रंथ वाचकवर्गाच्या हातीं पोहोंचविणें फारच अवघड गेलें असतें विशेषेंकरून श्री जयंतराव टिळक, संपादक 'केसरी' आणि श्री भाऊसाहेब मोडक, विश्वस्त 'केसरी' संस्था या उभयतांनीं माझ्याकडे ज्या आपुलकीनें पाहिलें त्याबद्दल मी या दोघांचाहि अत्यंत ऋणी आहें आणि केसरी संस्थेचा आभारी आहें जॉबवर्क विभागाचे प्रमुख श्री भास्करराव कुलकर्णी आणि व्यवस्था विभागाचे प्रमुख श्री क नि चित्रे यांनीं या ग्रंथाला उत्तम कागद, उत्तम छपाई, उत्तम बाइंडिंग इत्यादि रूपानें जें सौष्ठव निर्माण केलें त्याबद्दल त्यांचें मन पूर्वक आभार मानतों

श्रीमंत सरदार सदाशिवराव फुलंब्रीकर यांच्या प्रेरणेनें श्री केशवराव देशपांडे यांनीं सौन्दर्यलहरीकरिता श्रीललितामहात्रिपुरसुंदरीचें जें सुंदर चित्र तयार करून दिलें तें मी या भागात सौंदर्यलहरीचा अंतर्भाव न झाल्यामुळें देऊं शकलों नाहीं तें दुसऱ्या भागात वाचकांना सादर केलें जाईल सदर चित्राबद्दल त्यांनीं माझ्याकडून कांहींहि मूल्य घेतलें नाहीं या त्यांच्या औदार्याबद्दल मी त्यांना मन पूर्वक धन्यवाद देत आहें श्रीगुरुदेव आर् डी रानडे यांचे अनन्यभक्त श्री ग वि तुळपुळे, एम् ए, सांगली यांनीं या ग्रंथाला साजेशी प्रस्तावना लिहून वाचकवर्गाला भक्तिमार्गाचें व अध्यात्ममार्गाचें जें मार्गदर्शन केलें आहे त्याबद्दल मी व्यक्तिश व वाचकवर्गातर्फेहि त्यांचें मन पूर्वक अभिनंदन करतों अध्यात्मविद्या परिषद् सांगली या संस्थेनें आगाऊ तीनशें रुपये देऊन या ग्रंथाच्या मुद्रणाला प्रोत्साहन दिल्यामुळें मी या संस्थेचा आभारी आहें.

अध्यात्मविद्या परिषदेचा व माझा पुरातन ऋणानुबंध लक्षात घेऊन मी हा ग्रंथ त्या संस्थेचें नववें प्रकाशन म्हणून प्रकाशित करीत आहें. या ग्रंथावर अभिप्राय देणा या थोर विद्वज्जनांनीं वेळात वेळ काढून हा ग्रंथ वाचला व आपला अभिप्राय दिला याबद्दल मी त्या सर्व विद्वज्जनाचा अत्यंत ऋणी आहें. नाशिकचे ब्रह्मीभूत श्रीगजानन महाराज गुप्ते याचे अनन्य भक्त व परम शिष्य, माझ्यावर अत्यंत प्रेमानें लक्ष ठेवून मला हें लिहिण्याला प्रोत्साहन देणारे योगिराज दादामहाराज आवेकर याचा ऋण निर्देश करणें हें माझें कर्तव्य समजतों. डॉ. व. ग. राटूरकर यांनीं वेळोवेळीं उपयुक्त सूचना केल्याबद्दल मी त्यानाहि धन्यवाद देतों.

श्रीदक्षिणामूर्तीचे छायाचित्र दिल्याबद्दल श्रीमंत आबासाहेब मुजुमदार, पुणें आणि प. बाळशास्त्री हरदास नागपूर या उभयतांना मी धन्यवाद देत आहें. श्रीमंत हिज हायनेस राजेसाहेब व श्रीमंत सौ. मा. राणीसाहेब सांगली यांनीं या ग्रंथाच्या अर्पणाचा स्वीकार केला याबद्दल व या ग्रंथाला पुरस्कार म्हणून दिलेल्या ५०१ रुपयांच्या देणगीबद्दल त्यांचें अभीष्ट चिंतून त्यांना मी मनःपूर्वक धन्यवाद देत आहें.

आता राहिले परमेश्वराचे आभार. ते मी कोणत्या शब्दानें प्रगट करूं ! त्या दयाघनाच्या अनुग्रहाला प्रकट करण्याकरिता माझ्याजवळ शब्दच नाहींत. तो स्वतः जसा अनिर्वचनीय आहे तसाच त्याचा अनुग्रहहि अनिर्वचनीय आहे. परमेश्वरानेंच या ग्रंथाच्या लेखनाला स्फूर्ति दिली व ग्रंथाचें लेखन पूर्णहि करून घतलें. १२ जुलै १९६१ चा तो पुण्याचा जलप्रलय ज्यांनीं ज्यांनीं पाहिला त्यांना त्याचें विस्मरण होणें शक्य नाहीं. पुणें शहरातील काहीं भागाबरोबर कसरी सरपेलाहि महापुरानें तडाखा दिला. त्या महापुरात या ग्रंथाची मुद्रणप्रत सापडलली होती पण पाण्यात असूनहि पाण्याचा तिला स्पर्श होऊं न देता ती परत माझ्या हातीं दिली ! या घटनेबद्दल मी त्या सच्चिदानंदघन प्रभूचा नितांत ऋणी आहें. अशीच त्याची अनुग्रहदृष्टि सतत सर्वांवर असावी अशी अनन्यभावानें प्रार्थना करून हें हृद्गताचें लेखन पूर्ण करतों.



# प्रस्तावना

म म न्यायाचार्य पंडित पांडुरंगशास्त्री गोस्वामी यानीं प्रस्तुत 'सुबोध स्तोत्रसंग्रह' या रूपानें श्रीमच्छंकराचार्यांची बरींच सुंदर, भक्तिज्ञानमय, काव्यपूर्ण स्तोत्रें प्रकाशित केलीं आहेत, यानें भाविक मराठी वाचकांना अत्यंत समाधान वाटेल, यांत शंका नाहीं अशा ग्रंथाची फार आवश्यकता होती आचार्यांच्याविषयीं परमादर असलेल्या अनेक वाचकांना, संस्कृत भाषेचें सखोल ज्ञान नसल्यानें, त्यांच्या स्तोत्रांतील ज्ञानभक्तीचा लाभ घेतां येत नाहीं पुष्कळांना यांतील कांहीं लोकप्रिय स्तोत्रें पाठहि असतात; परंतु त्यांचा पूर्ण अर्थ कळणें कठीण पडतें अशा वाचकांचीच केवळ न हे, तर चांगल्या सुविद्य, संस्कृतज्ञ वाचकांचीहि मोठी सोय या ग्रंथामुळें झाली आहे कारण शास्त्रीबुवानीं स्तोत्राचा केवळ शब्दार्थ दिला नाहीं, त्यावर मराठी भाष्यच केलें आहे, असें म्हणण्यास हरकत नाहीं अशा भाष्यामकट महत्त्वाची स्तोत्रें एकत्र हातीं येणें ही वाचकांना फार उपकारक गोष्ट आहे

आपल्या धर्मांत स्तोत्रें, ख्रिश्चन धर्मांत साम्स (Psalms) इत्यादि ईश्वराच्या गुणाचें भक्तिभावानें वर्णन करणारीं काव्यें, प्राचीन काळापासून प्रचारांत व लोकांच्या मुखीं आहेत नामदेव तुकारामाचे अभंग, समर्थांचे मनाचे श्लोक, भूपाळ्या, आरत्या हीं लिखाणेंहि याच स्वरूपाचीं आहेत तीं अत्यंत लोकप्रिय असून भाविकांच्या नित्य पाठांत आहेत त्यांच्या पारमार्थिक जीवनाला त्यांचा मोठा आधार आहे पहाटेच्या शांत, मंगल वेळीं अशीं स्तोत्रें भक्तिभावानें गाइलेलीं कानीं पडलीं कीं काही काळ तरी अंत करण ईश्वरप्रेम, कृतज्ञता इत्यादि उदात्त भावनांनीं भरून यतें, याविषयीं विशेष मतभेद बहुधा नसेल आचार्यांच्या स्तोत्रांत उत्कट भक्तीबरोबर उच्च वेदांताचेंहि लीलेनें विवेचन केलेलें आहे त्यामुळें त्यांना एक आगळेंच मूल्य आलेलें आहे तेव्हा अशा स्तोत्रांचें साधकाच्या पारमार्थिक जीवनांत नेमकें स्थान कोणतें, साक्षात्कारमार्गाला त्यांचा काण या प्रकारें उपयोग होतो, याविषयीं कांहीं विचार वाचकांच्यापुढें ठेवणें उपयुक्त होईल असें वाटतें आपण जें दीर्घकाल करीत आलों त्याचें मर्म तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें समजलें, तर तेंच कार्य अधिक उपयुक्तपणें करता येतें व लाभदायक होतें जीवनांतील सर्व अनुभवांना शास्त्रीय स्वरूप देण्यांत हाच

हेतु असतो कृषिशास्त्र निर्माण होण्यापूर्वी अनेक शतकें शेतकी केली जात होतीच, परंतु त्या शास्त्रानें ती अधिक लाभदायक व निश्चित केली आहे.

'मानवी मन अखंड, अविभाज्य आहे, त्याचे बौद्धिक, नैतिक, आध्यात्मिक घटक अगदीं तुटक वेगळे करता येणार नाहीत मनुष्याच्या मानसिक विकासाच्या दृष्टीनें बुद्धि, भावना व कर्मशक्ति ( will ) अगदीं अलग करतां येणार नाहींत,' असें गु रानडे यानी आपल्या 'उपनिषद् रहस्या'त म्हटलें आहे *साक्षात्कारप्राप्तीसाठीं या तिन्ही शक्तींची वाढ व्हावी लागते* शिवाय प्रतिभा या अविकसित शक्तीचा नामस्मरणाच्या साधनानें विकास होणें अत्यंत अवश्य आहे प्रतिभेच्या विकासाशिवाय ईश्वर दर्शन अशक्य आहे त्याप्रमाणें पारमार्थिक जीवनात या चारहि शक्तींची वाढ होणें अवश्य आहे आणि या दृष्टीनेंच परमार्थ-मार्गाची योजना पूर्व-सूत्रानी केली आहे यात भावनाचा विकास करण्याचें कार्य स्तोत्राकडून सर्व प्रकारें होतें आचार्यांच्या स्तोत्रात भावनाबरोबर बुद्धि प्रगल्भ करण्याचीहि योजना आहे साधकाची तत्त्वज्ञानाची भूमिका सुदृढ करून त्याच्या बुद्धींतील गोंधळ स्तोत्रें दूर करतात, त्याच्यामुळें भक्तिभावाचा विकास होतोच स्तोत्रें तात्त्विक ग्रंथाप्रमाणें नुसती वाचली जात नाहींत, त्याचा केवळ अभ्यास केला जात नाही, त्याचें नित्य पठण होतें. अर्थात् न कळत त्याचें सतत चिंतन होतें आणि त्यामुळें त्यातील विचार अत करणात ठसून, बुद्धि व भावना याच्या विकासाला साह्य होतें

आपल्या गीतेवरील ग्रंथात गु रानडे यानी चिंतनाचे तीन प्रकार सागितले आहेत :– ( १ ) ईश्वराच्या गुणधर्मांचें चिंतन ( २ ) सद्गुणाचें चिंतन व ( ३ ) साक्षात्काराची प्राप्ति करून देणारें चिंतन अर्थात् नामस्मरण या मार्गांनी मनुष्याच्या बुद्धि, भावना, कर्मशक्ति व प्रतिभा या सर्वांचा विकास होऊन साक्षात्कार होतो म्हणून या ग्रंथराजाचा थोडा विस्तारानें विचार करण्याचें योजिलें आहे या पार्श्वभूमीवर, स्तोत्राचें परमार्थ साधनात नेमकें स्थान कोणतें व साधकानें त्याचा कसा उपयोग करून घ्यावा, हें समजण्यास सोपें होईल *पहिल्या दोन चिंतनानीं प्रत्यक्ष साक्षात्कार होणार नाहीं* परंतु, ईश्वराच्या गुणचिंतनानें भक्तिभाव वाढेल वेदान्तपर विचाराच्या चिंतनानें त्याच्या सगुण-निर्गुण स्वरूपाची स्पष्ट कल्पना होऊ लागेल आणि या गोष्टी नामस्मरणाला व शेवटी मोक्ष प्राप्तीला उपकारक ठरतील, त्याचप्रमाणें सद्गुण-

भक्तिच प्रतिपादिली आहे, परतु याचा अर्थ भक्ति व ज्ञान यात विरोध आहे, असा मात्र नाही केवळ ज्ञानच काय पण कर्म व ध्यानहि भक्तीला पूरक आहेत असो धर्म म्हणजे देवाशीं मानवाचें प्रत्यक्ष जिव्हाळ्याच नातें अशी धर्माची व्याख्या करून, गु रानडे यानीं तत्त्वज्ञान व हा सत्य धर्म परस्पराना पूरक आहेत, हें दाखविलें आहे "भ्रममूलक अधश्रद्धा आणि सशयवाद या दोन्ही दोषापासून सत्य धर्म दूर राहिला पाहिजे आणि हें कार्य तत्त्वज्ञान साधू शकेल गु रानडे एकदा म्हणाले "तत्त्वज्ञान हें परमार्थाच्या शेताला घातलेलें कुपण आहे भ्रामक समजुतीची मोकाट गुरें त्या शेतात शिरू नयेत, म्हणून असें कुपण अवश्य आहे ' या विधानाची सत्यता सहज पटण्यासारखी आहे तत्त्वज्ञानाच्या अभ्यासानें श्रद्धेंत डोळसपणा न आल्यानें धर्म या नावाखाली किती आधळेपणा, वेडगळपणा व धूर्ताकडून भोळ्याची फसवणूक चालू आहे, हें वरवर पहाणारालाहि दिसून येईल त्याच प्रमाणें परमार्थसाधनानें काय साधावयाचें, याचेंच ज्ञान नसल्यामुळें होणारा गोंधळहि समजू शकेल आत्मविद्येच्या अभ्यासाविषयीं गु रानडे म्हणतात, "ईश्वरावर प्रेम असावें यासाठीं त्याचें स्वरूप बुद्धीनें निश्चित करून घेणें अवश्य आहे यासाठीं अध्यात्मविद्येचा अभ्यास केला पाहिजे ' साराश शब्दज्ञान व बुद्धि ही ईश्वरप्राप्तीची प्रत्यक्ष साधनें नसली, तरी परमार्थसाधनाचीं उपागें आहेत त्याची उपेक्षा परमार्थाला अपायकारक ठरेल प्र यक साधकाला भक्तीबरोबर कर्म ज्ञान ध्यान याचा अवलब करावाच लागतो प्रकृतिधर्मानुरूप यापैकीं एकेकावर एकेकाचा भर असतो. त्यावरून कर्म योगी ज्ञान योगी वगैरे नावें दिलीं जातात ह चार मार्ग अलग, स्वतत्र नाहीत त्या सर्वाचा मिळून भक्तिप्रधान पथराज झालेला आह आणि तोच साक्षात्काराच्या म्हणजेच प्रत्यक्ष, अपरोक्ष ज्ञानाच्या गावीं पोहोंचवितो म्हणून आचार्यांनीं आपल्या स्तोत्रात, ज्ञान भक्ति-ध्यान याचा मधुर त्रिवेणीसगम केला आहे

भक्तीशीं ध्यानाचा कशा प्रकारचा सबध येतो? आचार्यांनीं ध्यान ह ईश्वरप्राप्तीचें साधन आहे असें म्हटलें आहे 'परतरे चेत समाधीयताम् ।' (पृष्ठ ८७–५), 'भक्त्यैकाग्र्यध्यानपरा' (पृष्ठ १८१–५), 'ॐ इति चित्त हृदि रुद्ध्वा' (पृष्ठ १८१–६) 'ध्यात्वात्मस्थम्' (पृष्ठ१८२–७) ही स्थळें उदा हरणार्थ दाखविता येतील भक्ति व ध्यान याच्यासबधाचा विचार करताना, भक्ति

व ध्यान यांचें स्वरूप काय हें प्रथम पाहिलें पाहिजे. गु. रानडे यांनी परमार्थमार्गाचें उत्कृष्ट तात्त्विक विवेचन केलें आहे. त्यांच्या अनुरोधानें या विषयाचा मी परामर्श घेणार आहें. सामान्यतः भक्तीचे सर्व आचार पूजा, पोथी, मानसपूजा, नामस्मरण, ध्यान त्याचप्रमाणें अन्तःकरणांतील ईश्वरप्रेम या सर्वांचा भक्ति या शब्दांत समावेश केला जातो, परन्तु प्रधान, सारभूत भाग कोणता आणि गौण उपांगभूत भाग कोणता हें पहावयाचें आहे. भक्तीचें ध्येय ईश्वराशीं ऐक्य पावणें, अभेद हें होय. या दृष्टीनें भक्ति म्हणजे काय गु. रानडे सांगतात, " भावाची साक्षात्काराला अगदीं मूलगामी, सर्वांत अधिक आवश्यकता आहे. ज्याचा अर्थ आजपर्यंत कोणी सांगितला नाहीं व सांगतां येणार नाहीं, असें ईश्वराबद्दल नितान्त प्रेम म्हणजे भाव किंवा भक्ति. आपल्या भक्तीनें शरणागतीची भावना निर्माण झाली पाहिजे. ईश्वराच्या इच्छेनें होईल तें होतें, अशा वृत्तीनें सर्व हवाला ईश्वरावर सर्वस्वी टाकल्यावांचून, परमार्थांत विशेष यश येणें शक्य नाहीं, असें गीता बजावते. ' तमेव शरणं गच्छ सर्वभावेन भारत ' (गीता १८–६२) केवळ अनन्य भक्तीनेंच ईश्वराला जाणणें, पहाणें, त्यांत प्रवेश करणें शक्य आहे (गीता ११–५४) आपल्या भक्तीनें ईश्वराचें अन्तःकरण हाललें पाहिजे " (भ. गीता साक्षात्कारदर्शन, पृष्ठ २३८–३९) हेंच ज्ञानेश्वरांच्या आधारानें त्यांनी स्पष्ट केलें आहे. ' देव-भक्तामध्यें ऐक्य होण्याला प्रथम शरणागति पाहिजे ' तत्त्वज्ञानाच्या दृष्टीनें शरणागति म्हणजे ऐक्य किंवा अभेद. बायबलमध्यें देवानें सांगितलें आहे, ' मला शरण ये, म्हणजे तुझें माझ्याशीं ऐक्य होईल ' अहंभाव पूर्णतः नष्ट झाला पाहिजे, तरच साक्षात्कार-प्रधान ऐक्य होईल

' सुवर्णमणि सोनियां । कीं कल्लोळ ये पाणियां ।
तैसा मज धनंजया । शरण ये तूं ॥
मजहि शरण रिघिजे । आणि जीविलेचि अभिजे ।
धिगबोली धिया न लजे । प्रज्ञा केरि ॥
तुझें पापपुण्य । मीचि होईन ॥
येतुलें नि आपैसया । सुटलाचि आहासि धनंजया ।
याकारणें पुढती । आधीं न यावें चित्तीं ।
मज एकाचि ये सुमति । जाणोनि शरण ॥

– ज्ञानेश्वरी, १८–१४०१–६

भक्तीची पराकोटि म्हणजे शरणागति साध्य झाल्यावाचून साक्षात्कार म्हणजेच अद्वैत ज्ञान शक्य नाहीं आत्मषट्क, आत्मपंचक आणि निर्वाण मंजरी ( पृष्ठ १५० ते १६१ ) यामध्यें किंबहुना वेदान्तपर प्रत्येक स्तोत्रात आचार्यांनी जीवाचें ब्रह्मत्वच अनेक प्रकारानीं वर्णिलें आहे ध्येयाचें स्वरूप सतत साधकाच्या अतरीं जागृत रहावें हा त्याचा हेतु आहे त्या अवस्थेची प्राप्ति मात्र अनन्यभक्तीनेंच होणार आहे, अपराध क्षमापन ( पृष्ठ २०–२५ ), अन्नपूर्णा ( पृष्ठ ३३–३८ ), षट्पदी ( पृष्ठ ४५–४७ ) या स्तोत्रात व इतरत्रहि आचार्यांनी ही शरणागतीची भावना आर्ततेनें व्यक्त केली आहे त्यात करुणा, वात्सल्य, नम्रता, कृपायाचन या सर्व भावना दृष्टीस पडतात यावरूनहि स्पष्ट दिसतें कीं, भक्ति व ज्ञान यात विरोध किंवा सवते सुभे नाहींतच उलट त्याचा सगमच झाला पाहिजे गु रानडे वयाच्या २३ व्या वर्षी, इ स १९०८ मध्यें काशीक्षेत्रीं आचार्यांच्या मठात गेले तेथ आचार्यांच्या स्तोत्राचा पाठ चालू होता तो ऐकून त्याच्या मनात विचार आला, 'या केवलाद्वैती आचार्यांचा इतक्या भक्तिपूर्ण स्तोत्राशीं कसा काय सबध येतो?' परमार्थ साधन तत्त्वज्ञानाचा अभ्यास व उच्च साक्षात्कार यामुळे गुरुदेवाचें या विषयावरील मत कसें पूर्णत बदललें, हें मागील विवेचनावरून दिसून येईल. महाराष्ट्रातील सताची अनन्यभक्ति आणि त्याबरोबरच त्याची अद्वैतसिद्धान्तावरील श्रद्धा, हें डॉ भाडारकर व काही पाश्चात्य तत्त्वज्ञ याना एक कोडेंच वाटे, असें गुरुदेव सागत असत

अशी ऐकातिक भक्ति साध्य करण्याचा उपाय म्हणजे ध्यान, नामस्मरण, असा ध्यान व भक्ति याचा सबध आहे आचार्यांनीहि ॐकाराचें ध्यान सागितलें आहे 'ओमिति चित्त हृदि रुद्ध्वा'। ( पृष्ठ १८१–६ ) यात भक्ति योग व ध्यानयोग याचा समन्वय आहे भक्तीची प्रयत्नपूर्वक वाढ करण्यासाठीं ध्यान अवश्य आहे भक्ति म्हणजे ईश्वरावर प्रेम, त्याचें प्रेमपूर्वक स्मरण तें प्रथम सहज प्रयत्नाशिवाय होऊ शकत नाहीं कारण साधकाच्या अत करणात ईश्वरप्रेमाबरोबर इतर अनेक विषयावर प्रेम असतेंच साधकावस्थेच्या आरभीं तर विषयप्रेमच प्रबळ असून भक्ति अ यल्प असते भक्तीचा लहानसा स्फुलिंग विझू न देता फुलविणें अवश्य असतें तें शक्य तितक्या एकाग्रतेनें नामस्मरण केल्यानें साधतें 'आठवतो ब्रह्म नाठवतो भवभ्रम' जोंपर्यंत नामाचें

स्मरण आहे तोंपर्यंत मन, जीव ब्रह्मरूप आहे, त्याचें विस्मरण झालें कीं त्यात माया भरते एकाचें स्मरण म्हणजे दुसऱ्याचें विस्मरण, इतका ब्रह्म व माया, शिवभाव व जीवभाव यात विरोध आहे भक्ति वाढविण्यासाठीं विषयाचा विसर पडला पाहिजे हें कार्य नामस्मरणाशिवाय पद्धतशीरपणें होणें शक्य नाहीं ज्याचें आपण स्मरण करतो, तेंच आपलें जीवन, तेंच मनात भरतें Man is what he Thinks किंवा 'आवडे तें वृत्ति किरीटी। आधीं मनींनीचि उठी। मग वाचा दिठी। करांसी ये ॥' अखड नामस्मरण करून विषयाचा विसर पडला पाहिजे म्हणजेच एकातिक भक्ति साध्य होईल या प्रक्रियेंत विषयाचा व विकाराचा नाश अतर्भूत आहेच

येथें नामस्मरणानें येणाऱ्या आत्मानुभवाचा थोडा विचार करणें अवश्य आहे कारण नामस्मरण व आत्मानुभव याचा ध्यानाशीं फार निकट सबध आहे विषयाचा पूर्ण विसर पडण्याइतकी चित्ताची एकाग्रता नुसत्या नामस्मरणानें दीर्घकाळ होऊ शकत नाहीं ध्यानप्रक्रियेंत आनद निर्माण झाला पाहिजे मग त्या आनदात मन मग्न होऊन दीर्घकाळ देवाशीं सहज एकरूप होता येतें, विषयाचा विसर पडतो हा आनद आत्मानुभवापासून मिळतो आत्मानुभव आणि आत्मानद एकच आहेत, तो अनुभव आहे तेथें आनद असतोच आत्मानदानें मन हळूहळू विषयाबाहेर येतें, ईश्वरात प्रवेश करू लागतें व असें होत होत शेवटीं विषयातून पूर्णत बाहेर निघून ईश्वरात प्रवेश करतें व ईश्वरच होतें, असें ज्ञानेश्वरानीं उत्कृष्ट रीतीनें दाखविलें आहे श्रीकृष्ण अर्जुनाला सागतात, "तुझें मन एकदम माझ्या ठिकाणीं अर्पण करणें तुला शक्य होत नसेल, तर रोज थोडा वेळ माझें चिंतन कर म्हणजे तुला माझ्या सुखाचा (अर्थात् आत्मानुभवाच्या किंवा साक्षात्काराच्या आनदाचा) अनुभव येईल" 'मग जेतुलें निमिख। देखेल माझें सुख। तेतुलें अरोचक। विषयीं घेईल ॥ ऐसा भागा आतूनि निवता। मजमाजीं रिघता। हळूहळू पडुमुता। मीचि होसी ॥' योगतारावलींत आचार्यांनीं नादानुसधानासबधीं अशीच प्रक्रिया सागितली आहे नामस्मरणानें तेज, वर्ण, रूप, नाद इत्यादि प्रातिभ अनुभव येतात, हें परमार्थप्रेमी वाचकाना ठाऊक आहेच हे सर्व सच्चिदानदस्वरूप आत्म्याचे, ईश्वराचे आविष्कार आहेत तेव्हा वर सागितल्याप्रमाणें अनुभवाच्या प्रमाणात त्यात आनद असतोच यात नादाचें अनुसधान करावें, नादाकडे

एकाग्रतेनें, आनदानें लक्ष धारें त्यानें मन विष्णुपदीं लीन होईल, प्रभात लीन होईल, असें आचार्यांनीं सांगितलें आहे 'नादानुसधान नमोऽस्तु तुभ्य। त्वा साधन तत्त्वपदस्य जाने। मनत्प्रसादात्पवनेन साक। विलीयते विष्णुपदे मनो मे॥' यो ता ४

नादानुसधानाप्रमाणें स्वरूपानुसधानासहि आचार्यांनीं फार महत्त्व दिलें आहे स्वरूपदर्शन हा फार महत्त्वाचा अनुभव आहे त्याचें अनुसधान म्हणजेच भक्ति असें आचार्य सांगतात 'मोक्षसाधनसामग्र्या भक्तिरेव गरीयसी। स्वस्वरूपानुसधान मक्तिरित्यभिधीयते॥' येथें ध्यान किंवा अखड स्मरण हेंच उत्कृष्ट भक्तिसाधन असें प्रतिपादिलें आहे त्यापासून ऐकान्तिक भाव, शरणागति, ब्रह्मभाव यांची क्रमानें प्राप्ति होते कारण जीवभाव क्रमानें कमी कमी होत पूर्णत नष्ट होतो व केवळ ईश्वरच उरतो समर्थ सांगतात 'सकल धर्मांमध्यें धर्म। स्वरूपीं रहाणें हा स्वधर्म॥ हेंचि जाणिजे मुख्य धर्म। साधुलक्षणाचें॥' स्वरूपीं रहाणें म्हणजेच स्वरूपानुसधान किंवा पातजलयोग सूत्र ? मध्यें सांगितलेलें 'स्वरूपानुसधान'। 'परा पूजा' या चमत्कृतिपूर्ण स्तोत्राच्या शेवटच्या श्लोकात (पृष्ठ १३७) आचार्यांनीं 'सर्वावस्थासु सर्वदा। एकबुध्या तु दवेशे' करावयाची परा पूजा, ऐक्यरूप परा पूजा, वर्णिली आहे, परा पूजा म्हणजे स्वरूपानुसधानच तो समर्थांचा स्वधर्म, तीच आचार्यांची भक्ति आचार्यांच्या नादानुसधानाप्रमाणेंच समर्थांचे स्वरूपानुसधानावरील विचारहि चिंतनीय आहेत दोन्ही प्रक्रियात ईश्वरानुसधानच होत असतें 'लागे स्वरूपानुसधान। नाठवे देहाभिमान। विश्रांतीते देखें मन। तद्रूप होय॥ तेथें मन पांगुळलें। आपणासि विसरलें। आपणासि भुलोनि गेलें। स्वरूपबोधें॥ मी कोण हें नकळे। अवघा आत्माचि मवळे। तेणें बळे मन मावळे। कर्पूरन्यायें॥ नको वक्तृत्व उपाधि। पांगुळली स्वरूपीं बुद्धि। लागली सहज समाधि। हेतुरहित॥ गुरुशिष्य एक झाले। अनुभव डोहीं बुडाले॥'

गु रानडे यांनीं सन १९१८ मध्यें 'चित्रमयजगता'त आचार्यांच्या 'योगतारावलीं'वर एक लेख लिहिला होता त्यातील काहीं उतारे खालीं देत आहें त्यावरून भक्ति ज्ञान, ध्यान व अनुसधान यांचें परमार्थांत किती महत्त्व आहे व त्याचें परमार्थांत कोणतें स्थान आहे, हें प्रत्येक साधकानें जाणून घेणें कसें अवश्य आहे तें दिसून येईल यासाठींच वरील विषयाच वर विशेष

विस्तारानें विवेचन केलें आहे ' सर्वसाधारणपणें ज्यानीं ज्यानीं म्हणून शंकराचार्यांच्या तत्त्वज्ञानाचा अभ्यास केला आहे, त्यास असें वाटतें कीं, त्याचें अद्वैत हा केवळ बुद्धिगम्य विषय असून, त्याचा प्रत्यक्ष अनुभव येण्यास पायरी पायरीनें आत्मसाक्षात्कार करून घेण्याची जरूर नाहीं वेदांताच्या मुख्य ध्येयाचा स्वत या बुद्धीनें ठाम निश्चय करून घेता येण्याजोगा असून राजयोगादिकांची वेदान्त सिद्धांतास जरूर नाहीं, असें पुष्कळांना वाटतें आचार्यांची केवळ प्रस्थानत्रयीच ज्यानीं वाचली आहे, त्यास शंकरार्यांनीं स्वत साक्षात्कार करून घेण्यासाठीं ज्या पिपीलिका मार्गाचें अवलंबन केलें, तो मार्ग फारसा माहीत नसतो अद्वैत साक्षात्काराच्या प्राप्तीच्या मार्गासंबधानें पुष्कळांच्या मनात चुकीच्या कल्पना भरलेल्या आहेत .. आपण ब्रह्म आहों, अशी केवळ बुद्धीच्या निश्चयानें आपली भ्रामक समजूत करून घेऊन, अद्वैताच्या प्रत्यक्ष अनुभवाचा मार्ग कोणता हें पहाण्याच्या भानगडींत लोक पडत नाहींत अद्वैतानुभवाच्या परमावधीस पोहोंचलेलें आचार्य आपल्या साधकस्थितींत कोणत्या मार्गानें गेले हें समजण्याला प्रस्थानत्रयीपेक्षांहि योगतारावली' अधिक उपयोगी पडेल योगतारावली हें त्याचें साधकदशेंतील आत्मचरित्रच होय स्वत आत्मसाक्षात्कार करून घेण्याला आचार्यांना हा नादानुसंधानलयच उपयोगी पडला असावा अद्वैतसाक्षात्कार होण्याकरिता केवळ बौद्धिक मार्गाचें अवलंबन न करता आचार्यांस सुद्धा राजयोगमार्गानेंच आत्म साक्षात्कार करून घेणें भाग पडलें ' ( रा द रानडे ) आचार्यांनीं आपले ग्रंथ लोकांना साक्षात्काराकडे प्रवृत्त करण्यासाठींच लिहिलें म्हणून साक्षात्कारमार्गाची प्रस्तावनेंत काहींशी प्रदीर्घ चर्चा केली आहे ✓

प्रस्तुत ग्रंथात ( पृष्ठें १३८–४१ ) स्वरूपानुसंधान हें प्रकरण आहे त्यात स्वरूपाची लक्षणें दिलीं आहेत त्या लक्षणाचें, गुणधर्माचें चिंतन म्हणजे स्वरूपानुसंधान नव्हे नादाप्रमाणें स्वरूपाचा अपरोक्ष अनुभव आल्यावर त्याचें अनुसंधान करता येतें गु रानडे म्हणतात, " स्वरूपानुसंधान व नादानुसंधान यांबरोबर नामस्मरण करणें, हें फार महत्त्वाचें आहे परंतु थोडाफार आत्मानुभव असल्यावरच हें करता येतें वर सांगितल्याप्रमाणें स्वरूप व नाद हे आत्म्याचेच आविष्कार आहेत व त्याचें अनुसंधान म्हणजे आत्म्यानें केलेलें आत्म्याचें अनुसंधान होय या अनुसंधानात किंवा अनुभवात द्वैत नाहीं

येथें आत्माच ज्ञाता, आत्माच ज्ञेय ते हा हेंच आत्म ज्ञान किंवा स्व सवित् असें गु रानडे यानीं सागितलें आहे यात मन व प्राण याचा लय होतो

यामप्रमाणें भक्तीला ज्ञानाची व ध्यानाची जोड देणें अवश्य आहे कर्मानं चित्तशुद्धि होते, ते हा कर्माची जोडहि दिली पाहिजे असा हा भक्तीचा पंथराज तयार होतो वेदान्ताच्या अभ्यासानें बुद्धीला आत्म्याचें स्वरूप समजतें, प्रपचाचें वैयर्थ्य अत करणात ठसतें, अर्थात् नित्यानित्यविवेक दृढमूल होतो आणि ईश्वरप्राप्तीची ओढ उत्पन्न होते वेदान्तज्ञानाचें मुख्यत्वेंकरून हें कार्य आहे कर्म भक्ति ध्यान याच्या कार्याचें विवेचन वर झालेंच आहे साधन सुरू केल्यानतरहि विवेक जागृत ठेवावा लागतो कारण विषयप्रवृत्तीमुळें मनुष्याला देवाचें विस्मरण फार लवकर होतें म्हणून निष्काम कर्मे व श्रवण मनन निदिध्यास ' केलेचि करावे ' प्रत्यक्ष साक्षात्कार, नामस्मरण व स्वरूप-नादानुसधान यानींच वाढत जातो परतु निष्काम कर्मे व विवेक हीं या साधनाला उपयोगी व उपकारक आहेत

साधकजीवनाला उपकारक अशा या सर्व गोष्टींची योजना आचार्याच्या स्तोत्रात दिसून येते स्तोत्रें म्हणजे परमार्थातील भावगीतें, शास्त्रीय ग्रथ न हेत तरीहि आचार्यांची तात्त्विक दृष्टि तेथें आहेच साक्षात्कार हें ध्येय मनापुढें ठेवून, ती सहजपणें उत्स्फूर्त झालीं आहेत अत करण ज्ञान भक्तीनें भरून गेल्यामुळें तसेच उद्गार बाहेर आले आहेत ' अतरीचें धावें स्वभावें बाहेरी ' कर्माविषयीं त्यानीं विशेष लिहिलें नाहीं, तरी पृष्ठ ८१ श्लोक १, पृष्ठ ८६–२१ पृष्ठ ८५–५, पृष्ठ ११६–४ इत्यादि श्लोकात कर्माविषयीं अर्थपूर्ण विचार आले आहेत ज्ञानासबधीं आचार्यांचा मुख्य भर ब्रह्माचें अर्थात् आत्म्याचें, जीवाचें सत्यस्वरूप स्पष्ट करून, त्याच्या प्राप्तीचा प्रयत्न करा, इतर सर्वांचा त्याग करा, त्यावाचून नि यानद व शाश्वत शाति नाहीं, हें सागण्यावर आहे ज्याच्या प्राप्तीनें जीवन धन्य, दिव्य, आनदमय होईल तें तत्त्वज्ञान श्रेष्ट असेंच तत्त्वज्ञान, ऋषींच्या व स्वत च्या अनुभवाच्या भक्कम पायावर आचार्यांनीं माडलें आहे प्रस्तुत पुस्तकातील पृष्ठ १५० पासून पुढील सर्व स्तोत्रें व प्रकरणें मुख्यतः वेदान्तपर आहेत त्यावरील म म पाडुरगशास्त्रींचें भाष्य इतकें विस्तृत, विद्वत्तापूर्ण आणि उद्बोधक आहे कीं, त्याविषयीं येथें काहीं चर्चा करणें म्हणजे निरर्थक पुनरुक्ति होय म्हणून त्यापूर्वीच्या स्तोत्रात

साधकांना उपयुक्त असे जे विचार आहेत, त्यांचा थोडक्यांत निर्देश येथें करावयाचा आहे

गुर्वष्टक ( पृष्ठ १११ ) व अनात्मश्रीविगर्हण ( पृष्ठ १२५ ) या स्तोत्रांत आत्मसाक्षात्कार हेंच उच्चतम जीवनमूल्य, इतर सर्व तथाकथित जीवनमूल्यें क्षुद्र होत, आत्मसाक्षात्काराशिवाय जीवन धन्य, सफल होणार नाहीं, असें ओजस्वी, काव्यमय भाषेंत निःसंदिग्धपणें प्रतिपादिलें आहे यांत कनक-कांता कीर्ति या ईषणात्रयाचेंच वैयर्थ्य सांगितलें आहे असें नाहीं, तर वेदज्ञान, काव्य, सदाचार, दान, शौर्य, योगयाग, जपतप इत्यादिकानाहि आत्मसाक्षात्काराच्या तुलनेनें निरुपयोगी लेखलें आहे पाश्चात्य तत्त्वज्ञानांतील सत्य शिव सुंदर हीं आचार्यांच्या मतें सत्य जीवनमूल्येंच नव्हेत, आत्मसाक्षात्कार हें एकच सत्य मूल्य, हें प्रभावीपणें या दोन स्तोत्रांत दाखविलें आहे हाच नित्यानित्य विवेक किंवा सारासार विवेक तो आपल्या तेजस्वी, काव्यपूर्ण वाणीनें साधकाऱ्या अंतःकरणांत ठसविण्याचा प्रयत्न आचार्यांनीं केला आहे तो अशा काव्यमय भाषेंत सांगितला नसता, तर रुक्ष ठरला असता याच विषयाच्या भावात्मक भागाचा विचार धन्याष्टक ( पृष्ठ १४४ ), कौपीनाष्टक ( पृष्ठ ११९ ) आणि जीवन्मुक्तानंदलहरी ( पृष्ठ १४१ ) यांत आहे यांत आत्मसाक्षात्कारी पुरुषाचें वैभव चित्रित करून साक्षात्कारी पुरुषाची धन्यता सिद्ध केली आहे प्रसन्न वैराग्य, अहंकारादि सर्व विकारांचा नाश, पूर्ण समाधान, गाढ भक्ति, पूर्ण ज्ञान, परमानंद, शाश्वत शांति हीं साक्षात्कारी पुरुषाचीं लक्षणें येथें वर्णिलीं आहेत हींच लक्षणें आपल्या अंगीं यावींत, यांच्या तुलनेनें जगांतील सर्व वैभव तुच्छ आहे असें कोणत्या विवेकी पुरुषाला वाटणार नाहीं ? अशी ईश्वरोन्मुखता जागृत करण्याचें सामर्थ्य या स्तोत्रांत आहे पृष्ठें ११५–२, ११७–८, ११८–१० १२०–४, १४९–१७ हे श्लोक विशेष चिंतनीय, मनोहर, स्फूर्तिदायक आहेत अतज्ज्ञ मनुष्यानें रत्नांच्या खाणींतून रत्नें कशीं व किती निवडावींत म्हणून श्लोकांचा निर्देश करतानाहि भीति वाटते

वैराग्यपंचक ( पृष्ठ ९९ ), चर्पटपंजरिका ( पृष्ठ ९३ ) आणि द्वादशपंजरिका ( पृष्ठ १०१ ) यांत वैराग्याचा प्रभावी उपदेश आहे नित्यानित्य विवेकानें बुद्धींत सहज उत्पन्न होणारें वैराग्य, या स्तोत्रांच्या वाचन चिंतनानें

दृढमूल, स्थिर होईल यांत वैराग्याचें तपशीलवार प्रतिपादन असल्यामुळें त्याचें स्वरूप अधिक स्पष्टपणें ध्यानात भरतें

सर्व स्तोत्राचा या अल्पशा प्रस्तावनेंत परामर्श घेणें शक्य नाहीं अवश्यहि नाहीं साधक-जीवनात दिसून येणाऱ्या भक्तिप्रेम, तळमळ, उत्कंठा, अनुताप, निराशा, प्रसन्नता, मार्दव, वात्सल्य इत्यादि भावनाचें त्यात होणारें दर्शन घ्यावयाचें आहे

देव-देवींवराल सर्वच स्तोत्रें भक्तिमय आहेत त्यातहि दोन्ही अच्युताष्टकें ( पृष्ठें ५९–६४ ) व श्रीरामस्तोत्र ( पृष्ठ ७२ ) हीं विशेष भावनापूर्ण आहेत श्रीरामस्तोत्र श्लोक ७ ते १० विशेष उल्लेखनीय वाटतात 'आपल्या चिन्मय मुद्रेनेंच तू ज्ञानबोध करतोस. हे रामचंद्रा, माझ्या मृत्युसमयीं आपलें रूप तू मला दाखवशील ना ! माझ्या हृदयमंदिरात वास करून मला कृतार्थ कर कृपा कर मला ज्ञान दे' किती भावपूर्ण स्तवन आहे हे ! या स्तोत्रातील एक वैशिष्ट्य हें कीं, सर्व देवदेवींना सगुण निर्गुण रूपानीं वर्णिलें आहे नावें भिन्न असलीं तरी गुण व लक्षणें जणु एकरूपच आहे अच्युताष्टकात राम व कृष्ण यात काहींच भेद दाखविला नाहीं याचें कारणहि उघडच आहे शास्त्रीबुवानीं म्हटल्याप्रमाण, अद्वैतसिद्धान्तात देवताभेद नाहींत सर्व एकाच ब्रह्माचे आविष्कार आहेत मग त्याच्या लक्षणात भेद येण्याचें कारण काय किंवा उपास्य दैवताच्या संकुचित अभिमानानें सांप्रदायाचा अभिनिवेश उत्पन्न होण्याचें तरी कारण काय ? ज्ञानेश्वर म्हणतात, "देवाचा देव अनंत रूपानीं, अनंत वेषानीं मीं पाहिला " तसाच तो आचार्यानींहि पाहिला असेल श्रीकृष्णानें व हनुमानानें आचार्यांना प्रत्यक्ष दर्शन दिलें असें त्यानीं स्पष्टच म्हटलें आहे 'एकं सद्विप्रा बहुधा वदन्ति ।' हा अनुभव ज्याना आला त्या आचार्यांना देवताभेद कोठून उरणार ? अनेक नामानीं परब्रह्माचींच स्तोत्रें त्यानीं गाइलीं आहेत निरनिराळ्या देवताच्या उपासकासाठीं कदाचित् भिन्न भिन्न नावाची योजना केली असेल

देव्यपराधक्षमापनस्तोत्र अत्यंत हृदयस्पर्शी आहे त्यात भक्ताच्या हृदयातील तळमळ, अपूर्णतेची व अपराधाची जाणीव, स्वतःच्या प्रयत्नानीं त्यातून मुक्त होता येणार नाहीं ही खात्री, त्यामुळें पूर्ण शरणागति, मातेपेक्षाहि कृपाळु ईश्वर आपली उपेक्षा करणार नाहीं हा दृढ विश्वास, नितान्त प्रेम, परम कारुण्य, वात्सल्य, मदुमार, अत्यंत हृद्वारपणें अभिव्यक्त केले आहेत

भक्तीच्या भावगीताचा हा उत्कृष्ट नमुना आहे 'कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति', 'पर जाने मातस्त्वदनुसरण क्लेशहरणम्', 'क्षुधातृषार्ता जननीं स्मरन्ति', 'अपराधपरंपरावृत न हि माता समुपेक्षते सुतम्' इत्यादि चरणाचें मूल्यमापन कसें करावें? प्रत्येक भक्ताला अशा अवस्थेंतून जावें लागतें तेव्हाच अहकाराच्या पूर्ण नाशाला अवश्य ती शरणागति लाभते व भक्त देवावर सर्व कांहीं सोपविण्याला तयार होतो ही अवस्था प्राप्त झाल्यावर देव दूर नाहीं, असें गु रानडे सागतात हीच समर्थांची सह्य भक्ति सहृदय, विनम्र भक्ताला आपल्या भावनाचें प्रतिबिंब या स्तोत्रात दिसेल पृष्ठ २८ श्लोक ११ मध्यें अन्नपूर्णेजवळ मागितलेली ज्ञानवैराग्याची भिक्षा या वृत्तींतूनच निर्माण झालेली आहे पारमार्थिक जीवनाच्या पूर्ततेसाठीं देवाचीच कृपा भाकावी लागते षट्पदीस्तोत्रांतील श्लोक १, ३, ७ हेहि असेच हृदयगम आहेत त्यांतील नम्रता, भक्तिभाव आणि अद्वैतानुभवानतरहि प्रकट केलेला देव भक्तभाव, याकडे विशेष लक्ष वेधतें श्लोक ३ प्रसिद्ध आहे आणि 'भेदनिरासानतरहि देव भक्तभाव उरत असेल तर तें कसलें अद्वैत' असा आक्षेप त्यावर घेतला जातो त्याचें उत्तर गु रानडे यांच्या एका सिद्धान्तात सापडतें ते सागतात, 'भक्ताची देवाशीं एकरूप होण्याकडे सतत वाटचाल (approximation) सुरू असतें परतु देह असेपर्यंत पूर्ण ऐक्य होत नाहीं ज्ञानेश्वर म्हणतात त्याप्रमाणें, पौर्णिमेचा चद्र व चतुर्दशीचा चद्र एवढें अतर तरी देव व भक्त यात राहतेंच देह पडल्यावर मात्र पूर्ण ऐक्य होतें"

सत्यपि भेदापगमे नाथ तवाह न मामकीनस्त्वम् या आचार्यांच्या श्लोकात दिसणाऱ्या जीवन्मुक्ताच्या हळुवार भक्तीची उपपत्ति या सिद्धान्तानें लागते

अह ब्रह्मास्मि हें स्वानुभवानें जाणलें, पण मन व देह यांच्या मर्यादा असल्यामुळें ऐक्यात थोडें न्यून राहिलें तरी चित्ताला आनदमय ब्रह्माशिवाय दुसरा विषयच उरला नाहीं या परा भक्तीच्या अवस्थेंत भक्ति व ज्ञान म्हणजे साक्षात्कार एकरूप होतात स्तोत्रांतील भक्ति व ध्यान या विषयाची थोडी चर्चा मागें आलीच आहे उपदेशपचकामध्ये (पृष्ठ ८५) सर्व परमार्थ मार्गच सक्षिप्त रूपानें माडला आहे परमार्थांत प्रगति होऊं लागल्यावर, बाह्य सर्व सोडून साधक अतर्मुख कसा होत जातो, हें काशीपचकात (पृष्ठ ८८) दिसतें त्यांतील शेवटच्या श्लोकावरून तुकारामाच्या 'देह तो पढरी प्रेम पुंडलीक।

स्वभाव सन्मुख चंद्रभागा। विवेकाची वीट आत्मा पंढरीराव। जेथें तेथें देव ठसावला॥' या चरणाचें स्मरण होतें. असो, आचार्यांच्या स्तोत्रांत भक्ति भाव, शरणागति, दोषांची जाणीव, अपराध क्षमापन, वात्सल्य, निर्वेद इत्यादि साधकाचे सर्व मृदु भाव आहेत तरी त्यांचा विद्वत्तत्त्वज्ञानी भक्तांचा असल्यामुळें शांति, प्रसन्नता, गांभीर्य, आत्मविश्वास हे त्यांच्या काव्याचे स्थायी भाव आहेत, असें म्हणावें लागेल. कौपीनपंचक, जीवन्मुक्तानंदलहरी, धन्याष्टक, आत्मपंचक, आत्मषट्क, निर्वाणलहरी यांत वरील सर्व भावांची उत्कृष्ट अभिव्यक्ति झालेली आहे पृष्ठ २८८ श्लोक ९ यावर उपासनेच्या दृष्टीनें शास्त्री-बुवांनी विस्तृत भाष्य केलें आहे त्यांत योगशास्त्राची पुष्कळ माहिती मिळते उपासना कोणती व कशी करावी याविषयीं प्रत्येक साधक आपलें मन ठरवितोच

श्रीशंकराचार्य श्रेष्ठ साक्षात्कारी पुरुष व तत्त्वज्ञानी आहेत, तसेच उच्च साहित्यिक व कविही आहेत तेव्हां स्तोत्रांतील काव्यगुणाचें थोडें दिग्दर्शन करणें इष्ट होईल काव्य आणि तत्त्वज्ञान या दोन गोष्टी क्वचितच एकत्र येतात, परंतु तत्त्वज्ञ साक्षात्कारी भक्त असेल, तर तत्त्वज्ञान व काव्य यांत मुळींच विरोध येणार नाहीं याचें उदाहरण म्हणून ज्ञानेश्वरांच्या काव्यपूर्ण तत्त्वज्ञानाचा नुसता निर्देश केला म्हणजे पुरे याच कारणामुळें आचार्यांच्या स्तोत्रांतहि तत्त्वज्ञान व काव्य यांचा मधुर संगम झाला आहे भाव हा काव्याचा आत्मा आहे आणि या दोन्ही महापुरुषांचीं अंतःकरणें श्रेष्ठ, उदात्त भक्तिभावानें भरून गेलीं होतीं मग त्यांच्या लिखाणांत अतिशुद्ध, उदात्त काव्याचा लीलेनें आविष्कार झाला नाहीं तरच आश्चर्य आचार्यांच्या उत्कट भावाची व तरल कल्पनाशक्तीची प्रचीती अनेक श्लोकांमधून येते भावासंबंधीं विचार वर झालाच आहे शिवमानसपूजा व आनंदलहरी या स्तोत्रांत काव्यकल्पनांचा स्वैर विलास प्रत्ययाला येतो तीं शब्दचित्रें मुळांतच वाचलीं पाहिजेत अतिशय सहज व सोपी शब्दरचना हा स्तोत्रांचा आणखी एक विशेष होय विशेष संस्कृत न येणाऱ्यालाहि सहज समजतील असे अनेक श्लोक त्यांत आहेत नाद माधुर्य हें स्तोत्रांचें आणखी एक वैशिष्ट्य आहे या संग्रहांतील श्लोक त्या विशिष्ट वृत्तांत आपण गुणगुणूं लागलों तर ही नादमधुर रचना प्रत्ययाला येईल, तिच्या चमत्कारानें आपण स्वतःला क्षणभर विसरून जातो यातच त्यांच्या नादवाही शब्दरचनेचें यश आहे यमक, अनुप्रास इत्यादि

शब्दालंकार आणि दृष्टान्त, रूपक, अर्थान्तरन्यास, विरोधाभास, स्वभावोक्ति इत्यादि अर्थालंकार यांनी हीं स्तोत्रें नटलेलीं आहेत सुंदर सुभाषितें सहजपणें सांगण्याची आचार्यांची हातोटी विलक्षण आहे आपल्या हिंदी 'परमार्थ-सोपान' या ग्रंथात भक्ति हा मूर्धन्यरस आहे आणि इतर सर्व रसाचा आविष्कार भक्तिरसात करता येतो, असें विस्तृत, सोदाहरण विवेचन करून गु रानडे यांनी प्रतिपादिलें आहे केवळ शृंगाराच्या सेवेलाच रस वाहिलें पाहिजे असें मानणें चूक आहे त्यातून मानवाची सर्व प्रकारें उन्नति करणारी भक्ति उत्कृष्टपणें अभिव्यक्त करता येते, असं त्याचें सांगणें आहे आचार्यांची स्तोत्रें म्हणजे गुरुदेवांच्या भक्तिप्रधान नवरसात्मक अलंकारशास्त्राचें प्रभावी उदाहरण आहे यात शंका नाही

ग्रंथातील महत्त्वाच्या व उद्बोधक अशा सर्व स्थलांचा विचार प्रस्तावनेंत करणें शक्य नाहीं नमुना म्हणून काहींचा उल्लेख केला आहे शास्त्रीबुवांची विद्वत्ता गाढ व अभ्यास अपूर्व आहे एका शास्त्राचा उत्कृष्ट अभ्यास केला तर मनुष्य बहुशास्त्रविद् होतो, हें सुभाषित थोडें बदलून प्रस्तुत ग्रंथाविषयीं असं म्हणता येईल कीं, याच्या सखोल अभ्यासानें मनुष्य बहुशास्त्रविद् होईल आचार्यांचा विडच तत्त्वज्ञाचा आहे त्यामुळें त्यांनी काहींहि लिहिलें तरी त्यात सहज लीलेनें उपनिषद्वाक्याचे व वेदान्त-सिद्धान्ताचे अनेक उल्लेख येतात वेदान्ताचें बरेंच ज्ञान असल्याशिवाय आचार्यांची स्तोत्रेंहि कळणें शक्य नाहीं आपल्या विस्तृत भाष्यात शास्त्री-बुवांनी वेदान्त सुलभ करून सांगितला आहे इतकेंच नव्हे तर 'हरिमीडे' व 'दक्षिणामूर्ति' या स्तोत्रावरील भाष्यात पूर्वपक्ष व सिद्धान्त या पद्धतीनें विचार मांडताना त्यांनीं इतर भारतीय दर्शनासबंधींहि बरेंच महत्त्वाचें उपनिषद्वचनें व संदर्भ यांचेंहि विस्तृत स्पष्टीकरण केलें आहे अशा विवेचनाच्या अभावीं स्तोत्राचें मर्म कळलें नसतें प्रत्येक स्तोत्राच्या सुरुवातीच्या प्रास्ताविक टीपाहि उद्बोधक व सुंदर आहेत ग्रंथाला आचार्यांचें लहानसें चरित्र जोडलें आहे, तेंहि मनोरंजक वाटेल समर्थांनी दासबोधाविषयीं म्हटलें आहे कीं, त्याच्या श्रवणानें बद्धाचे मुमुक्षु, मुमुक्षूचें साधक व साधकाचे सिद्ध होतील हे विचार या स्तोत्रानाहि लागू आहेत कर्म ज्ञान ध्यान भक्ति यांचा समन्वय करून, आचार्यांनीं साधकांना सांगितलेला हा ग्रंथराज शास्त्रीबुवांनीं आपल्या भाष्यासह मराठी

वाचकांना सादर केला, याबद्दल त्यांना धन्यवाद देणें सर्वथा योग्य आहे भाविक मराठी वाचकांना त्यांनी या कार्यामुळें कायमचें ऋणी केलें आहे. शास्त्रीबुवांना आयुरारोग्य लाभावें व असेंच ईश्वरसेवेचें व जनसेवेचें पवित्र कार्य त्यांच्याकडून दीर्घकाल घडावें, अशी ईश्वरचरणीं नम्र प्रार्थना आहे या ग्रंथाला प्रस्तावना लिहिण्याचा माझा अधिकार नाहीं प्रस्तावना लिहिण्याची शास्त्रीबुवांनीं मला सूचना केली, तेव्हा मीं त्यांना तसें कळवून, अधिकारी विद्वानांची नावेंहि सुचविलीं परंतु साधकांना थोडीफार उपयुक्त होईल अशी विस्तृत प्रस्तावना मीच लिहावी असें त्यांचें पुन पत्र आलें त्यांच्या इच्छेविरुद्ध जाणें मला शक्य नव्हतें म्हणून ही प्रस्तावना मी लिहिली आहे केसरी संस्थेनें भारतीय संस्कृतीची जोपासना व प्रसिद्धि करण्याचें पवित्र व श्रेष्ठ कार्य प्रथमपासूनच अंगीकारलें आहे प्रस्तुत ग्रंथाच्या प्रकाशनाला साह्य केल्याबद्दल त्या संस्थेलाहि धन्यवाद देणें अवश्य आहे आणखी काहीं स्तोत्रें दुसऱ्या भागांत प्रसिद्ध करण्याचा शास्त्रीबुवांचा विचार आहे त्याची वाचक उत्कंठेनें प्रतीक्षा करीत रहातील.

या ग्रंथामुळें आचार्यांच्या कल्याणकारक, पुण्यपावन उपदेशाकडे समाजाचें लक्ष वेधेल व त्यांच्या अभ्यासानें मुमुक्षु साधक आपलें पारमार्थिक जीवन उज्ज्वल करून घेतील, अशी आशा व्यक्त करून ही लांबलेली प्रस्तावना संपवितों

सांगली
दि २-४-६२

— ग. वि. तुळपुळे

# अध्यात्मविद्यामंदिराचे चार शब्द

ईश्वरप्राप्ति, हेंच मनुष्याचें उच्चतम ध्येय आहे यातच त्याच्या जीवनाची कृतार्थता आहे प्रपच व परमार्थ या दोहोंनाहि तें उपकारक आहे अभ्युदय-नि श्रेयस याची प्राप्ति, ईश्वराच्या भक्तीनें होते, असें सर्व धर्म, ऋषि, सत सागत आले आहेत आजहि तत्वज्ञ व समाजकार्यकर्ते पुरुष मानतात कीं, अध्यात्म ज्ञानाचा प्रसार, हा व्यक्तींच्या व म्हणून, अर्थात समाजाच्या, सद्भावना, जागृत करण्याचें, उत्तम साधन आहे, या दृष्टीनें त्याचे प्रयत्नहि सुरू आहेत श्रीमत राजेसाहेब सागली याची परमार्थावरील भक्ति व समाजातील, सद्भावना वाढविण्याची तळमळ, सर्वश्रुतच आहे त्यानीं गुरुदेव रानडे याच्या मार्ग दर्शनाखाली अध्यात्मविद्येचा प्रसार करण्यासाठी उदार देणगी देऊन अध्यात्म विद्यामदिर ही सस्था स्थापन केली या सस्थेच्या कार्याचा एक अगदीं लहानसा भाग म्हणून सागलीस इ सन १९४८ पासून परमार्थ विषयावर प्रवचनें सुरू करण्यात आलीं व तीं आजहि सुरू आहेत नव्या मुरलीधराच्या मदिरातील बुधवारचें हें प्रवचन सर्वांना पूर्ण परिचित झालें आहे हीं प्रवचनें चागली लोकप्रिय झाली असून श्रोतृवर्ग ३०० ते ४०० पर्यंत असतो त्यात भगिनीवर्ग शेंकडा ४०–४५ पर्यंत उपस्थित असतो या प्रवचनापैकीं काही प्रवचनें पुस्तकरूपानें प्रसिद्ध व्हावीं, अशी इच्छा श्रीमत राजेसाहेब सागली यानीं दर्शविल्यावरून आजपर्यंत प्रवचनाचीं आठ लहानमोठीं पुस्तकें प्रसिद्ध करण्यात आलीं आहेत

महामहोपाध्याय विद्यारत्न पडित पाडुरगशास्त्री गास्वामी, यानीं अध्यात्मविद्यामदिराच्या विद्यमानें गतवर्षी श्रीशकराचार्यांच्या काहीं स्तोत्रावर सुमारें १०११२ प्रवचनें केलीं, त्याचा विस्तार करून त्यानीं प्रस्तुत 'सुबोध-स्तोत्रसग्रह' प्रसिद्ध केला आहे हा ग्रथ फार मोठा असल्यानें त्याचा सर्व खर्च सस्थेला झेपणें शक्य नाहीं, तरी फुलाची पाकळी म्हणून सस्थेनें रु ३०० (तीनशें) प्रकाशनाला थोडा हातभार म्हणून दिले, ते आनदानें स्वीकारून, शास्त्रीबुवानीं, या सस्थेच्या मालेंतील ९ वें पुष्प म्हणून, प्रस्तुत ग्रथ प्रकाशित करण्याचें ठरविलें, हे त्याना खरोखर भूषणावह आहे यापूर्वी अध्यात्मविद्यामदिराच्या विद्यमानें, शास्त्रीबुवाचीं, 'उपनिषदें' 'षड्दर्शनें',

'भक्तियोग' व 'योग वासिष्ठ', यावर प्रवचनें झाली आहेत त्यांची वाणी रसाळ विवेचन सोपें, विचार उच्च असतात — त्यामुळें ते एक लोकप्रिय प्रवचनकार झाले आहेत त्यांचे जीवन-चरित्रहि, अलौकिक व वैचित्र्यपूर्ण असें आहे. यापूर्वी त्यांचीं प्रवचनें, 'सुलभ वेदांत' व 'योगवासिष्ठाचें हृद्गत' या दोन लहानशा पुस्तकरूपानें प्रसिद्ध झालीं आहेत त्यापैकीं, दुसऱ्या पुस्तकांत, त्यांच्या जीवनचरित्राचा अल्प परिचय करून दिला आहे त्याची पुनरुक्ति येथें करीत नाहीं अशीं प्रवचनें करून, शास्त्रीबुवांनीं, या संस्थेस व श्रोतृवर्गास निश्चित ऋणी केलें आहे

श्रीमंत राजेसाहेब सांगली यांच्या द्रव्यसाहाय्यामुळेंच संस्थेचें हें सर्व कार्य चालू आहे याबद्दल अध्यात्मविद्यामंदिर, त्यांचें फार ऋणी आहे

महायुद्धासारख्या घोर आपत्ति, व्यक्ति व राष्ट्रें यांतील, द्वेष, कलह, मत्सर, इत्यादि विकार नष्ट व्हावेत, असें सर्वांना वाटतें विश्वबंधुत्व सर्वांनाच, हवें आहे परंतु, एक देव, एक धर्मतत्त्व, एक मानवता व विश्वबंधुत्व असें अनेक थोर पुरुष सांगतात या तत्त्वांचा प्रसार आध्यात्मिक प्रवचनांच्या द्वारें, चढत्या-वाढत्या प्रमाणांत होत जावो, अशी प्रभुचरणीं, प्रार्थना करून, प्रस्तावना संपवितों

'जयदेव-सदन', सांगली
रामनवमी, शक १८८४

विठ्ठल कृष्ण जोशी
सेक्रेटरी, अध्यात्मपरिषद

# श्रीशंकराचार्यांचें संक्षिप्त चरित्र

*श्रुतिस्मृतिपुराणानामालयं करुणालयम्।*
*नमामि भगवत्पादं शंकरं लोकशंकरम्॥*

### उपक्रम

अलौकिक गुणांनीं संपन्न असलेल्या यशस्वी कार्यकर्त्याला लोक ईश्वराचा अवतार समजतात 'यद्यद्विभूतिमत्सत्त्व' या न्यायानें तें योग्यहि आहे. लोककल्याणाकरितां समयानुरूप प्राप्त झालेलें कार्य आपल्या अलौकिक सामर्थ्यानें यशस्वी रीतीनें पार पाडणाऱ्या अशा महाविभूति या भूमंडळावर वेळोवेळीं अवतीर्ण झालेल्या आहेत. भारतभूमीचें प्रांगण हें तर जणु काहीं अवतारांची क्रीडाभूमीच आहे महाविभूतींचीं अलौकिक चरित्रें जितकीं भारताच्या इतिहासांत पहावयास सापडतात तितकीं तीं इतर कोणत्याहि देशाच्या इतिहासांत पहावयास सापडत नाहींत परशुराम, राम, बलराम, भगवान् श्रीकृष्ण, बुद्धदेव, कपिल, गौतम, मनु, याज्ञवल्क्य, वसिष्ठ, विश्वामित्र, नारद, व्यास, पृथुराज, ऋषभदेव, कुमारिलभट्ट, शंकराचार्य, ज्ञानेश्वरमहाराज, तुकाराममहाराज, संत एकनाथ, समर्थ रामदास, छत्रपति श्रीशिवाजीमहाराज व लोकमान्य टिळक इत्यादि सर्व विभूति-महाविभूतींचीं चरित्रें वरील विधानाच्या सत्यत्वाची जणु काहीं साक्षच देत आहेत लोककल्याणाकरितां ज्या ज्या वेळीं ज्या ज्या गोष्टींची उत्कटत्वानें गरज भासली अथवा समाजानें किंवा राष्ट्रानें संघटित होऊन ज्या ज्या वेळीं ईश्वराची अनन्यभावानें प्रार्थना केली त्या त्या वेळीं अशा थोर विभूति या भूतलावर अवतरल्या व त्यांनीं आपल्या अलौकिक गुणांनीं अनेक लोककल्याणाचीं कार्यें केलीं अशाच थोर विभूतींपैकीं वर निर्दिष्ट केलेल्या आद्य श्रीशंकराचार्यांच्या चरित्राचा आपल्याला येथें विचार करावयाचा आहे

### आचार्यांचा अवतार कां झाला ?

आचार्यांच्या पूर्वकाळाचें निरीक्षण केलें तर असें आढळून येईल कीं, समाजाची सांस्कृतिक घडी अगदीं विस्कळीत झालेली होती. समर्थांच्या शब्दांत सांगावयाचें म्हणजे 'मतामतांचा गलबला। कोणी पुसेना कोणाला' अशी समाजाची दुरवस्था झालेली होती बौद्ध आणि जैन मतांचा प्रभाव दांडगा

होता. समाजाला अत्यंत बहिर्मुख बनविणारें चार्वाकांचें मत जरी बौद्ध व जैन पंडितांनीं हतबल केलेलें होतें, तरी बौद्धांचा व जैनांचा निरीश्वरवाद आणि नास्तिकवाद समाजामध्यें अतोनात फैलावलेला होता. बहुसंख्य लोक कर्मभ्रष्ट आणि धर्मभ्रष्ट बनलेले होते. त्यांनीं जणु कांहीं वैदिक धर्माचा उच्छेदच मांडला होता !

वैदिक धर्मामध्येंहि एकवाक्यता राहिलेली नव्हती. वैदिक वाङ्मयाची ओढाताण सुरू झालेली होती. वेदवाक्यांचा ज्याला जो वाटेल तो त्यानें अर्थ करावा व आपला संप्रदाय किंवा पंथ निराळा स्थापावा अशी स्थिति होती. अवैदिक तांत्रिकांचीहि मतें खूप बळावलेलीं होतीं. लोक दिङ्मूढ झालेले होते. लोकांना खऱ्या धर्माच्या व तत्त्वज्ञानाच्या बाबतींत मार्गदर्शन होणें अत्यंत आवश्यक होतें. नेमकें हेंच कार्य आचार्यांनीं अवतार घेऊन पूर्ण केलें. देहात्मवादी चार्वाकांचा तर प्रश्नच नाहीं, पण बौद्ध आणि जैन मतांचें समर्थन करणाऱ्या महामहा पंडितांच्या प्रखर तर्कांचेंहि आपल्या अलौकिक बुद्धीनें, सहज लीलेनें पण बिनतोड तर्कपद्धतीनें खंडण करून टाकलें ! बौद्ध मताला तर तार्किक पद्धतीनें वर डोकें काढण्यास अवसरच ठेवला नाहीं. बौद्धांना भारत-वर्षांतून जो काढता पाय घ्यावा लागला त्याचें श्रेय आचार्यांना द्यावें लागेल.

श्रीशिवाजीमहाराजांबद्दल एका हिंदी कवीनें म्हटलें आहे कीं, 'अगर न होते शिवाजी तो सुनत होत सबकी.' जर शिवाजीमहाराज अवतरले नसते तर सर्वांवर सुनता करून घेण्याची पाळी आली असती ! त्याचप्रमाणें शंकरा-चार्यांच्या बाबतीतहि म्हणतां येईल कीं, 'अगर न होते शंकर तो बन जाते सभी बौद्ध !' जर शंकराचार्यांचा अवतार झाला नसता तर सर्वांवर बौद्ध होण्याची पाळी आली असती ! वैदिक धर्म नामशेष झाला असता. आचार्यांनीं बौद्ध व जैन यांच्याप्रमाणेंच शैव, शाक्त, कापालिक, उग्रभैरव, गाणपत, नीलकंठ, भट्टभास्कर व तांत्रिक इत्यादि वेदविरुद्ध मतांचें जोरदार खंडण करून समन्वय-वादाची मोठ्या चातुर्यानें मांडणी केली. अद्वैतवादाचा पुरस्कार करूनहि वेदाचें प्रामाण्य व ईश्वराचें अस्तित्व सिद्ध करून सनातन वैदिक धर्माची विस्कळीत झालेली घडी नीटनेटकी केली. स्वतःच्या आचरणानेंच ज्वलंत वैराग्य दाखवून भक्तिमार्गाची व ज्ञानमार्गाची उज्ज्वल परंपरा स्थापिली व देशाला अनेक महान् सांस्कृतिक संकटांतून सोडविलें.

## आचार्यांचा काळ कोणता ?

आचार्यांच्या काळाविषयीं विद्वान् लोकामध्यें पुष्कळ मतभेद आहेत इसवी सनाच्या पूर्वी पाचव्या शतकापासुन तें इसवी सनाच्या आठव्या शतकापर्यंत म्हणजे जवळ जवळ बाराशें-तेराशें वर्षांचा मतभेद पहावयास सापडतो प्रत्येकजण आपआपला पक्ष सिद्ध करण्याकरिता शक्य तितकें प्रमाणाचें पाठबळ मिळविण्याचा प्रयत्न करीतच असतो अशा स्थितींत सामान्य वाचकाची बुद्धि गोंधळते, कटाळते व या रूक्ष विषयाच्या खटपटींत मातातून बाहेर पडू पहाते. हें लक्षात घेऊनच या ठिकाणीं आचार्यांच्या काळनिर्णयाचें दिग्दर्शन मात्र केलें जात आहे

पं काशीनाथशास्त्री तेलग, प काशीनाथशास्त्री पाठक, डॉ भांडारकर, डॉ फर्ग्युसन, प्रो मॅक्समुल्लर, राजा राममोहन राय व लोकमान्य टिळक इत्यादि भारतीय आणि पाश्चात्य विद्वानानीं आचार्यांच्या काळासंबधानें खूप ऊहापोह केलेला आहे अगदीं अलीकडे डॉ अलतेकर, प्रो बल्देव उपाध्याय व डॉ म. न्य महस्त्रबुद्धे यानींहि या विषयावर निबध लिहिले आहेत पण एकदर विचार करता 'नैको मुनिर्यस्य वच प्रमाणम्' अशीच स्थिति याहि विषयाची झाली आहे आचार्यांच्या विशाल ग्रथसपत्तींत आचार्यांनीं स्वतःबद्दल एक पक्तीहि लिहिलेली नाहीं 'इन्द्रोऽपि लघुता याति स्वय प्रख्यापितैर्गुणै' आपल्या मुखानें आपले गुण वर्णन करण्यात इद्रालाहि कमीपणा येतो असें समजण्याचा तो काळ होता ! लोकशाहीतल्या उमेदवाराप्रमाणें 'मी असें केलें, मी तसें केलें' याप्रमाणें स्वत च्या मुखानें स्वत ची वढाई सागण्याचा किंवा लिहिण्याचा तो काळ नव्हता "अशोपि मन्त्रिता याति स्वय प्रख्यापितैर्गुणै" असा आजचा काळ आहे अजूनहि सात्त्विक प्रवृत्तीच्या लोकाना स्वत चें चरित्र स्वत लिहिताना कमीपणा वाटतो मग आचार्यांच्या बाबतींत काय सागावें ? आचार्य तर कल्पनेपेक्षाहि अधिक विनयी होते

## आचार्यांचा विनय

असें सागतात कीं, एकदा आचार्य आपल्या शिष्यजनासह समुद्राच्या काठीं बसले असता एका शिष्यानें विचारलें, "महाराज ! आपण केवढी विद्या सपादन केली आहे ? आपल्या भाष्यातून आलेले इतर ग्रथातील उतारे,

शास्त्राचे आधार व आपलें वादपटुत्व आणि प्रत्युत्पन्नमतित्व पाहिलें म्हणजे आपलें ज्ञान मोठें अफाट आहे असें वाटतें !" यावर आचार्य म्हणाले, "पहा माझें ज्ञान किती आहे तें मी तुला सांगतों, ऐक" असें म्हणून आचार्यांनीं आपला दंड समुद्रांत हातभर खालीं बुडविला व वर काढून उभा केला! तेव्हां त्या दंडाच्या खालच्या बाजूस एक थेंब लटकलेला होता तो दाखवून आचार्य म्हणाले, "पहा, या अफाट सागरांतून ह्या दंडानें किती पाणी घेतलें ? असेंच माझें समजा! ज्ञान हें अथांग महासागरासारखें आहे, मी त्यांतला एक कण उचलला आहे येवढेंच यापेक्षा अधिक कांहीं नाहीं!" यावरून आचार्यांच्या अंगीं असलेल्या विनयाची कल्पना येते अशा स्थितींत आचार्य स्वतःच्या गुणाचा स्वतः कधींच निर्देश करणार नाहींत हें स्वाभाविकच आहे मी अमक्या वेळीं, अमक्या कुळांत जन्मलों वगैरे आचार्यांनीं स्वतःबद्दल आपल्या ग्रंथांत कांहींच लिहिलेलें नाहीं

कांहीं लोक इसवी सन ७८८ हा आचार्यांचा काळ मानतात बेळगांवामध्यें उपलब्ध झालेल्या एका हस्तलिखिताच्या संग्रहांत खालीं लिहिलेले श्लोक आढळले :

*दुराचारविनाशाय प्रादुर्भूतो महीतले ।*
*स एव शंकराचार्यः साक्षात्कैवल्यनायकः ॥*
*निधिनागेभवह्न्यब्दे विभवे शंकरोदयः ।*
*अष्टवर्षे चतुर्वेदान् द्वादशे सर्वशास्त्रकृत् ॥*
*षोडशे कृतवान् भाष्यं द्वात्रिंशे मुनिरभ्यगात् ॥*

निधि म्हणजे ९, नाग म्हणजे ८, इभ म्हणजे ८ आणि अग्नि म्हणजे ३ 'अंकानां वामतो गतिः' या न्यायानें संख्येंतील अंक उजवीकडून डावीकडे लिहिले जात असतात या संकेताप्रमाणें ही संख्या ३८८९ होते तीन हजार आठशें एकूणनव्वद कलि वर्षें पूर्ण झालीं असतां विभवनाम संवत्सरामध्यें आचार्यांचा जन्म झाला कलियुगाला आरंभ होऊन ५०६२ वर्षें झालीं आहेत या पांच हजार त्रेसष्ट वर्षांतून ३८८९ वर्षें कमी केलीं म्हणजे ११७४ उरतात या दृष्टीनें पहातां आचार्यांना अवतरून ११ शतकें होत आलीं असा याचा अर्थ होतो चालू साल १९६२ यांतून ११७४ वर्षें वजा केलीं म्हणजे ७८८ शिल्लक रहातात वगैरे वचनाप्रमाणें हाच आचार्यांचा काळ ठरतो

नास्तिक आणि पाखंडी लोकांनी माजविलेल्या दुराचारांचें निरसन करून सदाचाराची, सनातन वैदिक धर्माची व प्रेममूलक अद्वैत मताची स्थापना करण्याकरिता प्रत्यक्ष मोक्षाचे अधिपति असलेले भगवान् श्रीशंकराचार्य विभव-नाम संवत्सरामध्यें या भूलोकीं अवतरले, त्याला ११७४ वर्षे झाली. त्यांनी आठव्या वर्षी चारी वेदांचें अध्ययन केलें. बाराव्या वर्षी ते सर्वशास्त्रसंपन्न झाले सोळाव्या वर्षापर्यंत त्यांनी सर्व भाष्य-ग्रंथांची रचना केली आणि बयाऱ्या बत्तिसाव्या वर्षी ते निजपदाला गेले, असा वरच्या सर्व श्लोकांचा अर्थ आहे या पोथीप्रमाणें पहातां इसवी सन ७८८ हा आचार्यांचा काळ ठरतो मात्र ही पोथी केव्हां लिहिली आहे, कोणी लिहिली आहे व कोणत्या आधारें लिहिली आहे, याचा उलगडा नाहीं.

सदानंद नावाच्या विद्वानानें रचलेल्या शंकर विजयसार ग्रंथामध्यें खाली लिहिलेला श्लोक आढळतो :

*प्रासूत तिष्यशरदामतियातवत्या -*
*मेकादशाधिकशतोनचतुःसहस्र्याम् ।*
*संवत्सरे विभवनाम्नि शुभे मुहूर्ते*
*राधे सिते शिवगुरोर्गृहिणी दशम्याम् ॥*

एकशें अकरा वर्षे कमी अशी कलियुगाची चार हजार वर्षे पूर्ण झाली असता विभव नावाच्या संवत्सरीं शुभमुहूर्तावर वैशाख शुद्ध १० ला शिवगुरूची भार्या प्रसूत झाली चार हजार या मध्येंतून १११ कमी केले म्हणजे ३८८९ उरतात आचार्यांच्या जन्माच्या वेळेला ३८९० कलि-वर्षे पूर्ण झालेली होती. या श्लोकांतील विचारहि मागच्या श्लोकांतील विचाराला पूरकच आहे तथापि सदानंदांचा विचार मागच्या श्लोककर्त्यानें घेतला आहे, का मागच्या श्लोकांतील विचार सदानंदांनी घेतला आहे हा प्रश्न रहातोच दोन्ही ग्रंथ स्वतंत्र आहेत असें म्हटलें, तर तसें सिद्ध करण्याची जबाबदारी शिल्लक रहातेच

इसवी सन ७८८ हा आचार्यांचा काळ कांहीं लोकांना मान्य नाहीं. त्यांचें म्हणणें असें कीं, आचार्यांनी आपल्या भाष्यांत स्रुघ्न आणि पाटलिपुत्र या दोन शहरांचा उल्लेख केलेला आहे इतिहासावरून पाटलिपुत्र हें शहर इसवी सन ७५६ मध्यें महापुरानें नामशेष झालें असल्याचें कळतें विद्यमान शहर सोडून नामशेष झालेल्या शहराचा वर्तमानकाळाप्रमाणें आचार्य उल्लेख करणार

नाहींत अर्थात् आचार्यांचा काळ इसवी सन ७५६ वर्षाच्या पूर्वी असला पाहिजे आचार्यांनीं आपल्या ब्रह्मसूत्रभाष्यात पूर्णवर्मा या नावाच्या राजाचा उल्लेख केलेला आहे आणि तोहि तो राजा जिवंत असल्यासारखा केलेला आहे इतिहासात पूर्णवर्म्याचा दोन ठिकाणी उल्लेख आहे एक जावा ताम्रपटात व दुसरा प्रसिद्ध चिनी प्रवासी ह्यूएनत्संग याच्या डायरींत दुसरा पूर्णवर्मा पश्चिम मगध देशाचा अधिपति होता आचार्यांचें बरेंच वास्तव्य काशीस झालेलें असल्यामुळें आचार्यांच्या ग्रंथात याच राजाचा उल्लेख होणें स्वाभाविक आहे ह्यूएनत्संग हा इसवी सन ६२७–२८ साली मगध देशात फिरत होता त्यापूर्वी पूर्णवर्मा नुकताच दिवंगत झाल्याचें दिसून येतें यावरून आचार्यांचा काळ इसवी सन ६ व्या शतकाच्या शेवटी असावा, असा ते तर्क करतात

माधवाचार्यांनीं आपल्या 'शंकर दिग्विजयात' बाण, मयूर आणि दण्डी इत्यादि विद्वान् कवींचा आचार्यसमकालीन म्हणून उल्लेख केलेला आहे ऐतिहासिकांनी सदर विद्वान कवींचा काळ ७ वें शतकच मानलेला आहे यावरून आचार्यांचाहि तोच काळ ठरतो गौडपादाचार्यांचे शिष्य गोविंदयति व गोविंदयतींचे शिष्य श्रीआद्यशंकराचार्य ही गुरुपरंपरा सर्वमान्य आहे गोविंदयतींचा काळ सहाव्या शतकाच्या शेवटी मानला जातो या दृष्टीनें पाहिलें असता आचार्यांचा काळ सहाव्या शतकाचा शेवट किंवा सातव्या शतकाचा आरंभ हाच ठरतो या सिद्धांताला तामिळ इतिहासाचेंहि पाठबळ आहे असें म्हणतात

आचार्य दिङ्नाग आणि आचार्य धर्मकीर्ति या प्रख्यात बौद्ध पंडितांच्या ग्रंथातील कित्येक पंक्तींचा उल्लेख करून आचार्यांनी त्यांचें खंडण केलें आहे आचार्य दिङ्नाग हे वसुबंधूचे शिष्य असून यामुळें त्यांचा काळ ५ वें शतक ठरतो, तर आचार्य धर्मकीर्ति यांचा काळ ७ वें शतक मानला जातो यावरून हे आचार्यांचा काळ ७ वें शतक असावा असें ठरतें [illegible] या [illegible] विचार करून आचार्यांचा काळ सातव्या शतकाचा प्रारंभ मानलेला आहे

डॉ. भांडारकरांना उपलब्ध झालेल्या एका ताम्रपटावरून आचार्य हे [illegible] निरविक्रम समकालीन असल्याचें सिद्ध होत आहे हा निरविक्रम पहिला मानावयाचा का दुसरा मानावयाचा, याबद्दल मतभेद आहे काही विद्वान् पहिला मानतात, तर काही विद्वान दुसरा मानतात पहिला मानला तर त्यानें आचार्यांचा काळ इसवी सन ५ वें शतक ठरतो तर दुसरा मानल्यास

मतानें आचार्यांचा काळ सहाव्या शतकाचा अंतिम भाग ठरतो. बहुमताचा कल दुसऱ्या बाजूलाच आहे.

कांचीकामकोटी आणि द्वारकामठ यांच्या अनुरोधानें विचार केला असतां आचार्यांचा काळ इसवी सनाच्या पूर्वी ५ वें शतक ठरतो. पण हा काळ मानण्यांत अनेक प्रश्नांची उत्तरें समाधानकारकपणें सुटत नाहींत. शृंगेरी मठांतील गुरुपरंपरेच्या अनुरोधानें विचार केल्यास आचार्यांचा जन्मकाळ विक्रम संवत् चौदा ठरतो पण हा विक्रम संवत् कोणता मानावा याबद्दल बराच मतभेद आहे. उत्तर भारतांत प्रचलित असलेला विक्रम संवत् दक्षिण भारताच्या एका टोंकाला आरंभींच्या काळातच इतका प्रचलित असण्याचा संभव नाहीं. ज्या चालुक्यवंशीय राजघराण्याशीं शृंगेरी मठाचा संबंध होता त्या राजघराण्यात विक्रमादित्य नांवाचा राजा जन्माला आलेला होता. त्याचा राज्यारोहणकाल इ. स. ६७० मानला जातो. त्याच विक्रम संवताचा शृंगेरी मठानें उल्लेख केलेला असावा असा तर्क लोकमान्य टिळकांनी केलेला आहे व तो ऐतिहासिक सत्याशीं बराच मिळता-जुळता आहे या दृष्टीनें पहातां आचार्यांचा काळ सातव्या शतकाच्या शेवटीं येतो उत्तर भारतातील विक्रम संवत् जर गृहीत धरला, तर शृंगेरी मठाची आचार्यपरंपरा त्रुटित झाली असें मानावें लागतें सुरेश्वराचार्य हे आचार्यांच्या पट्टशिष्यांपैकीं एक होते हें सर्वमान्य आहे शृंगेरी मठाचे पहिले आचार्य म्हणून त्यांची योजना झाली. पुढें आचार्यपरंपरेची शृंखला तुटलेली दिसते ती जुळविण्यासाठीं सुरेश्वराचार्यांची आयुर्मर्यादा ७००–८०० वर्षांची मानावी लागते शृंगेरी मठाची सर्व आचार्यपरंपरा अगदी सुव्यवस्थित आहे. ही व्यवस्था लक्षात घेता आरंभीची त्रुटी व ती भरून काढण्याची कल्पना बुद्धीला ग्राह्य होत नाहीं इतरहि अनेक जटिल प्रश्न पुढें उभे रहातात. यावरून वर निर्दिष्ट केलेला लोकमान्याचाच तर्क अधिक ग्राह्य ठरतो

एका मतानें तर आचार्यांच्या काळाला चौदाव्या शतकापर्यंत अलीकडे ओढण्याचा प्रयत्न केला आहे, पण या मताला कोणाचाच दुजोरा नसल्यामुळें हें मत वाऱ्यानें वितळणाऱ्या शरदृतूतील ढगाप्रमाणें हवेंत विरून गेलें आहे. असो; याप्रमाणें आचार्यांच्या काळनिर्णयाबद्दल कितीहि मतभेद असले, तरी आचार्यांच्या चरित्राबद्दल मात्र कोठेंहि मतभेद असल्याचें फारसें दिसून येत नाहीं ही गोष्ट त्यातल्या त्यात अत्यंत समाधानाची आहे. नेव्हां आपण ...

काळनिर्णयाच्या रूक्ष क्षेत्रातून बाहेर पडून अत्यंत मधुर असलेल्या आचार्य चरित्ररूपी अमृताचें प्राशन करूं या

## आचार्यांचा जन्मप्रदेश

भारताच्या चरणकमलीं दक्षिण दिशेला विराजमान असलेल्या केरळ प्रदेशांत पूर्णानदीच्या कांठीं कालटी नावाचा गांव आहे येथेंच आचार्यांचा जन्म झाला कोचीन शोरानूर रेल्वे मार्गावर आलवाई नावाचें एक लहानसें स्टेशन आहे तेथून पांच सहा मैलांच्या अंतरावर कालटी गांव आहे आकृतीनें लहान पण प्रकृतीनें महान् सत्त्वगुणसंपन्न असा तो गांव त्या वेळीं होता या ठिकाणीं सृष्टिदेवीनें जणु कांहीं आपल्या नैसर्गिक सौंदर्याचें दालनच उघडलेलें होतें पूर्णा नदीचा पवित्र प्रवाह, गगनाला भेदणारे उंच उंच वृक्ष, शुक, कोकिळ, भारद्वाज आणि मयूर इत्यादि पक्ष्यांचे दाही दिशांमध्यें दुमदुमणारे निनाद ताडमाड, फणस आणि आम्र इत्यादि वृक्षांची अफाट गर्दी जणु कांहीं गगनाला आलिंगित आहे भरगच्च फलांच्या घोसांनीं जणु कांहीं दिवसा सूर्यनारायणाची व रात्रीं रजनीनाथाची ते वृक्ष समाराधना करीत आहेत व विकसित झालेल्या पुष्पगुच्छांनीं पुष्पलताहि त्यांना आपली साथ देत आहेत भ्रमरांचा मधुर गुंजारव अहर्निश कानाला सनईचा साक्षात्कार करून देत आहे घागरीप्रमाणें भरलेल्या कांसातून स्रवणाऱ्या दुधानें गोमाता आपल्या वत्सांना व तेथील जनतेला तृप्त करीत आहेत पूर्णा नदीच्या डगरीशीं टकरा घेणारे मदोन्मत्त बैल कालिदासाच्या 'मदोन्मत्ता ककुद्मन्त सरिता कूलमुद्रुजा' या वचनाची आठवण करून देत आहेत सर्व प्रकारचें स्वास्थ्य तेथील जनतेच्या चित्तांत नांदत आहे सर्व लोक गुण्यागोविंदानें व अत्यंत आनंदानें आपआपल्या धर्माप्रमाणें वागत आहेत आपआपल्या परीनें स्नानसंध्या, जप, तप, पूजा, अनुष्ठानें आणि होम हवनें चाललेलीं आहेत जिकडे तिकडे वेदांचे घोष, शास्त्रांचा चर्चा व वक्त्यांचीं व्याख्यानें चालू आहेत अशा थाटांत प्रेक्षकांना कालटी गांवाचें दर्शन घडत होतें। त्या वेळच्या राजानें हा गांव ब्राह्मणांना अग्रहार म्हणजे इनाम दिलेला होता

कालटी गांवांत विद्याधिराज या नांवाचे एक सदाचारसंपन्न विद्वान् गृहस्थ रहात होते हेच आपल्या चरित्रनायकाचे पितामह म्हणजे वडिलांचे वडील

अर्थात् आजोबा होत. ते कृष्णयजुर्वेदी होते. त्यांच्या घरीं अध्ययन-अध्यापन-परंपरा अखंड चाललेली होती. कितीतरी विद्यार्थी येत असत, रहात असत व विद्वान् होऊन आपआपल्या घरीं परत जात असत. येथील ब्राह्मणांना नंबुद्री ब्राह्मण असें म्हणतात.

बराच काळ लोटला. विद्याधिराजांना पोटीं पुत्रसंतती नसल्यामुळें उद्विग्नता वाटू लागली. एकनिष्ठ अंतःकरणानें शंकराची आराधना करण्यासाठीं त्यांनीं पत्नीची अनुमति घेतली व जवळच असलेल्या वृषपर्वतावर श्रीज्योतिर्लिंगाची आराधना करून शंकरांना प्रसन्न करून घेतलें. आशुतोष भगवान् श्रीशंकर प्रसन्न झाले व त्यांनीं विद्याधिराजाला उत्तम पुत्र होईल असा वर दिला. शंकराच्या कृपेनें विद्याधिराजांना जो मुलगा झाला त्याचें 'शिवगुरु' असें नाव ठेवण्यात आलें. हेच आपल्या चरित्रनायकाचे वडील होत.

शिवगुरूच्या जन्मानें मातापितरांचा आनंद गगनांत मावेना. आपल्या पश्चात् आपल्याला कोण पिंड देणार ? कोण पाणी देणार ? आपल्याला कशी उत्तम गति मिळणार ? ही जी रात्रंदिवस मनाला चिंता वाटत होती ती आतां मावळली. 'त्रायते पुन्नामनरकात् तस्मात्पुत्र इतीरितः' पुं नावाच्या नरकापासून आईबापांचें मुलगा रक्षण करतो म्हणून त्याला 'पुत्र' असें म्हणतात. 'अपुत्रस्य गतिर्नास्ति' ज्याला पुत्र नाहीं त्याला उत्तम गति मिळत नाहीं, असें शास्त्र सांगतें. विद्याधिराज आणि त्यांची पत्नी यांना आतां ही काळजी उरली नाहीं. शंकराच्या कृपेनें ते आतां या काळजींतून मुक्त झाले. शिवगुरूकडे पाहून त्यांना जो आनंद होत होता तो अवर्णनीय होता. शिवगुरूच्या बाललीला अवलोकन करीत मातापितरें आनंदानें काळ घालवू लागलीं. मुलाचें जातकर्म, नामकरण, मौंजीबंधन इत्यादि सर्व संस्कार अगदीं शास्त्रोक्त पद्धतीनें जे त्या त्या वेळीं साजरे केले जात होते.

उपनयनानंतर शिवगुरूला अध्ययनाकरितां गुरुगृहीं पाठविलें. तेथें त्यानें अल्पावधींतच सर्व वेदांचें व शास्त्रांचें अध्ययन करून मोठा लौकिक मिळविला. त्याची कीर्ति ऐकून विद्याधिराजांना मोठा आनंद वाटला. ते त्याला घरीं घेऊन जाण्यासाठीं गुरुगृहीं आले. गुरूंनीं मोठ्या प्रेमानें आशीर्वाद देऊन त्याला निरोप दिला. शिवगुरु स्वभावतःच अत्यंत विरक्त असल्यामुळें गुरूंचा आश्रम सोडून आपल्या घरीं जाण्यास तयारच होईना. नैष्ठिक ब्रह्मचर्यव्रतानें

येथेंच राहून सर्व आयुष्य अध्ययन अध्यापनात घालवावें असें त्याला वाटत होतें; पण वडिलांच्या आणि गुरूंच्या इच्छेपुढें त्याचें कांहीं चाललें नाहीं अखेर वडिलांच्या इच्छेप्रमाणें गुरूंची आज्ञा घेऊन मोठ्या जड अंतःकरणानें गुरूंच्या चरणीं प्रणाम केला, गुरुदक्षिणा दिली, गुरूंचा आशीर्वाद घेतला आणि वडिलांच्याबरोबर तो घरीं परत आला त्याचें प्रगाढ पांडित्य आणि सर्व शास्त्रावरील प्रभुत्व पाहून वडिलांना मोठें समाधान वाटलें आता याला गृहस्थाश्रमात गुंतवावें, दोन हाताचे चार हात करावेत आणि आपल्या डोळ्याचें पारणें फेडावें असे विचार स्वाभाविकच मातेच्या अंतःकरणात आले. तिनें ते आपल्या पतिराजाजवळ बोलून दाखविले विद्याधिराजानेंहि तिच्या विचारांना आपली संमति दाखविली

## शिवगुरूंचा गृहस्थाश्रम

विद्वान्, बुद्धिमान्, तेजस्वी आणि संपन्न म्हणून शिवगुरूंची सर्वत्र ख्याति झालेलीच होती उत्तम मुली सांगून येऊं लागल्या विद्याधिराजहि आपल्या मुलाकरिता अनुरूप वधूचें निरीक्षण करूं लागले कुलशीलसंपन्न आणि विद्वान् अशा मघपंडित नावाच्या ब्राह्मणाची सुस्वरूप आणि सुस्वभावी असलेली कन्या त्यांनीं आपल्या मुलाकरिता पसंत केली मोठ्या थाटानें विवाह साजरा झाला सर्व ब्राह्मणांना विपुल दक्षिणा देऊन त्यांचे आशीर्वाद घेतले लक्ष्मीपूजन होऊन मुलीचें नाव आर्यांबा असें ठेवण्यात आलें अशा रीतीनें आपल्या चरित्रनायकाचे वडील शिवगुरु हे गृहस्थाश्रमसंपन्न झाले कालांतरानें वडील आणि मातुश्री यांच्या पश्चात् सर्वच गृहस्थाश्रमाची जबाबदारी त्यांच्यावर येऊन पडली स्नान-संध्या, पूजाअर्चा, अध्ययन अध्यापन, आल्या गेल्या अतिथींचा सत्कार आणि आपल्या आश्रयानें असलेल्या विद्यार्थ्यांचें संगोपन इत्यादि सर्व कार्ये त्यांनीं अत्यंत उत्तम रीतीनें चालविलेलें होतें शिवगुरूंच्या गृहस्थाश्रमाचा बराच काळ लोटला पोटीं पुत्रसंतति नसल्यामुळें त्यांच्या चित्ताला सारखें रुखरुख वाटूं लागलें '*गृहरत्नानि बालका*' *लहान मुलें हीं घरातील रत्नेंच होत. ज्या घरात लहान* मूल नाहीं तें घर कसलें ! 'अपुत्रस्य गृहं शून्यं' ज्याला मूलबाळ नाहीं त्याचें घर शून्यच होय दुसऱ्याच्या मांडीवर खेळत असलेलीं मुलें बाळें पाहून निपुत्रिकांना एक प्रकारचा हेवा वाटतो 'धन्यास्तदङ्गरजसा मलिनीभवन्ति'

मुलाबाळाचें अगावर हगणें मुतणें यात देखील त्याना धन्यता वाटू लागते! आर्यांबा आणि शिवगुरु यांचीहि अशीच अवस्था झाली आपला वंश अंकुरित व्हावा, आपल्या पश्चात् घरामध्यें दिवा लागावा, मृत्युनंतर आपल्याला पिंड आणि पाणी धावयास कोणी तरी आपल्या पोटीं जन्माला यावें, असें त्याना वाटू लागलें शिवगुरूला तर काहीं सुचेना! सर्व विश्व उदास दिसू लागलें! जेवणात लक्ष नाहीं, स्नान संध्येंत लक्ष नाहीं, उद्योगात लक्ष नाहीं, कोठेंच लक्ष लागत नाहीं, अशी त्याची अवस्था झाली

आर्यांबा अत्यंत शांत, सात्विक आणि गंभीर होती ती आपल्या पतीला म्हणाली, " महाराज! आपण इतकें उद्विग्न का होता? आपण सदाचार-संपन्न आणि विद्वान् आहा जरा विचार करा तो दयाघन प्रभु भगवान् शंकर त्याच्याकडे पहा तो विश्वनाथ आहे, तो अनाथाचा नाथ आहे, तो करुणा सागर आहे, त्याचें आपण आराधना करा एकचित्तानें त्याला आपण शरण जा तो आपले सकल मनोरथ पूर्ण करील अदृष्टयोग कितीहि प्रतिकूल असला, तरी भगवत्कृपा झाल्यानंतर ती प्रतिकूलता पार विरल्याला जाते. प्रतिकूल ग्रहहि अनुकूल होऊन उच्चस्थानाचीं फळें देतात भूत प्रेत पिशाच-बाधा होऊ शकत नाहीं वैऱ्यांचीहि बुद्धि फिरते शत्रूहि मित्र होतात ' अनुकूले जगन्नाथे, अनुकूलमिदं जगत् ' जगन्नाथ जर अनुकूल असेल, तर सर्व जग अनुकूल होत असतें हें काय मी आपणास सांगावयास पाहिजे? आपण सर्व जाणतच आहा असें उद्विग्न होऊ नका शंकराची आराधना करा

सती साध्वीच्या शुद्ध हृदयातील ते सात्विक बोल शिवगुरूच्या हृदयात रुजले ते म्हणाले, " तू सांगतेस तें सर्व सत्य आहे ' कार्येषु मन्त्री ' या सुभाषितात वर्णन केल्याप्रमाणें तू आम्हाला पत्नी मिळाल्यामुळें, आम्हाला मोठी धन्यता वाटते मी आता तू म्हटल्याप्रमाणें शंकराचीच आराधना करतों असें म्हणून शिवगुरु शंकराच्या आराधनेला लागले आर्यांबाहि पण आपल्या पतीला सर्वतोपरी साहाय्य करून पतीबरोबरच शंकराची उपासना करू लागली सोनें जसें अग्नीच्या तापानें शुद्ध व्हावें त्याचप्रमाणें तपश्चर्येनें त्या उभयताचे देह व अंतःकरणें शुद्ध झालीं सर्व दुरिताचा क्षय झाला इष्टसिद्धीला प्रतिबंध करणारीं सर्व पापें जळालीं! भगवान् शंकर प्रसन्न झाले! हरिहराचा कृपाप्रसाद ज्याच्यावर झाला त्याला या जगात दुर्मिळ असें काय आहे? शंकरानीं

शिवगुरूंना स्वप्नात दर्शन दिलें, आशीर्वाद दिला ते म्हणाले, "मी प्रसन्न आहें 'वर ब्रूहि' काय पाहिजे तें माग" शिवगुरूंच्या अंतःकरणात पुत्रप्राप्तीचीच उत्कंठा असल्यामुळें त्यांना दुसरें मागणें सुचलें नाहीं ते म्हणाले, "'पुत्र देहि' देवा! मला पुत्र द्या!" शंकर म्हणाले, "किती? एक का शंभर! गुणवान्, सर्वज्ञ असा पुत्र पाहिजे असेल तर एकच मिळेल नाहीं तर शंभर पुत्र देतों" 'शंभर वेळा सांगितलें' या वाक्यात शंभर शब्दाचा अर्थ जसा 'पुष्कळ' करतात तसाच येथेंहि समजावा शिवगुरूंनी विचार केला पुष्कळ विद्या मिळविली पण चित्ताला शांति नाहीं तें ज्ञान काय कामाचें? भाराभर चिंध्या मिळविल्या पण एकहि धड नाहीं त्याचा काय उपयोग? आपल्या मनाला व भोंवतालच्या जनाला ज्याच्यापासून सुख नाहीं अशीं रडोगणती मूर्ख मुलें काय कामाचीं? ज्याचा यशोदुंदुभि दाही दिशांना निनादून सोडील असा एकच पुत्र बरा मूर्ख असलेले शंभर पुत्र काय उपयोगाचे? 'वरमेको गुणी पुत्रो न च मूर्खशतान्यपि' पुत्र व्हावा ऐसा गुंडा ज्याचा तिन्ही लोकीं झेंडा शिवगुरु म्हणाले, "देवा! मला एकच पुत्र द्या, पण सर्वगुणसंपन्न द्या शंकरानीं 'तथास्तु' म्हणजे 'ठीक आहे' असें म्हटलें भगवान् शंकर अंतर्धान पावले शिवगुरु जागे झाले घडलेला सर्व वृत्तान्त त्यांनीं पत्नीला सांगितला उभयतांच्या चित्ताला मोठा आनंद झाला भगवान् शंकर आपले मनोरथ पूर्ण करतील अशी खात्री झाली शिवकृपेनें उभयतांचा देह शिवस्वरूप म्हणजे शुद्ध मंगलमय झाला त्या मंगलमय देहातूनच योग्य वेळीं शुभ मुहूर्तावर शंकराचा आविर्भाव झाला हेच आपले चरित्रनायक भगवान् श्रीशंकराचार्य होत

## आचार्यांचा जन्म

शिवगुरूंची पत्नी आर्यांबा प्रसूत झाली तो दिवस वैशाख शुद्ध पंचमीचा होता काहीं लोक दशमी मानतात आचार्यांच्या जन्मानें विभवनाम संवत्सर हें खरोखरच वैभवसंपन्न झालें त्या वेळीं मध्याह्नींचा सूर्य आपल्या प्रखर तेजानें तळपत होता जणु काहीं हा मुलगा माझ्यासारखाच प्रखर तेजस्वी होईल असें तो सुचवीत होता कोणी म्हणेल कीं, अहो, प्रखर तेजानें तर लोकांना ताप होतो मग त्याचा काय उपयोग? पण ही शंका बरोबर नाहीं सूर्यनारायणाच्या प्रखर तेजातूनच आपल्या अमृतमय भागापूर्णानें विश्वाला शांति,

## श्रीआद्यशंकराचार्य



यः शंकरः सकलशास्त्ररहस्यवक्ता
बौद्धादिदुर्बुद्धितमसां खलु चण्डभानुः ।
अभ्युद्धारविगलच्छ्रुतिमार्गमद्धा
भूमण्डले विजयते यतिसार्वभौमः ॥

## श्रीजगद्गुरु शंकराचार्य कृष्णबोधाश्रमस्वामीजी

वन्दे श्रीशंकराचार्यं ज्योतिष्पीठाधिपं गुरुम् ।
कृष्णबोधाश्रमं नाम्ना विद्यावैराग्यभूषितम् ॥



## श्रीस्वामी करपात्रीजी महाराज

यत्कृपालेशतो विद्यामध्यात्मज्ञानरूपिणीम् ।
लब्ध्वाऽऽनन्दी रामभवं शान्तश्च सुसमाहितः ॥
वाणी मूकायते यत्र मनो यात्यमनस्कताम् ।
कथं वक्तुं पारयेऽहं तदीयं गुणवैभवम् ॥
यः स्वामी करपात्रीति लोके विख्याततां गतः ।
ज्ञानवैराग्ययुक्ताय तस्मै श्रीगुरवे नमः ॥

"जो पृथ्वीमध्यें वास्तव्य करून पृथ्वीचें नियमन करतो पण ज्याला पृथ्वी ओळखीत नाहीं" इत्यादि वाक्यांनी वेद ज्याचें वर्णन करतो आणि जो जगाचा स्वामी सत्ताधारी आहे, निर्मळ आहे, नियंता आहे, ध्यान करण्याला योग्य आहे, ऋषींना, देवांना व मानवांना मोक्ष देणारा आहे, तो भक्तवत्सल लोकस्वामी भगवान् श्रीकृष्ण मला प्रत्यक्ष दिसावा

महेन्द्रादिर्देवो जयति दितिजान् यस्य बलतो
न कस्य स्वातन्त्र्यं क्वचिदपि कृतौ यत्कृतिमृते ।
कवित्वादेर्गर्वं परिहरति योऽसौ विजयिनः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ५ ॥

ज्याच्या बळावरच इंद्रादि देव दैत्यांना जिंकू शकतात, ज्याच्या कृतीशिवाय कोणालाहि कोणत्याहि कार्यांत स्वातंत्र्य नाहीं, जो कवि विजयी इत्यादि लोकांचा कवित्व, विजय इत्यादि गोष्टींबद्दलचा गर्व नाहींसा करतो, अर्थात् जो कवींचा कवि व जेत्यांचा जेता आहे काहीं पुस्तकांत 'कवित्वादेर्' याच्या ऐवजीं 'बलारातेर्' असा पाठ आढळतो त्या ठिकाणी बलाराति म्हणजे इंद्र समजावा बल दैत्याशीं युद्ध करून विजयी झालेल्या इंद्राच्याहि गर्वाचा जो परिहार करतो असा तो कृपाळू लोकनायक भगवान् श्रीकृष्ण, मला प्रत्यक्ष दर्शन देवो

विना यस्य ध्यानं व्रजति पशुतां सूकरमुखां
विना यस्य ज्ञानं जनिमृतिभयं याति जनता ।
विना यस्य स्मृत्या कृमिशतजनिं याति स विभुः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ६ ॥

ज्याचें ध्यान केलें नाहीं तर मनुष्य डुकराच्या, कोल्ह्या कुत्र्याच्या जन्माला जातो, ज्याच्या ज्ञानाशिवाय मनुष्याचें जन्ममरणाचें भय टळू शकत नाहीं, ज्याचें स्मरण केलें नाहीं तर मानवाला शेंकडों कृमिकीटकांचे जन्म घ्यावे लागतात, असा तो सर्वसमर्थ भक्तवत्सल भगवान् श्रीकृष्ण मला प्रत्यक्ष केव्हा भेटेल ? त्याच्या प्रत्यक्ष दर्शनासाठीं माझा जीव आतुर झाला आहे

नरातङ्कोट्टङ्कः शरणशरणो भ्रान्तिहरणो
घनश्यामो वामो व्रजशिशुवयस्योऽर्जुनसखः ।

स्वयंभूर्भूतानां जनक उचिताचारसुखदः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ७ ॥

जो मनुष्याना छळणाऱ्या दुष्ट राक्षसादिकांचा नाश करतो, शरण आलेल्याचें संरक्षण करतो, आर्तीचा नाश करतो, पाण्यानें भरलेल्या ढगाप्रमाणें ज्याची अंगकांति सावळ्या रंगाची आहे, जो अत्यंत सुंदर आहे, गोपाल बालकांचा समवयस्क मित्र आहे, अर्जुनाचा सखा आहे, स्वयंभू म्हणजे ज्याचा कोणी जनक नाहीं, पण जो विश्वाचा जनक आहे, योग्य आचरण करणा-याला जो सुख देणारा आहे, असा हा त्रैलोक्याधीश भक्तवत्सल भगवान् श्रीकृष्ण मला प्रत्यक्ष दिसावा, अशी माझी उत्कंठा आहे

यदा धर्मग्लानिर्भवति जगतां क्षोभकरणी
तदा लोकस्वामी प्रकटितवपुः सेतुधृगजः ।
सतां धाता स्वच्छो निगमगणगीतो व्रजपतिः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषय ॥ ८ ॥

सर्व लोकामध्ये अस्थिरता निर्माण करणारा असा धर्माचा ऱ्हास जेव्हा घडून येतो तेव्हा जगन्नायक भगवान् श्रीकृष्ण अवतार घेऊन लोक मर्यादा व धर्म मर्यादा सुरक्षित ठेवतो ज्याला तत्त्वत जन्म नाहीं पण जो वेळोवेळीं जन्म घेऊन सताचें संरक्षण करतो, जो निर्मल आहे, सर्व वेदानीं वर्णिलेला आहे, जो गोकुल-वृंदावनाचा अधिपति आहे असा जो भगवान् श्रीकृष्ण तो मला प्रत्यक्ष दिसावा मी त्याच्या दर्शनासाठीं तळमळत आहे हे श्रीकृष्णा ! मला प्रत्यक्ष दर्शन दे

इति हरिरखिलात्माऽऽराधितः शङ्करेण
श्रुतिविशदगुणोऽसौ मातृमोक्षार्थमाद्यः ।
यतिवरनिकटे श्रीयुक्त आविर्बभूव
स्वगुणवृत उदारः शङ्खचक्राब्जहस्तः ॥ ९ ॥

आपल्या मातेला मुक्ति मिळावी म्हणून याप्रमाणें श्रीशंकराचार्यांनीं, अखिल जगाचा आत्मा असलेल्या श्रीकृष्णाची या स्तोत्रानें आराधना केली तो श्रीकृष्ण भक्ताचीं सर्व दु खें हरण करतो म्हणून त्याला हरि म्हणतात त्याचे गुण वेदानीं विशद करून सांगितलेले आहेत तो सर्व जगाचें मूळकारण

आहे म्हणून त्याला आद्य म्हणतात. तो मोठा उदार आहे. थोर अंतःकरणाचा आहे. शंकराचार्यांनी केलेली स्तुति ऐकून, सौंदर्य, माधुर्य, लावण्य, कारुण्य इत्यादि आपल्या अंगच्या स्वतःसिद्ध असलेल्या सर्व गुणांनीं संपन्न असा तो आनंदकंद श्रीकृष्ण, शंख, चक्र, गदा, पद्म धारण करून लक्ष्मीसह श्रीशंकराचार्यांच्या डोळ्यांसमोर प्रत्यक्ष उभा राहिला!! आचार्यांच्या मातेलाहि दर्शन देऊन आचार्यांचे व त्यांच्या मातेचे सर्व मनोरथ त्यानें पूर्ण केले.

• •

# श्रीकृष्णाष्टकम्

## (२)

[ प्रमाणिका वृत्तांतलें हें श्रीकृष्णाष्टक, हें एक अष्टक नसून हें एक जोडअष्टक आहे. म्हणायला अत्यंत गोड आहे. यमक, अनुप्रास इत्यादि अलंकारहि यांत आहेतच. शिवाय श्रीकृष्णाचें शब्दचित्रहि यांत फारच उत्तम रेखाटलेलें आहे. ]

भजे व्रजैकमण्डनं समस्तपापखण्डनम् ।
स्वभक्तचित्तरञ्जनं सदैव नन्दनन्दनम् ॥
सुपिच्छगुच्छमस्तकं सुनादवेणुहस्तकम् ।
अनङ्गरङ्गसागरं नमामि कृष्णनागरम् ॥ १–२ ॥

परम चतुर आनंदकंद नंदनंदन नटनागर भगवान श्रीकृष्ण प्रभु, त्याला मी प्रेमभावानें भजत आहें तो वृंदावनाचा एकमात्र अलंकार आहे. तो सर्व पापांचा नाश करणारा आहे. आणि आपल्या भक्तजनांच्या चित्ताचें सर्व काळ रंजन करणारा आहे.

मोरांच्या पिसांचा उत्तम मुकुट ज्याच्या मस्तकावर शोभत आहे आणि ज्यानें आपल्या हातात मधुर नाद करणारी मुरली धारण केली आहे, जो कामदेवाच्या कांतीचा सागर आहे, त्या नटनागर श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों.

मनोजगर्वमोचनं विशाललोललोचनं
विधूतगोपशोचनं नमामि पद्मलोचनम् ।

करारविन्दभूधरं स्मितावलोकसुन्दरं
महेन्द्रमानदारणं नमामि कृष्णवारणम् ॥ ३–४ ॥

कामदवाच्या दर्पाचें हरण करणारा तो भगवान् श्रीकृष्ण, त्याचे नेत्र मोठे विशाल आणि चचल आहेत त्यानें गोप व गोपीजनाचें दु ख हरण केलेलें आहे ज्याचे नेत्र कमळाप्रमाणें सुदर आहेत, त्या श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों

इद्राच्या गर्वाचा परिहार करताना ज्यानें गोवर्धन पर्वत सात दिवस आपल्या, कमलाप्रमाणें कोमल असलेल्या हातावर सहज लीलेनें धारण केला, ज्याचें गालातल्या गालात हसणें आणि मिस्किल दृष्टीनें पहाणें मोहक दिसतें, ज्यानें इद्राच्य अहकाराचा परिहार केला, त्या श्रीकृष्णरूपी महागजाला मी नमस्कार करतों

कदम्बसूनकुण्डलं सुचारुगण्डमण्डलम् ।
व्रजाङ्गनैकवल्लभं नमामि कृष्णदुर्लभम् ॥
यशोदया समोदया सगोपया सनन्दया ।
युतं सुखैकदायकं नमामि गोपनायकम् ॥ ५–६ ॥

ज्याच्या कानात कदबाच्या फुलाचीं कुडलें आहेत, ज्याचें कपोल मडल –गाल अत्यत सुदर दिसत आहेत, गोपीजनाचा तो आवडता आहे, अभक्ताला ज्याचें दर्शन होणें अत्यत दुर्लभ आहे, अशा त्या भगवान् श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों

जो गोपसमुदायामध्यें नदासह विराजमान असलेल्या प्रसन्नमुख अशा यशोदेच्या सान्निध्यात उभा आहे, ज्याच्याकडे पाहून आनदच आनद वाटतो, त्या गोपनायक श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों

सदैव पादपङ्कजं मदीयमानसे निजम् ।
दधानमुत्तमालकं नमामि नन्दबालकम् ॥
समस्तदोपशोषणं समस्तलोकपोषणम् ।
समस्तगोपमानसं नमामि कृष्णलालसम् ॥ ७–८ ॥

माझ्या अंतःकरणरूपी सरोवरामध्यें ज्यानें आपलें चरणकमल नेहमीच स्थापन केलेलें आहे, ज्याचे कुरळे केस फारच सुंदर दिसतात, त्या नंदबालकाला मी नमस्कार करतों.

भक्तजनांच्या अंतःकरणांतील सर्व दोषांचें निरसन करणारा, सर्व लोकांचें पालनपोषण करणारा, आणि संपूर्ण गोकुलवासि जनांचें मूर्तिमंत मनच असलेला, असा तो नंदाच्या लालसेचा विषय असलेला, नंदबालक आनंद-कंद भगवान् श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों.

भुवो भरावतारकं भवाब्धिकर्णधारकम् ।
यशोमतीकिशोरकं नमामि दुग्धचोरकम् ॥
दृगन्तकान्तभङ्गिनं सदासदालसङ्गिनम् ।
दिने दिने नवं नवं नमामि नन्दसम्भवम् ॥ ९–१० ॥

दुष्टांचा संहार करून पृथ्वीचा भार हलका करणारा, संसारसागरातील कर्णधार आणि दुधादह्याची चोरी करणारा यशोदेचा कुमार जो भगवान् श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों. कांहीं पुस्तकांतून 'चित्तचोरकम्' असा पाठ आढळतो. त्या ठिकाणीं भक्तांचें चित्त हरण करणारा असा अर्थ करावा.

ज्याचे नेत्रकटाक्ष अत्यंत सुंदर दिसतात आणि उत्तम अलंकारांनीं जो सदासर्वकाळ भूषित झालेला असतो — दुष्टजनांशीं नेहमीं कपटानें वागणारा कपटपटु भगवान् श्रीकृष्ण, जेव्हा जेव्हा पहावें तेव्हा तेव्हा तो नवाच म्हणजे अपूर्वच दिसतो. अशा त्या नंदकुमाराला मी नमस्कार करतों.

गुणाकरं सुखाकरं कृपाकरं कृपापरम् ।
सुरद्विषन्निकन्दनं नमामि गोपनन्दनम् ॥
नवीनगोपनागरं नवीनकेलिलम्पटम् ।
नमामि मेघसुन्दरं तडित्प्रभालसत्पटम् ॥ ११–१२ ॥

जो गोपनंदन भगवान् श्रीकृष्ण सर्व सद्गुणांची खाण आहे, सुखाचा सागर आहे, दयेचा समुद्र आहे, भक्तावर कृपा करण्याकरितां सदा तत्पर आहे, देवांचे शत्रु जे दैत्य दानव, त्यांचा नाश करतो, त्या गोपालकृष्णाला मी नमस्कार करतों.

नित्य नव्या नव्या बाललीला करणारा, गोपालबालकामध्यें अत्यंत चतुर असलेला, घनश्याम आणि विद्युल्लतेप्रमाणें ज्याच्या अंगांवर पीतांबर झळकत आहे असा जो भगवान् श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों.

समस्तगोपनन्दनं हृदम्बुजैकमोहनं
नमामि कुञ्जमध्यगं प्रसन्नभानुशोभनम् ।
निकामकामदायकं दृगन्तचारुसायकं
रसालवेणुगायकं नमामि कुञ्जनायकम् ॥ १३-१४ ॥

सर्व गोपालांना आनंद देणारा, हृत्कमलाला प्रफुल्लित करणारा प्रसन्न आणि सूर्यासारखा देदीप्यमान, असा जो कुंजविहारी गोपालकृष्ण त्याला मी नमस्कार करतों.

तो भक्तजनांचे सकल मनोरथ पूर्ण करणारा आहे, ज्याचे कटाक्ष बाणाप्रमाणें चित्ताचा वेध करणारे आहेत, रसाळ वेणुनादाची साथ घेऊन जो सुंदर गायन करतो, त्या वृंदावनांतील कुंजवनाच्या अधिनायकाला मी नमस्कार करतों.

विदग्धगोपिकामनोमनोज्ञतल्पशायिनं
नमामि कुञ्जकानने प्रवृद्धवह्निपायिनम् ।
यदा तदा यथा तथा तथैव कृष्णसत्कथा
मया सदैव गीयतां तथा कृपा विधीयताम् ॥१५-१६॥

चतुर गोपीजनांच्या अंतःकरणरूपी कोमल शय्येवर शयन करणारा, कुंजवनामध्यें भडकलेल्या वणव्याला गिळून टाकणारा, भक्तवत्सल भगवान् श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों.

हे श्रीकृष्णा ! वेळोवेळीं कोणत्याहि निमित्तानें कशी का होईना तुझी सच्चरित्रेंच माझ्या मुखानें वर्णिलीं जावीत, अशीच माझ्यावर कृपा करावी, हीच माझी विनंती आहे.

प्रमाणिकाष्टकद्वयं जपत्यधीत्य यः पुमान् ।
भवेत्स नन्दनन्दने भवे भवे सुभक्तिमान् ॥ १७ ॥

प्रमाणिक वृत्तांतील हीं दोन्ही कृष्णाष्टकें पाठ करून जो म्हणत राहील तो जन्मोजन्मीं नंदनंदन श्रीकृष्णप्रभूचा अनन्यभक्त होईल.

• •

# गोविन्दाष्टकस्तोत्रम्

[ हें गोविंदाष्टक म्हणताना कानाला फारच गोड लागतें. गोविंदाचें पारमार्थिक स्वरूप व अवतारचरित्र यात मोठ्या बहारीनें वर्णन केलेलें आहे गोविंदाला पहावयास कोठें लाब जायला नको या अष्टकाचें पठण करा, म्हणजे परमानदरूप गोविंद आपल्या हृदयातच आपल्याला भेटेल असें आचार्यांनी *स्तोत्राच्या शेवटी म्हटलें आहे* ]

सत्यं ज्ञानमनन्तं नित्यमनाकाशं परमाकाशं
गोष्ठप्राङ्गणरिङ्गणलोलमनायासं परमायासम् ।
मायाकल्पितनानाकारमनाकारं भुवनाकारं
क्ष्मामानाथमनाथं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ १ ॥

जो सत्यस्वरूप आणि ज्ञानस्वरूप आहे, सदा सर्वकाळ सर्वत्र विराजमान असल्यामुळें आणि विश्वातील सर्व पदार्थांच्या रूपानें तोच नटलेला असल्यामुळें ज्याच्या स्वरूपाचा कधींच अत लागत नाहीं म्हणून ज्याला अनत म्हणतात ज्याचा कधीं नाश होत नाहीं म्हणून त्याला नित्य असेंहि म्हणतात आकाश, वायु, तेज, जल आणि पृथ्वी हीं पचमहाभूतें ज्याच्या स्वरूपात सामावलेलीं असल्यामुळें जो आकाशाहून भिन्न आहे, तथापि तो परमाकाश म्हणजे महाकाश किंवा चिदाकाश स्वरूप आहे आकाशापेक्षाहि मोठा आहे त्याचा अतर्भाव किंवा समावेश दुसऱ्या कोणत्याहि तत्त्वात होत नाहीं म्हणून त्याला अनाकाश असेंहि म्हणतात

जो गोकुळाच्या अगणात रागण्यामध्यें–रिंगणें घालण्यामध्यें–चपळाई दाखवीत आहे, अनन्यभक्ताना ज्याच्या प्राप्तीसाठीं काहीं आयास पडत नाहींत पण भक्तिहीनाना मात्र ज्याच्या प्राप्तीकरिता फार आयास पडतात अथवा तत्त्वत ज्याला काहीं परिश्रम नाहींत पण भक्तजनाच्या मेळाव्यात, खेळात किंवा काम करताना जो फार थकल्यासारखा दिसतो

तत्त्वत ज्याला काहीं आकार नाहीं पण मायेनें ज्यानें अनेक आकार कल्पिले आहेत व धारणाहि केले आहेत, जो विश्वाच्या आकारानें नटला आहे जो सपूर्ण पृथ्वीचा आणि लक्ष्मीचाहि नाथ म्हणजे अधिपति आहे, स्वत

मात्र अनाथ आहे, अर्थात् ज्याचा कोणीहि अधिपति नाहीं अशा त्या आनंदस्वरूप असलेल्या गोविंदाला प्रणाम करा.

मृत्स्नामत्सीहेति यशोदाताडनशैशवसन्त्रासं
व्यादितवक्त्रालोकितलोकालोकचतुर्दशलोकालिम् ।
लोकत्रयपुरमूलस्तम्भं लोकालोकमनालोकं
लोकेशं परमेशं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ २ ॥

" अरे ! माती खातोस काय तूं ? " असें म्हणणारी यशोदा माता, आतां आपल्याला मार देईल असें समजून बालस्वभावाला अनुरूप अशा भीतीनें तो घाबरला आहे. " आई ! मीं माती खाल्ली नाहीं, पहा माझें तोंड " असें म्हणून आऽऽ केला असतां ज्याच्या मुखांत यशोदेला लोकालोक पर्वतासह चौदा भुवनांची मालिका दिसली, जो त्रैलोक्याचा मूळ आधारस्तंभ आहे, सर्व लोकांना जो प्रकाशित करतो पण ज्याला कोणीहि प्रकाशित करूं शकत नाहीं, अर्थात् सर्व प्रकाशक व स्वयप्रकाश असलेल्या त्या सर्व लोकाधिपतीला, महान् सत्ताधारी आणि निरतिशयानंद स्वरूप असलेल्या गोविंदाला प्रणाम करा.

त्रैविष्टपरिपुवीरघ्नं क्षितिभारघ्नं भवरोगघ्नं
कैवल्यं नवनीताहारमनाहारं भुवनाहारम् ।
वैमल्यस्फुटचेतोवृत्तिविशेषाभासमनाभासं
शैवं केवलशान्तं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ३ ॥

देवांचें शत्रुत्व करणाऱ्या बड्याबड्या दैत्यांचा ज्यानें नाश केला आहे, जो पृथ्वीचा भार दूर करतो व भवरोगाचा म्हणजे संसारदुःखाचा नाश करतो, जो मोक्षपदस्वरूप आहे, ज्याला तत्त्वतः कांहीं खायला लागत नाहीं पण गोकुळ-वृंदावनामध्यें भक्तांनीं व गोपींनीं दिलेलें लोणी प्रेमानें खातो, न दिलें तर तें चोरूनहि खातो व प्रलयकाळीं सर्व विश्वाचेंहि भक्षण करतो. तत्त्वतः तो कोठेंच प्रतिबिंबित होत नाहीं, पण सत्त्वगुणाच्या उत्कर्षानें स्वच्छ झालेल्या चित्तवृत्तीमध्यें मात्र विशेषकरून ज्याचें प्रतिबिंब प्रतीतीस येतें, अशा त्या केवळ शांतस्वरूप असलेल्या मंगलमय परमानंदरूप गोविंदाला नमस्कार करा.

गोपालं भूलीलाविग्रहगोपालं कुलगोपालं
गोपीखेलनगोवर्धनधृतिलीलालालितगोपालम् ।
गोभिर्निगदितगोविन्दस्फुटनामानं बहुनामानं
गोधीगोचरदूरं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ४ ॥

पृथ्वीवर क्रीडा करण्याकरिता गोपालाच्या देह धारण करून ज्यानें गोपालवंशात जन्म घेतला आणि गाई राखल्या, गोपीजनामध्यें खेळणें, गोवर्धन पर्वत करांगुलीवर धारण करणें इत्यादि अनेक लीलांनीं गोपालाचें ज्यानें लालन पालन केलें, वेदांनी अथवा गाईंनी देखील 'गोविंद गोविंद' म्हणून ज्याच्या नामाचा स्पष्ट उच्चार केला, ज्याला अनेक नामें आहेत, जो वाणी आणि बुद्धि यांच्या विषयापासून दूर आहे, म्हणजे वाणीला साकल्यानें ज्याचें वर्णन करता येत नाहीं व बुद्धीलाहि संपूर्णपणें ज्याचें आकलन होत नाहीं, अशा त्या परमानंदरूप गोविंदाला नमस्कार करा.

गोपीमण्डलगोष्ठीभेदं भेदावस्थमभेदाभं
शश्वद्गोखुरनिर्धूतोद्धतधूलीधूसरसौभाग्यम् ।
श्रद्धाभक्तिगृहीतानन्दमचिन्त्यं चिन्तितसद्भावं
चिन्तामणिमहिमानं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ५ ॥

गोपीसमुदायातील गोष्ठींमध्यें विराजमान होणारा, जो तत्त्वत: अभिन्न स्वरूप म्हणजे एकरूप असूनहि भिन्नभिन्न अवस्था धारण करतो, अथवा ज्याच्या अनेक रूपातहि तत्त्ववेत्त्यांना एकरूपतेची प्रतीति येते, वरचेवर गाईंच्या खुराच्या आघातानें वर उठणाऱ्या धुळीनें धूसरित म्हणजे धुळकट होण्यात जो आपल्याला उत्तम भाग्यवान् समजतो, अथवा गोरजानें धुळकट होण्यातहि ज्याचें सौंदर्य उठावदार दिसतें, श्रद्धा आणि भक्ति यांच्या साहाय्यानें ज्याचा आनंद ग्रहण करता येतो, अचिंत्य म्हणजे चिंतन करण्यास अशक्य असूनहि योगीजन ज्याच्या सत्स्वरूपाचें चिंतन करतात, ज्याचा महिमा चिंतामणिसारखा आहे, अर्थात् जो भक्तांचें सकल मनोरथ पूर्ण करणारा आहे, त्या परमानंदरूप गोविंदाला तुम्ही प्रणाम करा.

स्नानव्याकुलयोषिद्वस्त्रमुपादायागमुपारूढं
व्यादित्सन्तीरथ दिग्वस्त्रा ह्युपादातुमुपाकर्षन्तम् ।

निर्धूतद्वयशोकविमोहं बुद्धं बुद्धेरन्तस्थं
सत्तामात्रशरीरं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ६ ॥

स्नानामध्यें व्यग्र असलेल्या गोपींचीं वस्त्रें घेऊन जो यमुनेच्या काठीं कदंबाच्या झाडावर जाऊन बसला ! आपआपलीं वस्त्रें घेण्याकरिता उत्सुक झालेल्या त्या नग्न गोपींना वस्त्रें घेण्याकरिता पाण्यातून बाहेर यावयाला लावणारा, ज्याच्या स्मरणानें शोक आणि व्यामोह दोन्हीं नाहींसे होतात, जो ज्ञानस्वरूप असून बुद्धीच्या अगदीं आंत किंवा बुद्धीच्याहि पलीकडे राहातो केवल सत्ता म्हणजे अस्तित्व हेंच ज्याचें शरीर आहे अशा त्या परमानंदरूप गोविंदाला वंदन करा.

कान्तं कारणकारणमादिमनादिं कालघनाभासं
कालिन्दीगतकालियशिरसि नृत्यन्तं सुविनृत्यन्तम् ।
कालं कालकलातीतं कलिताशेषं कलिदोषघ्नं
कालत्रयगतिहेतुं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ७ ॥

जो अत्यंत सुंदर आहे, विश्वाला कारण असलेल्या मूळ प्रकृतीचें किंवा पंचमहाभूतादिकांचेंहि जो कारण आहे, जो सर्वांचें मूळकारण आहे, पण ज्याचें मूळकारण कोणींच नाहीं, पाण्यानें भरलेल्या ढगाप्रमाणें ज्याची अंगकांति कृष्णवर्ण आहे, यमुनेच्या डोहामध्यें असलेल्या कालिय नागाच्या मस्तकावर नृत्य करणारा, अत्यंत कौशल्यानें नृत्य करणारा, जो कालस्वरूप असून कोणत्याहि कालखंडांत अंतर्भूत होत नाहीं, जो सर्वांना आपल्या स्वरूपांत सामावून घेतो किंवा सर्व विषयांचें आकलन करतो, ज्याच्या स्मरणानें संपूर्ण कलिदोष नाहींसे होतात किंवा जो कलियुगांतील दोषांचें निरसन करणारा आहे, तिन्हीं काळाच्या गतींचें — कालचक्राच्या गतींचें जो कारण आहे, त्या परमानंदरूप गोविंदाला प्रणाम करा.

वृन्दावनभुवि वृन्दारकगणवृन्दाराधितवन्द्येऽहं
कुन्दाभामलमन्दस्मेरसुधानन्दं सुहृदानन्दम् ।
वन्द्याशेषमहामुनिमानसवन्द्यानन्दपदद्वन्द्वं
वन्द्याशेषगुणाब्धिं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ८ ॥

वृंदावनाच्या परिसरात असंख्य देवगणांचे समुदाय आणि वृन्दा ( एक पतिव्रता व भक्त असलेली स्त्री ) यांच्याकडून ज्याची आराधना केली गेलेली आहे, अशा हे श्रीकृष्णा ! मी तुला वंदन करतों कुंदपुष्पाच्या कांतीप्रमाणें स्वच्छ असलेल्या ज्याच्या मंदहास्यामध्यें अमृतासारखा आनंद भरलेला आहे, जो मित्रजनाला आनंद देतो, सर्व जगाला वंद्य असलेल्या नारदादि महामुनींच्याहि मनाला, ज्याचे आनंददायक चरणयुगल वंदनीय वाटतात, आणि वंदनीय तसेंच आदरणीय अशा सर्व गुणांचा जो सागर आहे, अशा त्या परमानंदस्वरूप गोविंदाला वंदन करा

गोविन्दाष्टकमेतदधीते गोविन्दार्पितचेता यो
गोविन्दाच्युत माधव विष्णो गोकुलनायक कृष्णेति ।
गोविन्दाङ्घ्रिसरोजध्यानसुधाजलधौतसमस्ताघो
गोविन्दं परमानन्दामृतमन्तस्थं स समभ्येति ॥ ९ ॥

या स्तोत्रात वर्णन केल्याप्रमाणें सर्व गुणांनीं संपन्न असलेल्या गोविंदाच्या ठिकाणीं आपलें मन लावून जो कोणी या गोविंदाष्टकाचा पाठ करील, गोविंदा ! अच्युता ! माधवा ! विष्णो ! गोकुलनायका श्रीकृष्णा ! अशा रीतीनें म्हणत राहील, त्याचीं सर्व पापें गोविंदाच्या चरणकमलाच्या ध्यानरूपी — अमृताप्रमाणें स्वच्छ असलेल्या जलानें धुवून निघतील पार नाहींशीं होतील आणि तो स्वतः त्याच अंतःकरणात विराजमान असलेल्या सर्वश्रेष्ठ आनंदरूप अमृतमय अशा गोविंदाला प्राप्त होईल अंतःस्थ नारायणाचा त्याला साक्षात्कार होईल

• •

## अच्युताष्टकम्

( १ )

[ या स्तोत्राचा आरंभच 'अच्युताच्युत' या शब्दानीं केलेला आहे अच्युत म्हणजे आपल्या स्वतःसिद्ध सच्चिदानंद स्वरूपापासून कधींहि भ्रष्ट न होणारा परिपूर्ण परमात्मा स्वस्वरूपापासून च्युत न होताहि आपल्या मायेनें परोपकारार्थ राम, कृष्ण, शिव, विष्णु इत्यादि अनेक रूपें त्यानें धारण केलीं तत्त्वतः त्याला नाव नाहीं, तथापि भक्तजनांच्या कल्याणाकरिता अनेक नावें धारण

केली शेवटच्या श्लोकात म्हटल्याप्रमाणें आचार्य आपल्या या 'रमणीय' अष्टकात परमेश्वराजवळ सर्व दु खाचा निरास करण्याची प्रार्थना करीत आहेत. हें स्तोत्र खरोखरच रमणीय आहे ]

अच्युताच्युत हरे परमात्मन्
राम कृष्ण पुरुषोत्तम विष्णो ।
वासुदेव भगवन्ननिरुद्ध
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ १ ॥

हे अच्युता ! अच्युता ! तुम्ही सर्व दु खाचें हरण करता म्हणून तुम्हाला हरि म्हणतात तुम्ही सर्व जीवात्म्याचे अधिपति आहा म्हणून तुम्हाला परमात्मा म्हणतात सर्व योगीजनाना तुम्ही रमविता अथवा भक्तजनाचें चित्त तुमच्या स्वरूपीं रमतें म्हणूनहि तुम्हाला राम असें म्हणतात 'कृष्' म्हणजे सत्ता आणि 'ण' म्हणजे आनद अशा अर्थानें तुम्ही सदानन्दस्वरूप आहा म्हणून तुम्हाला कृष्ण असें म्हणतात अथवा जवसाच्या फुलाप्रमाणें, किंवा दूर्वाच्या अकुराप्रमाणें, तसेंच नीलकमलाप्रमाणें, किंवा पाण्यानें भरलेल्या मेघाप्रमाणें अथवा इद्रनील रत्नाप्रमाणें तुमची अगकाति असल्यामुळें तुम्हाला कृष्ण असें म्हणतात इतर जीवाप्रमाणें तुमच्या ज्ञानशक्तीचा किंवा क्रियाशक्तीचा कधींहि ऱ्हास किंवा लोप होत नसल्यामुळें तुम्हाला उत्तम पुरुष अथवा पुरुषोत्तम म्हणतात सर्व विश्वाला तुम्ही व्यापलेलें अथवा वेष्टिलेलें असल्यामुळें तुम्हाला विष्णु असें म्हणतात सर्व विश्वाचें तुमच्या स्वरूपात वास्तव्य असल्यामुळें व सर्व विश्वात तुमचें वास्तव्य असल्यामुळें तुम्हाला 'वासु' आणि तुम्ही स्वयप्रकाश देदीप्यमान असल्यमुळें देव' मिळून तुम्हाला वासुदेव असें नाव पडलें ! किंवा वसुदेवाच्या पोटीं तुम्ही अवतार घेतला म्हणूनहि तुम्हाला वासुदेव म्हणतात तुम्ही षड्गुणैश्वर्यांनीं सपन्न असल्यामुळें तुम्हाला भगवान् म्हणतात ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य याच्या पूर्णतेला षड्गुणैश्वर्य म्हणतात देवा ! ते तुमच्याजवळ आहे म्हणून तुम्ही भगवान् आहा कधीं शत्रूकडून तुमचा निरोध म्हणजे पराभव होत नाहीं म्हणून तुम्हाला अनिरुद्ध असें म्हणतात समुद्रमथनाच्या वेळीं वर आलेल्या श्रीनें म्हणजे लक्ष्मीनें तुम्हालाच वरलें म्हणून तुम्ही श्रीपति आहा अथवा श्री म्हणजे पराशक्ति

योगमाया ती तुमच्याच ठिकाणीं असल्यामुळें तुम्हाला श्रीपति म्हणतात. हे परमेश्वरा ! आपण माझ्या सर्व दुःखांचा निरास करा.

विश्वमङ्गल विभो जगदीश
नन्दनन्दन नृसिंह नरेन्द्र ।
मुक्तिदायक मुकुन्द मुरारे
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ २ ॥

हे परमेश्वरा ! आपल्यामुळेंच त्रैलोक्याचे — विश्वाचें मंगल म्हणजे कल्याण होत आहे म्हणून विश्वमंगल हें तुमचें यथार्थ नांव आहे. विविधरूपानें तुम्ही नटतां म्हणून तुम्हाला विभु असें म्हणतात. तुम्ही सर्व जगाचे स्वामी आहां. नंदाच्या घरीं पुत्ररूपानें राहून त्याला तुम्ही आनंदविलें म्हणून तुम्ही नंदनंदनहि आहां. भक्तश्रेष्ठ प्रल्हादाकरितां तुम्ही नरसिंहाच्या रूपानें अवतरलां. सर्व जीवांचे तुम्ही अधिपति आहां म्हणून तुम्हाला नरेंद्र असें म्हणतात. आपण मुक्ति देणारे आहां म्हणूनच आपणांस मुकुंद असेंहि म्हणतात. मुर नांवाच्या दैत्याचा तुम्ही नाश केला म्हणून तुम्हाला मुरारि असें नांव पडलें. हे श्रीपते ! माझ्या सर्व दुःखांचा निरास करा.

रामचन्द्र रघुनायक देव
दीननाथ दुरितक्षयकारिन् ।
यादवेन्द्र यदुभूषण यज्ञ
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ३ ॥

हे परमेश्वरा ! आपण भक्तांना रमविणारे व चंद्राप्रमाणें आल्हाद देणारे आहां म्हणून आपणास रामचंद्र म्हणतात. रघुराजाच्या घराण्यांत आपण श्रेष्ठ आहां म्हणून आपणास रघुनायक हें नांव आहे. आपण स्वयंप्रकाश आहां, दीनांचे नाथ म्हणजे संरक्षक आहां, भक्तांच्या पापांचा नाश करतां. सर्व यादवांमध्यें आपण श्रेष्ठ आहां. यदुवंशाचें भूषण आहां. आपण यज्ञस्वरूप आहां. परमेश्वरा ! आपण माझ्या सर्व दुःखांचा नाश करा.

देवकीतनय दुःखदवाग्ने
राधिकारमण रम्य सुमूर्ते ।

दुःखमोचन दयार्णव नाथ
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ४ ॥

हे प्रभो देवकीनंदना ! आपण सर्व दु खाना जाळून भस्म करणारे प्रत्यक्ष दावानल आहा राधेच्या अंत करणाला रमण्याचें एकमेव अधिष्ठान आहा परम रमणीय आहा आपली मूर्ति मोठी सुंदर आहे आपण भक्ताना सर्व दु खातून सोडविता दयेचे सागर आहा ! जगाचें आपण सरक्षक आहा, म्हणून आपणास नाथ म्हणतात हे श्रीपते ! परमेश्वरा ! आपण माझीं सर्व दु खें नाहींशीं करा

गोपिकावदनचन्द्रचकोर
नित्य निर्गुण निरञ्जन जिष्णो ।
पूर्णरूप जय शङ्कर शर्व
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ५ ॥

चकोरपक्ष्याला ज्याप्रमाणें चंद्राकडे पाहून आनंद होतो त्याचप्रमाणें तुम्हालाहि आपल्या अनन्यभक्त असलेल्या गोपीजनाच्या मुखचंद्राकडे पाहून आनद होतो परमेश्वरा ! तुम्ही नित्य, निर्गुण, निरंजन आणि विश्वविजयी आहा तुम्हीच सर्व लोकाचें कल्याण करता म्हणून तुम्हाला शकर असें म्हणतात तुम्हाला शर्वहि म्हणतात कारण तुम्ही प्रलयकाळीं सर्व विश्वाचा आपल्या स्वरूपात लय करता अथवा भक्तजनाच्या दु खाचा तुमच्या कृपेनें लय होतो म्हणूनहि तुम्हाला शर्व असें म्हणतात हे परमेश्वरा ! माझ्या सर्व दु खाचा निरास करा

गोकुलेश गिरिधारण धीर
यामुनाच्छतटखेलन वीर ।
नारदादिमुनिवन्दितपाद
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ६ ॥

हे गोकुलनाथ ! तुम्ही गोवर्धन पर्वत हातावर उचलून धरला आपण मोठे धीर म्हणजे बुद्धिमान् अथवा गंभीर आहा यमुनेच्या काठीं स्वच्छ वाळवटात खेळणें आपल्याला फार आवडतें आपण मोठे वीर आहा नारदादि ऋषींनीं आपल्या चरणीं वदन केलें आहे हे श्रीपते, माझीं सर्व दुःखें हरण करा

द्वारकाधिप दुरन्तगुणाब्धे
प्राणनाथ परिपूर्ण भवारे ।
ज्ञानगम्य गुणसागर ब्रह्मन्
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ७ ॥

हे द्वारकानाथ ! सागराप्रमाणें अनंत व अपार असलेल्या आपल्या गुणाचा अंत लागणें कठीण आहे, नव्हे अशक्यच आहे. आपण आमचे प्राणनाथ आहां. परिपूर्ण आहां. भवसागराचे शत्रु म्हणजे विनाशक आहां. हे ब्रह्मस्वरूपा श्रीपते ! आपण गुणाचे सागर आहां. केवळ गुरूच्या कृपेनें व उपनिषदाच्या अभ्यासानें प्राप्त होणाऱ्या ज्ञानानेंच आपल्या स्वरूपाची कल्पना येऊं शकते. हे परमेश्वरा, माझ्या सर्व दुःखाचें निरसन करा.

दुष्टनिर्दलन देव दयालो
पद्मनाभ धरणीधरधारिन् ।
रावणान्तक रमेश मुरारे
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ८ ॥

हे दुष्टाचें निर्दलन करणाऱ्या कृपाळु देवा ! ब्रह्मदेवाचें आसन असलेलें कमल आपल्या नाभिस्थानापासून प्रकट झालें म्हणून आपणास पद्मनाभ असें म्हणतात. पृथ्वीचा आधार असलेला धरणीधर म्हणजे शेष त्याचाहि आपण आधार आहां. रामाचा अवतार घेऊन आपण रावणाचा वध केला. हे रमेशा, मुरारे, श्रीपते ! माझीं सर्व दुःखें दूर कर.

अच्युताष्टकमिदं रमणीयं
निर्मितं भवभयं विनिहन्तुम् ।
यः पठेद्विषयवृत्तिनिवृत्ति-
र्जन्मदुःखमखिलं स जहाति ॥ ९ ॥

संसारभयाचें निरसन करण्याकरितां हें अत्यंत रमणीय असें अच्युताचें अष्टक निर्माण केलें आहे. विषयवृत्तींना बाजूला सारून भक्तियुक्त अंतःकरणानें जो कोणी या स्तोत्राचें पठण करील त्याचीं संपूर्ण जन्मदुःखें नाहींशीं होतील.

• •

# अच्युताष्टकम्

## ( २ )

[ या अच्युताष्टकाचें वृत्त मोठें सुंदर आहे. स्वतः आचार्यांनींच 'वृत्ततः सुन्दरम्' असें याचें वर्णन केलेलें आहे. याचा पहिला श्लोक तर प्रायः सर्वतोमुखी आहे. बाकीच्या श्लोकांनींहि श्रीहरीची उत्तम स्तुति केलेली आहे. राम आणि कृष्ण हीं रूपें अवतारभेदामुळें भिन्न असलीं तरी त्यामध्यें तत्त्वतः एकरूपता आहे. एकाच स्तोत्रांत केलेलें दोन्ही रूपाचें वर्णन आचार्यांच्या अभेदभक्तीचें सुंदर गमक आहे. प्रेमपूर्वक या स्तोत्राचा पाठ केल्यास श्रीहरि सत्वर वश होईल अशी आचार्यांची ग्वाही आहे. ]

अच्युतं केशवं रामनारायणं
कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम् ।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं
जानकीनायकं रामचन्द्रं भजे ॥ १ ॥

हे अच्युता ! तुम्ही कितीहि रूपें धारण केलीं तरी आपल्या मूळ सच्चिदानंद स्वरूपापासून कधींहि च्युत म्हणजे भ्रष्ट होत नाहीं. तुमचे केश मोठे सुंदर काळे व कुरळे आहेत म्हणून तुम्हाला केशव म्हणतात. अथवा केशि नांवाच्या दैत्याचा तुम्ही वध केला म्हणूनहि तुम्हाला केशव म्हणतात. किंवा क म्हणजे ब्रह्मदेव, अ म्हणजे विष्णु आणि ईश म्हणजे महादेव हे तिघेहि ज्याच्या वश म्हणजे अधीन राहून आपआपलें कार्य करतात तो परमात्मा तोहि तुम्हीच आहां. तुम्हीच राम आहां. तुम्हालाच नारायण म्हणतात, कारण 'नारा' म्हणजे जलसमूह, 'अयन' म्हणजे आश्रयस्थान. जलसमूह म्हणजे क्षीरसागर हा तुमचें आश्रयस्थान आहे. श्रीहरि नेहमीं जलसमूहांत — क्षीरसागरांत रहातात हें प्रसिद्धच आहे. अथवा 'नार' म्हणजे यच्चयावत् प्राण्यांचा समुदाय. त्या सर्वांमध्यें परमेश्वरा तुम्ही वास्तव्य करतां. सर्व प्राणिसमूह तुमचें 'अयन' म्हणजे वसतिस्थान आहे म्हणून तुम्हाला नारायण असें म्हणतात. श्रीकृष्णा ! यशोदामातेनें तुम्ही फार खोड्या करता म्हणून तुमच्या पोटाला दावें गुंडाळून तुम्हाला उखळीस बांधून ठेवलें होतें तेव्हांपासून दामोदर हें तुमचें नाव पडलें !

संस्थापनेचें नियमअधिक कार्य पार पाडलें होतें. कुमारिलभट्टांना एक प्रकारची रुखरुख वाटत होती. आपण प्रच्छन्नपणें बौद्ध समाजांत राहिलो. बौद्ध पंडितांकडून त्यांची तर्कविद्या ग्रहण केली. त्यांच्याच तर्कपद्धतीनें त्यांचें खंडण केलें, आणि शेवटीं राजाकडून त्यांना शासनहि करविलें याचा त्यांना पश्चात्ताप होत होता. याच पापातून मुक्त होण्याकरितां त्यांनीं देहान्त प्रायश्चित्ताचा सकल्प करून वर सांगितल्याप्रमाणें तुषाग्नींत प्रवेश केलेला होता. त्यांनीं आचार्यांना प्रणाम करून सांगितलें कीं, आपण माझा मुख्य शिष्य जो मंडणपंडित त्याच्याशीं वाद करावा. त्याच्या मताचें खंडण करावें, प्रधानमल्लनिबर्हणन्यायानें ( मुख्य मल्लाला जिंकलें म्हणजे इतरहि मल्ल जिंकल्यासारखे होतात ) त्याला आपण जिंकलें म्हणजे सर्व जडवादी कर्मठ असलेल्या मीमांसकांना जिंकल्यासारखें होईल. कुमारिलभट्टांची अनुज्ञा घेऊन आचार्य निघाले. ते मंडणपंडिताचा शोध करीत चालले

## मंडणपंडित आचार्यांचे शिष्य झाले

मंडणपंडित माहिष्मती नगरीमध्यें रहात होते. हें शहर नर्मदेच्या कांठीं इंदूरच्या विभागांत महेश्वर या नांवानें प्रसिद्ध आहे. आचार्य तेथें गेले. हें शहर मोठें होतें. त्यांत ब्राह्मणांची वस्ती फारच मोठी होती. आचार्य मंडणमिश्रांच्या घराचा शोध करू लागले. योगायोगानें मंडणपंडितांच्या दासी नदीवर भेटल्या. आचार्यांनीं त्यांना विचारलें, मंडणपंडित कोठें रहातात? हे कोणी तरी विद्वान् आहेत असें ताडून त्या दासींनीं संस्कृतांत उत्तर दिलें :

*स्वतःप्रमाणं परतःप्रमाणं कीराङ्गना यत्र गिरं गिरन्ति ।*
*द्वारस्थनीडान्तरसन्निरुद्धा जानीहि तन्मण्डनपण्डितौकः ॥*

*फलप्रदं कर्म फलप्रदोऽजः कीराङ्गना यत्र गिरं गिरन्ति ।*
*द्वारस्थनीडान्तरसन्निरुद्धा जानीहि तन्मण्डनपण्डितौकः ॥*

*जगद्ध्रुवं स्याज्जगदध्रुवं स्यात् कीराङ्गना यत्र गिरं गिरन्ति ।*
*द्वारस्थनीडान्तरसन्निरुद्धा जानीहि तन्मण्डनपण्डितौकः ॥*

वेद हे स्वतःप्रमाण आहेत का परतःप्रमाण आहेत? अर्थात् वेदांचें प्रामाण्य स्वतः सिद्ध आहे का तें कोणी चांगल्या भल्या गृहस्थानें रचले म्हणून प्रमाण मानावेत? मनुष्यांनीं केलेल्या कर्मांचीं फळें कर्म देतें का ईश्वर

देतो ? जग हें नित्य आहे का अनित्य आहे ? अशा रीतीनें दारावर टांगलेल्या पिंजऱ्यातील पोपट मैनाहि जेथें चर्चा करतात तेंच मंडणपंडिताचें घर आहे असें समजा ? अहोरात्र पंडिताच्या चर्चा ऐकून जेथें पोपटांच्याहि तोंडी हे शब्द बसले तेथें वादविवाद करणें हें काही सोपें काम नव्हतें ! आचार्य मंडण मिश्रांच्या घरी गेले अगदी मध्यान्हकाळ होता दरवाजा लावलेला होता खिडक्या बंद होत्या तथापि आचार्यांनी योगबलानें घरात प्रवेश केला ! त्या दिवशी मंडणमिश्रांच्या घरी श्राद्ध होते अधिकारी ब्राह्मण निमंत्रित केलेले होते श्राद्धसंकल्पाला आरंभ झालेला होता इतक्यात आचार्यांची स्वारी पुढें उभी असलेली दिसली ! संन्याशाला पाहून मंडणमिश्र संतापले ! संतापाच्या भरातच त्यांनी प्रश्न केला, "कुतो मुण्डी ?" अरे, हा संन्याशी कोठून आला ? आचार्यांनी या प्रश्नाचा निराळाच अर्थ कल्पून उत्तर दिलें, 'आगलात् मुण्डी' मी गळ्यापर्यंत मुंडण केलेलें आहे यावर मंडणमिश्र म्हणाले, "तसें नव्हे 'पन्थास्ते पृच्छ्यते मया' मी तुमच्या मार्गाला विचारीत आहें ( मार्गासंबंधी विचारीत आहे ) " आचार्यांनी याहि वाक्याचा निराळा अर्थ कल्पून प्रश्न केला, "मग माझ्या मार्गानें काय सांगितलें ?" अशा पद्धतीला शास्त्रात छलवाद म्हटलेलें आहे आचार्यांचा हा छलवाद ऐकून मंडणमिश्र फार चिडले ! ते म्हणाले 'अहो पीता किमु सुरा ' " काय दारूबिरू घेतली आहे काय ? आचार्यांनी 'पीता' या शब्दाचा अर्थ 'पिवळी' असा कल्पून उत्तर दिलें, "ते दारू पिवळी नसते ती पांढरी असते मंडणमिश्र म्हणाले, "अहो ! तुम्हाला दारूचा रंगहि माहीत आहे !" आचार्य म्हणाले, "मी रंग जाणतो पण तुम्ही रसहि जाणता ! ! ' असा काही आचार्य आणि मंडणमिश्र यांचा एकमेकाना पाहून बोलण्याच्या स्वरूपातला सवाल झाला ग्रंथकारांनी काय रचनेच्या नादात तो अतिशयोक्तीनें वर्णन केलेला दिसतो एवढे विद्वान व अधिकारी इतक्या हीन पातळीवर उतरतील असें वाटत नाही काही असो, शेवटी आचार्यांनी मंडणमिश्रांना वादभिक्षेची याचना केली ती त्यांनी आनंदानें स्वीकारली आचार्य निघून गेले व श्राद्धकर्म संपलें

पुढें आचार्य आणि मंडणमिश्र यांचा वाद सुरू झाला या वादामध्यें मध्यस्थाचें काम प्रत्यक्ष मंडणमिश्रांची पत्नी सरस्वती हिनेंच करावयाचें ठरलें ती अध्यक्षस्थानी विराजमान झाल्यानंतर आचार्यांनी प्रतिज्ञा केली की या

वादात मी जर पराभूत झालों तर मी चतुर्थाश्रम सोडून देईन मंडणमिश्रांनीहि पण प्रतिज्ञा केली मी जर या वादात पराभूत झालों तर मी देखील गृहस्थाश्रमाचा त्याग करून संन्यास घेईन यासमाणें प्रतिज्ञा झाल्यानंतर आचार्यांनीं आपला पक्ष मांडला "ब्रह्म हेंच सत्य आहे जीव आणि परब्रह्म तत्त्वत एकच आहेत विश्व मायिक असल्यामुळें मिथ्या आहे. विश्वाचें अधिष्ठान परब्रह्म आहे. परब्रह्मच विश्वरूपानें नटलें आहे माया ही अनिर्वचनीय आहे' इत्यादि. मंडणमिश्रांनीहि पण या सर्व पक्षाचें खंडण करून आपला पक्ष मांडला "वेद हे अपौरुषेय असून स्वत प्रमाण आहेत जीवाच्या कर्मानेंच जग निर्माण होतें व तें सत्य आहे कर्मेंच जीवाना सुखदुःखात्मक फळें देतात मोक्षहि पण कर्मानेंच प्राप्त होतो" इत्यादि आचार्यांनीं मंडणाचें व मंडणानीं आचार्यांचें खंडण करावें असा हा वाद रोजच्या रोज जवळ जवळ चाळीस दिवस चालला होता

शेवटीं मंडणमिश्राचा सर्व कोटिक्रम संपला। सरस्वतीनें विचार केला, प्रसंग मोठा बाका आहे आपल्या पतीवर संन्यास घेण्याची पाळी येणार! तिनें आचार्यांस म्हटलें, "मी मंडणमिश्राची अर्धांगी आहे माझा पराभव झाल्याशिवाय मंडणमिश्राचा पूर्ण पराभव झाला असें म्हणता येणार नाहीं" आचार्यांनीं तें मान्य केलें आचार्य हे बालसंन्यासी, ही गोष्ट लक्षात घेऊन सरस्वतीनें कामशास्त्रातले प्रश्न चर्चेला घेतले। तेव्हा आचार्यांचा निरुपाय झाला। आचार्यांनीं काही मुदत मागून घेतली संरक्षणाकरिता आपलें शरीर एका गुहेंत शिष्याच्या स्वाधीन करून आचार्य त्याच वेळीं निवर्तलेल्या व स्मशानात आणलेल्या एका राजाच्या मृत शरीरात योगबलानें प्रविष्ट झाले राजा जिवंत झाला लोकाना आनंद झाला राजासह सर्व लोक वाजत-गाजत राजधानीत परत आले यासमाणें परकायाप्रवेश करून आचार्यांनीं कामशास्त्राचें अध्ययन केलें याच वेळीं आचार्यांनीं एक ग्रंथहि रचला राजाचें नाव अमरक असल्यामुळें तो ग्रंथ 'अमरशतक' म्हणून प्रसिद्धीस आला असें म्हणतात राजाच्या देहात कोणी तरी महात्मा प्रविष्ट झाला आहे असा तर्क करून राजाच्या प्रधानानें राजदूताना "त्याचा देह शोधून काढा व जाळून टाका" अशी आज्ञा केली राजदूतांनीं शोध करून आचार्यांचा देह मिळविला त्याला जाळण्याच्या उद्देशानें अग्नीहि प्रदीप्त केला इतक्यात आचार्य राजाचा देह सोडून आपल्या देहात प्रविष्ट झाले। चितेंतून ते बाहेर आले त्याच ठिकाणीं

पद्मपादानीं अंतर्दृष्टीनें ही गोष्ट लक्षात घेतली व योगबळानें नृसिंहरूप धारण करून ते तेथें आले व त्यांनीं त्या कापालिकावर झडप घालून त्याच्या नरडीचा घोट घेतला। आचार्यांनी तें अक्राळविक्राळ नरसिंहाचें रूप पाहिलें आणि हा प्रत्यक्ष भगवान् नरसिंहच आहे असें जाणून मोठ्या भक्तिभावानें नरसिंहाचें स्तोत्र केलें सर्व विषयापासून परावृत्त होऊन लक्ष्मी नृसिंहाच्या चरणकमलीं स्थिर रहा, असा आपल्या मनाला या स्तोत्रात फारच सुंदर उपदेश केलेला आहे (सु स्तो म भाग २ रा लक्ष्मी नृसिंहपञ्चरत्नस्तोत्र पहा)

आचार्यांची स्मरणशक्ति फार विलक्षण होती एकदा एका राजानें आपलीं तीन नाटकें आचार्यांना वाचून दाखविलीं होतीं पद्मपादाचार्यांनीहि ब्रह्मसूत्रशारीरमीमांसेवर ग्रंथ रचला होता ताहि आचार्यांना वाचून दाखविण्यात आला होता कालांतरानें राजाचीं तीं तीन नाटकें नष्ट झालीं व पद्मपादाचार्यांचा ग्रंथहि पद्मपादाचार्यांच्या मामानें कपटयुक्तीनें जाळून टाकला। तो राजा आचार्यां कडे आला पद्मपादाचार्यहि आचार्यांकडे आले, ते हा आचार्यांनी कित्ती तरी वर्षें लोटल्यानंतरहि तीं तीन नाटकें राजाला म्हणून दाखविलीं पद्मपादाचार्यांच्या ग्रंथातील पाच पादहि म्हणून दाखविले। तोच ग्रंथ पुढें 'पंचपादिका' या नावानें प्रसिद्धीस आला यावरून त्यांच्या स्मरणशक्तीची कल्पना करावी

एकदा आचार्य शिष्यमंडळींच्या संगतीत बसले असताना त्यांच्या कानावर अशी गोष्ट आली की, काश्मीरमध्यें शारदापीठ आहे त्या शारदापीठा या भव्य मंदिराला चारी दिशांना चार दरवाजे आहेत तेथें बडे बडे वादधुरंधर पंडित आहेत त्यांच्याशीं वाद करून तीन दिशांचे दरवाजे उघडले गेले आहेत, पण दक्षिणेकडून कोणीच असा वादपटु विद्वान् न आल्यामुळें दक्षिणेकडचा दरवाजा बंद आहे आचार्यांनीं हें ऐकलें व काश्मिरात जाण्याचा विचार करून ते शिष्यजनांना बरोबर घेऊन काश्मीरला गेले तेथेंहि त्यांनीं पंडितांशीं वाद करून त्यांना वादात जिंकलें आणि शारदापीठाचा दक्षिण दरवाजा उघडविला आचार्य त्या दरवाजानें आत गेले व शारदापीठावर ते अधिष्ठित होणार इतक्यात आकाशवाणीसारखे शब्द कानीं आले या पीठावर अधिष्ठित हाताना केवळ विद्वत्ताच उपयुक्त होत नाहीं, तर माझ्या या पवित्र पीठावर आरोहण करताना चारित्र्याचाहि विचार केला जातो आचार्यांनीं त्या आकाशवाणीचें म्हणणें लक्षात घेतलें आणि उत्तर दिलें 'आई शारदे! मी या देहानें जन्मापासून

काहीहि किल्बिष आचरण केलें नाहीं कामशास्त्राच्या अध्ययनासाठीं मला परकाया प्रवेश करावा लागला निराळ्या देहाचा आश्रय करून मी जें कार्य केलें त्याचा बध या देहाला तिळमात्रहि नाहीं, याची मला खात्री आहे आचार्यांचें हे आत्मविश्वासपूर्ण उद्गार ऐकून शारदा संतुष्ट झाली सर्व विद्वान् संतुष्ट झाले आचार्य सर्वानुमतें शारदापीठावर अधिष्ठित झाले

अभिनवगुप्त नावाचा एका शाक्त सांप्रदायिकानें आचार्यांनी त्याला वादात जिंकल्यानंतर आचार्यांचें शिष्यत्व स्वीकारलें व तो आचार्यांच्याजवळ राहिला आचार्यांचा उत्कर्ष त्याला सहन न झाल्यामुळें त्यानें आचार्यांना उद्देशून अभिचारकर्म केलें याच्या त्या जादूटोण्यानें आचार्यांना भगंदर रोग झाला त्यामुळें त्यांना फार कष्ट झाले अनेक उपाय केले पण उपयोग झाला नाहीं पद्मपादाचार्यहि मोठे मांत्रिक होते त्यांनीं त्या जादूटोण्याचें प्रतिविधान करून त्या रोगाला आचार्यांच्या शरीरातून हाकलले आचार्य रोगमुक्त झाले पुढें तोच रोग अभिनवगुप्ताला लागला व त्यातच त्याचा अंत झाला

आपलें अवतारकार्य आता पूर्ण झालें आहे असें पाहून आचार्यांनीं निर्याणाचा संकल्प केला। चारी दिशांना चार मठांची स्थापना करून राष्ट्राच्या संस्कृतिसंरक्षणाची घडी नीटनेटकी बसविली संन्याशांनी मठाची उठाठेव करावयाची नाहीं अशी शास्त्राची आज्ञा असली, तरी मातुश्रींच्या बाबतींत शास्त्राज्ञा बाजूला ठेवूनहि त्यांनी तिचा अंत्यसंस्कार करून तिच्या सेवेचें कर्तव्य जसें पार पाडलें त्याचप्रमाणें भारताची विस्कळीत झालेली सांस्कृतिक घडी नीटनेटकी करून ती सुरक्षित ठेवण्यासाठीं आचार्यांनी मठाची स्थापना करून देशसेवेचें व धर्मसेवेचें कार्य पूर्ण केलें आचार्यांनीं अलौकिक पांडित्यपूर्ण विपुल ग्रंथरचना केली गीताभाष्य, उपनिषद्भाष्यें, ब्रह्मसूत्रभाष्य विष्णुसहस्रनामभाष्य, सनत्सुजातीयभाष्य, श्वेताश्वतरोपनिषद्भाष्य इत्यादि अनेक भाष्यांची रचना केली भक्ति, ज्ञान, वैराग्य आणि उपदेशपर अशीं अमर्याद स्तोत्रें केलेलीं आहेत त्यापैकीं बरीच अद्यापि अमुद्रितहि आहेत उपदेशसाहस्री, विवेकचूडामणि इत्यादि छोटेमोठे अध्यात्मप्रकरणेंहि त्याचीं बरीच उपलब्ध आहेत

दिग्विजययात्रेच्या निमित्तानें देशभर पर्यटन करून परवादी लोकांचें खंडण केलें अवैदिक संप्रदायांचें निरसन करून वैदिक संप्रदायाची स्थापना केली वैदिक संप्रदायांतील मतभेद मिटवून सर्व मतांचा समन्वय केला अद्वैत

सिद्धान्ताचा प्रचार करून लोकांतील परस्पराबद्दल द्वेषमत्सर इत्यादि मलिन भावांचा निरास केला. अद्वैत संप्रदायाच्या रूपानें समाजामध्यें त्यांनी एक प्रकारें प्रेमपंथाचीच स्थापना केली. आपल्या यशानें दाही दिशा पूर्ण केल्या. अद्भुत चारित्र्यानें व विद्वत्तेनें लोकांना आश्चर्यचकित करून सोडलें. लोकांना भक्तीचा व मुक्तीचा अर्थात् ऐहिक कल्याणाचा व पारलौकिक कल्याणाचा मार्ग दाखवून कृतार्थ केलें. याप्रमाणें यतिसम्राट् भगवत्पूज्यपाद श्रीमान् आद्यशंकराचार्य यांनी सर्व लोकांना उपकृत करून सौजन्याची पराकाष्ठाच प्रकट केली ! एवढ्या अल्पवयांत इतकें विशाल कार्य यशस्वी रीतीनें पार पाडणारा आचार्यांच्यासारखा इतिहासांत दुसरा कोणी पहावयास सांपडणार नाहीं.

सर्वांगपरिपूर्ण अशा ज्ञानदेवीची — ज्ञानेश्वरीची व अमृतानुभवाची रचना पूर्ण झाल्यावर संतसम्राट् श्रीज्ञानदेवांनी वयाच्या एकविसाव्या वर्षी जनतेचा निरोप घेऊन स्वेच्छेनें जशी समाधि घेतली त्याचप्रमाणें आचार्यांनी आपलें इष्टकार्य पूर्ण झाल्याबरोबर तेहतिसाव्या वर्षीच हिमाचलप्रदेशांत गुहाप्रवेश करून लोकदृष्ट्या निर्वाणपद प्राप्त करून घेतलें ! दक्षिणेंत तुंगभद्रेच्या कांठीं त्यांचें निर्याण झालें असेंहि कांहीचें मत आहे. तें कांही असो आचार्यांनी एवढ्या अल्पवयांत लोककल्याणाची एवढी विशाल कामगिरी केली आहे कीं, त्याला इतिहासांत आजमितिपर्यंत दुसरा दाखला देतां येत नाहीं आचार्यांचें चरित्र अत्यंत विशाल आणि गहन आहे. त्याचें केवळ दिग्दर्शन मात्र या संक्षिप्त चरित्रांत केलें आहे. आचार्यांच्या चरणीं ही शब्दसुमनांजलि भक्तिभावानें अर्पण करून वाचकांना आतां सुबोधस्तोत्र-संग्रहाकडे दृष्टि टाकण्याची विनंती करीत आहें.

— पांडुरंगशास्त्री गोस्वामी

# अर्पणपत्रिका

॥ श्रीसच्चिदानन्दपरब्रह्मणे नमः ॥

*हिज् हायनेस श्रीमन्त सर*

**चिन्तामणराव धुंडिराज**

ऊर्फ

**अप्पासाहेब पटवर्धन**

*राजेसाहेब सांगली*

*हर हायनेस*

*श्रीमन्त सौभाग्यवती मातोश्री*

**सरस्वतीबाई पटवर्धन**

*राणीसाहेब सांगली*

*या उभयतांच्या करकमलीं*

सच्चिदानन्दसौगन्ध्यभक्तिपुष्पसमन्वितः।
आत्मयाथात्म्यफलदो नित्यसौख्यविवर्धनः॥
अपर्वरसमाधुर्यसुधाबिन्दुपरिप्लुतः।
अर्प्यते परमप्रेम्णा सुबोधस्तोत्रसंग्रहः॥

## सांगलीचे राजेसाहेब व राणीसाहेब



हिज हायनेस
श्रीमन्त चिंतामणराव धुंडिराज पटवर्धन





हर हायनेस
श्रीमन्त सौ. सरस्वतीबाई पटवर्धन

# सुबोधस्तोत्रसंग्रह

॥ श्रीमन्महागणपतये नमः ॥



[ कोणत्याहि कार्याच्या आरंभीं तें कार्य निर्विघ्नपणें परिसमाप्त व्हावें म्हणून गणपतीचें स्तवन करण्याचा प्रघात आहे. प्रस्तुत ग्रंथाच्या आरंभीं आचार्यांनीं केलेलें हें भुजंगप्रयात वृत्तांतील यमक आणि अनुप्रास अलंकारानें नटलेलें काव्यमय एकश्लोकी गणपतीचें सुंदर 'स्तवन' वाचकांपुढें सादर केलें जात आहे. ]

गलद्दानगण्डं मिलद्भृङ्गखण्डं
चलच्चारुशुण्डं जगत्त्राणशौण्डम् ।
लसद्दन्तकाण्डं विपद्भङ्गचण्डं
शिवप्रेमपिण्डं भजे वक्रतुण्डम् ॥

ज्याच्या गंडस्थलांतून दानोदक स्रवत आहे (दानोदक म्हणजे हत्तीच्या गंडस्थलांतून पाझरणारा द्रव) त्या दानोदकाच्या सुगंधानें आकृष्ट झालेले भ्रमरांचे समुदाय गंडस्थलाभोंवतीं गुंजारव करीत आहेत. ज्याची सुंदर सोंड इकडून तिकडे व तिकडून इकडे सारखी हालत आहे, जो जगाचें संरक्षण करण्यामध्यें कुशल आहे, सोंडेच्या दोन्हीं बाजूला ज्याचे दांत शोभत आहेत, भक्तजनांच्या विघ्नाचा नाश करण्यास जो पूर्ण समर्थ आहे, जो शंकराचें मूर्तिमंत प्रेमच आहे त्या वक्रतुंडाला — श्रीगजाननाला — मी प्रेमानें भजत आहें. वक्र म्हणजे वाकडे, दुष्ट प्रवृत्तीचे लोक त्यांना तुण्डयति म्हणजे तुडवितो, नष्ट करतो म्हणून गणपतीला वक्रतुंड म्हणतात. त्या वक्रतुंडाला मी नमस्कार करतों. ]

# महागणेशपञ्चरत्नस्तोत्रम् ।

[ महागणेश पञ्चरत्न या नावानें आचार्यांनीं केलेलें हें गणपतिस्तोत्र पञ्चचामर वृत्तात रचलेलें आहे हें वृत्त म्हणायला अत्यत सुदर आहे भाषा आलकारिक गोड व कायमय आहे यात गणपतीचें स्वरूप, स्वभाव व चरित्र याची छटा उत्तम प्रतीतीला येते सर्वांनीं रोज म्हणण्यासारखें आहे ]

मुदा करात्तमोदकं सदा विमुक्तिसाधकं
कलाधरावतंसकं विलासिलोकरक्षकम् ।
अनायकैकनायकं विनाशितेभदैत्यकं
नताशुभाशुनाशकं नमामि तं विनायकम् ॥ १ ॥

ज्यानें हातात प्रेमानें मोदक धारण केलेला आहे, भक्तजनाना ससार तापातून सोडविण्याकरिता जो सदा तत्पर आहे, ज्याच्या मस्तकावर चद्राची कोर शोभत आहे, भक्तीच्या विलासात रगलेल्या लोकाचें जो सरक्षण करतो, अथवा विलासि लोकाचें म्हणजे काम्य कर्मांत प्रवृत्त असलेल्यादि भक्ताचें जो सरक्षण करतो, जो अनाथाचा एकमात्र नाथ आहे लोकाचा छळ करणाऱ्या सिंदुर दैत्याचा ज्यानें नाश केला, चरणीं नम्र झालेल्या लोकाचें अशुभ जो सत्वर नाहींसें करतो, त्या विनायकाला मी नमस्कार करतों

नतेतरातिभीकरं नवोदितार्कभास्वरं
नमत्सुरारिनिर्जरं नताधिकापदुद्धरम् ।
सुरेश्वरं निधीश्वरं गजेश्वरं गणेश्वरं
महेश्वरं तमाश्रये परात्परं निरन्तरम् ॥ २ ॥

गर्वानें अत्यत उद्धट असलेल्या लोकाना जो अत्यत धाक दाखवतो, ज्याची अगकाति उदयाला येणाऱ्या सूर्याप्रमाणें देदीप्यमान आहे, नम्र झालेल्या देवाच्या शत्रूना – दैत्याना जो जर्जर करून सोडतो, जो भक्तजनाचा घोर सकटातून उद्धार करतो, अथवा अधिक नम्र असलेल्या भक्ताना सकटातून सोडवितो, ज्याला सुरेश्वर, निधिपति, गजराज, गणेश आणि महेश्वर असेंहि म्हणतात, त्या श्रेष्ठापेक्षाहि श्रेष्ठ असलेल्या गणपतीचा मी निरतर आश्रय घेत आहें

समस्तलोकशङ्करं निरस्तदैत्यकुञ्जरं
दरेतरोदरं वरं वरेभवक्त्रमक्षरम् ।
कृपाकरं क्षमाकरं मुदाकरं यशस्करं
मनस्करं नमस्कृतां नमस्करोमि भास्वरम् ॥ ३ ॥

जो सर्वलोकाचें कल्याण करतो, हत्तीमारख्या प्रचड दैत्याचा जो नाश करतो, ज्याचें उदर विशाल आहे, मुख हत्तीसारखें भव्य आहे जो अत्यंत श्रेष्ठ आहे तत्त्वत पाहू गेलें असता जो अक्षरब्रह्मस्वरूप आहे अथवा ओंकार, स्वरूप आहे, कृपाळू आहे, क्षमाशील आहे, प्रेमाचा सागर आहे, यश देणारा आहे, नमस्कार करणाऱ्याला उत्तम मन देणारा आहे, अशा ददीप्यमान गजाननाला मी नमस्कार करतो

अकिञ्चनार्तिमार्जनं चिरन्तनोक्तिभाजनं
पुरारिपूर्वनन्दनं सुरारिगर्वचर्वणम् ।
प्रपञ्चनाशभीषणं धनञ्जयादिभूषणं
कपोलदानवारणं भजे पुराणवारणम् ॥ ४ ॥

कोणत्याहि विषयात ज्याचें मन आसक्त राहिलेलें नाहीं अशा भक्त जनाच्या दु खाचें भजन करणारा, अथवा दरिद्री भक्ताचें दु ख दूर करणारा वेदानी स्तविलेला अथवा वेदाच्याच साहाय्यानें ज्याचें यथार्थ ज्ञान होऊ शकतें असा शकराचा सर्वमान्य व नित्य पुढें विराजमान असलेला पुत्र व दैत्य दानवाच्या गर्वाचा परिहार करणारा, प्रापचिक कष्टाचा नाश करणारा — ससाराचा भयकर शत्रु, अग्न्यादि देवताचा भूषण, गडस्थलातून कपोलभागीं स्रवणाऱ्या दानोदकाला आपल्या सोंडेनें वारवार पुसणाऱ्या, पुरातन प्राचीन, अनादि गजाननाला, जेव्हा पहावें तेव्हा नव्याप्रमाणें दिसणाऱ्या गणरायाला मी भक्तिभावानें भजत आहें

नितान्तकान्तदन्तकान्तिमन्तकान्तकात्मजं
अचिन्त्यरूपमन्तहीनमन्तरायकृन्तनम् ।
हृदन्तरे निरन्तरं वसन्तमेव योगिनां
तमेकदन्तमेव तं विचिन्तयामि सन्ततम् ॥ ५ ॥

ज्याची दंतकांति अत्यंत सुंदर आहे, काळाचाहि काळ महाकाळ महाकाळेश्वर असलेल्या शंकराचा जो पुत्र आहे, ज्याच्या यथार्थ स्वरूपाचा पत्ता लागत नाहीं, ज्याचा कोणालाहि अंत लागत नाहीं किंवा ज्याचा कधीं अंत म्हणजे नाश होत नाहीं, भक्तिभावानें स्मरण केलें असता जो विघ्नाचा नाश करतो, योगी लोकांच्या — भक्तजनांच्या हृदयामध्यें निरंतर वास्तव्य करणाऱ्या त्या एकदंत विनायकाचें मी निरंतर चिंतन करीत आहें

महागणेशपञ्चरत्नमादरेण योऽन्वहं
प्रजल्पति प्रभातके हृदि स्मरन् गणेश्वरम् ।
अरोगतामदोषतां सुसाहितीं सुपुत्रतां,
समाहितायुरष्टभूतिमभ्युपैति सोऽचिरात् ॥ ६ ॥

या पांच श्लोकांना महागणेशपंचरत्न असें म्हणतात पहाटेच्या वेळीं अंतःकरणांत गणेशाचें स्मरण करून जो कोणी प्रत्येक दिवशीं या स्तोत्राचें पठण करील त्याला आरोग्य प्राप्त होईल त्याचें सर्व दोष नाहींसे होतील त्याला उत्तम मित्राचा व उत्तम पुत्रपौत्रादिकांचाहि लाभ होईल समाधानकारक आयुष्य लाभेल व अष्टविध ऐश्वर्यांचीहि सत्वर प्राप्ति होईल



## शिवपञ्चाक्षरस्तोत्रम्

[ शंकराच्या सर्व मंत्रांत पंचाक्षर मंत्र अत्यंत श्रेष्ठ आहे आपआपल्या अधिकाराप्रमाणें प्रणवसहित अथवा प्रणवरहित शिवपंचाक्षरमंत्राचा नित्य जप करावा शिवपंचाक्षरस्तोत्राच्या प्रत्येक श्लोकांतील चौथ्या चरणांत तस्मै या शब्दापुढें असलेलें अवतरणचिन्हांतील प्रत्येक अक्षर क्रमानें संकलित केलें कीं, शिवपंचाक्षरमंत्र तयार होतो दुसऱ्या श्लोकांतील मकार विसर्गसहित असावा चौथ्या श्लोकांतील 'व'चा मंत्राक्षरांत 'वा' करावा प्रत्येक श्लोकांतील शेवटचीं पांच अक्षरें शिवपंचाक्षरमंत्रच आहेत. मंत्रांतील प्रत्येक अक्षर शिवस्वरूप आहे अशी भावना ठेवून मंत्र जपावा व शंकराचीं स्तोत्रें म्हणावींत या शिवपंचाक्षर स्तोत्रांतहि शंकराची स्तुति अत्यंत उत्तम केली आहे ]

नागेन्द्रहाराय त्रिलोचनाय
भस्माङ्गरागाय महेश्वराय ।
नित्याय शुद्धाय दिगम्बराय
तस्मै 'न'काराय नमः शिवाय ॥ १ ॥

नागराजाला ज्यानें हाराप्रमाणें गळ्यांत धारण केलेलें आहे, ज्याला तीन नेत्र आहेत, ज्यानें सर्व अंगाला भस्म चर्चिलें आहे, ज्याला महेश्वर म्हणतात, जो नित्य म्हणजे अविनाशी आहे, शुद्ध म्हणजे सर्व संसारधर्मांनीं विरहित आहे, दिगंबर म्हणजे दिग्वस्त्र परिधान करणारा आहे, त्या 'न'कारस्वरूप शंकराला मी नमस्कार करतों.

मन्दाकिनीसलिलचन्दनचर्चिताय
नन्दीश्वरप्रमथनाथमहेश्वराय ।
मन्दारपुष्पबहुपुष्पसुपूजिताय
तस्मै 'म'काराय नमः शिवाय ॥ २ ॥

गंगाजलमिश्रित चंदनाचें उटणें ज्याला लावलेलें आहे, जो नंदीश्वरादि प्रमथगणांचा नाथ आणि महेश्वर आहे, स्वर्गांतील विशिष्ट वृक्ष — पारिजातक, रुई, धोतरा इत्यादिकांच्या फुलांनीं व इतरहि असंख्य फुलांनीं ज्याची उत्तम पूजा केली आहे, अशा त्या विसर्गसहित मकाररूपी शंकराला माझा नमस्कार असो.

शिवाय गौरीवदनाब्जवृन्द-
सूर्याय दक्षाध्वरनाशकाय ।
श्रीनीलकण्ठाय वृषध्वजाय
तस्मै 'शि'काराय नमः शिवाय ॥ ३ ॥

जो सर्वांचें मंगल करतो, पार्वतीच्या मुखकमलाला व नेत्रकमलाला जो सदा सूर्याप्रमाणें विकसित करतो, काम्य कर्मांमध्यें आसक्त होऊन अहंकारानें ग्रासलेल्या दक्षप्रजापतीच्या यज्ञाचा ज्यानें विध्वंस केला, अमृताच्या प्राप्तीकरितां समुद्राचें मंथन करीत असतांना अवचित प्राप्त झालेल्या *हालाहल* विषानें सारें विश्व संत्रस्त झालेलें पाहून, विश्वाच्या कल्याणाकरितां ज्यानें तें हालाहल विष प्राशन केलें, त्यामुळें कंठ काळा पडला, म्हणून ज्याला नीलकंठ

म्हणतात. ज्याच्या ध्वजावर नंदीचें चिह्न आहे व नंदी ज्याचें वाहनहि आहे त्या 'शि'कारस्वरूप असलेल्या शंकराला मी नमस्कार करतों.

वसिष्ठकुम्भोद्भवगौतमार्य-
मुनीन्द्रदेवार्चितशेखराय ।
चन्द्रार्कवैश्वानरलोचनाय
तस्मै 'व'काराय नमः शिवाय ॥ ४ ॥

वसिष्ठ, अगस्ति, गौतम इत्यादि आर्य महामुनींनी व देवांनीहि ज्याची पूजा केली आहे, जो स्वतः सर्वश्रेष्ठ आहे, चंद्र, सूर्य व अग्नि हे ज्याचे तीन नेत्र आहेत, त्या 'व'कारस्वरूप बनलेल्या अर्थात् 'वा' अक्षरस्वरूप असलेल्या शिवाला माझा नमस्कार असो.

यक्षस्वरूपाय जटाधराय
पिनाकहस्ताय सनातनाय ।
दिव्याय देवाय दिगम्बराय
तस्मै 'य'काराय नमः शिवाय ॥ ५ ॥

जो यक्षस्वरूप आहे, ज्यानें मस्तकीं जटाभार धारण केलेला आहे, ज्याच्या हातांत पिनाक नांवाचें धनुष्य आहे, जो सनातन म्हणजे सर्वकाळ असणारा असा आहे, त्या अलौकिक व दिगंबर असलेल्या देवाला 'य'कारात्मक शंकराला माझा नमस्कार असो.

पञ्चाक्षरमिदं पुण्यं यः पठेच्छिवसन्निधौ ।
शिवलोकमवाप्नोति शिवेन सह मोदते ॥ ६ ॥

हें पुण्यकारक पंचाक्षरशिवस्तोत्र शंकराजवळ बसून जो पठण करील त्याला शिवलोकाची प्राप्ति होईल व शिवलोकीं तो शंकरासह आनंदानें राहील. अर्थात् सालोक्य व सामीप्य त्याला प्राप्त होईल. चतुर्विधमुक्तींपैकीं हे दोन मुक्तींचेच प्रकार होत.

• •

# वेदसारशिवस्तवः ।

[ स्तोत्राच्या नावावरूनच कल्पना येते की, हें स्तोत्र वेदांनी केलेल्या शंकराच्या वर्णनाचें सारच आहे भाषा अत्यंत सुबोध व वर्णनहि गोड आहे ]

पशूनां पतिं पापनाशं परेशं
गजेन्द्रस्य कृत्तिं वसानं वरेण्यम् ।
जटाजूटमध्ये स्फुरद्गाङ्गवारिं
महादेवमेकं स्मरामि स्मरारिम् ॥१॥

पशु म्हणजे जीव त्याचा पति, अधिपति, स्वामी, पशुपतीश्वर सर्व पापाचा नाश करणारा, थोराचाहि शास्ता हत्तीचें चर्म परिधान करणारा, श्रेष्ठ असा जो एक भगवान महादेव, ज्याच्या जटासमूहामध्यें गंगेचा प्रवाह शोभत आहे त्या, मदनाला भस्म करणाऱ्या शंकराचें मी स्मरण करतों

महेशं सुरेशं सुरारातिनाशं
विभुं विश्वनाथं विभूत्यङ्गभूषम् ।
विरूपाक्षमिन्द्वर्कवह्नित्रिनेत्रं
सदानन्दमीडे प्रभुं पञ्चवक्त्रम् ॥२॥

भगवान् शंकर हे महान् सत्ताधीश आहेत सर्व देवाचें अधिपति आहेत देवाच्या शत्रूचा नाश करणारे आहेत त्याना विश्वनाथ म्हणतात त्याचा सर्व देह भस्मानें विभूषित झालेला आहे नेत्र विषमसंख्य म्हणजे तीन असल्यामुळें ज्याला विरूपाक्ष असें म्हणतात सूर्य, चंद्र आणि अग्नि हे ज्याचे नेत्र आहेत, तो सदानंद प्रभु पंचानन भगवान् शंकर त्याची मी स्तुति करतों

गिरीशं गणेशं गले नीलवर्णं
गवेन्द्राधिरूढं गणातीतरूपम् ।
भवं भास्वरं भस्मना भूषिताङ्गं
भवानीकलत्रं भजे पञ्चवक्त्रम् ॥३॥

ज्याला गिरीश म्हणतात आणि गणेशहि म्हणतात वस्तुत गणेश हें नाव गणपतीचें आहे पण भगवान् शंकर प्रमथगणाचा अधिपति असल्यामुळें

त्यालाहि गणेश म्हणतात. गळ्याच्या ठिकाणीं तो नीलवर्ण आहे. तो मोठ्या नंदीवर बसलेला आहे. तो गणातीत म्हणजे प्रमथादि गणांच्या पलीकडचा अर्थात् प्रमथादि गणांचा स्वामी आहे किंवा गुणातीत असा पाठ घेतल्यास सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांच्या पलीकडचा आहे. सर्व विश्वाची उत्पत्ति त्याच्यापासून होत असल्यामुळें त्याला 'भव' असें म्हणतात. तो भास्वर म्हणजे देदीप्यमान आहे. त्याचें अंग भस्मानें भूषित झालेलें आहे. भवानी म्हणजे देवी पार्वती ही त्याची पत्नी आहे. त्याला पांच मुखें आहेत. त्या शंकराला मी भक्तिभावानें भजत आहें.

शिवाकान्त शम्भो शशाङ्कार्धमौले
महेशान शूलिन् जटाजूटधारिन् ।
त्वमेको जगद्व्यापको विश्वरूप
प्रसीद प्रसीद प्रभो पूर्णरूप ॥४॥

हे पार्वतीपते शंकरा ! तुमच्या भक्तीनें भक्तजनांचें कल्याण होतें, म्हणून तुम्हांला 'शम्भु' असें म्हणतात. तुम्ही मस्तकावर चंद्राची कोर धारण केलेली आहे. तुम्ही महेशान म्हणजे थोर सत्ताधीश लोकपालांचेहि अधिपति आहां. हातांत त्रिशूळ धारण केलेला आहे. मस्तकांवर जटाजूट धारण केलेला आहे. तुम्हीच एक या सर्व जगाला व्यापून राहिलेले आहां. विश्वाच्या रूपानें तुम्हीच नटलेले आहां. हे पूर्णरूपा प्रभो ! प्रसन्न व्हा. कृपा करा.

परात्मानमेकं जगद्बीजमाद्यं
निरीहं निराकारमोङ्कारवेद्यम् ।
यतो जायते पाल्यते येन विश्वं
तमीशं भजे लीयते यत्र विश्वम् ॥५॥

हे परमेश्वरा ! तुम्हीच एक या सर्व जगाचें बीज म्हणजे मूलकारण आहां. या विश्वाचें निमित्तकारण तुम्हीच आहां. म्हणून तुम्हांला आद्य असें म्हणतात. तुम्ही आद्य म्हणजे प्रमुखहि आहां. तुम्ही आप्तकाम — पूर्णकाम असल्यामुळें निरीह म्हणजे निरिच्छ आहां. अथवा तुम्ही निरीह म्हणजे कूटस्थ, निश्चल म्हणून क्रियाविरहित आहां निराकार आहां. प्रणव हा तुमचा वाचक अथवा तुमच्या स्वरूपाचें प्रतिपादन करणारा आहे. म्हणून तुम्ही ओंकारवेद्य

आहां. ओंकारवेद्य म्हणजे ओंकारानें जाणण्याला योग्य हें सर्व विश्व तुमच्यापासूनच उत्पन्न होतें. तुम्हीच त्याचें पालन करता व शेवटीं तें तुमच्यामध्येंच लय पावतें. हे विश्वेशा! मी तुम्हाला भक्तिपूर्वक शरण आलों आहें.

न भूमिर्न चापो न वह्निर्न वायु-
र्न चाकाशमास्ते न तन्द्रा न निद्रा।
न ग्रीष्मो न शीतं न देशो न वेषो
न यस्यास्ति मूर्तिस्त्रिमूर्तिं तमीडे ॥ ६ ॥

पृथिवी, जल, तेज, वायु आणि आकाश, तसेंच निद्रा, तंद्रा, उन्हाळा, *हिंवाळा आणि पावसाळा यांचा ज्याच्याशीं कांहीं संबंध नाहीं*, ज्याला देश नाहीं व वेषहि नाहीं, वास्तविक पहातां ज्याला कांहीं मूर्ति म्हणजे आकार नाहीं, पण आपल्या अनिर्वचनीय शक्तीच्या — मायेच्या — साहाय्यानें विश्वाच्या कल्याणाकरितां जो *ब्रह्मा, विष्णु आणि महेश या तीन रूपांनीं नटला*, अथवा त्रिमूर्ति म्हणजे दत्त — या रूपानें अवतरला त्या शंकराची मी स्तुति करीत आहें.

अजं शाश्वतं कारणं कारणानां
शिवं केवलं भासकं भासकानाम्।
तुरीयं तमःपारमाद्यन्तहीनं
प्रपद्ये परं पावनं द्वैतहीनम् ॥ ७ ॥

जो अज म्हणजे जन्मरहित आहे, शाश्वत म्हणजे अविनाशी आहे, कारणांचा कारण आणि प्रकाशकाचा प्रकाशक आहे. केवळ म्हणजे एकच एक अद्वितीय व शिव म्हणजे ब्रह्मस्वरूप आहे तुरीय म्हणजे स्थूल, सूक्ष्म, कारण किंवा जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थांच्या पलीकडचा व अज्ञानरूपी अंधकाराच्या पलीकडचा म्हणजे ज्योतिस्वरूप आहे, अशा त्या द्वैतविरहित असलेल्या, परमपावन अनादि अनंत असलेल्या शंकराला मी अनन्यभावानें शरण आलों आहें

नमस्ते नमस्ते विभो विश्वमूर्ते
नमस्ते नमस्ते चिदानन्दमूर्ते।
नमस्ते नमस्ते तपोयोगगम्य
नमस्ते नमस्ते श्रुतिज्ञानगम्य ॥ ८ ॥

हे विश्वरूपा प्रभो ! चिदानंदस्वरूप अशा तुम्हाला मी पुन पुन्हा नमस्कार करतो. तपश्चर्येनें, ध्यानानें व वेदाच्या ज्ञानानेंच तुमच्या स्वरूपाचें ज्ञान होऊ शकतें. तुम्हाला मी प्रेमपूर्वक पुन पुन्हा नमस्कार करतों

प्रभो शूलपाणे विभो विश्वनाथ
महादेव शम्भो महेश त्रिनेत्र ।
शिवाकान्त शान्त स्मरारे पुरारे
त्वदन्यो वरेण्यो न मान्यो न गण्यः ॥ ९ ॥

हे प्रभो शूलपाणे ! विश्वव्यापका विश्वनाथा ! महादेवा शंभो ! त्रिलोचना महेश्वरा ! त्रिपुरासुराचा व मदनाचा नाश करणाऱ्या पण भक्तजनाना शांत असलेल्या पार्वतीरमणा ! या जगात तुमच्यापेक्षा दुसरा मला कोणीच श्रेष्ठ दिसत नाहीं. तुमच्याशिवाय मी कोणालाहि मानीत नाहीं व जुमानीतहि नाहीं

शम्भो महेश करुणामय शूलपाणे
गौरीपते पशुपते पशुपाशनाशिन् ।
काशीपते करुणया जगदेतदेक-
स्त्वं हंसि पासि विदधासि महेश्वरोऽसि ॥ १० ॥

जीवाच्या संसारपाशाचा नाश करणाऱ्या हे पशुपतीश्वरा ! शंभो महेश्वरा ! करुणाघना ! आपण हातात त्रिशूळ धारण केलेला आहे. आपण गौरीनाथ आहा. हे काशिनाथा ! आपणच करुणेनें हें सर्व जग एकटे निर्माण करता. आपण त्याचें परिपालनहि करता व शेवटीं त्याचा नाशहि करता ! आपण महेश्वर आहा

त्वत्तो जगद्भवति देव भव स्मरारे
त्वय्येव तिष्ठति जगन्मृड विश्वनाथ ।
त्वय्येव गच्छति लयं जगदेतदीश
लिङ्गात्मकं हर चराचरविश्वरूपिन् ॥ ११ ॥

हे मदनांतका ! तुमच्यापासूनच हें सर्व जग उत्पन्न होतें म्हणून तुम्हाला 'भव' म्हणतात. तुमच्याच ठिकाणीं हें जग आनंदानें रहातें. तुम्ही त्याला सुखवितां म्हणून तुम्हाला 'मृड' असेंहि म्हणतात. हे चराचरविश्वरूपानें नट-

णाऱ्या विश्वनाथा ! हें सर्व जग शेवटीं तुमच्यामध्येंच लीन होतें — लय पावतें. म्हणून या जगाला 'लिंग' असें म्हणतात (लयं गच्छति इति लिङ्गम्) अथवा लीन म्हणजे परमसूक्ष्म असे जे तुम्ही त्या तुमची कल्पना या जगावरूनच घेतां येतें म्हणूनच या जगाला 'लिंग' असें म्हणतात (लीनं अर्थं गमयति इति लिङ्गम्) हे परमेश्वरा ! तुम्हांला माझा भक्तिपूर्वक नमस्कार.



# शिवमानसपूजा

[ अंतःकरणांत खरी भक्ति नसतांना हटावटानें पूजासामग्री एकत्रित करून थाटामाटानें पूजाअर्चा करण्याचा खटाटोप पुष्कळ लोक करीत असतात. 'मोलें घातलें रडाया नाहीं आसू आणि माया' या उक्तीप्रमाणें भक्तीवांचून केलेली परमेश्वराची पूजा अंतःकरणांत खरा आनंद निर्माण करणार नाहीं. खऱ्या आनंदाकरितां पूजेच्या बाह्योपचारापेक्षां मानसिक उपचारच अंतःकरणाला तन्मय करण्यास अधिक उपयुक्त होतात. शंकराचार्यांची ही 'शिवमानसपूजा' अर्थाकडे दृष्टि देऊन शांत चित्तानें रोज म्हटली तर अंतःकरणाला निश्चित देवपूजेचें समाधान लाभेल. तीन श्लोकांनी मानसपूजेचें स्वरूप वर्णिलें असून चौथा श्लोक खऱ्या देवाला आपल्या अंतर्यामांतच पहाण्याची दृष्टि देत आहे. पांचव्या श्लोकानें आपल्या हातून कळत अथवा नकळत घडलेल्या सर्व अपराधांची क्षमा मागितली आहे. ]

रत्नैः कल्पितमासनं हिमजलैः स्नानं च दिव्याम्बरं
नानारत्नविभूषितं मृगमदामोदाङ्कितं चन्दनम् ।
जातीचम्पकबिल्वपत्ररचितं पुष्पं च धूपं तथा
दीपं देव दयानिधे पशुपते हृत्कल्पितं गृह्यताम् ॥ १ ॥

हे देवा दयानिधे शंकरा ! हें आपल्याकरितां मी रत्नमंडित सिंहासन तयार केलें आहे. याचा स्वीकार करा. स्नानाकरितां आपलें आवडतें थंडगार गंगाजल आणलेलें आहे, त्यानें मी आपणास स्नान घालीत आहे. अनेक

रत्नांनीं विभूषित असलेलीं हीं सुंदर वस्त्रें आणलीं आहेत. कस्तूरीचें मिश्रण केल्यामुळें अधिक सुगंधित झालेलें असें हें सुवासिक चंदन मीं आपल्याकरितां आणलेलें आहे. जाईचीं फुलें, चाफ्याचीं फुलें, बेलाचीं पानें इत्यादिकांनीं परिपूर्ण असलेली ही फुलांची ओंजळ मी आपणास अर्पण करीत आहें, त्याचप्रमाणें धूप आणि दीप हे सर्व उपचार मीं मनानें कल्पिलेले भक्तियुक्त अंतःकरणानें आपणास अर्पण करीत आहें, याचा आपण स्वीकार करावा.

सौवर्णे मणिखण्डरत्नरचिते पात्रे घृतं पायसं
भक्ष्यं पञ्चविधं पयोदधियुतं रम्भाफलं पानकम् ।
शाकानाममुतं जलं रुचिकरं कर्पूरखण्डोज्ज्वलं
ताम्बूलं मनसा मया विरचितं भक्त्या प्रभो स्वीकुरु ॥२॥

उत्तमोत्तम पैलू पाडलेलीं अनेक प्रकारचीं रत्नें ज्याला जडविलेलीं आहेत अशा या सुवर्णाच्या पात्रांत हे प्रभो मीं आपल्यासाठीं नैवेद्य तयार केला आहे. साजुक तूप आहे. पायस म्हणजे दुधांत शिजविलेल्या तांदळाची खीर आहे. बासुंदी आहे, श्रीखंड आहे. पंचपक्वान्नें आहेत. तोंडीं लावण्यासाठीं चटण्या–कोशिंबिरी ठेवलेल्या आहेत. दहीं, दूध, केळीं, मठ्ठा, लोणी, सरबत वगैरे सर्व कांहीं आणलेलें आहे. मेथी, चुका चाकवत, अळू, भोपळा पडवळ, काकडी, दोडका, भेंडी वगैरे अनेक भाज्या तयार करून आणलेल्या आहेत. कापूर, वाळा वगैरे सुगंधि द्रव्यें घालून सुवासिक केलेलें रुचकर थंडगार पाणी पिण्याकरितां आणलेलें आहे. हा पहा त्रयोदशगुणी तांबूल. हे परमेश्वरा ! हें सर्व मीं भक्तियुक्त अंतःकरणानें मनानें कल्पिलेलें आहे. त्याचा आपण स्वीकार करावा.

छत्रं चामरयोर्युगं व्यजनकं चादर्शकं निर्मलं
वीणाभेरिमृदङ्गकाहलकला गीतं च नृत्यं तथा ।
साष्टाङ्गं प्रणतिः स्तुतिर्बहुविधा ह्येतत्समस्तं मया
संकल्पेन समर्पितं तव विभो पूजां गृहाण प्रभो ॥ ३ ॥

हे विभो विश्वव्यापका विश्वेश्वरा ! मी तुमच्या मस्तकावर छत्र धारण करीत आहें. चवऱ्या ढाळीत आहें. पंख्यानें वारा घालीत आहें. आपल्यापुढें हा निर्मल आरसा ठेवला आहे. वीणा-तंबोरा, सतार सारंगी इत्यादि ततुवाद्यें,

नगारे, ढोल, मृदंग, पखवाज इत्यादि चर्मवाद्यें, अशा अनेक वाद्यांची कला-कौशल्यें तसेंच संगीत आणि नृत्य. परमेश्वरा! हें सर्व मी तुम्हांला अर्पण करीत आहें. मी आपणांस साष्टांग प्रणिपात करून आपली अनेक प्रकारचीं स्तुति-स्तोत्रें म्हणत आहें. हे भगवन्! हें सर्व मी संकल्पानें केलेलें आहे. ही माझी मानसपूजा आपण स्वीकारावी.

आत्मा त्वं गिरिजा मतिः सहचराः प्राणाः शरीरं गृहं
पूजा ते विषयोपभोगरचना निद्रा समाधिस्थितिः।
संचारः पदयोः प्रदक्षिणविधिः स्तोत्राणि सर्वा गिरो
यद्यत्कर्म करोमि तत्तदखिलं शम्भो तवाराधनम् ॥ ४ ॥

हे शंकरा! आत्मा हेंच तुमचें रूप आहे. बुद्धि ही पार्वती देवी आहे. पंचप्राण व इंद्रियें, ही नेहमी तुमच्याबरोबर राहणारे प्रमथगण आहेत. शरीर हेंच तुमचें मंदिर आहे. अनेक प्रकारचे विषय सेवन करण्याकरितां मी जी मांडणी केलेली आहे तीच तुमची आरास आणि पूजा होय. माझी निद्रा हीच समाधिअवस्था. पायानें इकडे तिकडे फिरणें हीच प्रदक्षिणा व मी जें कांहीं बोलेन तीच आपली स्तुति होय. या प्रकारें हे शंकरा! जें जें कांहीं मी करतों ती सर्व तुमचीच आराधना होय.

करचरणकृतं वाक्कायजं कर्मजं वा
श्रवणनयनजं वा मानसं वाऽपराधम्।
विहितमविहितं वा सर्वमेतत्क्षमस्व
जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो ॥ ५ ॥

हे प्रभो परमेश्वरा! मी हातानें, पायानें, वाणीनें, देहानें तसेंच कर्मानें आणि त्याचप्रमाणें कान, डोळे इत्यादि इंद्रियें अथवा मन यांच्या योगानें जे जे कांहीं अपराध केले असतील त्या सर्वांची आपण क्षमा करा. ते विहित असो अथवा अविहित असो. योग्य असो अथवा अयोग्य असो, त्या सर्वांची क्षमा करा. हे करुणासागरा! महादेवा! आपला जयजयकार असो.

• •

# शिवापराधक्षमापणस्तोत्रम् ।

[ शिवापराधक्षमापणस्तोत्र आणि देव्यपराधक्षमापणस्तोत्र हीं दोन्ही स्तोत्रें 'अपराधक्षमापणस्तोत्र' या शब्दसादृश्यावरून एकाच आचार्यांनी केलेलीं असा वीत असें वाटतें या स्तोत्रांतील वर्णनावरून तीं आद्य शंकराचार्यांचीं असतील असें वाटत नाहीं शिवापराधक्षमापणस्तोत्रांत चौथ्या श्लोकांत 'वार्धक्ये चेन्द्रियाणां विकलगति' या वाक्यांत मम या शब्दानें स्वतःच्या वार्धक्याचा उल्लेख केलेला आहे तसेंच तिसऱ्या श्लोकांत ' सुतधनयुवतिस्वादसौख्ये निषण्णः ' असें स्वतःचें वर्णन केलेलें आहे आद्य शंकराचार्य स्वतःचें असें वर्णन खास करणार नाहींत देव्यपराधक्षमापणस्तोत्रांतहि 'मया पञ्चाशीतेरधिकमपनीते तु वयसि' या वाक्यांत स्वतःच्या वयाचा ८५ वर्षांचा उल्लेख केलेला आहे आद्य शंकराचार्यांचें वय बत्तीस वर्षांपेक्षां अधिक नव्हतें याबद्दल कोणाचेंहि दुमत नाहीं दुसऱ्याची अवस्था गृहीत धरून आद्य शंकराचार्यांनींच स्वतःचें हें वर्णन केलें आहे असें कोणी म्हणेल तर हा एक ओढाताणीचाच प्रकार समजला जाईल हीं दोन्ही स्तोत्रें कोणत्याहि शंकराचार्यांनीं रचलेलीं असोत, तीं गोड आहेत भावपूर्ण आहेत त्यांत वस्तुस्थितीचें वर्णन आहे प्रेम आहे कळकळ आहे पश्चात्ताप आहे शब्दरचना सरळ व सुगम आहे त्यांत ओज आहे अशा रीतीनें सर्वगुण संपन्न असल्यामुळें हीं स्तोत्रें रोज म्हणण्यासारखीं आहेत आणि म्हणूनच तीं वाचकांच्यापुढें सादर केलीं जात आहेत वाचकांनी त्यांचा आस्वाद घ्यावा तीं रोज म्हणावींत ]

आदौ कर्मप्रसङ्गात्कलयति कलुषं मातृकुक्षौ स्थितं मां
विण्मूत्रामेध्यमध्ये क्वथयति नितरां जाठरो जातवेदाः ।
यद्यद्वै तत्र दुःखं व्यथयति नितरां शक्यते केन वक्तुं,
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव शिव भोः श्रीमहादेव शम्भो ॥ १ ॥

पूर्वजन्मीं केलेल्या कर्मांच्या निमित्तानें घडलेलें पाप – अर्थात् पूर्वजन्मींचें पाप – प्रथम मला आईच्या उदरांत आणून सोडतें तेथें राहिल्यावर मलमूत्राशयाच्या सान्निध्यांत असलेल्या गर्भाशयामध्यें आईचा जाठराग्नि मला अत्यंत तापवितो तेथें मला जीं अपरिमित दुःखें होतात त्यांचें कोण वर्णन करू

शकणार ! हे मंगलमय देवाधिदेवा ! श्रीशिवा ! शंकरा ! शंभो ! आता माझ्या अपराधांची आपण क्षमा करावी

बाल्ये दुःखातिरेकान्मललुलितवपुः स्तन्यपाने पिपासा
नो शक्तश्चेन्द्रियेभ्यो भवगुणजनिता जन्तवो मां तुदन्ति ।
नानारोगादिदुःखाद्रुदनपरवशः शंकरं न स्मरामि
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ २ ॥

बाल्यावस्थेत अनेक दुःखें भोगलीं शरीर मलमूत्रानें लिडबिडलेलें स्तनपानाची इच्छा प्रबल तहान लागायची भूक लागायची बोलता यायचें नाहीं काहीं करता यायचें नाहीं इंद्रियामध्यें सामर्थ्य नाहीं संसारधर्मानें, सृष्टिक्रमानुसार उत्पन्न होणारे प्राणि, ढेकूण, डास, पिसवा वगैरे सारखे मला चावायचे अनेक प्रकारचीं दुःखें ताप जाळ, हगवण, ओकारी, पोटदुखी, खवडे खरूज इत्यादि रोगांनीं पीडित होऊन मी सारखा रडायचा ! हे करुणानिधे शंकरा ! त्या वेळेला तुमच्या स्वरूपाची मला जाणीव सुद्धा नव्हती, मग स्मरण कसलें करणार ! हे शंकरा ! माझ्या अपराधाची क्षमा करा

प्रौढोऽहं यौवनस्थो विषयविषधरैः पञ्चभिर्मर्मसन्धौ
दष्टो नष्टो विवेकः सुतधनयुवतिस्वादसौख्ये निषण्णः ।
शैवीचिन्ताविहीनं मम हृदयमहो मानगर्वाधिरूढं
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ ३ ॥

मी पुढें मोठा झालों तारुण्यात आलों प्रौढ झालों पण याहि काळात हे शंकरा ! मी तुमचें स्मरण करू शकलों नाहीं संसारांतील विषयरूपी सर्पांनीं— शब्द स्पर्श-रूप रस गंध हे पांच विषय सर्पासारखे घातक आहेत — त्यांनीं माझा चावा घेतला ! त्या विषबाधेनें माझा नाश झाला ! विवेकच संपला आणि मी स्त्री पुत्र आणि पैसा यांच्या सुखाचा आस्वाद घेण्यात गुंग झालों मी त्यातच गढून गेलों हे शंकरा ! त्या वेळीं तुमच्या स्वरूपाचें चिंतन अथवा स्मरण न करता माझें हृदय खोटया अभिमानात, अहंकारात अगदीं चूर होऊन गेलें अशा रीतीनें तारुण्यातला व प्रौढावस्थेतला काळ मी व्यर्थ घालविला ! हे शंकरा ! माझ्या अपराधांची आपण क्षमा करा !

वार्धक्ये चेन्द्रियाणां विकलगतिमतिश्चाधिदैवादितापैः
पापै रोगैर्वियोगैस्त्वनवसितवपुः प्रौढिहीनं च दीनम् ।
मिथ्यामोहाभिलाषैर्भ्रमति मम मनो धूर्जटेर्ध्यानशून्यं
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ ४ ॥

पुढें वार्धक्यामध्यें ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, मन व बुद्धि याची गति कुंठित झाली ज्ञानशक्ति मावळली आधिदैविक, आधिभौतिक व आध्यात्मिक अशा त्रिविध तापानी होरपळून गेलों। रोगानी घेरलें पापानी पछाडलें आई, बाप, बहिण, भाऊ, बायको आणि मुलें याच्या वियोगाची दुःखें पुढें उभी राहिलीं। देहाचा भरवसा उरला नाही जगण्यात काही प्रौढी राहिली नाही मन व्याकुळ होऊन गेलें आहे तरी पण खोटा मोह आणि विषयाचा अभिलाष यानी पछाडलेलें माझें मन शंकराचें ध्यान न करता ससारातच सारखें भटकत आहे। हे देवाधिदेवा शंकरा। माझ्या अपराधाची आपण क्षमा करा

नो शक्यं स्मार्तकर्म प्रतिपदगहनप्रत्यवायाकुलाख्यं
श्रौते वार्ता कथं मे द्विजकुलविहिते ब्रह्ममार्गे सुसारे ।
नास्था धर्मे विचारः श्रवणमननयोः किं निदिध्यासितव्यं
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ ५ ॥

पावलोपावलीं आचरण्यास अत्यत कठीण असलेलीं, चुकलें की घ्या प्रायश्चित्त। अशा अनेक दोषानी व्यापलेलीं स्मार्त कर्में, ज्याचीं स्वरूपें गहन प्रायश्चित्तानीं मनाला व्याकुळ करून टाकतात, तीं स्मार्त कर्मेंहि यथासाग माझ्या हातून घडत नाहींत तर मग श्रौत कर्माची काय वार्ता? अर्थात् अत्यत सारभूत, ब्राह्मणकुलाला विहित असलेलीं व ब्रह्मप्राप्तीच्या मार्गाला सुकर करणारीं जीं अग्निहोत्रादि श्रौत कर्में, तीं माझ्या हातून घडलीं नाहींत हें सागायलाच नको धर्माबद्दल आस्था नाहीं श्रवण मननाचा विचार नाहीं मग मी निदिध्यासन कशाचें करणार? हे शंकरा। माझ्या अपराधाची क्षमा करा

स्नात्वा प्रत्यूषकाले स्नपनविधिविधौ नाहृतं गाङ्गतोयं
पूजार्थं वा कदाचिद्बहुतरगहनात्खण्डबिल्वीदलानि ।

नानीता पद्ममाला सरसि विकसिता गन्धपुष्पं त्वदर्थं
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ ६ ॥

मी प्रातःकाळीं स्नान करून आपल्याला स्नान घालण्याच्या प्रसंगीं कधीं गंगेचें पाणी आणलें नाहीं अथवा पूजेकरितां निबिड अरण्यांतून बिल्वपत्रेंहि कधीं तोडून आणलीं नाहींत. सरोवरामध्यें विकसित झालेल्या कमलांची माळहि शंकरा मी तुम्हांला कधीं वाहिली नाहीं गंध आणि फुलेंहि पण मी आपल्या-करितां पूजेच्या वेळीं आणलीं नाहींत. हे शंभो! शंकरा! सदाशिवा! महादेवा! आपण माझ्या अपराधाची क्षमा करा.

दुग्धैर्मध्वाज्यपयुक्तैर्दधिसितसहितैः स्नापितं नैव लिङ्गं
नो लिप्तं चन्दनाद्यैः कनकविरचितैः पूजितं न प्रसूनैः।
धूपैः कर्पूरदीपैर्विविधरसयुतैर्नैव भक्ष्योपहारैः
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ ७ ॥

तूप आणि मध यांनीं युक्त असलेल्या तसेंच दहींसाखरेचें मिश्रण केलेल्या दुधानें अर्थात् पंचामृतानें मी कधीं शिवलिंगाला स्नान घातलें नाहीं. कधीं चंदन, कापूर इत्यादि सुगंधि द्रव्यांचें शंकरा! मी तुम्हांला उटणेंहि लावलें नाहीं. सुवर्णपुष्पांनीं अथवा आपल्याला प्रिय असलेल्या धोतऱ्याच्या फुलांनीं मी कधीं आपली पूजा केली नाहीं. कधीं धूप घातला नाहीं. कापूर लावला नाहीं व दीपहि समर्पण केला नाहीं. अनेक रसांचीं फळें किंवा पंचपक्वान्नें यांचा नैवेद्य अर्पण करून कधीं पूजा केली नाहीं. काहीं माझ्या हातून घडलें नाहीं! शंकरा! आपण माझ्या अपराधाची क्षमा करा.

ध्यात्वा चित्ते शिवाख्यं प्रचुरतरधनं नैव दत्तं द्विजेभ्यो
हव्यं ते लक्षसंख्यैर्हुतवहवदने नार्पितं बीजमन्त्रैः।
नो तप्तं गाङ्गतीरे व्रतजपनियमैः रुद्रजाप्यैर्न वेदैः
क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ ८ ॥

कधीं चित्तामध्यें शिवतत्त्वाचें चिंतन करून ब्राह्मणांना विपुल धन अर्पण केलें नाहीं हे शंकरा! मी कधीं आपल्या बीजमंत्रांचा एक लक्ष उच्चार करून अग्नि-मुखामध्यें आहुति अर्पण केल्या नाहींत आपल्या प्राप्तीकरितां कधीं गंगेच्या

काहीं तपश्चर्या केली नाहीं व्रत जप-तप-नियम, रुद्रपाठ किंवा वेदमंत्र म्हणून मीं कधीं आपली आराधना केली नाहीं हे विश्वेश्वरा! शंकरा! आपण माझ्या अपराधाची क्षमा करा

**स्थित्वा स्थाने सरोजे प्रणवमयमरुत्कुण्डले सूक्ष्ममार्गे**
**शान्ते स्वान्ते प्रलीने प्रकटितविभवे ज्योतिरूपे पराख्ये ।**
**लिङ्गज्ञे ब्रह्मवाक्ये सकलतनुगतं शङ्करं न स्मरामि**
**क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥९॥**

पवित्रस्थानीं एकान्तामध्यें बसून सूक्ष्ममार्गस्वरूप असलेल्या, मस्तकांतील सहस्रदल कमलामध्यें, जेथें प्राणवायु प्रणवतत्त्वाशीं तादात्म्य पावून सकलित होऊन रहातो त्या ठिकाणीं आपल्या अंतःकरणाला शांत ठेवून— एकाग्र करून तें मन ब्रह्मस्वरूपीं लीन झालें असता तेथें परसश्रेष्ठ जोतिस्वरूप स्वयंप्रकाश अशा ब्रह्मस्वरूपाच्या वैभवाचा आविष्कार होतो, साक्षात्कार होतो तो वाणीनें बोलून दाखवता येत नाहीं केवळ लक्षणावरूनच ज्याची कल्पना येऊं शकते जो सर्व वेदवाक्यांचें तात्पर्य आहे, 'वेदैश्च सर्वैरहमेव वेद्य ' 'सर्वे वेदा यत्पदमामनन्ति ' सर्व वेदानी जें जाणण्यास योग्य आहे अथवा सर्व वेद ज्याचें प्रतिपादन करतात, त्या परब्रह्मतत्त्वामध्यें सर्वांतर्यामी शंकराला अवलोकन करून मी त्याचें स्मरण केलें नाहीं सारा जन्म वाया घालविला! शंकरा! आपण माझ्या अपराधाची क्षमा करा (या श्लोकांतील ज्योतिरूप हा शब्द अशुद्ध वाटेल पण ताण्ड्य ब्राह्मणातहि तो तसाच आढळतो )

**नग्नो निःसङ्गशुद्धस्त्रिगुणविरहितो ध्वस्तमोहान्धकारो**
**नासाग्रे न्यस्तदृष्टिर्विदितभवगुणो नैव दृष्टः कदाचित् ।**
**उन्मन्यावस्थया त्वां विगतकलिमलं शङ्करं न स्मरामि**
**क्षन्तव्यो मेऽपराधः शिव शिव० ॥ १० ॥**

हे शंकरा! आपण दिगंबर सर्वसंगविरहित शुद्ध निर्गुणातीत भक्तजनांच्या मोहरूपी अंधकाराचा नाश करणारे, नासाग्रीं दृष्टि लावून पद्मासनावर बसलेले, सर्व विश्वाच्या कल्याणकारक गुणांना जाणणारे, सदा सत्त्वगुणसंपन्न,

मंगलमय ध्यानस्थ अशा थाटांत बसलेले, अशा स्वरूपांत मीं कधीं आपलें दर्शन घेतलें नाहीं कलीचे दोष दूर सारून उन्मनी भावानें मीं कधीं तुमचें स्मरणहि केलें नाहीं हे सदाशिवा! शंकरा! माझ्या अपराधाची आपण क्षमा करा

चन्द्रोद्भासितशेखरे स्मरहरे गङ्गाधरे शङ्करे
सर्पैर्भूषितकण्ठकर्णविवरे नेत्रोत्थवैश्वानरे।
दन्तित्वक्कृतसुन्दराम्बरधरे त्रैलोक्यसारे हरे
मोक्षार्थं कुरु चित्तवृत्तिमखिलामन्यैस्तु किं कर्मभिः ॥११॥

ज्याच्या भालप्रदेशीं चंद्र शोभत आहे, ज्यानें मदनाला भस्म करून टाकलें! मस्तकावर गंगा धारण केली सर्व लोकांचें सदा कल्याण करतो म्हणून ज्याला शंकर असें सार्थ नांव मिळालेलें आहे, ज्याचे कान आणि कंठ सर्पांनीं भूषित आहेत, ज्याच्या तृतीय नेत्रांत अग्निज्वाला प्रकट होत आहे, हत्तीचें चर्म ज्यानें आपल्या पाठीवर सुंदर वस्त्राप्रमाणें धारण केलेलें आहे, ज्याचें रूप त्रैलोक्याचें जणुं कांहीं सारच आहे, तो सर्व भक्तजनांचें दुःख हरण करतो म्हणून त्याला हर असें म्हटलें जातें हे जीवा! सर्व संसारदुःखांतून मुक्त व्हावयाचें असेल तर तूं आपली सर्व चित्तवृत्ति त्या शंकराच्या ठिकाणीं ठेव इतर कर्मांचा काय उपयोग! शंकराच्या भक्तीशिवाय इतर सर्व कर्मे व्यर्थ होत

किं वाऽनेन धनेन वाजिकरिभिः प्राप्तेन राज्येन किं
किं वा पुत्रकलत्रमित्रपशुभिर्देहेन गेहेन किम्।
ज्ञात्वैतत्क्षणभङ्गुरं सपदि रे त्याज्यं मनो दूरतः
स्वात्मार्थं गुरुवाक्यतो भज भज श्रीपार्वतीवल्लभम् ॥१२॥

या मना! विचार कर या धनाचा उपयोग काय? घोडे हत्ति काय कामाचे? राज्य मिळालें तरी त्याचा काय उपयोग? स्त्री आहे पुत्र आहेत मित्र आहेत गाई बैल, दूधदुभतें, शेतीभाती सर्व कांहीं आहे देह आहे घर आहे पण याचा उपयोग काय? हें सर्व क्षणभंगुर आहे क्षणभंगुर म्हणजे केव्हां नाहींसे होतील याचा भरंवसा नाहीं म्हणून हे मना! त्यांना तूं दूर सोड त्यांच्यापासून अलिप्त रहा सच्चित्स्वरूप निजानंदाचा अनुभव घेण्याकरितां गुरूच्या उपदेशाप्रमाणें श्रीपार्वतीवल्लभ सदाशिवाला भज त्याला शरण जा

आयुर्नश्यति पश्यतां प्रतिदिनं याति क्षयं यौवनं
प्रत्यायान्ति गताः पुनर्न दिवसाः कालो जगद्भक्षकः।
लक्ष्मीस्तोयतरङ्गभङ्गचपला विद्युच्चलं जीवितं
तस्मान्मां शरणागतं शरणद त्वं रक्ष रक्षाधुना ॥ १३ ॥

रोजच्या रोज पहातां पहातां आयुष्य चाललें आहे. तारुण्य क्षीण होत चाललें आहे. गेलेले दिवस परत येत नाहींत काळ जगाला खाऊन टाकीत आहे. लक्ष्मी पाण्यावर उसळणाऱ्या तरंगाप्रमाणें चंचल आहे. जीवित हें विद्युल्लतेप्रमाणें क्षणभंगुर आहे. म्हणून हे भक्तवत्सला शंकरा ! मी आपल्या चरणीं अनन्यभावानें शरण आलों आहें. आपण माझें रक्षण करा ! शरणागत-वत्सला ! आपण माझें रक्षण करा !

करचरणकृतं वाक्कायजं कर्मजं वा
श्रवणनयनजं वा मानसं वाऽपराधम् ।
विहितमविहितं वा सर्वमेतत्क्षमस्व
जय जय करुणाब्धे श्रीमहादेव शम्भो ॥ १४ ॥

हे शंकरा ! माझ्या हातापायांकडून जे अपराध घडले असतील अथवा देहानें जे अपराध घडले असतील अथवा माझ्या कर्मानें जे अपराध घडले असतील, कानानें, डोळ्यानें किंवा मनानें जे अपराध घडले असतील, बरेंवाईट जें जें कांहीं घडलें असेल त्या सर्वांची क्षमा कर. हे करुणासागरा ! श्रीमहादेवा ! शंभो ! तुझा जयजयकार असो.



## देव्यपराधक्षमापणस्तोत्रम् ।

[ निरपेक्ष प्रेमाची पूर्णता मातृहृदयांतच पहावयास सांपडते. बालकाचे सहस्र अपराध पोटांत घालून क्षमा करणें, त्यास पोटाशीं धरून कुरवाळणें व त्याची अपेक्षा पूर्ण करणें ही मातेची सहजप्रवृत्ति असते. हा मातेचा स्वभाव लक्षांत घेऊन आचार्य माता या बुद्धीनें पार्वतीदेवीची स्तुति करीत आहेत. ती

जगज्जननी असल्यामुळें सर्वांचीच माता आहे म्हणूनहि तिला माता म्हणून शरण जाऊं या ]

न मन्त्रं नो यन्त्रं तदपि च न जाने स्तुतिमहो
न चाह्वानं ध्यानं तदपि च न जाने स्तुतिकथाः।
न जाने मुद्रास्ते तदपि च न जाने विलपनं
परं जाने मातस्त्वदनुसरणं क्लेशहरणम् ॥ १ ॥

हे माते महादेवि! माझे सर्व अपराध पोटात घाल. माझ्यावर क्षमा कर हे आई! मला मंत्र कळत नाहीं, यंत्र कळत नाहीं. तसेंच तुझी स्तुति कशी करावी हेंहि कळत नाहीं. तुझें आवाहन कसें करावें, ध्यान कसें करावें, हेंहि कळत नाहीं. स्तुति करण्याला योग्य अशीं तुझीं चरित्रेंहि मला माहीत नाहींत. मंत्रशास्त्रांत अथवा उपासना पद्धतींत सांगितलेल्या तुझ्या मुद्रा कोणत्या व त्या कशा कराव्यात हेंहि मला माहीत नाहीं. आई! तुझ्यापुढें विलाप कसा करावा? हेंहि पण मला कळत नाहीं! पण हे आई! तुला अनुसरलें असता, तुला शरण गेलें असता सर्व क्लेशाचा, सर्व दुःखाचा, संकटाचा नाश होतो एवढें मात्र मला कळतें!

विधेरज्ञानेन द्रविणविरहेणालसतया
विधेयाशक्यत्वात्तव चरणयोर्या च्युतिरभूत्।
तदेतत्क्षन्तव्यं जननि सकलोद्धारिणि शिवे
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ २ ॥

हे आई! तुझ्या पूजापद्धतीचें मला ज्ञान नसल्यामुळें, तुझी सांगोपांग पूजा करण्याला लागणारें पुरेसें द्रव्यहि माझ्याजवळ नसल्यामुळें आणि माझ्या ठिकाणीं आळसहि भरपूर असल्यामुळें तुझी पूजा करणें मला अशक्य झालें आणि त्यामुळें तुझ्या चरणाला मी जें अंतरलों त्याबद्दल क्षमा कर. हे आई! तू सर्वांचा उद्धार करणारी व कल्याण करणारी आहेस. मला क्षमा कर. कुपुत्र जन्माला येऊं शकेल पण आई मात्र कधीं कुमाता होऊं शकत नाहीं.

पृथिव्यां पुत्रास्ते जननि बहवः सन्ति सरलाः
परं तेषां मध्ये विरलतरलोऽहं तव सुतः।

मदीयोऽयं त्यागः समुचितमिदं नो तव शिवे
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ ३ ॥

आई ! या भूतलावर अंतःकरणानें सरल असलेले असे तुझे पुष्कळ पुत्र आहेत. पण त्यांच्यामध्यें मीच एक अत्यंत चपळ व अस्थिर वृत्तीचा असा तुझा मुलगा आहें. हे कल्याणकारिणि माते ! माझा हा त्याग करणें तुला योग्य नाहीं. कुपुत्र जन्माला येऊं शकेल, पण आई मात्र कधीं कुमाता होऊं शकत नाहीं.

जगन्मातर्मातस्तव चरणसेवा न रचिता
न वा दत्तं देवि द्रविणमपि भूयस्तव मया ।
तथापि त्वं स्नेहं मयि निरुपमं यत्प्रकुरुषे
कुपुत्रो जायेत क्वचिदपि कुमाता न भवति ॥ ४ ॥

हे जगज्जननी आई ! मी तुझ्या चरणकमलांची सेवा केली नाहीं अथवा हे देवी ! मी तुला पुष्कळसें धनहि अर्पण करूं शकलों नाहीं. तरी पण तूं माझ्यावर एवढें जें निरुपम प्रेम करीत आहेस, हें तुझ्या चांगुलपणाचें लक्षण आहे. पुत्र हा कुपुत्र होऊं शकतो पण माता ही कधीं कुमाता होऊं शकत नाहीं.

परित्यक्ता देवा विविधविधसेवाकुलतया
मया पञ्चाशीतेरधिकमपनीते तु वयसि ।
इदानीं चेन्मातस्तव यदि कृपा नापि भविता
निरालम्बो लम्बोदरजननि कं यामि शरणम् ॥ ५ ॥

मी पंचायशीं वर्षांपेक्षां अधिक वय घालविलें. आतां माझ्या हातून कांहीं होत नाहीं. जटिल उपासना-पद्धतींना कंटाळून मीं सर्व देवांना सर्वस्वीं सोडून दिलें आहे. या वेळेला हे आई ! जर तुझी कृपा होणार नसेल तर मग मी सर्वस्वीं निराधारच बनलों ! हें गजाननाच्या आई, मी आतां कोणाला शरण जाऊं ! तुझ्याशिवाय कोण मला पदरांत घेणार ?

श्वपाको जल्पाको भवति मधुपाकोपमगिरा
निरातङ्को रङ्को विहरति चिरं कोटिकनकैः ।

तवापर्णे कर्णे विशति मनुवर्णे फलमिदं
जनः को जानीते जननि जपनीयं जपविधौ ॥ ६ ॥

हे अपर्णे ! (पार्वतीनें शंकराच्या प्राप्तीकरिता तपश्चर्या करीत असताना झाडाचीं पानेंहि खाल्लीं नाहींत म्हणून तिला अपर्णा असें म्हणतात) आई पार्वती ! तुझ्या मंत्राचें अक्षर कानावर पडलें – कानात शिरलें तरी देखील एखादा चांडाळ – संस्कारहीन मानव – असला तरी तो मधुर पक्वान्नाप्रमाणें गोड असलेल्या शब्दांनीं वक्तृत्व करण्यात कुशल बनतो उत्तम वक्ता होतो तसेंच अत्यंत दरिद्री असला तरी तो कोट्यवधि सुवर्णमुद्रांनीं संपन्न होऊन चिरकाल या भूमंडलावर नांदू शकतो केवळ तुझ्या मंत्राचें अक्षर कानात शिरल्याचें जर हें फळ आहे, तर मग हे आई ! त्या मंत्राचा विधिपूर्वक जप केला असता जें फळ मिळेल तें कोण मनुष्य जाणू शकेल ?

चिताभस्मालेपो गरलमशनं दिक्पटधरो
जटाधारी कण्ठे भुजगपतिहारी पशुपतिः।
कपाली भूतेशो भजति जगदीशैकपदवीं
भवानि त्वत्पाणिग्रहणपरिपाटीफलमिदम् ॥ ७ ॥

आई भवानी ! काय शंकराची अवस्था ! अंगाला लावायला चितेचें भस्म सेवन करायला विष ! नेसायला पांघरायला दिशा हींच वस्त्रें (दिगंबर – नग्न) मस्तकावर जटा गळ्यामध्यें महाभुजंग, नागराज वासुकि सर्प माळे प्रमाणें धारण केला आहे पशुपति म्हणजे बैलवाला अर्थात् वाहन म्हणून बसायला नंदीबैल ! हातात भिक्षापात्र म्हणून नरकपाल अर्थात् मनुष्याची कवटी धारण केलेली आहे शृंगी, भृंगी इत्यादि भूतगणाचा तो अधिपति आहे पण असें असूनहि त्याला जगदीश, विश्वनाथ, महेश्वर ही श्रेष्ठ पदवी प्राप्त झाली ! हें कशाचें फल ? तू त्याना हात दिलास ! तुझ्याशीं केलेल्या पाणिग्रहणाचें लग्नविधीचेंच हें फल आहे

न मोक्षस्याकाङ्क्षा भवविभववाञ्छाऽपि च न मे
न विज्ञानापेक्षा शशिमुखि सुखेच्छाऽपि न पुनः।

अतस्त्वां संयाचे जननि जननं यातु मम वै
मृडानी रुद्राणी शिव शिव भवानीति जपतः ॥ ८ ॥

हे आई ! तुझें मुख चन्द्राप्रमाणें आल्हाद देणारें आहे, म्हणून तुला शशिमुखी असें म्हणतात हे शशिमुखी माते ! मला आता मोक्षाची इच्छा नाहीं आणि संसारांतील कोणत्याहि वैभवाची इच्छा नाहीं मला विज्ञानाची – शिल्पशास्त्र, कलाकौशल्य इत्यादिकांची अपेक्षा नाहीं आणि इतर कसल्याहि सुखाची पण अपेक्षा नाहीं तथापि तुला एक मागणें आहे, आई ! माझा सर्व जन्म ' मृडानी रुद्राणी शिव शिव भवानी ' असा जप करीत परिसमाप्त व्हावा एवढी एकच इच्छा आहे ती तू पूर्ण कर

नाराधितासि विधिना विविधोपचारैः
किं रूक्षचिन्तनपरैर्न कृतं वचोभिः ।
श्यामे त्वमेव यदि किञ्चन मय्यनाथे ।
धत्से कृपामुचितमम्ब परं तवैव ॥ ९ ॥

हे आई श्यामे ! नाना प्रकारच्या पूजा-सामग्रीनें मी तुझी विधिपूर्वक आराधना केली नाहीं उलट सदा सर्वकाळ निरर्थक विचार व कठोर शब्दांचे उच्चार करण्यात तत्पर असलेल्या माझ्या मनानें व वाणीनें मी कोणतें पाप केलें नाहीं? सर्व काहीं पापें केलीं आहेत, तरी देखील हे आई ! सर्वस्वीं अनाथ असलेल्या अशा माझ्या ठिकाणीं तू आपण होऊनच ही जी काहीं कृपा करीत आहेस ती तुला योग्यच आहे शोभण्यासारखी आहे तात्पर्य, पुत्र जरी कर्तव्यपराङ्मुख झाला तरी माता ही कधीं कर्तव्यपराङ्मुख होऊं शकत नाहीं तू माझी आई आहेस, मी तुझें अज्ञान लेकरूं आहें मी चुकलों तरी तू न चुकणें हेंच योग्य होयई

आपत्सु मग्नः स्मरणं त्वदीयं
करोमि दुर्गे करुणार्णवेशि ।
नैतच्छठत्वं मम भावयेथाः
क्षुधातृषार्ता जननीं स्मरन्ति ॥ १० ॥

हे आई दुर्गे ! दयासागर परमेश्वरी ! मी आपत्तींत सापडलों म्हणून तुझें स्मरण करीत आहें यास्तव मी लबाड किंवा आपमतलबी आहें असें समजू

नकोस कारण भुकेनें व तहानेनें व्याकुळ झालेलीं मुलें आईचेंच स्मरण करीत असतात तू तर माझी आई आहेस मग मी तुला सोडून दुसऱ्या कोणाचें स्मरण करणार ?

जगदम्ब विचित्रमत्र किं
परिपूर्णा करुणास्ति चेन्मयि ।
अपराधपरम्परावृतं
न हि माता समुपेक्षते सुतम् ॥ ११ ॥

हे जगज्जननि माते ! तुझी माझ्यावर जर परिपूर्ण कृपा असेल, तर यात नवल तें कसलें ? कारण मुलगा सतत अपराध करीत असला तरी आई त्याची कधीं उपेक्षा करीत नाहीं

मत्समः पातकी नास्ति पापघ्नी त्वत्समा न हि ।
एवं ज्ञात्वा महादेवि यथायोग्यं तथा कुरु ॥ १२ ॥

हे आई महादेवी ! माझ्यासारखा पापी कोणी नाहीं व तुझ्यासारखी पापातून मुक्तकरणारीहि पण कोणी नाहीं हें जाणून तुला जें योग्य दिसेल तें तू कर तात्पर्य, माझ्या सर्व अपराधाची क्षमा करून माझ्या सर्व पापाचा नाश करणें व मला पदरात घेणें हेंच तुला योग्य आहे आई ! तेंच तू करावेस अशी माझी प्रार्थना आहे



## आनन्दलहरी

[ श्रीशंकराचार्यांनी केलेली ही पार्वतीची स्तुति अर्थाकडे दृष्टि ठेवून म्हणत असताना चित्तात आनंदाच्या लहरी निर्माण करते, म्हणून या स्तुतीलाहि आनंदलहरी म्हटलें आहे यात पार्वतीच्या सगुण स्वरूपाचें फारच सुंदर वर्णन केलेलें आहे ]

भवानि स्तोतुं त्वां प्रभवति चतुर्भिर्न वदनैः
प्रजानामीशानस्त्रिपुरमथनः पञ्चभिरपि ।

न षड्भिः सेनानीर्दशशतमुखैरप्यहिपति-
स्तदान्येषां केषां कथय कथमस्मिन्नवसरः ॥ १ ॥

आईभवानी ! सर्व सृष्टीचा स्वामी ब्रह्मदेव चारी मुखानींहि तुझी स्तुति करण्यास समर्थ होऊ शकत नाहीं त्रिपुरारि भगवान् शंकर आपल्या पाचहि मुखानीं तुझी स्तुति करण्याला समर्थ होऊ शकत नाहीं कार्तिकस्वामी श्रीषडानन आपल्या सहाहि मुखानीं तुझी पूर्णपणें स्तुति करू शकत नाहीं एवढेंच काय ! सहस्रवदन शेषहि तुझी स्तुति करण्याला असमर्थ आहे तुझी स्तुति करताना जेथें ब्रह्मादि देवाची ही स्थिति आहे तेथें इतर कोणाला अवसर मिळणार ! आई ! तूच साग तुझी स्तुति करण्याला कोण समर्थ होणार !

घृतक्षीरद्राक्षामधुमधुरिमा कैरपि पदैर्
विशिष्यानाख्येयो भवति रसनामात्रविषयः ।
तथा ते सौन्दर्यं परमशिवदृङ्मात्रविषयः
कथंकारं ब्रूमः सकलनिगमागोचरगुणे ॥ २ ॥

हे आईभवानी ! तुझ्या सौंदर्याचा महिमा कोण वर्णन करू शकेल ! तूप, दूध, द्राक्षें, मध इत्यादि पदार्थांची गोडी पृथक् पृथक् रूपानें—विशेष—रूपानें कोणत्याहि शब्दानीं वर्णन करता येत नाहीं ती फक्त जिभेलाच—रसनेंद्रियालाच कळू शकते त्याचप्रमाणें तुझ्या सौंदर्याची कल्पना फक्त परम महान् असलेल्या शंकराच्याच दृष्टीला येऊ शकते केवळ भगवान् शंकरच तुझ्या सौंदर्याचा महिमा जाणू शकतात तो आम्ही काय वर्णन करणार ! हे आई जगज्जननी ! सर्व वेदानाहि तुझ्या सगळ्या गुणाचा थागपत्ता लागलेला नाहीं, तेथें आमचा काय पाड !

मुखे ते ताम्बूलं नयनयुगले कज्जलकला
ललाटे काश्मीरं विलसति गले मौक्तिकलता ।
स्फुरत्काञ्ची शाटी पृथुकटितटे हाटकमयी
भजामस्त्वां गौरीं नगपतिकिशोरीमविरतम् ॥ ३ ॥

आई भवानी ! तुझ्या मुखामध्यें तांबूल आहे दोन्ही नेत्रामध्यें काजळाची कोर शोभत आहे भालप्रदेशीं केशर कुंकुमतिलक शोभत आहे

आणि गळ्यामध्यें मोत्याचा हार शोभत आहे. अगावर भरजरीचा शालू त्यावर विशाल कटिभागी सुदर कबरपट्टा चमकत आहे याप्रमाणें शोभणारी गौरवर्ण, पर्वतराज हिमालयाची कन्या अशी जी तू पार्वती त्या तुला मी निरतर भक्तिभावानें भजत आहें

विराजन्मन्दारद्रुमकुसुमहारस्तनतटी
नदद्वीणानादश्रवणविलसत्कुण्डलगुणा ।
नताङ्गी मातङ्गीरुचिरगतिभङ्गी भगवती
सती शम्भोरम्भोरुहचटुलचक्षुर्विजयते ॥ ४ ॥

जिच्या वक्षःस्थलावर पारिजातक पुष्पाचा हार शोभत आहे, जवळच वाजणाऱ्या वीणेच्या ताराचा मजुळ नाद श्रवण करून डोलत असलेल्या जिच्या कानातील कुडलें लुकलुक हालत अधिकच शोभा देत आहेत, जिचा देह नम्र आहे, जिच्या चालण्याची रीति हत्तिणीप्रमाणें मद आणि मनोहर आहे, जिचें डोळे कमळाप्रमाणें सुदर आहेत, आणि जी सकल ऐश्वर्यानें सपन्न आहे, अशा त्या श्रीशंकराच्या सती पार्वतीचा जयजयकार असो

नवीनार्कभ्राजन्मणिकनकभूषापरिकरैर्
वृताङ्गी सारङ्गीरुचिरनयनाऽङ्गीकृतशिवा ।
तडित्पीता पीताम्बरललितमञ्जीरसुभगा
ममापर्णा पूर्णा निरवधिसुखैरस्तु सुमुखी ॥ ५ ॥

उदयाला येणाऱ्या सूर्याप्रमाणें देदीप्यमान अशा रत्नजडित सोन्याच्या अलकारानीं जिचे अवयव शोभत आहेत हरिणीप्रमाणें जिचे नेत्र विशाल आणि सुदर आहेत, जिनें अनन्यभक्तीनें तपश्चर्या करून शकराला वरलेलें आहे, विद्युल्लतेप्रमाणें जिची अगकाति पीतवर्ण आहे, पीतवस्त्र परिधान केल्यामुळें शोभायमान दिसणाऱ्या पायातील अलकारानी जी अधिकच सुदर दिसत आहे, अशी ती निरतिशय सुखानें परिपूर्ण असलेली देवी पार्वती मला प्रसन्न होवो

हिमाद्रेः संभूता सुललितकरैः पल्लवयुता
सुपुष्पा मुक्ताभिर्भ्रमरकलिता चालकभरैः ।

कृतस्थाणुस्थाना कुचफलनता सूक्तिसरसा
रुजां हन्त्री गन्त्री विलसति चिदानन्दलतिका ॥ ६ ॥

हे आईभवानी ! तूं मूर्तिमंत चिदानंदस्वरूपाची लता आहेस. ज्याप्रमाणें एखादी लता डोंगरांवर उगवते, तिला पानें फुटतात, फुलें येतात, भ्रमर तिच्या भोंवतालीं गुंजारव करतात, ती एखाद्या खोडाचा—वृक्षाचा आश्रय घेते, फलभारानें नम्र होते, लोक रसास्वाद घेतात. तृप्त व रोगांतून मुक्तहि होतात, त्याचप्रमाणें ही पार्वतीरूपी लता हिमालयापासून जन्माला आली. सुंदर हात हींच तिचीं पानें. अंगावर असलेल्या अलंकारांतील मोती हींच फुलें. मस्तकावरील कुरळे केश हेच जणुं काय भ्रमर, स्थाणु म्हणजे भगवान् श्रीशंकर यांचा तिनें आश्रय घेतलेला आहे, ती स्तनभारानें नम्र झालेली आहे, भक्तजनांना उपदेश करणारे शब्द हाच रस, जे कोणी या रसाचें सेवन करतात, त्यांच्या भवरोगाचा नाश होतो. अशी ही पार्वती चालतीबोलती मूर्तिमंत चिदानंद लतिकाच शोभत आहे.

सपर्णामाकीर्णां कतिपयगुणैः सादरमिह
श्रयन्त्यन्ये वल्लीं मम तु मतिरेवं विलसति।
अपर्णैका सेव्या जगति सकलैर्यत्परिवृतः
पुराणोऽपि स्थाणुः फलति किल कैवल्यपदवीम् ॥ ७ ॥

इतर लोक कांहीं तरी कोणत्या न कोणत्या तरी गुणांनीं युक्त असलेल्या व पानांनीं व्यापलेल्या अशा ( सपर्णा ) वल्लीचा आदरानें आश्रय करतात, पण मला मात्र असें वाटतें कीं, या जगांत सर्वांनीं एका अपर्णेचाच आश्रय करावा. कारण ही अपर्णा, म्हणजे पार्वती अपर्णा म्हणजे पानें नसलेली लता असली तरी ती आश्रितांचे मनोरथ सफल करते. वरें यांत आश्चर्य मानण्याचें कांहीं कारण नाहीं. कारण जिनें वेष्टिल्यामुळें अथवा जिच्या आश्रयामुळेंच भगवान् शंकर स्वतः पुरातन स्थाणु ( अनादि निश्चल अथवा अगदीं जुनें खोड ) या नांवानें प्रसिद्ध असूनहि म्हणजे जेथें सामान्य फलाचीहि अपेक्षा करतां येत नाहीं तेथें ते मोक्षरूपी श्रेष्ठ फल देण्यास समर्थ झाले आहेत ! मग स्वतः पार्वती इष्ट फल देण्यास समर्थ असेल यांत नवल कसलें ?

विधात्री धर्माणां त्वमसि सकलाम्नायजननी
त्वमर्थानां मूलं धनदनमनीयाङ्घ्रिकमले ।

त्वमादिः कामानां जननि कृतकन्दर्पविजये
सतां भक्तेर्बीजं त्वमसि परमब्रह्ममहिषी ॥ ८ ॥

हे आई पार्वती ! सर्व धर्मांना जन्म देणारी तू सर्व वेदांची माता आहेस. हे जगज्जननी ! तू सर्व वैभवाचें मूळ आहेस. कुबेरानेंहि तुझ्या चरणकमळीं वंदन करावें असा तुझा महिमा आहे. सर्वकामनांचें — सर्व संकल्पांचें मूळ कारण तूंच आहेस तू कामदेवालाहि जिंकलेलें आहेस. सज्जनांच्या भक्तीचें व मुक्तीचें बीज म्हणजे मुख्य कारणहि तूंच आहेस व तूं परब्रह्म परमेश्वर जो भगवान् श्रीशंकर त्याची पट्टराणी आहेस मी तुझा महिमा किती वर्णूं ?

प्रभूता भक्तिस्ते यदपि न ममालोलमनसस्
त्वया तु श्रीमत्या सदयमवलोक्योऽहमधुना ।
पयोदः पानीयं दिशति मधुरं चातकमुखे
भृशं शङ्के कैर्वा विधिभिरनुनीता मम मतिः ॥ ९ ॥

हे आई जगज्जननी ! माझें मन अत्यंत चंचल असल्यामुळें जरी मी तुझी पुष्कळशी भक्ति करूं शकलों नाहीं, तरी तू उदार मनाची असल्यामुळें या वेळीं माझ्याकडे तू दयापूर्ण दृष्टीनें पाहिलेंच पाहिजे चातक प्रेम करो अथवा न करो, पण मेघ मात्र त्याच्या मुखामध्यें मधुर जलाचे कण टाकीतच रहातो आई ! मला मोठी काळजी वाटते कीं, कोणत्या प्रकारानी माझी बुद्धि तुझ्याकडे लागेल ? तुझ्या स्वरूपीं लीन होईल ?

कृपापाङ्गालोकं वितर तरसा साधुचरिते
न ते युक्तोपेक्षा मयि शरणदीक्षामुपगते ।
न चेदिष्टं दद्यादनुपदमहो कल्पलतिका
विशेषः सामान्यैः कथमितरवल्लीपरिकरैः ॥ १० ॥

हे आई जगज्जननी ! तुझीं सगळीच चरित्रें उत्तम आहेत तू माझ्या-कडे सत्वर कृपापूर्ण कटाक्षयुक्त दृष्टीनें अवलोकन कर. मी तुझ्याचरणीं शरण येण्याची दीक्षा घेतली असताना तू माझी उपेक्षा करणें योग्य होणार नाहीं. कल्पलतेनें वेळोवेळीं इष्ट फळ जर तावडतोब दिलें नाहीं तर तिच्यात आणि सर्वसाधारण इतर लतावेलींच्या समूहात काय फरक राहिला ?

महान्तं विश्वासं तवचरणपङ्केरुहयुगे
निधायान्यन्नैवाश्रितमिह मया दैवतमुमे ।
तथापि त्वच्चेतो यदि मयि न जायेत सदयं
निरालम्बो लम्बोदरजननि कं यामि शरणम् ॥ ११ ॥

हे आई पार्वती ! मी तुझ्या दोन्ही चरणकमलावर फार मोठा विश्वास ठेवला व त्या भरवशावर इतर कोणत्याहि देवाचा आश्रय घेतला नाहीं असें असूनहि तुझ्या चित्तात माझ्याबद्दल जर दया आली नाहीं तर निराधार झालेला मी, हे गजाननाच्या आई ! कोणाला बरें शरण जाऊं ?

अयः स्पर्शे लग्नं सपदि लभते हेमपदवीं
यथा रथ्यापाथः शुचि भवति गङ्गौघमिलितम् ।
तथा तत्तत्पापैरतिमलिनमन्तर्मम यदि
त्वयि प्रेम्णा सक्तं कथमिव न जायेत विमलम् ॥ १२ ॥

हे आई पार्वती ! लोखंडाचा तुकडा परिसाचा स्पर्श झाल्याबरोबर सोनें बनतो अथवा जसें गटारातील पाणी गंगेच्या प्रवाहामध्यें मिळालें असता पवित्र होतें, गंगेशीं एकरूप होऊन जातें, त्याचप्रमाणें निरनिराळ्या पापांनीं माझें अंतःकरण जरी मलिन असलें तरी तें तुझ्या ठिकाणीं प्रेमानें आसक्त झाल्या नंतर कसें बरें निर्मळ होणार नाहीं ? का बरें शुद्ध होणार नाहीं ? तात्पर्य माझें अंतःकरण कितीहि मलिन असलें तरी तुझ्या ठिकाणीं आसक्त झाल्यानंतर तें शुद्ध झालेंच पाहिजे

त्वदन्यस्मादिच्छाविषयफललाभे न नियमस्
त्वमर्थानामिच्छाधिकमपि समर्था वितरणे ।
इति प्राहुः प्राञ्चः कमलभवनाद्यास्त्वयि मनस्
त्वदासक्तं नक्तंदिवमुचितमीशानि कुरु तत् ॥ १३ ॥

हे परमेश्वरी आई पार्वती ! तुझ्यापेक्षां निराळे देव किंवा देवता यांच्या कडून मनाला अपेक्षित असलेल्या फळाचाहि लाभ होईल अशी खात्री नाहीं मग अधिक मिळणें तर लांब राहिलें ! तू मात्र भक्तजनांना त्यांच्या इच्छे पेक्षांहि अधिक फळ देण्यास समर्थ आहेस असें प्राचीन ब्रह्मदेव, विष्णु वगैरे

देवहि सांगतात म्हणून हे आई ! माझें मन रात्रंदिवस तुझ्या ठिकाणीं आसक्त झालेलें आहे आता तुला योग्य वाटेल तें तू कर

स्फुरन्नानारत्नस्फटिकमयभित्तिप्रतिफलत्-
त्वदाकारं चञ्चच्छशधरविलासोपशिखरम् ।
मुकुन्दब्रह्मेन्द्रप्रभृतिपरिवारं विजयते
तवागारं रम्यं त्रिभुवनमहाराजगृहिणि ॥ १४ ॥

हे आई जगज्जननी ! तू त्रैलोक्याधीश्वर भगवान् श्रीशंकर यांची गृहिणी आहेस तुझ्या मंदिराचा महिमा मी काय वर्णन करूं ! तुझ्या मंदिराच्या भिंती स्फटिकाच्या आहेत त्यावर नाना प्रकारचीं रत्नें जडविलेलीं आहेत त्यामध्यें चोहोंकडे तुझी मूर्ति प्रतिबिंबित झालेली दिसत आहे त्या मंदिराच्या गर्भावरील शिखरावर चंद्राची कोर प्रतिबिंबित होऊन शोभा देत आहे महादेव, विष्णु, इंद्र इत्यादि देवता तुझ्या मंदिरांत परिवाराप्रमाणें शोभत आहेत. असें तुझ्या मंदिराचा थाट आहे तें सर्वांपेक्षा श्रेष्ठ आहे

निवासः कैलासे विधिशतमखाद्याः स्तुतिकराः
कुटुम्बं त्रैलोक्यं कृतकरपुटः सिद्धिनिकरः ।
महेशः प्राणेशस्तदवनिधराधीशतनये
न ते सौभाग्यस्य क्वचिदपि मनागस्ति तुलना ॥ १५ ॥

हे आई पार्वती !, सकल पर्वतांचा अधिनायक जो हिमालय त्याची तू कन्या आहेस तुझ्या उत्तम भाग्याचें मी काय बरें वर्णन करूं ! त्याला या जगांत तिळमात्र देखील कशाचीहि उपमा देता येत नाहीं तुझें रहाणें कैलास पर्वतावर ब्रह्मदेव, इंद्र, कुबेर इत्यादि देव स्तुति करीत आहेत त्रैलोक्य हें तुझें कुटुंब आहे सर्व सिद्धींचा समुदाय तुझ्यापुढें हात जोडून उभा आहे प्रत्यक्ष परमेश्वर भगवान् श्रीशंकर हे तुझे पतिराज आहेत अशी धन्य आहेस तू

वृषो वृद्धो यानं विषमशनमाशा निवसनं
श्मशानं क्रीडाभूर्भुजगनिवहो भूषणविधिः ।
समग्रा सामग्री जगति विदितैव स्मररिपोः
यदेतस्यैश्वर्यं तव जननि सौभाग्यमहिमा ॥ १६ ॥

पहा शंकराची काय अवस्था आहे ती! बसायला म्हातारा बैल! नेसायला दिशा! आणि खायला विष! खेळायला स्मशान आणि सर्पांचा समुदाय हेच अलंकार! मदनाचा शत्रु असलेला भगवान् श्रीशंकर यांची ही सर्व सामग्री जगाला माहीतच आहे. असें असूनहि शंकराचें हें दिसून येणारें वैभव—त्रैलोक्याधिपतित्व—हा खरोखर तुझ्याच उत्तम भाग्याचा महिमा होय!

अशेषब्रह्माण्डप्रलयविधिनैसर्गिकमतिः
श्मशानेष्वासीनः कृतभसितलेपः पशुपतिः
दधौ कण्ठे हालाहलमखिलभूगोलकृपया
भवत्याः संगत्याः फलमिति च कल्याणि कलये ॥१७॥

सकल ब्रह्मांडाचा प्रलय करीत रहाणें हीच ज्याची स्वाभाविक बुद्धि, सर्वांगाला भस्म फासून स्मशानांत बसून रहाणें हाच ज्यांचा स्वभाव, तथापि पशुपति भगवान् श्रीशंकर यांनीं अखिल भूमंडलांवर कृपा करण्याकरितां अत्यंत भयंकर असें हालाहल विष कंठामध्यें धारण केलें — प्राशन केलें! एवढी दया आणि एवढी शक्ति त्यांना जी प्राप्त झाली ती हे आई! कल्याणकारिणी! हें तुझ्याच संगतीचें फळ होय असें मी समजतों.

त्वदीयं सौन्दर्यं निरतिशयमालोक्य परया
भियैवासीद्गङ्गा जलमयतनुः शैलतनये।
तदेतस्यास्तस्माद्वदनकमलं वीक्ष्य कृपया
प्रतिष्ठामातेने निजशिरसि वासेन गिरिशः॥ १८॥

हे आई शैलजे! तुझें सर्वांत अधिक उत्तम असलेलें सौंदर्य पाहून गंगा फार घाबरली व भीतिनें तिचें पाणीच पाणी झालें! तेव्हां तिच्या म्लान झालेल्या मुखकमलाकडे पाहून शंकरांना दया आली व त्यांनीं आपल्या मस्तकांवर तिला धारण करून तिची मान मान्यता वाढविली! आई पार्वति! केवढें तुझें हें सौंदर्य प्रमाणशालि आहे!

विशालश्रीखण्डद्रवमृगमदाकीर्णघुसृण-
प्रसूनव्यामिश्रं भगवति तवाभ्यङ्गसलिलम्।
समादाय स्रष्टा चलितपदपांसून्निजकरैः
समाधत्ते सृष्टिं विबुधपुरपङ्केरुहदृशाम्॥ १९॥

हे सर्वैश्वर्यसंपन्न माते पार्वति ! अतिशय विशाल चंदनाचा रस (गंध) त्यांत कस्तूरी मिसळलेली, केशराचें चूर्ण कालविलेलें, अशा तऱ्हेनें तुझ्या अंगाला लावण्याकरितां तयार केलेल्या उटण्याचें मिश्रण असलेलें, तुझ्या अभ्यंगस्नानाचें पाणी, आणि तूं चालूं लागलीस म्हणजे तुझ्या चरणकमळाच्या स्पर्शानें पावन होणारी तुझ्या चरणाची धूळ, हें सर्व आपल्या हातांनीं गोळा करून ब्रह्मदेव स्वर्गांतील दिव्य अप्सरांची सृष्टि करतो ! असा तुझ्या चरणांचा महिमा आहे.

वसन्ते सानन्दे कुसुमितलताभिः परिवृते
स्फुरन्नानापद्मे सरसि कलहंसालिसुभगे ।
सखीभिः खेलन्तीं मलयपवनान्दोलितजले
स्मरेद्यस्त्वां तस्य ज्वरजनितपीडाऽपसरति ॥ २० ॥

हे देवी पार्वति ! आनंदानें पूर्ण असलेल्या वसंत ऋतूंत प्रफुल्लित झालेल्या लतांनीं मंडित असलेलें, नाना प्रकारच्या कमलांनीं सुशोभित, व हंससमूहानें अलंकृत असलेलें असें जें उत्तम सरोवर, त्या सरोवरांत मलय पर्वतावरून येणाऱ्या मंद, शीतल आणि सुगंध अशा वाऱ्याच्या आघातानें लाटा उसळत असतांना तूं आपल्या मैत्रिणींसह जेव्हां क्रीडा करतेस तेव्हां त्या वेळच्या तुझ्या आनंदमय आणि मंगलमय अशा स्वरूपाचें जे कोणी स्मरण करतात त्यांच्या सर्व दुःखाच्या वेदना निरास पावतात.

• •

# अन्नपूर्णास्तोत्रम्

## (१)

[ काशीमध्यें विश्वेश्वराचें दर्शन घेतल्यानंतर दुसरा नंबर अन्नपूर्णेच्याच दर्शनाचा आहे. अन्नपूर्णा ही विश्वेश्वराची अर्धांगी व विश्वाची अधिष्ठात्री आहे. विश्वाला अन्न पुरविण्याचें कार्य तीच करते म्हणून तिला अन्नपूर्णा म्हणतात. आचार्यांनीं ज्ञानवैराग्याची सिद्धि व्हावी म्हणून मोठ्या गोड शब्दांत तिची स्तुति करून तिला भिक्षा मागितली आहे. ज्ञानवैराग्याची सिद्धि कोणाला नको आहे ? कारण ज्ञान आणि वैराग्य यांच्याशिवाय अंतःकरणाला खरें समाधान लाभूं शकत नाहीं. म्हणून आपणहि ज्ञानवैराग्याच्या सिद्धीकरितां आचार्यांच्याच शब्दांत अन्नपूर्णेश्वरी मातेची प्रार्थना करूं या. ]

नित्यानन्दकरी वराऽभयकरी सौन्दर्यरत्नाकरी
निर्धूताखिलघोरपापनिकरी प्रत्यक्षमाहेश्वरी ।
प्रालेयाचलवंशपावनकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ १ ॥

हे जगज्जननि पार्वति ! तू माता आहेस, अन्नपूर्णेश्वरी आहेस तू भक्तांना नित्य आनंद देणारी आहेस एका हातानें वरमुद्रा व दुसऱ्या हातानें अभयमुद्रा धारण केलेली आहेस तू सर्व प्रकारच्या सौंदर्याची खाण आहेस तुझें स्मरण केलें असतां तू त्याच्या सर्व पापसमूहाचा निरास करतेस तू प्रत्यक्ष महेश्वराची प्राणवल्लभा आहेस तू जन्म घेऊन पर्वतराज हिमाचलाचा वंश पावन केला आहेस काशी नगरीची तू अधीश्वरी आहेस या जगांत सहस्र अपराधांची क्षमा करून कृपापूर्ण दृष्टीनें आधार देणारी तूच आहेस हे माते अन्नपूर्णेश्वरी ! ज्ञानवैराग्याच्या सिद्धीसाठीं भिक्षा मागण्याकरितां मी तुझ्याकडे आलों आहें मला तू भिक्षा घाल आणि कृतार्थ कर

नानारत्नविचित्रभूषणकरी हेमाम्बराडम्बरी
मुक्ताहारविडम्बमानविलसद्वक्षोजकुम्भान्तरी ।
काश्मीरागरुवासिताङ्गरुचिरे काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ २ ॥

अनेक प्रकारचीं रत्नें जडविलेलीं आश्चर्यकारक भूषणें जिच्या हातामध्यें आहेत, सोन्याचें भरजरी वस्त्र जिच्या आडवरीवर सिंहासनाच्या प्रभावळीवर शोभत आहे, भरजरी वस्त्राच्या समूहानें जी युक्त आहे किंवा जरीच्या वस्त्रानें जी ऐटींत शोभून दिसत आहे, जिच्या वक्षःस्थलावर मोत्यांचे हार शोभत आहेत, केशर, कस्तुरी, अगरु, चंदन यांचें उटणें अंगाला लावल्यामुळें जिचें अंग अधिक शोभत आहे, भक्तजनांना कृपेचा आधार देणारी काशी नगरीची अधिष्ठात्री, देवता माता अन्नपूर्णेश्वरी अशी तू आहेस आई पार्वति ! तू मला भिक्षा घाल

योगानन्दकरी रिपुक्षयकरी धर्मैकनिष्ठाकरी
चन्द्रार्कानलभासमानलहरी त्रैलोक्यरक्षाकरी ।
सर्वैश्वर्यकरी तपःफलकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ ३ ॥

योग म्हणजे चित्ताचा निरोध, एकाग्रता, समाधि अभ्यासानें तो साध्य झाला असताना जो आनंद मिळावा तोच आनंद तू देतेस तू सर्व शत्रूंचा नाश करतेस तूच धर्माच्या ठिकाणीं दृढ निष्ठा उत्पन्न करतेस चंद्र सूर्य आणि अग्नि यांच्या तेजाप्रमाणें तुझ्या कांतीच्या छटा भासतात. तू त्रैलोक्याचें रक्षण करतेस भक्तांना सर्व प्रकारचें ऐश्वर्य देतेस तपाच्या फलाची सिद्धि तुझ्याच कृपेनें होते आई तू मला भिक्षा घाल माझ्या सर्व इच्छा पूर्ण कर

कैलासाचलकन्दरालयकरी गौरी ह्युमा शाङ्करी
कौमारी निगमार्थगोचरकरी ह्योंकारबीजाक्षरी ।
मोक्षद्वारकपाटपाटनकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ ४ ॥

हे आई पार्वति ! तू शंकराच्या प्राप्तीकरिता हिमाचलाच्या गुहांत वास्तव्य केलेंस व तपश्चर्या केलीस तुझ्या आईनें तुला 'उ' म्हणजे हे मुली ! 'मा' म्हणजे नको एवढी खडतर तपश्चर्या करू नकोस असें तुला वरचेवर सांगितलें म्हणून 'उमा' हेंच तुझें नाव पडलें ! शंकरानें तुझा अंगीकार केला म्हणून तुला शांकरी म्हणतात कुमार म्हणजे कार्तिकस्वामी त्याची तू माता आहेस म्हणून तुला कौमारी असेंहि म्हणतात तुझ्याच कृपेनें वेदशास्त्राचा अर्थ चित्तामध्यें प्रकट होतो ॐकार म्हणजे प्रणव हेंच तुझ्या ज्ञानाचें बीज म्हणजे मुख्य साधन होय तू अक्षरी म्हणजे अविनाशी आहेस भक्तजनांकरिता मोक्षाच्या दरवाजाची कवाडें तू उघडी करतेस तुझ्याच कृपेनें भक्तांना मोक्षाचें द्वार खुलें होतें ! आई ! तू मला भिक्षा घाल

दृश्यादृश्यविभूतिवाहनकरी ब्रह्माण्डभाण्डोदरी
लीलानाटकसूत्रखेलनकरी विज्ञानदीपाङ्कुरी ।
श्रीविश्वेशमनःप्रसादनकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ ५ ॥

हे माते अन्नपूर्णे ! दृश्य आणि अदृश्य अशा ज्या ईश्वराच्या विभूति — थोर अधिकारी लोक व देवता आहेत त्या सर्वांचा निर्वाह — नेतृत्व — मार्गदर्शन तूच करतेस अथवा त्यांना आपआपलें कार्य करण्याचें सामर्थ्य तूच देतेस हें संपूर्ण ब्रह्मांडरूपी भांडें तुझ्याच उदरीं सामावलेलें आहे लीलेनें तूच नाचतेस

नाटकें करतेस. सूत्रें हालवितेस. अनेक प्रकारचे खेळ करितेस. तुझ्याच कृपेनें भक्तांच्या हृदयांत ज्ञानदीप अंकुरतो — ज्ञानदीप प्रकाशतो. श्रीकाशीविश्वेश्वराच्या मनाला तूंच प्रसन्न करतेस. आई ! मला भिक्षा घाल. माझे सगळे मनोरथ पूर्ण कर.

आदिक्षान्तसमस्तवर्णनिकरी शंभुप्रिया शाङ्करी
काश्मीरात्रिपुरेश्वरी त्रिनयनी विश्वेश्वरी शर्वरी ।
स्वर्गद्वारकपाटपाटनकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ ६ ॥

अकारापासून तो क्षकारापर्यंत संपूर्ण वर्णसमूहाचें तूंच अधिष्ठान आहेस. शंकराची तूं अत्यंत आवडती आहेस. तूं काश्मीरवासिनी आहेस. त्रिपुरेश्वरी आहेस. त्रिनयना, विश्वेश्वराची अर्धांगी. तुला शर्वरी — कालरात्रि असेंहि म्हणतात. तूं भक्तांकरितां स्वर्गाचें द्वार उघडें ठेवतेस. आई ! तूं मला भिक्षा घाल. कृतार्थ कर.

उर्वी सर्वजनेश्वरी जयकरी माता कृपासागरी
वेणीनीलसमानकुन्तलधरी नित्यान्नदानेश्वरी ।
साक्षान्मोक्षकरी सदा शुभकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ ७ ॥

हे आई ! तूं सर्वश्रेष्ठ आहेस सर्वजनांची अधीश्वरी आहेस. भक्तांना जय देतेस. तूं कृपेचा सागर आहेस. काळ्याभोर केसांची मनोहर वेणी तूं धारण केलेली आहेस. तूं नित्य अन्नदान करण्याला समर्थ आहेस. तूं प्रत्यक्ष मोक्ष प्राप्त करून देणारी आहेस. कृपापूर्ण दृष्टीनें तूं भक्तांचें सदा सर्वकाळ शुभ म्हणजे मंगल करतेस. आई ! मला भिक्षा घाल. माझें कल्याण कर.

देवी सर्वविचित्ररत्नरचिता दाक्षायणी सुन्दरी
वामा स्वादुपयोधरा प्रियकरी सौभाग्यमाहेश्वरी ।
भक्ताभीष्टकरी दशाशुभहरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ ८ ॥

हे आई ! तूं देवी म्हणजे प्रकाशमान आहेस. निरनिराळ्या सर्व प्रकारच्या रत्नांनी सुंदर दिसत आहेस. तूं दक्षप्रजापतीची कन्या म्हणून तुला दाक्षायणी

म्हणतात. तू सुंदर आहेस म्हणूनच तुला वामा असें म्हणतात. तुझें स्तन्य मधुर आहे. तू सर्वांचें प्रिय करतेस. तू सर्वसौभाग्यसंपन्न अशी प्रत्यक्ष महेश्वराची पत्नी आहेस. भक्तजनांचे चिंतित मनोरथ पूर्ण करणारी आहेस. अशुभ म्हणजे पाप. पापें दहा प्रकारचीं असतात. दुसऱ्याचें धन, वस्त्र, अन्न वगैरे चोरणें किंवा लुबाडणें, हिंसा करणें व परस्त्रीसेवन हीं तीन प्रकारचीं कायिक पापें होत. कठोर बोलणें, खोटें बोलणें, निंदाचहाडी करणें आणि असंबद्ध प्रलाप हीं चार वाचिक पापें होत. दुसऱ्याचा अपहार करण्याचा विचार करणें, अनिष्ट चिंतन करणें आणि खोटा अभिनिवेश बाळगणें हीं तीन मानसिक पापें होत. हे आई ! या सर्व दाही प्रकारच्या पापांचा तू निरास करतेस म्हणून तुला दशाशुभहरी असें म्हटलें जातें. हे आई ! मला भिक्षा घाल व कृतार्थ कर.

चन्द्रार्कानलकोटिकोटिसदृशी चन्द्रांशुबिम्बाधरी
चन्द्रार्काग्निसमानकुण्डलधरी चन्द्रार्कवर्णेश्वरी ।
मालापुस्तकपाशसाङ्कुशधरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ ९ ॥

आई, तुझ्या तेजाला कांहीतरी जर उपमा द्यावयाचीच झाली तर कोटि कोटि चंद्र, सूर्य अथवा अग्नि यांचीच उपमा द्यावी लागेल अशी तू आहेस. तुझे ओठ उदयाला येणाऱ्या चंद्राच्या किरणांप्रमाणें आरक्त आहेत. कानांतील कुंडलें चंद्र सूर्यांप्रमाणें झळकत आहेत अथवा अग्नीप्रमाणें देदीप्यमान आहेत, वर्णादि जिचा चंद्रसूर्यांप्रमाणेंच आहे, जी ईश्वराची–शंकराची अर्धांगी आहे. जिनें आपल्या हातांत माला, पुस्तक, पाश आणि अंकुश धारण केलेले आहेत, अशी तू आई अन्नपूर्णे ! मला भिक्षा घाल. माझे मनोरथ पूर्ण कर.

क्षत्रत्राणकरी महाभयहरी माता कृपासागरी
सर्वानन्दकरी सदाशिवकरी विश्वेश्वरी श्रीधरी ।
दक्षाक्रन्दकरी निरामयकरी काशीपुराधीश्वरी
भिक्षां देहि कृपावलम्बनकरी मातान्नपूर्णेश्वरी ॥ १० ॥

समाजाचें संरक्षण करण्याचा विडा ज्यांनी उचलला आहे अशा – क्षत्रियांचेंहि संरक्षण तूच करतेस. मोठमोठ्या भयांचें – संकटांचें निरसनहि तूच करतेस. या ठिकाणीं 'महाभयकरी' असा पाठ घेतल्यास शत्रूच्या अंत-

करणांत मोठा दरारा निर्माण करणारी असा अर्थ करावा. हे आई! तूं सर्वांची माता व दयेचा सागर आहेस. सर्वांना आनंद देतेस, सदासर्वकाळ भक्तांचें कल्याण करतेस. तूं विश्वाची मालक आहेस व अव्याहत ऐश्वर्य धारण करणारी आहेस. आपल्या प्रजापतिपदाच्या व कर्मठपणाच्या अहंकारांत चूर झालेल्या दक्षप्रजापतीच्या गर्वाचा परिहार करून त्याला तूं आक्रंदन करावयास लावलेस. तूं भक्त जनांना निरामय करणारी आहेस. आई अन्नपूर्णे! कृपा कर, मला भिक्षा घाल व माझ्या सर्वकामना पूर्ण कर.

अन्नपूर्णे सदापूर्णे शङ्करप्राणवल्लभे ।
ज्ञानवैराग्यसिद्ध्यर्थं भिक्षां देहि च पार्वति ॥ ११ ॥

हे आई अन्नपूर्णे! तूं सदा परिपूर्ण आहेस. शंकरांना प्राणाप्रमाणें प्रिय वाटतेस. माझ्या ठिकाणीं ज्ञान आणि वैराग्य यांची प्राप्ति व पूर्णता होण्याकरितां मला भिक्षा घाल व ज्ञान आणि वैराग्य यांनीं तूं मला संपन्न कर.

माता च पार्वती देवी पिता देवो महेश्वरः ।
बान्धवाः शिवभक्ताश्च स्वदेशो भुवनत्रयम् ॥ १२ ॥

देवी पार्वती ही माझी माता आहे आणि भगवान् परमेश्वर हेच माझे पिता आहेत. भगवद्भक्त शिवभक्त हे सर्व माझे बांधव होत आणि त्रिभुवन हाच माझा स्वदेश आहे! (केवढी उदात्त कल्पना आहे ही! या वेळीं ज्ञानदेवांच्या "हें विश्वचि माझें घर" या वाक्याची आठवण झाल्याशिवाय रहात नाहीं. अशी वृत्ति अंगीं बाणल्यावर भांडणतंटा, कलह, द्वेष, मत्सर, हेवा-दावा इत्यादि दुर्गुण कशाला रहातील! या स्तोत्रांत 'देहि' म्हणजे दे असें क्रियापद आहे, पण क्रियापदाला अनुलक्षून संबोधनवाचकपद आणि द्वितीयपुरुषीं एकवचनी कर्तृवाचकपद मात्र सबंध स्तोत्रांत कोठेंच नाहीं. हीं दोन्ही पदें अध्याहृत घेऊन अन्वय लावावा लागतो. हे स्तोत्र आद्य शंकराचार्यांचें नसावें असेंहि कांहीं लोक म्हणतात. तथापि स्तोत्रांतील गोडवा व भावनेंतील उदात्तता लक्षांत घेऊन आणि आद्यशंकराचार्यांच्या स्तोत्रावलींतहि याचा अंतर्भाव असलेला पाहून आम्हीं हें स्तोत्र सुबोध करून वाचकांच्यापुढें ठेवलें आहे.)

• •

# अन्नपूर्णास्तोत्रम् ।

## ( २ )

[ माझे हार्दिक ऋणानुबंधी डॉ वा अ बेलसरे याच्याकडे प्रेम करून ठवलेलें एक स्तोत्र दिसलें. कुतूहलबुद्धीनें पाहू लागलों तर तें अन्नपूर्णेचें स्तोत्र निघालें । शेवटच्या ओळीवर दृष्टि टाकली तर " इति श्रीशंकराचार्यविरचित अन्नपूर्णास्तोत्र संपूर्णम् " अशी अक्षरें दिसली चौकशीअंती डॉक्टराना झालेल्या एका दृष्टान्तातून हें स्तोत्र उपलब्ध झाल्याचें समजलें हें कोठेंहि मुद्रित असल्याचें दिसलें नाही बेळगाव येथील श्रीकाशीनाथ चिंतामणि दाडेकर याच्या संग्रही असलेल्या लिखितात हें स्तोत्र श्रीशंकराचार्यांचें असल्याचा उल्लेख आहे अवघ्या सातच श्लोकाचें हें स्तोत्र, पण त्यातहि ओज, माधुर्य आणि प्रसाद दिसत आहे ससारी लोकाच्या हिताकरिता आचार्यांनी हें स्तोत्र रचलेलें दिसतें या स्तोत्राचा भक्तिपूर्वक पाठ केल्यास श्रीअन्नपूर्णामाता निश्चित आपले मनोरथ पूर्ण करील या स्तोत्रात एक प्रकारचें दैवी सामर्थ्य आहे वाचकानी याचा अवश्य लाभ घ्यावा ]

भगवति भवरोगात् पीडितं दुष्कृतोत्थात्
सुतदुहितृकलत्रोपद्रवेणानुयातम् ।
विलसदमृतदृष्टया वीक्ष्य विभ्रान्तचित्तं
सकलभुवनमातस्त्राहि मामों नमस्ते ॥ १ ॥

हे आई अन्नपूर्णे, तू सर्व प्रकारच्या ऐश्वर्यांनी संपन्न आहेस चतुर्दश-भुवनाची तू माता आहेस मी तुझ्या चरणी अनन्यभावानें शरण आलों आहें तू माझें रक्षण कर मी मींच आचरलेल्या दुष्कृत्यानीं प्राप्त झालेल्या या भवरोगानें अत्यत पीडित झालों आहें कन्या, पुत्र आणि कलत्र ( बायको ) याचा उपद्रव सारखा मागें लागला आहे ससारात माझें चित्त गांगरून गेलेलें आहे प्रसन्न अशा अमृतमयदृष्टीनें तू माझ्याकडे पहा आई ! ॐ हा पवित्र शब्द उच्चारीत मी तुला नमस्कार करतों अथवा ॐ ( अ + उ + म् ) म्हणजे ब्रह्मा, विष्णु, आणि महेशस्वरूप असलेल्या तुला मी नमस्कार करीत आहें

माहेश्वरीमाश्रितकल्पवल्ली-
महंभवोच्छेदकरीं भवानीम् ।

क्षुधार्तजायातनयाद्युपेत-
स्त्वामन्नपूर्णे शरणं प्रपद्ये ॥ २ ॥

हे आई अन्नपूर्णे ! तूं महेश्वराची — सदाशिवाची लोकदृष्ट्या अर्धांगी पण तत्त्वतः अधिष्ठानशक्ति आहेस. म्हणून तुला माहेश्वरी म्हणतात. अनन्यभावानें शरण आलेल्या भक्तजनांचें सकल मनोरथ पूर्ण करणारी तूं प्रत्यक्ष कल्पलता आहेस. तूं भक्तजनांचा अहंकार आणि दुःखपूर्ण संसार यांचा उच्छेद करतेस. भव म्हणजे शंकर, त्यांची तूं पत्नी आहेस म्हणून तुला भवानी म्हणतात. अथवा भव म्हणजे कल्याण उत्कर्ष समृद्धि यांची प्राप्ति तुझ्याच कृपेनें होत असते म्हणून तुला भवानी — लोककल्याणकर्त्री असें म्हटलें आहे. आई भवानी ! भुकेनें व्याकुळ झालेल्या पुत्रकलत्रादि परिवारानें युक्त असा मी तुझ्या चरणीं शरण आलों आहें. आई अन्नपूर्णे ! कृपा कर.

दारिद्र्यदावानलदह्यमानं
पाह्यन्नपूर्णे गिरिराजकन्ये ।
कृपाम्बुधौ मज्जय मां त्वदीये
त्वत्पादपद्मार्पितचित्तवृत्तिम् ॥ ३ ॥

हे नगाधिराजतनये आई अन्नपूर्णे ! चहूंकडून भडकलेल्या दारिद्र्यरूपी वणव्यानें मी होरपळून निघत आहें. आई ! माझें रक्षण कर. मी माझी चित्तवृत्ति तुझ्या चरणकमलीं अर्पण केली आहे. मला तूं आपल्या कृपारूपी सागरांत निमग्न कर, हींच माझी विनंती आहे.

इत्यन्नपूर्णास्तुतिरत्नमेतत्
श्लोकत्रयं यः पठतीह भक्त्या ।
तस्मै ददात्यन्नसमृद्धिमम्बा
श्रियं च विद्यां च यशश्च मुक्तिम् ॥ ४ ॥

हें अन्नपूर्णेचें स्तोत्र खरोखर रत्नच आहे. जो कोणी भक्तियुक्त अन्तःकरणानें या तीन श्लोकांचें पठण करील त्याला याच लोकीं आणि याच जन्मीं माता अन्नपूर्णादेवी सर्व प्रकारची अन्नसमृद्धि, वैभव, विद्या, कीर्ति आणि मुक्ति हें सर्व कांहीं देते.

• •

# कालभैरवाष्टकम्

[ भगवान् विश्वनाथ ही काशीनगरीची अधिष्ठात्री देवता होय कालभैरव, आनंदभैरव, बटुकभैरव इत्यादि अष्टभैरव हे विश्वनाथाचेच अवतार होत त्यातहि कालभैरवाला अधिक प्राधान्य आहे काशीमध्यें कालभैरवाचें दर्शन घेतल्याशिवाय कोणताहि यात्रेकरू आपली काशीयात्रा पूर्ण झाली असें समजत नाहीं महाराष्ट्रातहि ठिक ठिकाणीं ज्योतिबा, भैरोबा या नावानीं भैरवाचीं मंदिरें दृष्टीस पडतात तीं सर्व कालभैरवाचींच होत (आपण रोज रात्रीं निजताना "अस्तिक अस्तिक काळभैरव" असें म्हणून काळभैरवाचें स्मरण करीतच असतों अस्तिकाच्या स्मरणानें सर्पांची व काळभैरवाच्या स्मरणानें भूत प्रेत-पिशाच इत्यादिकांची बाधा दूर होते अशी फलश्रुति आहे ) ऐहिक दृष्ट्या शोकमोहाचा निरास व पारमार्थिक दृष्ट्या ज्ञान मुक्तीचा लाभ कालभैरवाच्या कृपेनें होतो म्हणून कालभैरवाष्टक नित्य म्हणण्याचा प्रघात ठेवावा हें अष्टक पंचचामर वृत्तातलें असून म्हणायलाहि अत्यंत सुंदर आहे ]

देवराजसेव्यमानपावनाङ्घ्रिपङ्कजं
व्यालयज्ञसूत्रमिन्दुशेखरं कृपाकरम् ।
नारदादियोगिवृन्दवन्दितं दिगम्बरं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ १ ॥

सर्व देवाचा राजा इंद्रहि ज्याच्या परम पवित्र चरणकमलाची सेवा करीत आहे, यज्ञोपवितासमाणें नागराज ज्याच्या गळ्यामध्यें शोभत आहे, ज्यानें आपल्या मस्तकावर चंद्र धारण केलेला आहे, जो शरणागतावर कृपा करणारा आहे, ज्यास नारदादि ऋषिजनाच्या समुदायानें आणि शुकसनकादि योगिजनाच्या समुदायानें ज्याच्या चरणारविंदीं वंदन केलेलें आहे, जो दिग्वस्त्र परिधान करणारा व काशीनगरीचा अधिपति आहे त्या कालभैरवाला मी अनन्य भावानें शरण आलों आहें हे भैरवनाथा! मी आपला आश्रय करीत आहें

भानुकोटिभास्वरं भवाब्धितारकं परं
नीलकण्ठमीप्सितार्थदायकं त्रिलोचनम् ।
कालकालमम्बुजाक्षमक्षशूलमक्षरं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ २ ॥

आकाशामध्यें एकदम उदयाला आलेल्या कोटि सूर्याप्रमाणें ज्याची अंगकांति देदीप्यमान आहे, जो भक्तजनांना तारून नेतो, जो सर्वांपेक्षा श्रेष्ठ, परब्रह्मस्वरूप आहे, ज्याचा कंठ निळा आहे, भक्तांचे इष्ट मनोरथ पूर्ण करतो, सूर्य, चंद्र आणि अग्नि, हे ज्याचे तीन नेत्र आहेत नेत्र कमळासारखे सुंदर आहेत. जो काळाचाहि काळ आहे ज्यानें त्रिशूळ धारण केलेला आहे, जो तत्त्वतः अक्षर म्हणजे अविनाशी ब्रह्मस्वरूप आहे त्या काशीपुरीचा अधिपति असलेल्या कालभैरवाला मी भजत आहें.

शूलटङ्कपाशदण्डपाणिमादिकारणं
श्यामकायमादिदेवमक्षरं निरामयम् ।
भीमविक्रमं प्रभुं विचित्रताण्डवप्रियं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ ३ ॥

ज्यानें आपल्या हातामध्यें त्रिशूळ, टंक, पाश आणि दंड हीं आयुधें धारण केलेलीं आहेत, जो सर्व जगाचा आदिकारण – मूलकारण आहे, ज्याची अंगकांति श्यामवर्ण आहे, ज्याला आदिदेव अथवा महादेव म्हणतात, जो अक्षर म्हणजे नित्य व निरामय म्हणजे निर्विकार आहे, ज्याचा पराक्रम मोठा भयंकर आहे, जो प्रभु म्हणजे सर्वसमर्थ आहे, नाना प्रकारचीं तांडवनृत्यें ज्याला आवडतात, अशा त्या काशीपुरीच्या अधिनायकाला – कालभैरवाला मी शरण आलों आहें तो माझें रक्षण करो

भुक्तिमुक्तिदायकं प्रशस्तचारुविग्रहं
भक्तवत्सलं स्थिरं समस्तलोकविग्रहम् ।
निक्वणन्मनोज्ञहेमकिङ्किणीलसत्कटिं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ ४ ॥

अनन्यभावानें शरण आलेल्या भक्तजनांना – जो सर्व ऐश्वर्यभोग देतो व मोक्षहि देतो, ज्याचा देह भव्य आणि अत्यंत सुंदर आहे, जो भक्तांवर अत्यंत प्रेम करतो, स्थिर म्हणजे सदासर्वकाळ एकरूप आहे, चौदा भुवनांचें ब्रह्मांड हाच ज्याचा विराट् देह आहे, मधुर नाद करणारीं सुंदर सोन्याचीं घुंगरें ज्याला लावलीं आहेत असा सुंदर रत्नजडित सोन्याचा कमरपट्टा घातलेल्या-

मुळें ज्याचा कटिभाग फारच शोभत आहे, अशा त्या वाराणसी नगरीच्या अधिनायकाला मी अनन्यभावानें भजत आहें.

धर्मसेतुपालकं त्वधर्ममार्गनाशकं
कर्मपाशमोचकं सुशर्मदायकं विभुम् ।
स्वर्णवर्णशेषपाशशोभिताङ्गमण्डलं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ ५ ॥

जो धर्ममर्यादेचें संरक्षण करतो आणि अधर्माच्या मार्गांचा उच्छेद करतो, भक्तजनांना त्यांच्या कर्मपाशांतून सोडवून त्यांना उत्तम सुख देतो, जो विभु म्हणजे विश्वव्यापि अथवा समर्थ असा आहे, सोन्यासारखे देदीप्यमान सर्प आणि पाश ज्याच्या अंगांवर शोभत आहेत ( कांहीं पुस्तकांत 'केशपाश' असा पाठ आढळतो. सोन्यासारख्या देदीप्यमान केशांनीं ज्याचें मस्तक शोभत आहे, असा त्याचा अर्थ करावा ), अशा स्वरूपाचा तो काशीपुराधीश भैरवनाथ, त्याला मी अनन्यप्रेमानें भजत आहे.

रत्नपादुकाप्रभाभिरामपादयुग्मकं
नित्यमद्वितीयमिष्टदैवतं निरञ्जनम् ।
मृत्युदर्पनाशनं करालदंष्ट्रमोक्षणं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ ६ ॥

रत्नजडित सोन्याच्या पादुका पायामध्यें असल्यामुळें त्या पादुकांच्या प्रभेनें ज्याचे दोन्ही पाय अत्यंत सुंदर दिसत आहेत, जो नित्य, अद्वितीय आणि निरंजन म्हणजे शोक, मोह, जरा, मृत्यु, काम, क्रोध, क्षुधा, पिपासा इत्यादि सर्व संसारधर्मांनीं विरहित आहे, जो सर्वांचें इष्ट दैवत आहे, जो मृत्यूचा दर्प शमविणारा व भक्तांना मृत्यूच्या भयंकर दाढेंतून सोडविणारा आहे ( कांहीं ठिकाणीं 'करालदंष्ट्रभूषण' असा पाठ आहे त्याचा अर्थ अक्राळ-विक्राळ अशा दाढा ज्याला शोभत आहेत ), असा तो काशी नगरीचा अधिपति भगवान् कालभैरव, त्याला मी भक्तिपूर्वक शरण आलों आहें.

अट्टहासभिन्नपद्मजाण्डकोशसन्ततिं
दृष्टिपातनष्टपापजालमुग्रशासनम् ।

अष्टसिद्धिदायकं कपालमालिकाधरं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ ७ ॥

हे देवाधिदेवा भैरवनाथा ! आपण काळभैरव आहां. काळालाहि आपलें भय वाटतें म्हणून आपणांस काळभैरव म्हणतात. — आपण मोठमोठ्यानें हंसूं लागलांत म्हणजे आपल्या त्या प्रचंड हास्यामुळें एकच काय पण अनेक ब्रह्मांडें भेद पावतात. आपल्या दृष्टीचा संपर्क होतांच भक्तजनांचें पापजाल नाश पावतें. आपलें शासन म्हणजे सत्ता, ही मोठी भयंकर आहे ! तथापि आपण प्रसन्न झालां म्हणजे भक्तजनांना अणिमा, महिमा इत्यादि अष्टसिद्धिहि समर्पण करतां. आपण आपल्या गळ्यांत कपालमाला धारण केलेली आहे. आपण काशी नगरीचे अधिपति आहां. मी आपल्या चरणीं अनन्यभावानें शरण आलों आहें.

भूतसङ्घनायकं विशालकीर्तिदायकं
काशिवासलोकपुण्यपापशोधकं विभुम् ।
नीतिमार्गकोविदं पुरातनं जगत्पतिं
काशिकापुराधिनाथकालभैरवं भजे ॥ ८ ॥

हे देवाधिदेवा कालभैरवा ! आपण भूतगणांचे अधिनायक आहां. आपल्या कृपेनें भक्तजनांना विशाल कीर्तीचा लाभ होतो — आपण कीर्तिदायक आहां. काशीमध्यें वास्तव्य करणाऱ्या लोकांची पुण्यें व पापें यांचें आपण संशोधन करतां व त्याप्रमाणें त्यांना योग्य तीं फळेंहि देतां. आपण समर्थ आहां. आपण नीतिमार्गामध्यें निपुण आहा. पुरातन म्हणजे अनादि आहां. सर्व जगाचे आपण अधिपति आहां. हे काशीपुराधिनाथा कालभैरवा ! मी आपल्या चरणीं अनन्यचित्तानें शरण आलों आहें.

कालभैरवाष्टकं पठन्ति ये मनोहरं
ज्ञानमुक्तिसाधनं विचित्रपुण्यवर्धनम् ।
शोकमोहलोभदैन्यकोपतापनाशनं
ते प्रयान्ति कालभैरवाङ्घ्रिसंनिधिं ध्रुवम् ॥ ९ ॥

हे कालभैरवाचें अष्टक अत्यंत मनोहर आहे. तें ज्ञान आणि मुक्ति यांचा लाभ करून देतें. अर्थात् तें ज्ञानाचें आणि मुक्तीचें साधन आहे. याच्या

पठणानें आश्चर्यकारक पुण्याची अभिवृद्धि होते. शोक, मोह, लोभ, दैन्य, कोप आणि ताप या सर्व विकारांचा नाश होतो. जे कोणी भक्तियुक्त अंतःकरणानें या अष्टकाचें पठण करतात ते कालभैरवाच्या चरणकमलांच्या सान्निध्याला निश्चित प्राप्त होतात. त्यांच्यावर कालभैरवाची निश्चित कृपा होते.



## षट्पदीस्तोत्रम्

[ आर्या वृत्तांतील सहा श्लोकांचें हें स्तोत्र आहे म्हणून याला षट्पदी म्हणतात. हें म्हणतांना व ऐकतांना फार आनंद वाटतो. हें स्तोत्र अनुप्रास यमक इत्यादि अलंकारांनी नटलेलें आहे. षट्पद म्हणजे भ्रमर. त्याला कमळ फार आवडतें. तो कमळाभोंवतीं घिरट्या घालतो. गुंजारव करतो. कमळांत रमतो. त्याचप्रमाणें ही षट्पदी माझ्या मुखकमळांत सदा असावी अशी आचार्यांनी ईश्वराची प्रार्थना केली आहे. या स्तोत्रांत आचार्यांनी जणुं काय आपलें अंतःकरणच ओतलें आहे. यांत प्रेम, भक्ति आणि तत्त्वज्ञान यांचें मधुर मीलन आहे. अद्वैत तत्त्वाला तिळमात्रहि धक्का न लावतां परमात्म्याचें व जीवात्म्याचें अभिन्नत्व राखून भक्ताला अपेक्षित असलेला ईश्वर आणि जीव यांच्यांतील भेदभावहि, समुद्र आणि तरंग यांचा दृष्टान्त देऊन मोठ्या युक्तीनें उपपन्न केला आहे. ईश्वराची स्तुति आणि त्याला मागितलेलें मागणें मोठें मननीय आहे. आपणहि हेंच ईश्वराजवळ मागायला पाहिजे ]

अविनयमपनय विष्णो दमय मनः शमय विषयमृगतृष्णाम् ।
भूतदयां विस्तारय तारय संसारसागरतः ॥ १ ॥

हे सर्वव्यापी परमेश्वरा ! माझा उद्धटपणा नाहींसा कर. माझ्या उच्छृंखल मनाचें दमन कर. मनांतील खोट्या विषयांच्या आकांक्षेला शांत कर. अंतःकरणांत प्राणिमात्राबद्दलची दया विशाल होईल असें कर. भवसागरांतून मला तारून ने.

दिव्यधुनीमकरन्दे परिमलपरिभोगसच्चिदानन्दे ।
श्रीपतिपदारविन्दे भवभयखेदच्छिदे वन्दे ॥ २ ॥

गंगा हेंच ज्यांच्यातील पुष्परस आहे आणि ज्यांच्यातील सुगंधाचा स्वाद सच्चिदानन्दरूप असल्यानें सर्वत्र दरवळत आहे, अशा त्या संसारभयाच्या

दुःखाचा निरास करणाऱ्या श्रीपतीच्या — लक्ष्मीपतीच्या — दोन्ही चरणारविंदांना मी वंदन करीत आहें.

सत्यपि भेदापगमे नाथ तवाहं न मामकीनस्त्वम् ।
सामुद्रो हि तरङ्गः क्वचन समुद्रो न तारङ्गः ॥ ३ ॥

अद्वैत तत्त्वज्ञानाच्या प्रकाशामुळें — 'तूं' आणि 'मी' अशा तऱ्हेचा भेदभाव जरी नाहींसा झालेला असला तरी, हे दीनदयाळा परमेश्वरा! मी तुझा आहें असेंच मी म्हणेन. तूं माझा आहेस असें मला म्हणतां येणार नाहीं. कारण समुद्र आणि तरंग तत्त्वतः एक (जलमय) असले तरी, 'समुद्राचा तरंग' असेंच लोक म्हणत असतात. 'तरंगांचा समुद्र' असें कोणी म्हणत नाहीं.

उद्धृतनग नगभिदनुज दनुजकुलामित्र मित्रशशिदृष्टे ।
दृष्टे भवति प्रभवति न भवति किं भवतिरस्कारः ॥ ४ ॥

हे परमेश्वरा! वृंदावनांतील भक्तजनांच्या संरक्षणाकरितां अगदीं अल्प वयांतहि करंगळीवर गोवर्धन पर्वत धारण केलास, वामनरूपानें इंद्राचा धाकटा भाऊ होऊन, स्थानभ्रष्ट व ऐश्वर्यभ्रष्ट झालेल्या देवांना पुन्हां स्वर्ग व ऐश्वर्य प्राप्त करून दिलेंस, आसुरी संपत्तीचा प्रचार व प्रसार करणाऱ्या दानव समूहाचा तूं नाश केलास. सूर्य व चंद्र हे तुझे दोन डोळे आहेत. सर्वसमर्थ असा तुझा साक्षात्कार झाल्यानंतर — तुझें दर्शन घडल्यानंतर — संसारभयाचा निरास होऊं शकणार नाहीं काय? तुझ्या दर्शनानें संसारभयाचा निरास झालाच पाहिजे, असा माझा पूर्ण विश्वास आहे.

मत्स्यादिभिरवतारैरवतारवताऽवता सदा वसुधाम् ।
परमेश्वर परिपाल्यो भवता भवतापभीतोऽहम् ॥ ५ ॥

मत्स्य, कच्छ, वराह इत्यादि अवतार धारण करून तूं या भूमंडळाचें सर्वकाळ संरक्षण केलेलें आहेस. हे परमेश्वरा! मीहि संसारतापानें गांगरून गेलों आहें, भ्यालों आहें. माझेंहि तूं संरक्षण केलें पाहिजे अशी माझी विनंती आहे.

दामोदर गुणमन्दिर सुन्दरवदनारविन्द गोविन्द ।
भवजलधिमथनमन्दर परमं दरमपनय त्वं मे ॥ ६ ॥

हे सकलगुणमंदिरा दामोदरा! हे गोविंदा! तुझें मुखारविंद (मुखकमल) अत्यंत रमणीय आहे. हे परमेश्वरा! तूं संसारसागराचें मंथन करणारा प्रत्यक्ष

मदर पर्वतच आहेस, तर मग माझ्या अंतःकरणातील ही जबरदस्त भीति — संसाराचें भय — तू नाहींसें कर हीच विनती

**नारायण करुणामय शरणं करवाणि तावकौ चरणौ ।**
**इति षट्पदी मदीये वदनसरोजे सदा वसतु ॥ ७ ॥**

हे नारायणा ! करुणाघना ! आत्मसंरक्षणासाठीं मी तुझ्या चरणारविंदाचा आश्रय घेतला आहे तुझ्या चरणीं अनन्यभावानें शरण आलों आहें. ही षट्पदी — हें सहा श्लोकांचें स्तोत्र माझ्या मुखीं सदा असू दे भ्रमर जसा कमळामध्यें रहातो त्याचप्रमाणेंहि षट्पदी माझ्या मुखकमलीं सदा विराजत असावी



## श्रीकृष्णाष्टकम्

### ( १ )

[ आसन्नमरण असलेल्या मातेनें आठवण केल्याबरोबर दूर प्रदेशांत असलेले आचार्य आईच्यापुढें येऊन उभे राहिले ! आईची अंतकाळची अपेक्षा लक्षांत घेऊन आईला श्रीकृष्णाचें दर्शन घडविण्याकरिता आचार्यांनीं या स्तोत्रानें श्रीकृष्णाची आठवण केली श्रीकृष्ण प्रसन्न झाले आचार्यांना व त्यांच्या मातोश्रींना दर्शन देऊन कृतार्थ केलें ! हें आचार्यांच्याच शब्दावरून या स्तोत्रांत स्पष्ट पहावयास सांपडतें ]

**श्रियाऽऽश्लिष्टो विष्णुः स्थिरचरवपुर्वेदविषयो**
**धियां साक्षी शुद्धो हरिरसुरहन्ताब्जनयनः ।**
**गदी शङ्खी चक्री विमलवनमाली स्थिररुचिः**
**शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ १ ॥**

जो लक्ष्मीनें आलिंगिलेला आहे, सर्वव्यापक आहे, चराचर स्थावर-जंगम — हें सर्व विश्व ज्याचें शरीर आहे, वेद ज्याचें प्रतिपादन करतात किंवा वेदाच्या साहाय्यानें ज्याचा साक्षात्कार होऊं शकतो, जो सर्वांच्या बुद्धीचा साक्षी आहे, जो शुद्ध म्हणजे सर्व दोषरहित आहे, हरि म्हणजे भक्तजनांचें सर्व दुःख हरण करणारा आहे, जो असुरांचा — दैत्यांचा व राक्षसांचा नाश करणारा आहे, ज्याचे नेत्र कमलाप्रमाणें सुंदर आहेत, ज्यानें हातांत गदा,

शंख आणि चक्र धारण केलेलें आहे, ज्याच्या गळ्यांत निर्मल वनमाला शोभत आहे आणि अंगकांति ज्याची सुस्थिर आहे, जो शरणागताचें रक्षण करणारा आणि सर्व लोकांचा अधिपति आहे, असा तो आनंदकंद भगवान् श्रीकृष्ण त्यानें मला प्रत्यक्ष दर्शन द्यावें तो मला प्रत्यक्ष डोळ्यांनीं दिसावा

यतः सर्वं जातं वियदनिलमुख्यं जगदिदं
स्थितौ निःशेषं योऽवति निजसुखांशेन मधुहा ।
लये सर्वं स्वस्मिन् हरति कलया यस्तु स विभुः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ २ ॥

सृष्टिकालीं हें आकाश, वायु वगैरे अखिल भूतभौतिक विश्व, ज्याच्या पासून उत्पन्न होतें व स्थितिकालीं आपल्या आनंदाच्या लेशानेंच जो अखिल विश्वाचें पालन करतो, मधु नावाच्या दैत्याला ज्यानें मारलें, प्रलयकालीं सर्व विश्वाचा जो आपल्या स्वरूपामध्यें लय करून घेतो, सर्व वैभवसंपन्न असा तो, भक्तवत्सल त्रैलोक्याधिपति भगवान् श्रीकृष्ण त्यानें मला प्रत्यक्ष दर्शन द्यावें

असूनायम्यादौ यमनियममुख्यैः सुकरणै-
र्निरुद्धयेदं चित्तं हृदि विलयमानीय सकलम् ।
यमीड्यं पश्यन्ति प्रवरमतयो मायिनमसौ
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ३ ॥

यमनियम, आसन वगैरे उत्तम साधनांनीं प्रथम प्राणाचें नियमन करून — प्राणायामाचा अभ्यास करून बुद्धिमान् लोक चित्ताचा निरोध करतात, चित्ताला सर्व विषयांपासून आवरून अंतर्मुख करतात, सर्व विश्वाचा मूलकारणामध्यें — ब्रह्मामध्यें लय करून आपल्या हृदयांत ज्याचा साक्षात्कार करून घेतात, जो सर्वस्वीं स्तुति करण्याला योग्य व मायेचा अधिपति आहे असा जो भक्तवत्सल लोकनाथ भगवान् श्रीकृष्ण त्यानें मला प्रत्यक्ष दर्शन द्यावें

पृथिव्यां तिष्ठन् यो यमयति महीं वेद न धरा
यमित्यादौ वेदो वदति जगतामीशममलम् ।
नियन्तारं ध्येयं मुनिसुरनृणां मोक्षदमसौ
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ४ ॥

"जो पृथ्वीमध्यें वास्तव्य करून पृथ्वीचें नियंत्रण करतो पण ज्याला पृथ्वी ओळखीत नाहीं" इत्यादि वाक्यानीं वेद ज्याचें वर्णन करतो आणि जो जगाचा स्वामी सत्ताधारी आहे, निर्मल आहे, नियता आहे, ध्यान करण्याला योग्य आहे, ऋषींना, देवाना व मानवाना मोक्ष देणारा आहे, तो भक्तवत्सल लोकस्वामी भगवान् श्रीकृष्ण मला प्रत्यक्ष दिसावा

महेन्द्रादिर्देवो जयति दितिजान् यस्य बलतो
न कस्य स्वातन्त्र्यं क्वचिदपि कृतौ यत्कृतिमृते ।
कवित्वादेर्गर्वं परिहरति योऽसौ विजयिनः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ५ ॥

ज्याच्या बळावरच इंद्रादि देव दैत्याना जिंकू शकतात, ज्याच्या कृतीशिवाय कोणालाहि कोणत्याहि कार्यांत स्वातंत्र्य नाहीं, जो कवि विजयी इत्यादि लोकाचा कवित्व, विजय इत्यादि गोष्टींबद्दलचा गर्व नाहींसा करतो, अर्थात् जो कवींचा कवि व जेत्याचा जेता आहे काहीं पुस्तकात 'कवित्वादेर्' याच्या ऐवजीं 'बलारातेर्' असा पाठ आढळतो त्या ठिकाणीं बलाराति म्हणजे इंद्र समजावा बल दैत्याशीं युद्ध करून विजयी झालेल्या इंद्राच्याहि गर्वाचा जो परिहार करतो असा तो कृपाळु लोकनायक भगवान् श्रीकृष्ण, मला प्रत्यक्ष दर्शन देवो

विना यस्य ध्यानं व्रजति पशुतां सूकरमुखां
विना यस्य ज्ञानं जनिमृतिभयं याति जनता ।
विना यस्य स्मृत्या कृमिशतजनिं याति स विभुः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ६ ॥

ज्याचें ध्यान केलें नाहीं तर मनुष्य डुकराच्या, कोल्ह्या कुत्र्याच्या जन्माला जातो, ज्याच्या ज्ञानाशिवाय मनुष्याचें जन्ममरणाचें भय टळू शकत नाहीं, ज्याचें स्मरण केलें नाहीं तर मानवाला शेंकडों कृमिकीटकाचे जन्म घ्यावे लागतात, असा तो सर्वसमर्थ भक्तवत्सल भगवान् श्रीकृष्ण मला प्रत्यक्ष केव्हा भेटेल ? त्याच्या प्रत्यक्ष दर्शनासाठीं माझा जीव आतुर झाला आहे

नरातङ्कोट्टङ्कः शरणशरणो भ्रान्तिहरणो
घनश्यामो वामो व्रजशिशुवयस्योऽर्जुनसखः ।

स्वयंभूर्भूतानां जनक उचिताचारसुखदः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषयः ॥ ७ ॥

जो मनुष्याना छळणाऱ्या दुष्ट राक्षसादिकाचा नाश करतो, शरण आलेल्याचें सरक्षण करतो, भ्रांतीचा नाश करतो, पाण्यानें भरलेल्या ढगाप्रमाणें ज्याची अगकांति सावळ्या रगाची आहे, जो अत्यत सुदर आहे, गोपालबालकाचा समवयस्क मित्र आहे, अर्जुनाचा सखा आहे, स्वयभू म्हणजे ज्याचा कोणी जनक नाहीं, पण जो विश्वाचा जनक आहे, योग्य आचरण करणाऱ्याला जो सुख देणारा आहे, असा हा त्रैलोक्याधीश भक्तवत्सल भगवान् श्रीकृष्ण मला प्रत्यक्ष दिसावा, अशी माझी उत्कठा आहे

यदा धर्मग्लानिर्भवति जगतां क्षोभकरणी
तदा लोकस्वामी प्रकटितवपुः सेतुधृगजः ।
सतां धाता स्वच्छो निगमगणगीतो व्रजपतिः
शरण्यो लोकेशो मम भवतु कृष्णोऽक्षिविषय. ॥ ८ ॥

सर्व लोकामध्यें अस्थिरता निर्माण करणारा असा धर्माचा ऱ्हास जेव्हा घडून येतो तेव्हा जगन्नायक भगवान् श्रीकृष्ण अवतार घेऊन लोक मर्यादा व धर्म मर्यादा सुरक्षित ठेवतो ज्याला वस्तुत जन्म नाहीं पण जो वेळोवेळीं जन्म घेऊन सतांचें सरक्षण करतो, जो निर्मल आहे, सर्व वेदानीं वर्णिलेला आहे, जो गोकुल वृदावनाचा अधिपति आहे असा जो भगवान् श्रीकृष्ण तो मला प्रत्यक्ष दिसावा मी त्याच्या दर्शनासाठीं तळमळत आहें हे श्रीकृष्णा! मला प्रत्यक्ष दर्शन दे

इति हरिरखिलात्माऽऽराधितः शङ्करेण
श्रुतिविशदगुणोऽसौ मातृमोक्षार्थमाद्यः ।
यतिवरनिकटे श्रीयुक्त आविर्बभूव
स्वगुणवृत उदारः शङ्खचक्राब्जहस्तः ॥ ९ ॥

आपल्या मातेला मुक्ति मिळावी म्हणून याप्रमाणें श्रीशंकराचार्यांनीं, अखिल जगाचा आत्मा असलेल्या श्रीकृष्णाची या स्तोत्रानें आराधना केली तो श्रीकृष्ण भक्तांचीं सर्व दुःखें हरण करतो म्हणून त्याला हरि म्हणतात त्याचे गुण वेदानीं विशद करून सांगितलेले आहेत तो सर्व जगाचें मूळकारण

आहे म्हणून त्याला आद्य म्हणतात तो मोठा उदार आहे थोर अंत करणाचा आहे शंकराचार्यांनी केलेली स्तुति ऐकून, सौंदर्य, माधुर्य, लावण्य, कारुण्य इत्यादि आपल्या अगच्या स्वत सिद्ध असलेल्या सर्व गुणांनीं संपन्न असा तो आनदकंद श्रीकृष्ण, शख, चक्र, गदा, पद्म धारण करून लक्ष्मीसह श्रीशंकराचार्यांच्या डोळ्यासमोर प्रत्यक्ष उभा राहिला ! ! आचार्यांच्या मातेलाहि दर्शन देऊन आचार्यांचे व त्याच्या मातेचे सर्व मनोरथ त्यानें पूर्ण केले

• •

## श्रीकृष्णाष्टकम्

(२)

[ प्रमाणिका वृत्तातलें हें श्रीकृष्णाष्टक, हें एक अष्टक नसून हें एक जोडअष्टक आहे म्हणायला अत्यंत गोड आहे यमक, अनुप्रास इत्यादि अलंकारहि यात आहेतच शिवाय श्रीकृष्णाचें शब्दचित्रहि यात फारच उत्तम रेखाटलेलें आहे ]

भजे व्रजैकमण्डनं समस्तपापखण्डनम् ।
स्वभक्तचित्तरञ्जनं सदैव नन्दनन्दनम् ॥
सुपिच्छगुच्छमस्तकं सुनादवेणुहस्तकम् ।
अनङ्गरङ्गसागरं नमामि कृष्णनागरम् ॥ १–२ ॥

परम चतुर आनदकंद नंदनंदन नटनागर भगवान् श्रीकृष्ण प्रभु, त्याला मी प्रेमभावानें भजत आहें तो वृंदावनाचा एकमात्र अलंकार आहे तो सर्व पापाचा नाश करणारा आहे आणि आपल्या भक्तजनांच्या चित्ताचें सर्व काळ रंजन करणारा आहे

मोराच्या पखाचा उत्तम मुकुट ज्याच्या मस्तकावर शोभत आहे आणि ज्यानें आपल्या हातात मधुर नाद करणारी मुरली धारण केली आहे, जो काम देणाऱ्या कांतीचा सागर आहे, त्या नटनागर श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों

मनोजगर्वमोचनं विशाललोललोचनं
विधूतगोपशोचनं नमामि पद्मलोचनम् ।

करारविन्दभूधरं स्मितावलोकसुन्दरं
महेन्द्रमानदारणं नमामि कृष्णवारणम् ॥ ३-४ ॥

कामदेवाच्या दर्पाचें हरण करणारा तो भगवान् श्रीकृष्ण, त्याचे. नेत्र मोठे विशाल आणि चंचल आहेत. त्यानें गोप व गोपीजनांचें दुःख हरण केलेलें आहे. ज्याचे नेत्र कमळाप्रमाणें सुंदर आहेत, त्या श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों.

इंद्राच्या गर्वाचा परिहार करतांना ज्यानें गोवर्धन पर्वत सात दिवस आपल्या, कमलाप्रमाणें कोमल असलेल्या हातांवर सहज लीलेनें धारण केला, ज्याचें गालांतल्या गालांत हंसणें आणि मिस्किल दृष्टीनें पहाणें मोहक दिसतें, ज्यानें इंद्राच्य अहंकाराचा परिहार केला, त्या श्रीकृष्णरूपी महागजाला मी नमस्कार करतों.

कदम्बसूनकुण्डलं सुचारुगण्डमण्डलम् ।
व्रजाङ्गनैकवल्लभं नमामि कृष्णदुर्लभम् ॥
यशोदया समोदया सगोपया सनन्दया ।
युतं सुखैकदायकं नमामि गोपनायकम् ॥ ५-६ ॥

ज्याच्या कानांत कदंबाच्या फुलांची कुंडलें आहेत, ज्याचें कपोल-मंडल – गाल अत्यंत सुंदर दिसत आहेत, गोपीजनांचा तो आवडता आहे, अभक्तांना ज्याचें दर्शन होणें अत्यंत दुर्लभ आहे, अशा त्या भगवान् श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों.

जो गोपसमुदायांमध्यें नंदासह विराजमान असलेल्या प्रसन्नमुख अशा यशोदेच्या सान्निध्यांत उभा आहे, ज्याच्याकडे पाहून आनंदच आनंद वाटतो, त्या गोपनायक श्रीकृष्णाला मी नमस्कार करतों.

सदैव पादपङ्कजं मदीयमानसे निजम् ।
दधानमुत्तमालकं नमामि नन्दबालकम् ॥
समस्तदोषशोषणं समस्तलोकपोषणम् ।
समस्तगोपमानसं नमामि कृष्णलालसम् ॥ ७-८ ॥

माझ्या अंतःकरणरूपी सरोवरामध्यें ज्यानें आपलें चरणकमल नेहमीच स्थापन केलेलें आहे, ज्याचे कुरळे केस फारच सुंदर दिसतात, त्या नंदबालकाला मी नमस्कार करतों.

भक्तजनांच्या अंतःकरणांतील सर्व दोषांचें निरसन करणारा, सर्व लोकांचें पालनपोषण करणारा, आणि संपूर्ण गोकुलवासि जनांचें मूर्तिमंत मनच असलेला, असा तो नंदाच्या लालसेचा विषय असलेला, नंदबालक आनंद कंद भगवान् श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों.

भुवो भरावतारकं भवाब्धिकर्णधारकम् ।
यशोमतीकिशोरकं नमामि दुग्धचोरकम् ॥
दृगन्तकान्तभङ्गिनं सदासदालसङ्गिनम् ।
दिने दिने नवं नवं नमामि नन्दसम्भवम् ॥ ९–१० ॥

दुष्टांचा संहार करून पृथ्वीचा भार हलका करणारा, संसारसागरांतील कर्णधार आणि दुधादह्याची चोरी करणारा यशोदेचा कुमार जो भगवान् श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों. काहीं पुस्तकांतून 'चित्तचोरकम्' असा पाठ आढळतो त्या ठिकाणीं भक्तांचें चित्त हरण करणारा असा अर्थ करावा.

ज्याचे नेत्रकटाक्ष अत्यंत सुंदर दिसतात आणि उत्तम अलंकारांनीं जो सदासर्वकाळ भूषित झालेला असतो – दुष्टजनांशीं नेहमीं कपटानें वागणारा कपटपटु भगवान् श्रीकृष्ण, जेव्हां जेव्हां पहावें तेव्हां तेव्हां तो नवाच म्हणजे अपूर्वच दिसतो. अशा त्या नंदकुमाराला मी नमस्कार करतों.

गुणाकरं सुखाकरं कृपाकरं कृपावरम् ।
सुरद्विषन्निकन्दनं नमामि गोपनन्दनम् ॥
नवीनगोपनागरं नवीनकेलिलम्पटम् ।
नमामि मेघसुन्दरं तडित्प्रभालसत्पटम् ॥ ११–१२ ॥

तो गोपनंदन भगवान् श्रीकृष्ण सर्व सद्‌गुणांची खाण आहे. सुखाचा सागर आहे. दयेचा समुद्र आहे. भक्तांवर कृपा करण्याकरितां सदा तत्पर आहे. देवांचे शत्रु जे दैत्य दानव, त्यांचा नाश करतो. त्या गोपालकृष्णाला मी नमस्कार करतों.

*नित्य नव्या नव्या बाललीला करणारा, गोपालबालकामध्यें अत्यंत* चतुर असलेला, घनश्याम आणि विद्युल्लतेप्रमाणें ज्याच्या अंगावर पीतांबर झळकत आहे असा जो भगवान् श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों

**समस्तगोपनन्दनं हृदम्बुजैकमोहनं**
**नमामि कुञ्जमध्यगं प्रसन्नभानुशोभनम् ।**
**निकामकामदायकं दृगन्तचारुसायकं**
**रसालवेणुगायकं नमामि कुञ्जनायकम् ॥ १३–१४ ॥**

सर्व गोपालांना आनंद देणारा, हृत्कमलाला प्रफुल्लित करणारा प्रसन्न आणि सूर्यासारखा देदीप्यमान, असा जो कुंजविहारी गोपालकृष्ण त्याला मी नमस्कार करतों

*तो भक्तजनाचे सकल मनोरथ पूर्ण करणारा आहे, ज्याचे कटाक्ष बाणा*-प्रमाणें चित्ताचा वेध करणारे आहेत, रसाळ वेणुनादाची साथ घेऊन जो सुंदर गायन करतो, त्या वृंदावनातील कुंजवनाच्या अधिनायकाला मी नमस्कार करतों.

**विदग्धगोपिकामनोमनोज्ञतल्पशायिनं**
**नमामि कुञ्जकानने प्रवृद्धवह्निपायिनम् ।**
**यदा तदा यथा तथा तथैव कृष्णसत्कथा**
**मया सदैव गीयतां तथा कृपा विधीयताम् ॥१५–१६॥**

चतुर गोपीजनांच्या अंतःकरणरूपी कोमल शय्येवर शयन करणारा, कुंजवनामध्यें भडकलेल्या वणव्याला गिळून टाकणारा, भक्तवत्सल भगवान् *श्रीकृष्ण त्याला मी नमस्कार करतों.*

हे श्रीकृष्णा ! वेळोवेळीं कोणत्याहि निमित्तानें कशी का होईना तुझीं सच्चरित्रेंच माझ्या मुखानें वर्णिलीं जावींत, अशीच माझ्यावर कृपा करावी, हींच माझी विनती आहे

**प्रमाणिकाष्टकद्वयं जपत्यधीत्य यः पुमान् ।**
**भवेत्स नन्दनन्दने भवे भवे सुभक्तिमान् ॥ १७ ॥**

प्रमाणिक वृत्तातील हीं दोन्ही कृष्णाष्टकें पाठ करून जो म्हणत राहील तो जन्मोजन्मीं नंदनंदन *श्रीकृष्णप्रभूचा अनन्यभक्त होईल.*

● ●

# गोविन्दाष्टकस्तोत्रम्

[ हें गोविंदाष्टक म्हणताना कानाला फारच गोड लागतें. गोविंदाचें पारमार्थिक स्वरूप व अवतारचरित्र यात मोठ्या बहारीनें वर्णन केलेलें आहे गोविंदाला पहावयास कोठें लांब जायला नको या अष्टकाचें पठण करा, म्हणजे परमानंदरूप गोविंद आपल्या हृदयातच आपल्याला भेटेल असें आचार्यांनीं स्तोत्राच्या शेवटीं म्हटलें आहे ]

सत्यं ज्ञानमनन्तं नित्यमनाकाशं परमाकाशं
गोष्ठप्राङ्गणरिङ्खणलोलमनायासं परमायासम् ।
मायाकल्पितनानाकारमनाकारं भुवनाकारं
क्ष्मामानाथमनाथं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ १ ॥

जो सत्यस्वरूप आणि ज्ञानस्वरूप आहे, सदा सर्वकाळ सर्वत्र विराजमान असल्यामुळें आणि विश्वातील सर्व पदार्थांच्या रूपानें तोच नटलेला असल्यामुळ ज्याच्या स्वरूपाचा कधींच अंत लागत नाहीं म्हणून ज्याला अनंत म्हणतात ज्याचा कधीं नाश होत नाहीं म्हणून त्याला नित्य असेंहि म्हणतात आकाश, वायु तेज, जल आणि पृथ्वी हीं पंचमहाभूतें ज्याच्या स्वरूपात सामावलेलीं असल्यामुळें जो आकाशाहून भिन्न आहे, तथापि तो परमाकाश म्हणजे महाकाश किंवा चिदाकाश स्वरूप आहे आकाशापेक्षाहि मोठा आहे त्याचा अंतर्भाव किंवा समावेश दुसऱ्या कोणत्याहि तत्त्वात होत नाहीं म्हणून त्याला अनाकाश असेंहि म्हणतात

जो गोकुळाच्या अंगणात रांगण्यामध्यें-रिंगणें घालण्यामध्यें-चपळाई दाखवीत आहे, अनन्यभक्तांना ज्याच्या प्राप्तीसाठीं कांहीं आयास पडत नाहींत पण भक्तिहीनांना मात्र ज्याच्या प्राप्तीकरिता फार आयास पडतात अथवा तत्त्वत ज्याला कांहीं परिश्रम नाहींत पण भक्तजनांच्या मेळाव्यात, खेळात किंवा काम करताना जो फार थकल्यासारखा दिसतो

तत्त्वत ज्याला कांहीं आकार नाहीं पण मायेनें ज्यानें अनेक आकार कल्पिले आहेत व धारणहि केले आहेत, जो विश्वाच्या आकारानें नटला आहे जो संपूर्ण पृथ्वीचा आणि लक्ष्मीचाहि नाथ म्हणजे अधिपति आहे, स्वत

मात्र अनाथ आहे, अर्थात् ज्याचा कोणीहि अधिपति नाहीं अशा त्या आनंद-स्वरूप असलेल्या गोविंदाला प्रणाम करा.

मृत्स्नामत्सीहेति यशोदाताडनशैशवसन्त्रासं
व्यादितवक्त्राऽऽलोकितलोकालोकचतुर्दशलोकालिम् ।
लोकत्रयपुरमूलस्तम्भं लोकालोकमनालोकं
लोकेशं परमेशं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ २ ॥

" अरे ! माती खातोस काय तूं ? " असें म्हणणारी यशोदा माता, आतां आपल्याला मार देईल असें समजून बालस्वभावाला अनुरूप अशा भीतीनें तो घाबरला आहे. " आई ! मीं माती खाल्ली नाहीं, पहा माझें तोंड " असें म्हणून आऽऽ केला असतां ज्याच्या मुखांत यशोदेला लोकालोक पर्वतासह चौदा भुवनांची मालिका दिसली, जो त्रैलोक्याचा मूळ आधारस्तंभ आहे, सर्व लोकांना जो प्रकाशित करतो पण ज्याला कोणीहि प्रकाशित करूं शकत नाहीं, अर्थात् सर्व प्रकाशक व स्वयप्रकाश असलेल्या त्या सर्व लोकाधिपतीला, महान् सत्ताधारी आणि निरतिशयानद स्वरूप असलेल्या गोविंदाला प्रणाम करा.

त्रैविष्टपरिपुवीरघ्नं क्षितिभारघ्नं भवरोगघ्नं
कैवल्यं नवनीताहारमनाहारं भुवनाहारम् ।
वैमल्यस्फुटचेतोवृत्तिविशेषाभासमनाभासं
शैवं केवलशान्तं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ३ ॥

देवाचें शत्रुत्व करणाऱ्या बड्याबड्या दैत्यांचा ज्यानें नाश केला आहे, जो पृथ्वीचा भार दूर करतो व भवरोगाचा म्हणजे संसारदु:खाचा नाश करतो, जो मोक्षपदस्वरूप आहे, ज्याला तत्त्वतः कांहीं खायला लागत नाहीं पण गोकुळ-वृंदावनामध्यें भक्तांनीं व गोपींनीं दिलेलें लोणी प्रेमानें खातो, न दिलें तर तें चोरूनहि खातो व प्रलयकाळीं सर्व विश्वाचेंहि भक्षण करतो. तत्त्वतः तो कोठेंच प्रतिबिंबित होत नाहीं, पण सत्त्वगुणाच्या उत्कर्षानें स्वच्छ झालेल्या चित्तवृत्तींमध्यें मात्र विशेषकरून ज्याचें प्रतिबिंब प्रतीतीस येतें, अशा त्या केवळ शांतस्वरूप असलेल्या मंगलमय परमानंदरूप गोविंदाला नमस्कार करा.

गोपालं भूलीलाविग्रहगोपालं कुलगोपालं
गोपीखेलनगोवर्धनधृतिलीलालालितगोपालम् ।
गोभिर्निगदितगोविन्दस्फुटनामानं बहुनामानं
गोधीगोचरदूरं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ४ ॥

पृथ्वीवर क्रीडा करण्याकरिता गोपालाचा देह धारण करून ज्यानें गोपाल वंशात जन्म घेतला आणि गाई राखल्या, गोपीजनामध्यें खेळणें, गोवर्धन पर्वत करांगुलीवर धारण करणें इत्यादि अनेक लीलानीं गोपालाचें ज्यानें लालन पालन केलें, वेदानीं अथवा गाईनीं देखील ' गोविंद गोविंद ' म्हणून ज्याच्या नामाचा स्पष्ट उच्चार केला, ज्याला अनेक नामें आहेत, जो वाणी आणि बुद्धि यांच्या विषयापासून दूर आहे, म्हणजे वाणीला साकल्यानें ज्याचें वर्णन करतां येत नाहीं व बुद्धीलाहि संपूर्णपणें ज्याचें आकलन होत नाहीं, अशा त्या परमानंदरूप गोविंदाला नमस्कार करा.

गोपीमण्डलगोष्ठीभेदं भेदावस्थमभेदाभं
शश्वद्गोखुरनिर्धूतोद्गतधूलीधूसरसौभाग्यम् ।
श्रद्धाभक्तिगृहीतानन्दमचिन्त्यं चिन्तितसद्भावं
चिन्तामणिमहिमानं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ५ ॥

गोपीसमुदायातील गोष्टीमध्यें विराजमान होणारा, जो तत्त्वतः अभिन्न स्वरूप म्हणजे एकरूप असूनहि भिन्नभिन्न अवस्था धारण करतो, अथवा ज्याच्या अनेक रूपातहि तत्त्ववेत्त्याना एकरूपतेची प्रतीति येते, वारंवार गाईंच्या खुरांच्या आघातानें वर उठणाऱ्या धुळीनें धूसरित म्हणजे धुळकट होण्यात जो आपल्याला उत्तम भाग्यवान् समजतो, अथवा गोरजानें धुळकट होण्यातहि ज्याचें सौंदर्य उठावदार दिसतें, श्रद्धा आणि भक्ति यांच्या साहाय्यानें ज्याचा आनंद ग्रहण करता येतो, अचिन्त्य म्हणजे चिंतन करण्यास अशक्य असूनहि योगीजन ज्याच्या सत्स्वरूपाचें चिंतन करतात, ज्याचा महिमा चिंतामणिसारखा आहे, अर्थात् जो भक्तांचे सकल मनोरथ पूर्ण करणारा आहे, त्या परमानंदरूप गोविंदाला तुम्ही प्रणाम करा.

स्नानव्याकुलयोषिद्वस्त्रमुपादायागमुपारूढं
व्यादित्सन्तीरथ दिग्वस्त्रा दातुमुपाकर्षन्तम् ।

निर्धूतद्वयशोकविमोहं बुद्धं बुद्धेरन्तरथं
सत्तामात्रशरीरं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ६ ॥

स्नानामध्यें व्यग्र असलेल्या गोपींचीं वस्त्रें घेऊन जो यमुनेच्या काठीं कदंबाच्या झाडावर जाऊन बसला। आपआपलीं वस्त्रें घेण्याकरितां उत्सुक झालेल्या त्या नग्न गोपींना वस्त्रें घेण्याकरितां पाण्यातून बाहेर यावयाला लावणारा, ज्याच्या स्मरणानें शोक आणि व्यामोह दोन्ही नाहींसे होतात, जो ज्ञानस्वरूप असून बुद्धीच्या आवर्दा आंत किंवा बुद्धीच्याहि पलीकडे राहातो केवळ सत्ता म्हणजे अस्तित्व हेंच ज्याचें शरीर आहे अशा त्या परमानंदरूप गोविंदाला वंदन करा.

कान्तं कारणकारणमादिमनादिं कालघनाभासं
कालिन्दीगतकालियशिरसि नृत्यन्तं सुविनृत्यन्तम् ।
कालं कालकलातीतं कलिताशेषं कलिदोषघ्नं
कालत्रयगतिहेतुं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ७ ॥

जो अत्यंत सुंदर आहे, विश्वाला कारण असलेल्या मूळ प्रकृतीचें किंवा पंचमहाभूतादिकांचेंहि जो कारण आहे, जो सर्वांचें मूळकारण आहे, पण ज्याचें मूळकारण कोणीच नाहीं, पाण्यानें भरलेल्या ढगाप्रमाणें ज्याची अंगकांति कृष्णवर्ण आहे, यमुनेच्या डोहामध्यें असलेल्या कालिय नागाच्या मस्तकावर नृत्य करणारा, अत्यंत कौशल्यानें नृत्य करणारा, जो कालस्वरूप असून कोणत्याहि कालखंडांत अंतर्भूत होत नाहीं, जो सर्वांना आपल्या स्वरूपांत सामावून घेतो किंवा सर्व विषयांचें आकलन करतो, ज्याच्या स्मरणानें संपूर्ण कलिदोष नाहींसे होतात किंवा जो कलियुगांतील दोषांचें निरसन करणारा आहे, तिन्ही काळांच्या गतीचें -- कालचक्राच्या गतीचें जो कारण आहे, त्या परमानंदरूप गोविंदाला प्रणाम करा.

वृन्दावनभुवि वृन्दारकगणवृन्दाराधित वन्देऽहं
कुन्दाभामलमन्दस्मेरसुधानन्दं सुहृदानन्दम् ।
वन्द्याशेषमहामुनिमानसवन्द्यानन्दपदद्वन्द्वं
वन्द्याशेषगुणाब्धिं प्रणमत गोविन्दं परमानन्दम् ॥ ८ ॥

वृंदावनाच्या परिसरात असंख्य देवगणांचे समुदाय आणि वृन्दा ( एक पतिव्रता व भक्त असलेली स्त्री ) यांच्याकडून ज्याची आराधना केली गेलेली आहे, अशा हे श्रीकृष्णा ! मी तुला वंदन करतों. कुंदपुष्पाच्या कांतीप्रमाणें स्वच्छ असलेल्या ज्याच्या मंदहास्यामध्यें अमृतासारखा आनंद भरलेला आहे, जो मित्रजनाला आनंद देतो, सर्व जगाला वंद्य असलेल्या नारदादि महामुनींच्याहि मनाला, ज्याचे आनंददायक चरणयुगल वंदनीय वाटतात, आणि वंदनीय तसेंच आदरणीय अशा सर्व गुणांचा जो सागर आहे, अशा त्या परमानंदस्वरूप गोविंदाला वंदन करा.

गोविन्दाष्टकमेतदधीते गोविन्दार्पितचेता यो
गोविन्दाच्युत माधव विष्णो गोकुलनायक कृष्णेति ।
गोविन्दाङ्घ्रिसरोजध्यानसुधाजलधौतसमस्ताघो
गोविन्दं परमानन्दामृतमन्तस्थं स समभ्येति ॥ ९ ॥

या स्तोत्रात वर्णन केल्याप्रमाणें सर्व गुणांनीं संपन्न असलेल्या गोविंदाच्या ठिकाणीं आपलें मन लावून जो कोणी या गोविंदाष्टकाचा पाठ करील, गोविंदा ! अच्युता ! माधवा ! विष्णो ! गोकुलनायका श्रीकृष्णा ! अशा रीतीनें म्हणत राहील, त्याचीं सर्व पापें गोविंदाच्या चरणकमलाच्या ध्यानरूपी – अमृताप्रमाणें स्वच्छ असलेल्या जलानें धुवून निघतील. पार नाहींशीं होतील. आणि तो स्वतः च्याच अंतःकरणांत विराजमान असलेल्या सर्वश्रेष्ठ आनंदरूप अमृतमय अशा गोविंदाला प्राप्त होईल. अंतःस्थ नारायणाचा त्याला साक्षात्कार होईल.

• •

# अच्युताष्टकम्

## ( १ )

[ या स्तोत्राचा आरंभच 'अच्युताच्युत' या शब्दानीं केलेला आहे. अच्युत म्हणजे आपल्या स्वतःसिद्ध सच्चिदानंद स्वरूपापासून कधींहि भ्रष्ट न होणारा परिपूर्ण परमात्मा स्वस्वरूपापासून च्युत न होताहि आपल्या मायेनें परोपकारार्थ राम, कृष्ण, शिव, विष्णु इत्यादि अनेक रूपें त्यानें धारण केलीं. तत्त्वतः त्याला नाव नाहीं, तथापि भक्तजनांच्या कल्याणाकरिता अनेक नावें धारण

केली. शेवटच्या श्लोकांत म्हटल्याप्रमाणें आचार्य आपल्या या 'रमणीय' अष्टकांत परमेश्वराजवळ सर्व दुःखांचा निरास करण्याची प्रार्थना करीत आहेत. हें स्तोत्र खरोखरच रमणीय आहे. ]

अच्युताच्युत हरे परमात्मन्
राम कृष्ण पुरुषोत्तम विष्णो ।
वासुदेव भगवन्ननिरुद्ध
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ १ ॥

हे अच्युता ! अच्युता ! तुम्ही सर्व दुःखांचें हरण करतां म्हणून तुम्हाला हरि म्हणतात. तुम्ही सर्व जीवात्म्यांचे अधिपति आहां म्हणून तुम्हाला परमात्मा म्हणतात. सर्व योगीजनांना तुम्ही रमवितां अथवा भक्तजनांचें चित्त तुमच्या स्वरूपीं रमतें म्हणूनहि तुम्हाला राम असें म्हणतात. 'कृष्' म्हणजे सत्ता आणि 'ण' म्हणजे आनंद अशा अर्थानें तुम्ही सदानन्दस्वरूप आहां म्हणून तुम्हाला कृष्ण असें म्हणतात. अथवा जवसाच्या फुलाप्रमाणें, किंवा दूर्वांच्या अंकुराप्रमाणें, तसेंच नीलकमलाप्रमाणें, किंवा पाण्यानें भरलेल्या मेघाप्रमाणें अथवा इंद्रनील रत्नाप्रमाणें तुमची अंगकांति असल्यामुळें तुम्हाला कृष्ण असें म्हणतात. इतर जीवांप्रमाणें तुमच्या ज्ञानशक्तीचा किंवा क्रियाशक्तीचा कधींहि ऱ्हास किंवा लोप होत नसल्यामुळें तुम्हाला उत्तम पुरुष अथवा पुरुषोत्तम म्हणतात. सर्व विश्वाला तुम्ही व्यापलेलें अथवा वेष्टिलेलें असल्यामुळें तुम्हाला विष्णु असें म्हणतात. सर्व विश्वाचें तुमच्या स्वरूपांत वास्तव्य असल्यामुळें व सर्व विश्वांत तुमचें वास्तव्य असल्यामुळें तुम्हाला 'वासु' आणि तुम्ही स्वयंप्रकाश ददीप्यमान असल्यमुळें 'देव' मिळून तुम्हाला वासुदेव असें नाव पडलें !, किंवा वसुदेवाच्या पोटीं तुम्ही अवतार घेतला म्हणूनहि तुम्हाला वासुदेव म्हणतात. तुम्ही षड्गुणैश्वर्यांनीं संपन्न असल्यामुळें तुम्हाला भगवान् म्हणतात. ऐश्वर्य, धर्म, यश, श्री, ज्ञान आणि वैराग्य यांच्या पूर्णतेला षड्गुणैश्वर्य म्हणतात. देवा ! ते तुमच्याजवळ आहे म्हणून तुम्ही भगवान् आहां. कधीं शत्रूकडून तुमचा निरोध म्हणजे पराभव होत नाहीं म्हणून तुम्हाला अनिरुद्ध असें म्हणतात. समुद्रमंथनाच्या वेळीं वर आलेल्या श्रीनें म्हणजे लक्ष्मीनें तुम्हालाच वरलें म्हणून तुम्ही श्रीपति आहां. अथवा श्री म्हणजे पराशक्ति

योगमाया ती तुमच्याच ठिकाणी असल्यामुळें तुम्हाला श्रीपति म्हणतात हे परमेश्वरा! आपण माझ्या सर्व दु खाचा निरास करा

विश्वमङ्गल विभो जगदीश
नन्दनन्दन नृसिंह नरेन्द्र ।
मुक्तिदायक मुकुन्द मुरारे
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ २ ॥

हे परमेश्वरा! आपल्यामुळेंच त्रैलोक्याचे—विश्वाचें मगल म्हणजे कल्याण होत आहे म्हणून विश्वमगल हें तुमचें यथार्थ नाव आहे विविधरूपानें तुम्ही नटता म्हणून तुम्हाला विभु असें म्हणतात तुम्ही सर्व जगाचे स्वामी आहा नदाच्या घरीं पुत्ररूपानें राहून त्याला तुम्ही आनदविलें म्हणून तुम्ही नदनदनहि आहा भक्तश्रेष्ठ प्रल्हादाकरिता तुम्ही नरसिंहाच्या रूपानें अवतरला सर्व जावाचे तुम्ही अधिपति आहा म्हणून तुम्हाला नरेंद्र असें म्हणतात आपण मुक्ति देणारे आहा म्हणूनच आपणास मुकुद असेंहि म्हणतात मुर नावाच्या दैत्याचा तुम्ही नाश केला म्हणून तुम्हाला मुरारि असें नाव पडलें हे श्रीपते! माझ्या सर्व दु खाचा निरास करा

रामचन्द्र रघुनायक देव
दीननाथ दुरितक्षयकारिन् ।
यादवेन्द्र यदुभूषण यज्ञ
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ३ ॥

हे परमेश्वरा! आपण भक्ताना रमविणारे व चद्राप्रमाणें आल्हाद देणारे आहा म्हणून आपणास रामचद्र म्हणतात रघुराजाच्या घराण्यात आपण श्रेष्ठ आहा म्हणून आपणास रघुनायक हें नाव आहे आपण स्वयप्रकाश आहा दीनाचे नाथ म्हणजे सरक्षक आहा, भक्ताच्या पापाचा नाश करता सर्व यादवामध्यें आपण श्रेष्ठ आहा यदुवशाचें भूषण आहा आपण यज्ञस्वरूप आहा परमेश्वरा! आपण माझ्या सर्व दु खाचा नाश करा

देवकीतनय दुःखदवाग्ने
राधिकारमण रम्य सुमूर्ते ।

दुःखमोचन दयार्णव नाथ
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ४ ॥

हे प्रभो देवकीनंदना ! आपण सर्व दुःखांना जाळून भस्म करणारे प्रत्यक्ष दावानल आहां. राधेच्या अंतःकरणाला रमण्याचें एकमेव अधिष्ठान आहां. परम रमणीय आहां. आपली मूर्ति मोठी सुंदर आहे. आपण भक्तांना सर्व दुःखांतून सोडवितां. दयेचे सागर आहां ! जगाचें आपण संरक्षक आहां, म्हणून आपणास नाथ म्हणतात. हे श्रीपते ! परमेश्वरा ! आपण माझीं सर्व दुःखें नाहीशीं करा.

गोपिकावदनचन्द्रचकोर
नित्य निर्गुण निरञ्जन जिष्णो ।
पूर्णरूप जय शङ्कर शर्व
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ५ ॥

चकोरपक्ष्याला ज्याप्रमाणें चंद्राकडे पाहून आनंद होतो त्याचप्रमाणें तुम्हालाहि आपल्या अनन्यभक्त असलेल्या गोपीजनांच्या मुखचंद्राकडे पाहून आनंद होतो. परमेश्वरा ! तुम्ही नित्य, निर्गुण, निरंजन आणि विश्वविजयी आहां. तुम्हीच सर्व लोकांचें कल्याण करतां म्हणून तुम्हाला शंकर असें म्हणतात. तुम्हाला शर्वहि म्हणतात. कारण तुम्ही प्रलयकालीं सर्व विश्वाचा आपल्या स्वरूपांत लय करतां अथवा भक्तजनांच्या दुःखाचा तुमच्या कृपेनें लय होतो म्हणूनहि तुम्हाला शर्व असें म्हणतात. हे परमेश्वरा ! माझ्या सर्व दुःखाचा निरास करा.

गोकुलेश गिरिधारण धीर
यामुनाच्छतटखेलन वीर ।
नारदादिमुनिवन्दितपाद
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ६ ॥

हे गोकुलनाथ ! तुम्ही गोवर्धन पर्वत हातावर उचलून धरला. आपण मोठे धीर म्हणजे बुद्धिमान् अथवा गंभीर आहां. यमुनेच्या काठीं स्वच्छ वाळवटांत खेळणें आपल्याला फार आवडतें. आपण मोठे वीर आहां. नारदादि ऋषींनी आपल्या चरणीं वंदन केलें आहे. हे श्रीपते, माझीं सर्व दुःखें हरण करा.

द्वारकाधिप दुरन्तगुणाब्धे
प्राणनाथ परिपूर्ण भवारे ।
ज्ञानगम्य गुणसागर ब्रह्मन्
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ७ ॥

हे द्वारकानाथ ! सागराप्रमाणें अनंत व अपार असलेल्या आपल्या गुणांचा अंत लागणें कठीण आहे, नव्हे अशक्यच आहे आपण आमचे प्राणनाथ आहां परिपूर्ण आहां भवसागराचे शत्रु म्हणजे विनाशक आहां हे ब्रह्मस्वरूपा श्रीपते ! आपण गुणांचे सागर आहां केवळ गुरूच्या कृपेनें व उपनिषदांच्या अभ्यासानें प्राप्त होणाऱ्या ज्ञानानेंच आपल्या स्वरूपाची कल्पना येऊं शकते हे परमेश्वरा, माझ्या सर्व दु खाचें निरसन करा

दुष्टनिर्दलन देव दयालो
पद्मनाभ धरणीधरधारिन् ।
रावणान्तक रमेश मुरारे
श्रीपते शमय दुःखमशेषम् ॥ ८ ॥

हे दुष्टांचें निर्दालन करणाऱ्या कृपाळु देवा ! ब्रह्मदेवाचें आसन असलेलें कमल आपल्या नाभिस्थानापासून प्रकट झालें म्हणून आपणास पद्मनाभ असें म्हणतात पृथ्वीचा आधार असलेला धरणीधर म्हणजे शेष त्याचाहि आपण आधार आहां रामाचा अवतार घेऊन आपण रावणाचा वध केला हे रमेशा, मुरारे, श्रीपते ! माझीं सर्व दु खें दूर कर

अच्युताष्टकमिदं रमणीयं
निर्मितं भवभयं विनिहन्तुम् ।
यः पठेद्विषयवृत्तिनिवृत्ति-
र्जन्मदुःखमखिलं स जहाति ॥ ९ ॥

संसारभयाचें निरसन करण्याकरितां हें अत्यंत रमणीय असें अच्युताचें अष्टक निर्माण केलें आहे विषयवृत्तींना बाजूला सारून भक्तियुक्त अंत करणानें जो कोणी या स्तोत्राचें पठण करील त्याचीं संपूर्ण जन्म दु खें नाहींशीं होतील

• •

# अच्युताष्टकम्

## ( २ )

[ या अच्युताष्टकाचें वृत्त मोठें सुंदर आहे. स्वतः आचार्यांनींच 'वृत्ततः सुन्दरम्' असें याचें वर्णन केलेलें आहे. याचा पहिला श्लोक तर प्राय सर्वतो मुखीं आहे. बाकीच्या श्लोकानींहि श्रीहरीची उत्तम स्तुति केलेली आहे. राम आणि कृष्ण हीं रूपें अवतारभेदामुळें भिन्न असलीं तरी त्यामध्यें तत्वतः एकरूपता आहे. एकाच स्तोत्रांत केलेलें दोन्ही रूपाचें वर्णन आचार्यांच्या अभेदभक्तीचें सुंदर गमक आहे. प्रेमपूर्वक या स्तोत्राचा पाठ केल्यास श्रीहरि सत्वर वश होईल अशी आचार्यांची ग्वाही आहे. ]

अच्युतं केशवं रामनारायणं
कृष्णदामोदरं वासुदेवं हरिम् ।
श्रीधरं माधवं गोपिकावल्लभं
जानकीनायकं रामचन्द्रं भजे ॥ १ ॥

हे अच्युता ! तुम्ही कितीहि रूपें धारण केलीं तरी आपल्या मूळ सच्चिदानंद स्वरूपापासून कधींहि च्युत म्हणजे भ्रष्ट होत नाहीं. तुमचे केश मोठे सुंदर काळे व कुरळे आहेत म्हणून तुम्हाला केशव म्हणतात. अथवा केशि नावाच्या दैत्याचा तुम्ही वध केला म्हणूनहि तुम्हाला केशव म्हणतात. किंवा क म्हणजे ब्रह्मदेव, अ म्हणजे विष्णु आणि ईश म्हणजे महादेव हे तिघेहि ज्याच्या वश म्हणजे अधीन राहून आपआपलें कार्य करतात तो परमात्मा तोहि तुम्हीच आहां. तुम्हीच राम आहां. तुम्हालाच नारायण म्हणतात. कारण 'नारा' म्हणजे जलसमूह, 'अयन' म्हणजे आश्रयस्थान. जलसमूह म्हणजे क्षीरसागर हा तुमचें आश्रयस्थान आहे. श्रीहरि नेहमीं जलसमूहांत — क्षीरसागरांत रहातात हें प्रसिद्धच आहे. अथवा 'नार' म्हणजे यच्चयावत् प्राण्यांचा समुदाय. त्या सर्वांमध्यें परमेश्वरा तुम्ही वास्तव्य करतां. सर्व प्राणिसमूह तुमचें 'अयन' म्हणजे वसतिस्थान आहे म्हणून तुम्हाला नारायण असें म्हणतात. श्रीकृष्णा ! यशोदामातेनें तुम्ही फार खोड्या करतां म्हणून तुमच्या पोटाला दावें गुंडाळून तुम्हाला उखळीस बांधून ठेवलें होतें तेव्हांपासून दामोदर हें तुमचें नांव पडलें !

वासुदेव हरि श्रीधर माधव ही तुमचींच नावें आहेत तुम्ही गोपीजनाचे अत्यन आवडते आहा तुम्हींच जानकीनायक प्रभु रामचंद्र आहा मी तुम्हाला मन पूर्वक भजत आहें मी तुमच्या चरणीं शरण आलों आहें

अच्युतं केशवं सत्यभामाधवं
माधवं श्रीधरं राधिकाराधितम् ।
इन्दिरामन्दिरं चेतसा सुन्दरं
देवकीनन्दनं नन्दजं सन्दधे ॥ २ ॥

अच्युत, केशव, सत्यभामेचा पति, माधव म्हणजे लक्ष्मीचा पति अथवा मधुकुलामध्यें जन्मला आलेला श्रीधर परमेश्वरा ! हीं सर्व तुमचींच नावें आहेत राधिकेनें अनन्यप्रेमानें तुमची आराधना केलेली आहे तुम्ही लक्ष्मीचें निवासस्थान आहा मनानें अत्यत सुदर म्हणजे उदार आहा, हे देवकीपुत्रा नंदनंदना ! मी तुम्हाला अंत:करणपूर्वक भजत आहें मी तुमचें मन पूर्वक स्मरण करीत आहें

विष्णवे जिष्णवे शङ्खिने चक्रिणे
रुक्मिणीरागिणे जानकीजानये ।
वल्लवीवल्लभायार्चितायात्मने
कंसविध्वंसिने वंशिने ते नमः ॥ ३ ॥

विष्णु म्हणजे सर्वव्यापी, जिष्णु म्हणजे सर्वविजयी शंख आणि चक्र धारण करणारा रुक्मिणीवर अत्यत प्रेम करणारा अथवा रुक्मिणीचें ज्याच्यावर अत्यत प्रेम आहे असा जानकीकांत सीतापति, गोपीजनाचा वल्लभ म्हणजे अत्यत आवडता सर्वांनीं पूजिलेला व सर्वांचा आत्मा असलेला, कसाचा विध्वस करणारा मुरलीधर भगवान् श्रीकृष्ण असा जो तू, हे परमेश्वरा ! मी तुला नमस्कार करीत आहें

कृष्ण गोविन्द हे राम नारायण
श्रीपते वासुदेवाजित श्रीनिधे ।
अच्युतानन्त हे माधवाधोक्षज
द्वारकानायक द्रौपदीरक्षक ॥ ४ ॥

हे कृष्णा ! रसातळीं बुडालेल्या पृथ्वीचा उद्धार करून तू ती लोकांना प्राप्त करून दिलीस म्हणून तुला गोविंद म्हणतात वृंदावनामध्यें चुकलेल्या गाई आपल्या मित्रांना दिल्यास म्हणूनहि तुला गोविंद म्हणतात गो म्हणजे इंद्रियें अथवा वाणी यांच्यावर नियंत्रण करणारा किंवा त्यांची प्राप्ति करून देणारा म्हणूनहि तू गोविंद या नावानें ओळखला जातोस हे गोविंदा रामा नारायणा ! हे लक्ष्मीपते वासुदेवा ! तू अजिंक्य आहेस म्हणून तुला अजित म्हणतात तू सकल सौंदर्याचें अथवा सर्व वैभवाचें निधान आहेस हे अच्युता ! हे अनंता ! हे माधवा ! तू अधोक्षज आहेस म्हणजे तुझें ज्ञान इंद्रियांना होऊं शकत नाहीं 'अक्षज' म्हणजे इंद्रियांनी होणारें ज्ञान हें 'अध' म्हणजे तुझ्यापेक्षा खालीं आहे तू त्याच्या पलीकडे आहेस म्हणून तुला अधोक्षज म्हणतात हे अधोक्षजा ! द्वारकाधीशा ! संकटसमयीं द्रौपदीचें रक्षण करणाऱ्या श्रीकृष्णा ! मी तुला नमस्कार करतों माझ्यावर कृपा कर

राक्षसक्षोभितः सीतया शोभितो
दण्डकारण्यभूपुण्यताकारणः ।
लक्ष्मणेनान्वितो वानरैः सेवितोऽ
गस्त्यसंपूजितो राघवः पातु माम् ॥ ५ ॥

हे प्रभो रामचंद्रा, धर्ममर्यादाचें व नीतिन्यायाचें उल्लंघन करून रावणादि राक्षसांनीं तुम्हाला प्रक्षुब्ध केलें जानकीच्या सान्निध्यात तुम्ही फारच सुंदर दिसता तुम्ही आपल्या चरणस्पर्शानें दंडकारण्याच्या भूमीला पावन केलेलें आहे तुमच्यामुळें दंडकारण्य पवित्र झालेलें आहे सदासर्वकाळ लक्ष्मण तुमच्या सान्निध्यात उभा आहे वानरांनी तुमची सेवा केलेली आहे अगस्ति महर्षींनी तुमची आराधना केलेली आहे हे परमेश्वरा, तुम्ही माझें रक्षण करा

धेनुकारिष्टकोऽनिष्टकृद् द्वेषिणां
केशिहा कंसहृद्वंशिकावादकः ।
पूतनाकोपकः सूरजाखेलनो
बालगोपालकः पातु मां सर्वदा ॥ ६ ॥

आनंदकंदा श्रीकृष्णा ! तुम्हीं अनेक शत्रूंचा नाश केला धेनुक, अरिष्ट इत्यादि दुष्टांचें अनिष्ट म्हणजे मरण घडवून आणलें केशि दैत्याचा वध केला

कंसाला मारलें. पूतनेच्या अंतःकरणांत कोप निर्माण केला. अर्थात् पूतना तुमच्यावर रागावली व तुमचा नाश करण्याच्या हेतूनें तुमच्याकडे आली पण तुम्ही तिला मातेप्रमाणें उत्तम गति दिली! बांसरी वाजवीत यमुनेच्या काठीं आपण खूप खेळला. हे बालमुकुंदा! गोपाळकृष्णा! तुम्ही माझें रक्षण करा.

> विद्युदुद्योतवत्प्रस्फुरद्वाससं
> प्रावृडम्भोदवत्प्रोल्लसद्विग्रहम् ।
> वन्यया मालया शोभितोरःस्थलं
> लोहिताङ्घ्रिद्वयं वारिजाक्षं भजे ॥ ७ ॥

तुमच्या अंगावरील पीतांबर विद्युल्लतेच्या प्रकाशाप्रमाणें झळकत आहे. तुमचें शरीर वर्षाऋतूंतील मेघाप्रमाणें श्यामवर्णानें विलसत आहे. वक्षःस्थलांवर वनमाला शोभत आहे. दोन्ही चरण आरक्तवर्ण आहेत. नेत्र कमलासारखे विशाल आणि सुंदर आहेत. हे आनंदकंदा श्रीकृष्णा! मी भक्तिपूर्वक तुमचा आश्रय करीत आहें. तुम्ही माझें रक्षण करा.

> कुञ्चितैः कुन्तलैर्भ्राजमानाननं
> रत्नमौलिं लसत्कुण्डलं गण्डयोः ।
> हारकेयूरकं कङ्कणप्रोज्ज्वलं
> किङ्किणीमञ्जुलं श्यामलं तं भजे ॥ ८ ॥

कुरळ्या केशांनी ज्याचें मुख अत्यंत शोभत आहे, मस्तकावर रत्नजडित मुकुट शोभत आहे, कानांतील कुंडलांचीं किरणें गालांवर झळकत आहेत, गळ्यामध्यें मोत्यांचा कंठा आणि दंडावर बाजुबंद, वाक्या शोभत आहेत, हातामध्यें सुवर्णकंकणें — कडीतोडे शोभत आहेत, करगोट्यांतील आणि पैंजणांतील घुंगराचा मंजुळ नाद होत असल्यामुळें, जो फारच सुंदर दिसत आहे, त्या परम सुकुमार श्यामवर्ण नंदकुमाराला मी अगदीं मनापासून भजत आहें.

> अच्युतस्याष्टकं यः पठेदिष्टदं
> प्रेमतः प्रत्यहं पूरुषः सस्पृहम् ।
> वृत्ततः सुन्दरं कर्तृविश्वंभरं
> तस्य वश्यो हरिर्जायते सत्वरम् ॥ ९ ॥

प्रेमपूर्वक श्रद्धायुक्त अंतःकरणानें जो कोणी या अच्युताष्टकाचें रोज पठण करील त्याला हें अष्टक इष्ट फल देईल. वृत्तानें सुंदर असलेल्या या अष्टकाच्या पाठानें, कर्तृ म्हणजे जगत्कर्ता विश्वंभर ज्यामध्यें वर्णिला आहे अशा या अष्टकाच्या पाठानें, कांहीं पुस्तकांत 'वेधविश्वभरं' असा पाठ आहे तेथें विश्वंभर ज्याच्यामुळें जाणला जाऊं शकतो असा अर्थ करावा. अशा या अष्टकाच्या पाठानें जगत्कर्ता विश्वंभर भगवान् श्रीहरि लवकर वश होईल.

• • •

## पाण्डुरङ्गाष्टकम्

[ ऐतिहासिक दृष्टया पंढरपूरचा महिमा साधारणपणें अकराव्या शतकापासून दृष्टीस पडतो. तथापि आद्य शंकराचार्य आपल्या दिग्विजय यात्रेच्या वेळीं महाराष्ट्रांतील या सुप्रसिद्ध क्षेत्रांत गेले होते असा उल्लेख चिद्विलासयतींच्या शंकरविजय ग्रंथांत आढळतो. यावरून आचार्यांच्या काळांतहि पंढरपूर आपल्या विशिष्टवैभवानें नटलेलें होतें, असें दिसतें. आचार्यांनीं केलेल्या या पांडुरंगाष्टक स्तोत्राची भाषा सरळ, सुगम, सालंकृत व चटकन् मनाची पकड घेणारी आहे. वाणीविलास प्रेसच्या शांकरग्रंथावलींतहि या स्तोत्राचा समावेश आहे. हें स्तोत्र आद्य शंकराचार्यांचेंच असावें असें वाटतें. कांहीं असो; स्तोत्राची भाषा प्रासादिक, अर्थ सुंदर व विषय महाराष्ट्राची आवडती देवता भगवान् पांडुरंग, म्हणून हें स्तोत्र वाचकांपुढें ठेवलें जात आहे.

ज्यांत शुभ्रवर्णाची व कृष्णवर्णाची छटा संमिश्र झालेली दिसते त्यास 'पांडुर' असें म्हणतात. गाईच्या खुरांनीं उधळलेली पांढरी धूळ श्रीकृष्णाच्या अंगांवर बसली व श्रीकृष्णाचा देह पांडुर दिसू लागला म्हणून श्रीकृष्णाला पांडुरंग असें नांव पडलें. तोच पांडुरंग पुंडरीकासाठीं पंढरीस आला व कमरेवर हात ठेवून विटेवर उभा राहिला. त्याचें आचार्यांनीं किती सुंदर वर्णन केलेलें आहे पहा ! ]

महायोगपीठे तटे भीमरथ्या
वरं पुण्डरीकाय दातुं मुनीन्द्रैः ।
समागत्य तिष्ठन्तमानन्दकन्दं
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ १ ॥

भीमेच्या काठीं महायोगपीठ म्हणजे महायोगाचें अधिष्ठान असलेल्या पंढरी क्षेत्रात, पुंडलीकाला वर देण्याकरिता व्यासनारदादि मह्यात्रह्या ऋषींसह जो येऊन राहिला आहे, त्या आनंदकंद परब्रह्मरूप पांडुरंगाला मी भजत आहें

तडिद्वाससं नीलमेघावभासं
रमामन्दिरं सुन्दरं चित्प्रकाशम्
वरं त्विष्टकायां समन्यस्तपादं
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ २ ॥

ज्याचें वस्त्र विद्युल्लतेप्रमाणें पीतवर्ण दिसत आहे, अंगकांति नीलवर्ण असलेल्या मेघाप्रमाणें शोभत आहे, जो लक्ष्मीचें निवासस्थान आहे जो परमसुंदर चित्स्वरूप व प्रकाशस्वरूप आहे सर्वश्रेष्ठ व जणु काय भक्तांना दर्शन देण्याकरिता विटेवर सारखीं पावलें ठेवून उभा आहे, अशा त्या परब्रह्मरूपी पांडुरंगाला मी शरण आलों आहें

प्रमाणं भवाब्धेरिदं मामकानां
नितम्बः कराभ्यां धृतो येन तस्मात् ।
विधातुर्वसत्यै धृतो नाभिकोशः
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ३ ॥

पांडुरंगानें कमरेवर हात का ठेवले आहेत ? असा कोणीं प्रश्न केल्यास त्याला आचार्य उत्तर देतात – मला अनन्यप्रेमानें शरण येणाऱ्या माझ्या भक्तांना भवसागर हा फक्त कमरेइतकाच आहे तो सहज सुलभ रीतीनें पार करता येतो हें सांगण्याकरिताच पांडुरंगानें कमरेवर हात ठेवले आहेत आणि बोटें नाभिस्थानाकडे वळविलीं आहेत, तीं का ? तर आचार्य उत्तर देतात – माझ्या भक्तांना ब्रह्मदेवाचा सत्यलोक हा कमरेपासून नाभिस्थान जितकें उंच आहे त्यापेक्षा अधिक उंच नाहीं, हें दाखविण्याकरिताच पांडुरंगानें आपलीं बोटें कमरेपासून नाभिस्थानाकडे वळविलीं आहेत त्या परब्रह्मरूपी पांडुरंगाला मी अनन्यभावानें शरण आलों आहें

स्फुरत्कौस्तुभालङ्कृतं कण्ठदेशे
श्रिया जुष्टकेयूरकं श्रीनिवासम् ।

शिवं शान्तमीड्यं वरं लोकपालं
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ४ ॥

कंठप्रदेशीं शोभणाऱ्या देदीप्यमान अशा कौस्तुभ रत्नानें जो अलंकृत झालेला आहे, ज्याच्या भुजप्रदेशावर केयूर म्हणजे बाजुबंद शोभत आहेत, ज्याच्या सान्निध्यांत लक्ष्मी नित्य वास्तव्य करीत आहे, जो सर्व लोकांचा पालनकर्ता आहे, अशा त्या सर्वश्रेष्ठ परमशांत मंगलमय शिवस्वरूप व स्तुति करण्याला योग्य असलेल्या परब्रह्मरूप पांडुरंगाला मी भक्तिपूर्वक भजत आहें.

शरच्चन्द्रबिम्बाननं चारुहासं
लसत्कुण्डलाक्रान्तगण्डस्थलान्तम् ।
जपारागबिम्बाधरं कञ्जनेत्रं
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ५ ॥

ज्याचें मुख शरदृतूंतील चंद्रबिंबाप्रमाणें अत्यंत रमणीय दिसत आहे, मुखावर सुंदर हास्य विलसत आहे, कानांमध्यें कुंडलें शोभत आहेत, त्या कुंडलांची कांति गंडस्थळावर गालांवर झळकत आहे, जास्वंदीच्या फुलाप्रमाणें ज्याचे ओठ आरक्तवर्ण, डोळे कमळाप्रमाणें विशाल आणि सुंदर, अशा त्या परब्रह्मरूपी पांडुरंगाला मी प्रेमपूर्वक नमस्कार करतों. त्याचा मी अनन्यभावानें आश्रय करीत आहे.

किरीटोज्ज्वलत्सर्वदिक्प्रान्तभागं
सुरैरर्चितं दिव्यरत्नैरनर्घैः ।
त्रिभङ्गाकृतिं बर्हमाल्यावतंसं
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ६ ॥

मस्तकांवर विराजमान असलेल्या मुकुटांतील रत्नांच्या कांतीनें भुवन-भोंवतालच्या सर्व दिशा उजाळल्यासारख्या दिसत आहेत, बहुमोलाचीं दिव्य रत्नें अर्पण करून देवांनीं ज्याची पूजा केली आहे, कृष्णस्वरूपानें तीन ठिकाणीं (पाय, कंबर व मान) वांकडा होऊन जो उभा आहे, गळ्यांत वनमाला व मस्तकावर मोराच्या पिसांचा तुरा शोभत आहे, अशा त्या परब्रह्मस्वरूप पांडुरंगाला मी प्रेमानें भजतों व नमस्कार करतों.

विभुं वेणुनादं चरन्तं दुरन्तं
स्वयं लीलया गोपवेषं दधानम् ।
गवां वृन्दकानन्ददं चारुहासं
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ७ ॥

तो पाडुरग विभु म्हणजे सर्व विश्वाला व्यापणारा अथवा विश्वस्वरूपानें नटणारा आहे वेणु वाजवीत वृदावनात फिरतो त्याचा कोणालाहि अत लागत नाहीं तो स्वत लीलेनें गोपवेष धारण करणारा आहे गाईच्या समुदायाला तो आनद देतो गोपगोपीजनानाहि आनदवितो ज्याचें हास्य मोठें सुदर आहे अशा त्या परब्रह्मरूप पाडुरगाला मी नमस्कार करतों

अजं रुक्मिणीप्राणसंजीवनं तं
परं धाम कैवल्यमेकं तुरीयम् ।
प्रसन्नं प्रपन्नार्तिहं देवदेवं
परब्रह्मलिङ्गं भजे पाण्डुरङ्गम् ॥ ८ ॥

अज म्हणजे ज्याला जन्म नाहीं असा रुक्मिणीचा प्राणाधार भक्ताचा परम विश्रामधाम शुद्ध एकमेवाद्वितीय जाग्रत् स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्था या पलीकडचा अथवा बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य या तिन्ही अवस्थाच्या पलीकडचा सदासर्वकाळ प्रसन्न आणि शरण आलेल्याचें दु ख हरण करणारा, देवाचा देव परब्रह्म स्वरूप जो पाडुरग भगवान् श्रीहरि, त्याचा मी अनन्यभावानें आश्रय करीत आहें त्याला माझा नमस्कार असो

स्तवं पाण्डुरङ्गस्य वै पुण्यदं ये
पठन्त्येकचित्तेन भक्त्या च नित्यम् ।
भवाम्भोनिधिं तेऽपि तीर्त्वाऽन्तकाले
हरेरालयं शाश्वतं प्राप्नुवन्ति ॥ ९ ॥

सच्चिदानदघन भगवान् पाडुरग त्याचें हें स्तोत्र अत्यत पुण्यकारक आहे जे कोणी एकाग्र चित्तानें प्रेमपूर्वक या स्तोत्राचें नित्य पठण करतील ते अतकाळीं भवसागराला सहज तरून जातील आणि त्याना नित्य अविनाशी आनदकद अशा परब्रह्मस्वरूप श्रीहरीच्या — पाडुरगाच्या शाश्वत स्वरूपाची प्राप्ति होईल

• •

# श्रीरामस्तोत्रम्

[ मर्यादापुरुषोत्तम हा शब्द उच्चारल्यावरोबर भगवान् श्रीरामचंद्र प्रभु यांचीच मूर्ति डोळ्यापुढें उभी रहाते आदर्श मानव कसा असतो हें दाखवावयाचें झाल्यास प्रभु रामचंद्राकडेच अंगुलिनिर्देश करावा लागतो सर्वस्वी लोककल्याणाकरिता झटणारा राजा पहावयाचा असल्यास रामाकडेच पहावें लागतें आदर्श लोककल्याणकारी राज्याला रामराज्य असें म्हणतात राम ज्यात नाहीं तें काय कामाचें ? आचार्यांनीहि रामचंद्रप्रभूचें या स्तोत्रात अत्यंत उत्तम वर्णन केलेलें आहे आपणहि आचार्यांच्याच शब्दानीं श्रीरामचंद्रप्रभूचें स्वरूप पाहू ]

विशुद्धं परं सच्चिदानन्दरूपं
गुणाधारमाधारहीनं वरेण्यम् ।
महान्तं विभान्तं गुहान्तं गुणान्तं
सुखान्तं स्वयं धाम रामं प्रपद्ये ॥ १ ॥

अत्यंत शुद्ध, सर्वांच्या पलीकडचा अनादि, सच्चिदानंदस्वरूप, सर्व गुणांचा आधार, स्वतःसिद्ध सर्वश्रेष्ठ महान् सर्व गुणांनीं शोभणारा, बुद्धि, गुण आणि सुख या सर्वांचें ज्याच्या स्वरूपात पर्यवसान झालेलें आहे, म्हणजे बुद्धीनें तेथेंच विश्रांत व्हावें, सर्व आदर्श गुण तेथेंच पहावेत आणि नित्य निरतिशय सुखाचा लाभहि तेथेंच घ्यावा, असा जो स्वयंप्रकाश भगवान् प्रभु रामचंद्र त्याला मी शरण आलों आहें

शिवं नित्यमेकं विभुं तारकाख्यं
सुखाकारमाकारशून्यं सुमान्यम् ।
महेशं कलेशं सुरेशं परेशं
नरेशं निरीशं महीशं प्रपद्ये ॥ २ ॥

सर्व लोकाचें कल्याण करणारा, नित्य म्हणजे अविनाशी, एकमेव अद्वितीय सर्वव्यापी तारकब्रह्म म्हणून ओळखला जाणारा, आनंद हाच ज्याचा आकार आहे, स्वयं निराकार, सर्वमान्य अथवा अत्यंत मान देण्याला योग्य सर्व कलांचा अधिपति, देवांचा नायक, महान् सत्ताधारी ज्याला कोणीहि ईश

म्हणजे सत्ताधारी नाहीं, पण तो मात्र सर्व लोकाचा ईश आहे, अशा त्या राजाला, राजाधिराज रामचद्रप्रभूला मी शरण आलों आहें

यदावर्णयत्कर्णमूलेऽन्तकाले
शिवो राम रामेति रामेति काश्याम् ।
तदेकं परं तारकब्रह्मरूपं
भजेऽहं भजेऽहं भजेऽहं भजेऽहम् ॥ ३ ॥

काशीमध्यें मरणसमयीं, भगवान् शंकर मुमूर्षु लोकाच्या कानात राम राम राम असा उपदेश करीत आलेले आहेत व अद्यापीहि करीत असतात तें एक तारक ब्रह्मस्वरूप परतत्त्व असलेल्या प्रभु रामचद्राला मी कायावाचामनेंकरून सर्वस्वी शरण आलों आहें

महारत्नपीठे शुभे कल्पमूले
सुखासीनमादित्यकोटिप्रकाशम् ।
सदा जानकीलक्ष्मणोपेतमेकं
सदा रामचन्द्रं भजेऽहं भजेऽहम् ॥ ४ ॥

कल्पवृक्षाखालीं अत्यत सुदर अशा रत्नजडित सिंहासनावर सुखानें विराजमान असलेल्या कोटि सूर्याप्रमाणें तेजानें झळकणाऱ्या आणि सदासर्वकाळ जानकी आणि लक्ष्मण यानीं युक्त असलेल्या प्रभु रामचद्राला मी सर्वकाळ भजत आहें मी त्याची सर्व काळ सेवा करीत आहें

क्वणद्रत्नमञ्जीरपादारविन्दं
लसन्मेखलाचारुपीताम्बराढ्यम् ।
महारत्नहारोल्लसत्कौस्तुभाङ्गं
नदच्चञ्चरीमञ्जरीलोलमालम् ॥ ५ ॥

मधुर नाद करणार तोरड्या पैंजण इत्यादि अलंकार ज्याच्या पायात शोभत आहेत रेशमी पीतांबर परिधान करून कमरेला रत्नजडित कमरपट्टाहि घातलेला शोभत आहे, कंठामध्यें कौस्तुभमणि व गळ्यामध्यें मूल्यवान् रत्नाचे हार शोभत आहेत, तुळशीमंजरीच्या माळा गळ्यात शोभत असून त्याच्या सुवासानें आकृष्ट झालेले भ्रमर ज्याच्या भोंवतालीं गुंजारव करीत आहेत, त्या प्रभु रामचद्राला मी नमस्कार करतों

लसच्चन्द्रिकास्मेरशोणाधराभं
समुद्यत्पतङ्गेन्दुकोटिप्रकाशम् ।
नमद्ब्रह्मरुद्रादिकोटीररत्न-
स्फुरत्कान्तिनीराजनाराधिताङ्घ्रिम् ॥ ६ ॥

शरदृतूंतील पौर्णिमेच्या चांदण्याप्रमाणें जो प्रसन्न आहे, ज्याचे ओठ आरक्तवर्ण आहेत, उदयाला येणाऱ्या कोटि सूर्यांच्या किंवा कोटि चंद्रांच्या प्रकाशाप्रमाणें ज्याची कांति झळकत आहे, नित्य नमस्कार करणाऱ्या ब्रह्मदेव, महादेव इत्यादि देवांच्या मुकुटांतील रत्नांच्या तेजानें व नीराजनानें ज्याच्या चरणकमलांची आराधना केली जात आहे, त्या प्रभु रामचंद्राला मी नमस्कार करतों.

पुरः प्राञ्जलीनाञ्जनेयादिभक्तान्
स्वचिन्मुद्रया भद्रया बोधयन्तम् ।
भजेऽहं भजेऽहं सदा रामचन्द्रं
त्वदन्यं न मन्ये न मन्ये न मन्ये ॥ ७ ॥

हात जोडून पुढें उभे असलेल्या मारुतिराय, सुग्रीव, बिभीषण इत्यादि भक्तांना आपल्या कल्याणकारक ज्ञानमुद्रेनें सदा बोध करणाऱ्या प्रभु रामचंद्रालाच मी भजत आहें. हे रामचंद्रा ! तुमच्याशिवाय दुसऱ्याला, मी कोणालाहि जाणीत नाहीं व मानीत नाहीं हें त्रिवार सांगतों.

यदा मत्समीपं कृतान्तः समेत्य
प्रचण्डप्रकोपैर्भटैर्भीषयेन्माम् ।
तदाविष्करोषि त्वदीयं स्वरूपं
सदापत्प्रणाशं सकोदण्डबाणम् ॥ ८ ॥

हे प्रभो रामचंद्रा ! ज्या वेळेला मृत्यु माझ्या जवळ येईल आणि मला आपल्या अत्यंत क्रूर व संतापी असलेल्या भयंकर दूतांकडून भीति दाखवूं लागेल त्या वेळीं तूं, भक्तजनांच्या संकटांचा सदासर्वकाळ नाश करण्याला उद्युक्त असलेल्या, धनुष्य व बाण धारण केलेल्या आपल्या स्वरूपाला प्रकट करशील ना ! अवश्य प्रकट कर आणि मला मृत्यूच्या पाशांतून सोडीव.

निजे मानसे मन्दिरे संनिधेहि
प्रसीद प्रसीद प्रभो रामचन्द्र ।
ससौमित्रिणा कैकयीनन्दनेन
स्वशक्त्याऽनु भक्त्या च संसेव्यमान ॥ ९ ॥

हे प्रभो रामचंद्रा ! लक्ष्मणासहवर्तमान कैकयीचा पुत्र भरत आणि तुमचीच स्वकीय शक्तिस्वरूप असलेली जगज्जननी जानकी भक्तियुक्त अंतःकरणानें तुमची नित्य सेवा करीत आहे. परमेश्वरा ! प्रसन्न व्हा. प्रसन्न व्हा आणि माझ्या मानस-मंदिरामध्यें निरंतर वास्तव्य करून मला कृतार्थ करा.

स्वभक्ताग्रगण्यैः कपीशैर्महीशै-
रनीकैरनेकैश्च राम प्रसीद ।
नमस्ते नमोऽस्त्वीश राम प्रसीद
प्रशाधि प्रशाधि प्रकाशं प्रभो माम् ॥ १० ॥

हे प्रभो रामचंद्रा ! तुमच्या भक्तांमध्यें अग्रगण्य असलेले नळ, नील सुग्रीव, हनुमंत इत्यादि कपिश्रेष्ठ वानरसेना आणि बिभीषणादि राजे यांच्यासह पुष्पक विमानांत सिंहासनावर विराजमान असलेले तुम्ही प्रसन्न व्हा. हे परमेश्वरा ! तुम्हांला मी वारंवार नमस्कार करीत आहें. प्रसन्न व्हा आणि मला ज्ञान वैराग्याचा उपदेश करा. अंतःकरणांतील अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करून मला प्रकाश द्या !

त्वमेवासि दैवं परं मे यदेकं
सुचैतन्यमेतत्त्वदन्यन्न मन्ये ।
यतोऽभूदमेयं वियद्वायुतेजो-
जलोर्व्यादिकार्यं चरं चाचरं च ॥ ११ ॥

हे रामा ! तुम्हींच माझें परमश्रेष्ठ दैवत आहां. हें विश्वव्यापि शुद्ध चैतन्य तुमच्याहून निराळें आहे असें मी मानीत नाहीं. तुम्हीच शुद्ध चैतन्यस्वरूप आहां. ज्याची मनानेंहि कल्पना करतां येत नाहीं असा हा अफाट चराचर विश्वप्रपंच आणि या भौतिक विश्वप्रपंचाला कारणीभूत असलेलीं पंचमहाभूतें ( पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश ) हीं सर्व तुमच्याचपासून उत्पन्न झालीं आहेत. प्रभो रामराया ! तुम्हांला मी नमस्कार करतों.

नमः सच्चिदानन्दरूपाय तस्मै
नमो देवदेवाय रामाय तुभ्यम् ।
नमो जानकीजीवितेशाय तुभ्यं
नमः पुण्डरीकायताक्षाय तुभ्यम् ॥ १२ ॥

हे देवाधिदेवा ! रामचंद्रा ! वेदांनीं प्रतिपादिलेलें जें सच्चिदानंद परब्रह्म, तेंच तुम्ही आहां. तुम्हाला नमस्कार असो. हे प्रभो ! तुम्ही जानकीच्या जीविताचे अधिपति आहां. कमलाप्रमाणें तुमचे नेत्र विशाल आणि रमणीय आहेत. तुम्हाला माझा नमस्कार असो.

नमो भक्तियुक्तानुरक्ताय तुभ्यं
नमः पुण्यपुञ्जैकलभ्याय तुभ्यम् ।
नमो वेदवेद्याय चाद्याय पुंसे
नमः सुन्दरायेन्दिरावल्लभाय ॥ १३ ॥

हे परमेश्वरा ! भक्तजनांवर सतत तुम्ही प्रेम करतां. पूर्वजन्मांचा व या जन्माचा पुण्यसमूह पदरीं असेल तरच तुमचा लाभ होईल. वेदांच्याच साहाय्यानें तुमचें ज्ञान होऊं शकतें. तुम्ही सर्व जगाच्या अगोदरचें जगाच्या मुळाशीं असलेलें मुख्य तत्त्व व परमपुरुष आहां. हे परम सुंदरा, लक्ष्मीरमणा रामचंद्रा ! तुम्हाला माझा नमस्कार असो.

नमो विश्वकर्त्रे नमो विश्वहर्त्रे
नमो विश्वभोक्त्रे नमो विश्वमात्रे ।
नमो विश्वनेत्रे नमो विश्वजेत्रे
नमो विश्वपित्रे नमो विश्वमात्रे ॥ १४ ॥

हे परमेश्वरा रामचंद्रा ! तुम्ही सर्व विश्व निर्माण करतां व विश्वाचा संहारहि करतां. जीवरूपानें सर्व विश्वाचा उपभोगहि पण तुम्हीच घेतां ! तुम्ही निर्माण केलेल्या या विश्वाचें यथार्थ ज्ञान तुम्हालाच आहे. विश्वाचे नेते तुम्हीच. जेतेहि पण तुम्हीच आहां. तुम्ही सर्व विश्वाचे माता आणि पिता आहां. तुमच्या चरणीं मी पुनः पुन्हां नमस्कार करतों.

नमस्ते नमस्ते समस्तप्रपंच-
प्रभोगप्रयोगप्रमाणप्रवीण ।

मदीयं मनस्त्वत्पदद्वन्द्वसेवां
विधातुं प्रवृत्तं सुचैतन्यसिद्धयै ॥ १५ ॥

सर्व भूतभौतिक विश्वप्रपंचाची उत्पत्ति करणें, धारणा करणें, त्यांचें यथार्थ स्वरूप जाणणें व त्याचा उपभोग घेणें या सर्व गोष्टींमध्यें तुम्हीच निष्णात आणि समर्थ आहां. माझें मन तुमच्या चरणारविंदांची सेवा करण्यास प्रवृत्त झालें आहे हे प्रभो रामचंद्रा! आपल्या कृपेनें मला शुद्ध चित्स्वरूपाचा साक्षात्कार होवो मी आपल्या चरणीं वारंवार नमस्कार करीत आहें.

शिलापि त्वदङ्घ्रिक्षमासङ्गिरेणु-
प्रसादाद्धि चैतन्यमाधत्त राम।
नरस्त्वत्पदद्वन्द्वसेवाविधानात्
सुचैतन्यमेतीति किं चित्रमत्र ॥ १६ ॥

हे प्रभो रामराया! तुमच्या चरणकमलाच्या रज कणाच्या मातीनें – स्पर्शानें शिला देखील समर्थ झाली. तिचा जडभाव नाहींसा होऊन ती चित्स्वरूपाला प्राप्त झाली! मग मनुष्याबद्दल काय सांगावें? तुमच्या चरणकमलाची सेवा करून मनुष्य शुद्ध चिदानंदस्वरूपाचा लाभ करून घेऊ शकेल यात आश्चर्य तें कसलें?

पवित्रं चरित्रं विचित्रं त्वदीयं
नरा ये स्मरन्त्यन्वहं रामचन्द्र।
भवन्तं भवान्तं भरन्तं भजन्तो
लभन्ते कृतान्तं न पश्यन्त्यतोऽन्ते ॥ १७ ॥

हे रामराया! तुमचें चरित्र मोठें पवित्र आहे तें अत्यंत आश्चर्यकारक आहे जे कोणी त्याचें रोजच्या रोज श्रवण अथवा पठण करतात आणि तुम्हाला भजतात त्यांना तुमची प्राप्ति होते तुम्ही त्याच्या संसारदुःखाचा नाश करतां, अंतकालीं यमाला अवलोकन करण्याची पाळी त्याच्यावर येत नाहीं.

स पुण्यः स गण्यः शरण्यो ममाऽयं
नरो वेद यो देवचुडामणिं त्वाम्।
सदाकारमेकं चिदानन्दरूपं
मनोवागगम्यं परं धाम राम ॥ १८ ॥

हे प्रभो रामचंद्रा! तुम्ही सर्व देवांचे चूडामणि आहां "प्रभु रामचंद्रच मला शरण जाण्याला योग्य आहेत तेच माझें रक्षण करतील" असें जो मनुष्य जाणतो तो खरोखर धन्य होय, तो पुण्यवान् होय आणि तोच मान देण्याला योग्य होय हे प्रभो! तुम्ही एकमेव अद्वितीय सच्चिदानंदस्वरूप आहां मनाला तुमचा थांगपत्ता लागत नाहीं व वाणीलाहि तुमचें वर्णन करतां येत नाहीं तुम्ही सर्वांचा आधार आहां, आश्रयस्थान आहां अथवा परम प्रकाशस्वरूप आहां प्रभो! मी तुम्हाला नमस्कार करतों

प्रचण्डप्रतापप्रभावाभिभूत-
प्रभूतारिवीर प्रभो रामचन्द्र ।
बलं ते कथं वर्ण्यतेऽतीव बाल्ये
यतोऽखण्डि चण्डीशकोदण्डदण्डः ॥ १९ ॥

हे प्रभो रामचंद्रा! तुमच्या प्रचंड प्रतापाच्या प्रभावानें शत्रूकडील असंख्य मोठमोठे वीर पराभूत झालेले आहेत रामराया! तुमचें बळ किती वर्णन करावें? अगदीं लहानपणीं तुम्ही शंकराच्या धनुष्याचे पहाता पहाता दोन तुकडे करून टाकले! रामा! धन्य आहां तुम्ही!

दशग्रीवमुग्रं सपुत्रं समित्रं
सरिद्दुर्गमध्यस्थरक्षोगणेशम् ।
भवन्तं विना राम वीरो नरो वाऽ
सुरो वाऽमरो वा जयेत्कस्त्रिलोक्याम् ॥ २० ॥

हे प्रभो रामराया! आपल्या पराक्रमाचें व शक्तीचें मी काय वर्णन करूं? तो अत्यंत उग्र दहातोंडाचा रावण, नद्या सागरानीं दुर्गम असलेल्या लंका बेटांत रहाणाऱ्या राक्षसांचा अधिपति, त्रैलोक्याचा जेता, पण त्यालाहि जिंकलें! त्याचे पुत्र इंद्रजित्, अक्षय इत्यादि आणि मित्र मारिच, सुबाहु, खर आणि त्रिदूषण इत्यादि या सर्वांनाहि असंख्य राक्षस-वीरांसह जिंकून त्यांना परलोकीं पाठविलेस रामा, तुझ्यावांचून मानवामध्यें, दैत्यामध्यें किंवा देवामध्यें असा कोण दुसरा वीर आहे की, जो या सर्वांना जिंकू शकेल? संपूर्ण त्रैलोक्यांत तुझ्यावांचून असा दुसरा कोणीहि नाहीं! धन्य आहेस तू तुला माझा नमस्कार असो

सदा राम रामेति रामामृतं ते
सदाराममानन्दनिष्पन्दकन्दम् ।
पिबन्तं नमन्तं सुदन्तं हसन्तं
हनूमन्तमन्तर्भजे तं नितान्तम् ॥ २१ ॥

हे रामा आनंदकंदा ! सदासर्वकाळ राम राम असा शब्दोच्चार करीत तुझ्या नामामृताचें प्राशन करणारा, नित्य निरतिशय आनंदाचा कंद व सज्जनांच्या चित्ताला आराम देणारा असा जो तूं, त्या तुझ्या चरणीं सदा नम्र असलेला तुझा भक्त श्रीहनुमान, ज्याचे दांत उत्तम आहेत व जो प्रसन्न मुखानें हंसत आहे त्या हनुमताचें मी आपल्या अंतःकरणांत अत्यंत प्रेमानें भजन करीत आहें.

सदा राम रामेति रामामृतं ते
सदाराममानन्दनिष्पन्दकन्दम् ।
पिबन्नन्वहं नन्वहं नैव मृत्यो-
र्बिभेमि प्रसादादसादात्तवैव ॥ २२ ॥

हे रामा ! सज्जनांच्या चित्ताला आनंद देणारें, नित्य निरतिशय आनंदाला प्रसवणारें, एकरूप, 'राम राम' इत्याकारक तुमचें नामामृत मी नित्य सेवन करीत आहें, ज्याची प्राप्ति झाली असतां सर्व दुःखांचा नाश होतो, त्या तुमच्या कृपाप्रसादाचा लाभ झाल्यामुळें मला आतां खरोखर मृत्यूचें तिळमात्रहि भय राहिलें नाहीं.

असीतासमेतैरकोदण्डभूषै-
रसौमित्रिवन्द्यैरचण्डप्रतापैः ।
अलङ्केशकालैरसुग्रीवमित्रै-
ररामाभिधेयैरलं दैवतैर्नः ॥ २३ ॥

ज्यांच्या सान्निध्यांत सीता नाहीं, हातांत धनुष्य शोभत नाहीं, लक्ष्मण ज्यांना वंदन करीत नाहीं, ज्यांचा प्रताप प्रचंड नाहीं, जे लंकेचा राजा रावण याचा काळ झाले नाहींत, सुग्रीव ज्यांचा मित्र नाहीं आणि ज्यांच्या नांवांत राम नाहीं अशा इतर दैवतांशीं मातें काय काम आहे ! मला रामाशिवाय इतर कोणत्याहि देवाची अपेक्षा नाहीं.

अवीरासनस्थैरचिन्मुद्रिकाढ्यै-
रभक्ताञ्जनेयादितत्त्वप्रकाशैः ।
अमन्दारमूलैरमन्दारमालै-
ररामाभिधेयैरलं दैवतैर्नः ॥ २४ ॥

जे वीरासनावर बसले नाहीत, ज्यांनीं चिन्मुद्रा म्हणजे ज्ञानमुद्रा धारण केलेली नाहीं, ज्यांनीं मारुतिराय लक्ष्मण वगैरे भक्तांना अध्यात्म तत्त्वज्ञानाचा प्रकाश दिलेला नाहीं, जे कल्पवृक्षाच्या मुळाशीं विराजमान झालेले नाहीत आणि कल्पवृक्षाच्या फुलांच्या माळाहि ज्यांच्या गळ्यात नाहींत ज्यांच्या नावात राम नाहीं किंवा ज्यांना राम ही संज्ञा नाहीं, अशा इतर देवतांचा मला काय उपयोग ? मी रामाशिवाय दुसऱ्या कोणालाहि जाणीत नाहीं

असिन्धुप्रकोपैरवन्द्यप्रतापै-
रबन्धुप्रयाणैरमन्दस्मिताढ्यैः ।
अदण्डप्रवासैरखण्डप्रबोधै-
ररामाभिधेयैरलं दैवतैर्नः ॥ २५ ॥

जे सागरावर प्रक्षुब्ध झाले नाहीत, ज्यांनीं सागरावर सेतु बांधला नाहीं, ज्यांचा प्रताप वंदनीय नाहीं, प्रवासामध्यें ( आणि इतरत्रहि ) प्रयाणकाळीं ज्यांच्या सांनिध्यात बंधु नाहीं, ज्यांच्या मुखावर स्मित हास्य झळकत नाहीं, ज्यांनीं दंडकारण्यात प्रवास केला नाहीं आणि ज्यांच्या नावात राम नाहीं किंवा ज्यांना राम ही संज्ञा नाहीं ते देव अखंडप्रबोध म्हणजे ब्रह्मज्ञानाचा उपदेश करणारे ज्ञानी असले तरी, मला त्यांचा काय उपयोग ? मी रामाशिवाय दुसऱ्या कोणत्याहि देवाला जाणीत नाहीं

( वरच्या तिन्ही श्लोकांत रामाशिवाय इतर देव मी जाणीत नाहीं असा अभिप्राय आचार्य व्यक्त करीत आहेत आणि त्यांनीं इतर देवांचींहि अत्यंत प्रेमानें भरपूर स्तुति स्तोत्रें केलेलीं आहेत तेव्हां ही वरवरदर्शनीं विसंगति दिसते पण सत्य विसंगति नाहीं कारण ज्या देवतेची स्तुति करावयाची, त्या देवतेशीं तादात्म्य पावूनच स्तुति करणें इष्ट असतें आचार्य ज्या देवतेची स्तुति करतात त्या देवतेशीं अनन्य होऊनच स्तुति करीत असत आचार्यांच्या तत्त्वज्ञानाप्रमाणें आचार्यांच्या दृष्टीनें सर्व देवता वस्तुतः एकरूपच आहेत तथापि

श्रीमत् प. प. भगवान् श्रीधरस्वामी महाराज

सज्जनगड



श्रीमान श्रीधरस्वामी यतिवरः पूर्णो दयासागर
प्रत्यक्षो भगवान स्वयं खलु जगद्रक्षार्थमभ्यागत ।
धन्या येन कृपामृतेन बहवो भक्ता भवाब्धेस्तिर
तस्मै भागवतोत्तमाय यतये भक्त्या नमस्कुर्महे ॥

# श्री श्रीदेवी आनन्दमयी माँ



"बैठे बैठे अन्धकारमें क्या टटोलते हो? प्रकाशका सन्धान करो, प्रकाशका सन्धान करो। जानते हो? सच्चा प्रकाश क्या है? वह है भगवन्निष्ठा, वह है भगवत्प्रेम। *तेल बत्ती आदिसे मिलनेवाला प्रकाश बुझ जाता है, भगवत्प्रेमसे मिलनेवाला प्रकाश अविनाशी है।*"

"जो महत्त्वादि सर्व गुणालङ्कृत है, पूर्ण और पवित्र है, वही आदर्श है, इस हिसावसे आदर्श एकमात्र भगवान हैं।"

"शान्ति सबही ढूढते हैं, किन्तु यह बात बहुत कम लोग सोचते हैं कि जबतक "वह" (भगवान) हृदयमें न जागे तबतक पूर्ण शान्ति किसी तरह नहीं मिल सकती है। धनसे शान्ति नहीं मिलती, पुत्र परिजनोंसे शान्ति नहीं होती, प्रतिष्ठा प्राप्त होनेसे शान्ति नहीं मिलती। कारण यह है कि, सांसारिक भोगमात्रही दिन रातकी भाँति परिवर्तनशील हैं, आते आते ही चले जाते हैं। इस लिये ऐसे धनका धनी होना आवश्यक है, जिसका फिर क्षय न हो और जिसके पानेसे सब आकांक्षायें एकदम मिट जायें। वह धन एकमात्र भगवान हैं। जो सबके हृदयमें रहते हुए भी अपरिचित हैं। सत्सङ्ग, सदाचार, समाराधना, स्तुतिस्तोत्र आदिके द्वारा चित्तका अन्धकार दूर होनेपर परम सुन्दरका मोहन रूप अपने आपही विकसित हो जाता है और चित्तमें पूर्ण शान्तिका राज्य आरम्भ होता है।"

*सबके लिये सब समय सब मार्ग नहीं होते हैं। जो संसारधर्म (गृहस्थाश्रम)* करना चाहते हैं, उन्हे धर्मका सञ्चार करना चाहिये। जिस प्रकार अर्थशून्य कोषागारका कोई माहात्म्य नही है, उसी प्रकार धर्महीन मनुष्य जीवनका कोई मूल्य नहीं है।

भक्तजनानीं आपल्या उपास्यदेवतेची स्तुति करताना इष्टदेवतेशीं किती तादात्म्य पावावें ? किती अनन्य व्हावें ? हें दाखविण्याकरिताच कीं काय निरनिराळ्या देवताची स्तुति करताना त्या त्या देवतेशीं अनन्यभाव व्यक्त केलेला आहे व तीच देवता सर्वश्रेष्ठ मानली आहे

आपलीच इष्टदेवता विश्वरूपानें व विश्वातील सर्व देवताऱ्या रूपानें नटलेली आहे हें तत्त्व बुद्धीला पटलें म्हणजे मग कोणत्याहि देवतेकडे आपल्या इष्टदेवतेच्या रूपानें भक्ताला पहाता येतें व कोणत्याहि देवतेची केलेली स्तुति ती आपल्या इष्टदेवतेची होऊ शकते )

हरे राम सीतापते रावणारे
खरारे मुरारेऽसुरारे परेति
लपन्तं नयन्तं सदा कालमेवं
समालोकयालोकपाऽशेषबन्धो ॥ २६ ॥

हे राम ! हरे राम ! हे जानकीनायका ! हे रावणांतका ! हे खरनाशना ! हे मुरारे ! हे दैत्यांतका, हे परमेश्वरा ! याप्रमाणें नेहमीं देवाचें नाव घेत मी काळ घालवीत आहें हे प्रभो जगदीश्वरा ! तुम्ही विश्वाचे बंधु आहां माझ्याकडे पहा माझ्याकडे कृपापूर्ण दृष्टीनें पहा

नमस्ते सुमित्रासुपुत्राभिवन्द्य
नमस्ते सदा कैकयीनन्दनेड्य ।
नमस्ते सदा वानराधीशवन्द्य
नमस्ते नमस्ते सदा रामचन्द्र ॥ २७ ॥

सुमित्रेचा सुपुत्र लक्ष्मण ज्याला नेहमीं वंदन करतो, त्याला माझा नमस्कार असो कैकयीचा नंदन भरत ज्याची नेहमीं स्तुति करतो त्या रामाला माझा नमस्कार असो वानराधिपति जो वायुनंदन तो ज्याला नेहमीं वंदन करतो त्या रामाला माझा नमस्कार असो हे रामचंद्रा ! सदासर्वकाळ तुम्हाला मी वारंवार नमस्कार करीत आहें

प्रसीद प्रसीद प्रचण्डप्रताप
प्रसीद प्रसीद प्रचण्डारिकाल ।

प्रसीद प्रसीद प्रपन्नानुकम्पिन्
प्रसीद प्रसीद प्रभो रामचन्द्र ॥ २८ ॥

हे प्रभो रामचंद्रा ! माझ्यावर तुम्ही प्रसन्न व्हा कृपा करा तुमचा प्रताप मोठा प्रचड आहे प्रभो ! अत्यत भयकर असलेल्या देवाच्या शत्रूचा, दैत्याचा तुम्ही प्रत्यक्ष काळ आहा, पण चरणी शरण आलेल्या भक्तावर अनुग्रह करणारे आहा हे प्रभो रामचद्रा ! तुम्ही माझ्यावर प्रसन्न व्हा कृपा करा

भुजङ्गप्रयातं परं वेदसारं
मुदा रामचन्द्रस्य भक्त्या च नित्यम् ।
पठन् सन्ततं चिन्तयन् स्वान्तरङ्गे
स एव स्वयं रामचन्द्रः स धन्यः ॥ २९ ॥

भुजगप्रयात वृत्तातील हें रामचद्राचें स्तोत्र अत्यत श्रेष्ठ व वेदाचें सारच आहे आनदानें व भक्तीनें जो कोणी या स्तोत्राचें पठन करील आणि आपल्या अतरगात चिंतन करील तो स्वत च रामचद्रस्वरूप होईल तो धन्य होईल

• •

## हनुमत्पञ्चरत्नम्

[ प्रभु रामचद्राचें स्तोत्र झाल्यानतर मारुतिरायाचें स्तवन करणें हें ओघानेंच येतें श्रीरामचद्रप्रभूच्या अनन्यभक्तात मारुतिरायाचा नबर पहिला आहे "एका एका उपकाराकरिता, हे मारुतिराया ! मी माझे पचप्राण अर्पण केले तरी, पाच उपकाराची फेड होईल पण बाकीच्या उपकाराचें ऋण माझ्या माथी कायम राहील !" असे उद्गार प्रत्यक्ष रामचद्रप्रभूनींच मारुतिरायाबद्दल काढलेले आहेत यावरून मारुतिरायाचा महिमा लक्षात घेण्यासारखा आहे

लक्ष्मणशक्तीच्या वेळीं "मारुतिराय जिवत असेल तर आम्हा सर्वांची धडगत आहे तो मेला असला तर आम्ही सर्व जिवत असूनहि मेल्या सारखेंच आहोंत" असे उद्गार समरभूमीवर प्रत्यक्ष जांबवानाच्या तोंडून बाहेर पडले आहेत

ब्रह्मचर्य, वैराग्य, कार्यनिष्ठा, स्वामिभक्ति, अतुल धैर्य, प्रखर बुद्धि, इंद्रियांचा निग्रह, आळसाला थारा नाही! किती वर्णन करावें मारुतिरायाचें? जे कोणी अनन्यभावानें मारुतिरायाला शरण जातात, मारुतिराय त्यांचीं दुःखें दूर करतात ही गोष्ट अजूनहि अनेकांच्या प्रतीतीला येते. आचार्यांना मारुतिरायांनीं प्रत्यक्ष दर्शन दिलेलें आहे. पाचव्या श्लोकात 'अद्राक्षम्' मारुतिराय मला प्रत्यक्ष दिसले असें त्यांनी स्पष्टच म्हटलेलें आहे. आत्मकल्याणासाठीं हें मारुतिरायाचें आर्या वृत्तातील स्तोत्र अवश्य म्हणत जा. ]

**वीताखिलविषयेच्छं जातानन्दाश्रुपुलकमत्यच्छम् ।**
**सीतापतिदूताद्यं वातात्मजमद्य भावये हृद्यम् ॥ १ ॥**

सर्व विषयांच्या इच्छा-वासना ज्याला सोडून गेलेल्या आहेत, श्रीरामचंद्रप्रभूंच्या प्रेमामुळें ज्याचे नेत्र आनंदाश्रूंनीं भरून येतात, अंगावर रोमांच उभे रहातात, जो अत्यंत स्वच्छ आहे, आत बाहेर निर्मळ आहे, सीतापति रामचंद्रप्रभूंचा जो मुख्य दूत आहे. असा तो परम हृद्य — माझा आवडता वायुपुत्र भगवान मारुति त्याचें मी हृदयांत चिंतन करीत आहें.

**तरुणारुणमुखकमलं करुणारस-पूर-पूरितापाङ्गम् ।**
**संजीवनमाशासे मञ्जुलमहिमानमञ्जनाभाग्यम् ॥ २ ॥**

नुकत्याच उदयाला येणाऱ्या अरुणाप्रमाणें ज्याच्या मुखकमलाचा वर्ण शोभत आहे, ज्याची दृष्टि करुणारूपी रसाच्या पुरानें परिपूर्ण भरलेली दिसत आहे, अर्थात् भक्तजनांकडे जो कृपापूर्ण दृष्टीनें पहात आहे, ज्याचा महिमा मोठा रम्य — गोड आहे आणि जो अंजनामातेचें मूर्तिमंत भाग्यच आहे, अशा त्या माझ्या जीवनाच्या आधार असलेल्या मारुतिरायाच्या प्राप्तीची — भेटीची मी आशा करीत आहें. त्यानें मला दर्शन द्यावें.

**शम्बर-वैरि-शरातिगमम्बुज दल-विपुल-लोचनोदारम् ।**
**कम्बुगलमनिल-दिष्टं बिम्बज्वलितोष्ठमेकमवलम्बे ॥ ३ ॥**

शंबर म्हणजे मेघ, त्याचा वैरी म्हणजे शत्रु अर्थात् शंबरवैरी म्हणजे वायु आणि शर म्हणजे बाण, यांच्यापेक्षांहि अधिक वेगानें धावणारा! किंवा शंबर नावाचा एक असुर होऊन गेला त्याचा नाश कामदेवानें केला आहे म्हणून कामदेवाला शंबरारि किंवा शंबरवैरी असें म्हणतात

अर्थात् शंबरवैरी म्हणजे मदन त्याच्या बाणाचा विषय न होणारा, मदनाच्या बाणाला बळी न पडणारा म्हणजे पूर्ण जितेंद्रिय ( शर अति ग = बाणाच्या पलीकडे असलेला ) अथवा शंवर वैरि शर अति-ग म्हणजे कामदेवाच्या बाणाला विषय न होणारा कामारि भगवान् शंकर असाहि अर्थ करावा मारुतिराय हे शंकराचेच अवतार असल्यामुळें त्यांना हें विशेषण लागू पडतेंच कमलदलाप्रमाणें ज्याचे नेत्र विशाल आणि रमणीय आहेत आणि जो उदार म्हणजे श्रेष्ठ, भव्य किंवा सुंदर आहे, ज्याचा कंठ शंखाप्रमाणें त्रिवलयांकित आणि सुंदर दिसत आहे, जो वायुदेवाचें मूर्तिमंत भाग्यच आहे, ज्याचे ओठ उदयाला येणाऱ्या सूर्याच्या किंवा चंद्राच्या बिंबाप्रमाणें आरक्तवर्ण आणि तेजस्वी दिसत आहेत अशा त्या एकमेव अद्वितीय असलेल्या मारुतिरायाचा मी आश्रय घेत आहें मारुतिरायाला मी शरण आलों आहें

दूरीकृत-सीतार्तिः प्रकटीकृतरामवैभवस्फूर्तिः ।
दारित-दशमुख-कीर्तिः पुरतो मम भातु हनुमतो मूर्तिः ॥ ४ ॥

रामविरहानें व्याकुळ होऊन अशोकवनामध्यें शोक करीत बसलेल्या जानकीमातेचें दुःख रामचंद्र प्रभूची कुशल वार्ता निवेदन करून, ज्यानें दूर केलें, त्याचप्रमाणें स्वतःच्या पराक्रमानें ज्यानें श्रीरामचंद्रप्रभूच्या वैभवाचा आविष्कार केला, रामचंद्रप्रभूचें वैभव लोकांच्या निदर्शनाला आणून दिलें देवानांहि बंदि-वासात टाकणारा, त्रैलोक्यविजयी, चौदा चौकड्यांचा राजा रावण पण त्याच्याहि कीर्तीला ज्यानें धुळीस मिळविलें, तो हनुमान, त्याची ती भव्य मूर्ति माझ्यापुढें प्रकट होवो. मला मारुतिरायाचें प्रत्यक्ष दर्शन घडावें अशी माझी इच्छा आहे

वानर-निकराध्यक्षं दानव-कुल-कुमुद-रवि-कर-सदृक्षम् ।
दीन-जनावन-दीक्षं पवन-तपःपाक-पुञ्जमद्राक्षम् ॥ ५ ॥

कुमुद म्हणजे चंद्रविकासी कमळ सूर्य उगवला की ही कमळें मिटतात सूर्याच्या किरणांचा स्पर्श या कमळांना सहन होत नाहीं त्याचप्रमाणें मारुतिरायाला पाहिल्याबरोबर दानवांचे, राक्षसांचे समुदाय अगदीं घाबरून जातात, म्लान होतात म्हणून मारुतिराय हे दानवकुलरूपी कुमुदांना सूर्यकिरणांच्या स्पर्शा प्रमाणें मिटविणारे आहेत तथापि मारुतिरायांनीं दीनजनांच्या संरक्षणाची दीक्षाच घेतलेली आहे दीनजनांच्या संरक्षणाचा त्यांनीं विडाच उचललेला

आहे मारुतिराय म्हणजे वायुदेवानें केलेल्या तपश्चर्येच्या परिपाकाचा प्रत्यक्ष समुच्चयच आहे त्या मारुतिरायाला मीं प्रत्यक्ष पाहिलें ! धन्य झालों

**एतत्पवनसुतस्य स्तोत्रं यः पठति पञ्चरत्नाख्यम् ।**
**चिरमिह निखिलान् भोगान् भुक्त्वा श्रीरामभक्तिभाग्भवति ॥ ६ ॥**

पवनपुत्र मारुतिरायाच्या या स्तोत्राला 'पंचरत्न' 'हनुमत्पंचरत्न' असें म्हणतात या स्तोत्राचें अनन्यभक्तीनें जो कोणी पठण करील तो इहलोकीं चिरकाळ सर्व भोग भोगून, शिवाय श्रीरामचंद्रप्रभूंच्या भक्तीनें — परम प्रेमानेंहि संपन्न होईल



## उपदेशपञ्चकम्

[ आचार्यांचीं कांहीं उपदेशपर प्रकरणें अगदीं लहान लहान असून त्यांची भाषा अगदीं सोपी, प्रासादिक आणि अत्यंत गोड आहे वृत्तेंहि कानाला गोड व मनाला आकर्षक वाटतात यमक, अलंकार इत्यादि काव्याचे गुणधर्महि त्यांत आहेत हीं प्रकरणें स्तोत्रांसारखीं दिसतात व म्हटलीं जातात म्हणून यांचा अंतर्भाव स्तोत्र ग्रंथांत केला आहे अशीं प्रकरणें बरींच आहेत त्यांतील कांहीं निवडक प्रकरणें या ठिकाणीं वाचकांना सादर करीत आहोंत

या साधनपंचकाच्या पांच श्लोकांत आचार्यांनी मानवानें आपला जीवनक्रम कसा आखावा, क्रमाक्रमानें बुद्धीचा विकास कसा करून घ्यावा व शेवटीं चित्तवृत्तीला सच्चिदानंदघन परब्रह्मस्वरूपाशीं समरस करून आनंदाची पराकाष्ठा कशी गाठावी यांचें अत्यंत उत्तम मार्गदर्शन केलें आहे यालाच उपदेशपंचक असेंहि म्हणतात या प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें आचरण वागण्याचा प्रयत्न करावा हे श्लोक पाठ करावेत ]

**वेदो नित्यमधीयतां तदुदितं कर्म स्वनुष्ठीयतां**
**तेनेशस्य विधीयतामपचितिः काम्ये मतिस्त्यज्यताम् ।**
**पापौघः परिधूयतां भवसुखे दोषोऽनुसंधीयता-**
**मात्मेच्छा व्यवसीयतां निजगृहात्तूर्णं विनिर्गम्यताम् ॥ १ ॥**

नेहमीं वेदांचें ( किंवा वेदाप्रमाणें पवित्र असलेल्या सद्‌ग्रंथांचें ) वाचन करा. त्यांत सांगितलेल्या सत्कर्माचें उत्तम रीतीनें आचरण करा. तीं कर्मे परमेश्वराला अर्पण करून परमेश्वराची पूजा करा. ईश्वरार्पणबुद्धीनें विहित कर्तव्यकर्माचें आचरण, हीं ईश्वरपूजाच होय. स्वर्गाच्या किंवा ऐहिक वैभवाच्या प्राप्तीसाठीं दानधर्म किंवा यज्ञयागादि कर्मे करण्याची बुद्धि सोडून द्या. पापसमूहाचें प्रक्षालन करा. सांसारिक सुखें सदोष असतात हीं गोष्ट लक्षांत ध्या. आत्मस्वरूपाला ओळखण्याचा प्रयत्न करा. तावडतोब घरांतून बाहेर पडा. घरादारांतून मनाला बाहेर काढा.

सङ्गः सत्सु विधीयतां भगवतो भक्तिर्दृढाऽऽधीयतां
शान्त्यादिः परिचीयतां दृढतरं कर्माशु संत्यज्यताम् ।
सद्विद्वानुपसृप्यतां प्रतिदिनं तत्पादुका सेव्यतां
ब्रह्मैकाक्षरमर्थ्यतां श्रुतिशिरोवाक्यं समाकर्ण्यताम् ॥ २ ॥

सज्जनांची संगति धरा. परमेश्वराविषयीं दृढ भक्ति प्रेम ठेवा शमदमादि सद्‌गुणांचा उत्तम संग्रह करा. दुःखदायक कर्माचा दृढनिश्चयानें त्याग करा जे उत्तम विद्वान् ( आत्मज्ञानी व सदाचारसंपन्न ) असतील त्यांच्याकडे नेहमीं जात जा. त्यांच्या चरणांची सेवा करा. त्यांच्याजवळ केवळ एका अक्षरब्रह्माची याचना करा. त्याचप्रमाणें उपनिषदांचें, उपनिषदांतील महावाक्यांचें श्रवण करा.

वाक्यार्थश्च विचार्यतां श्रुतिशिरःपक्षः समाश्रीयतां
दुस्तर्कात्सुविरम्यतां श्रुतिमतस्तर्कोऽनुसंधीयताम् ।
ब्रह्मास्मीति विभाव्यतामहरहर्गर्वः परित्यज्यतां
देहेऽहंमतिरुज्झ्यतां बुधजनैर्वादः परित्यज्यताम् ॥ ३ ॥

"तत्त्वमसि", "अयमात्मा ब्रह्म", "अहं ब्रह्मास्मि"—'तेंच तत्त्व तूं आहेस', 'हा आत्मा ब्रह्म स्वरूप आहे', 'मी ब्रह्म आहें' इत्यादि महावाक्यांचा विचार करा. वेदांताचाच पक्ष स्वीकारा कुतर्कापासून दूर रहा. वेदांना मान्य असलेल्या तर्कांचा विचार करा. तत्त्वतः मी ब्रह्मरूप आहें अशी नित्य भावना ठेवा गर्व अगदीं सोडून द्या. देहाविषयीं अहंभाव ठेवूं नका आणि ज्ञानी लोकांशीं वितंडवाद करूं नका.

क्षुद्व्याधिश्च चिकित्स्यतां प्रतिदिनं भिक्षौषधं भुज्यतां
स्वाद्वन्नं न तु याच्यतां विधिवशात्प्राप्तेन संतुष्यताम् ।
शीतोष्णादि विषह्यतां न तु वृथा वाक्यं समुच्चार्यता-
मौदासीन्यमभीप्स्यतां जनकृपा नैष्ठुर्यमुत्सृज्यताम् ॥ ४ ॥

क्षुधारूपी व्याधीची चिकित्सा करा ( औषध ज्याप्रमाणें आवण रोग निवारण्यापुरतेंच सेवन करतों त्याचप्रमाणें जेवण देखील भूक निवारण्यापुरतेंच घ्यावें अधिक जेवण्यानें, जड व गोड पदार्थ अधिक खाण्यानें रजोगुण व तमोगुण वाढतो ) औषध समजूनच सन्याशानें भिक्षान्न रोज सेवीत असावें ( गृहस्थाश्रमात असलेल्यानें देखील अन्न सेवन करताना अन्नपूर्णेनें दिलेली ही भिक्षा आहे, अशी भावना ठेवूनच अन्न सेवन करावें अशा भावनेनें ज्ञान-वैराग्याची सिद्धि होते अन्नपूर्णाष्टकाचा शेवट पहा पुष्कळ सुजन लोक जेवण्याच्या पूर्वी " अन्नपूर्णे सदा पूर्णे " हा श्लोक म्हणत असतात असेंहि दिसून येतें )

गोड अन्नाची कधी याचना करू नये दैवयोगानें जें मिळेल त्यात संतोष मानावा शीत उष्ण, सुख दुःख, लाभ हानि इत्यादि द्वंद्वें सहन करावींत व्यर्थ बोलणें सोडून द्यावें तटस्थ वृत्ति धारण करावी अर्थात् कोणत्याहि पक्षाचा अभिनिवेश धरून व्यर्थ भाडत बसू नये अन्याय्य पक्षपाती बुद्धि सोडून द्यावी लोकांनी आपल्यावर कृपा करावी अशी बुद्धि ठेवू नये व लोकांशीं निष्ठुरपणानेंहि वागू नये, किंवा लोकांवर यावच्छक्य कृपा करीत असावें कृपेबद्दल निष्ठुरपणा धारण करू नये दुसरा अर्थ करताना 'जनकृपानैष्ठुर्य' हें एकच पद समजावें

एकान्ते सुखमास्यतां परतरे चेतः समाधीयतां
पूर्णात्मा सुसमीक्ष्यतां जगदिदं तद्बाधितं दृश्यताम् ।
प्राक्कर्म प्रविलाप्यतां चितिबलान्नाप्युत्तरैः श्लिष्यतां
प्रारब्धं त्विह भुज्यतामथ परब्रह्मात्मना स्थीयताम् ॥ ५ ॥

एकान्तात सुखानें बसावें व परब्रह्मस्वरूपीं चित्त स्थिर करावें पूर्णब्रह्माचा साक्षात्कार होईपर्यंत विचार करावा हें दोरखंड आहे असें कळल्यावर सर्प-बुद्धीचा जसा बाध होतो, म्हणजे दोरीच्या ठिकाणीं भासलेला सर्प खोटा आहे असें कळतें, त्याचप्रमाणें अधिष्ठानरूप ब्रह्मस्वरूपाच्या साक्षात्कारानें विश्वाच्या

सत्यत्वाचा बाध करून घ्यावा म्हणजे ब्रह्मच तत्त्वत सत्य आहे, विश्वाची प्रतीति तत्त्वत सत्य नाही, ही गोष्ट लक्षात घ्यावी ज्ञानाग्नीच्या बळावर संचित कर्मांचा नाश करून टाकावा व क्रियमाण कर्मांचें बंधन लागू देऊ नये प्रारब्ध कर्म भोगून पुरें करावें ( तें भोगावेंच लागतें भोगावाचून बलवत्तर प्रारब्ध कर्माचा क्षय होत नाहीं याची जाणीव ठेवून वागावें ) आणि परब्रह्मस्वरूपाशीं एकरूप होऊन रहावें मग पहा जिकडे तिकडे सदा सर्वकाळ आनंदच प्रतीतीला येईल ।

यः श्लोकपञ्चकमिदं पठते मनुष्यः
सञ्चिन्तयत्यनुदिनं स्थिरतामुपेत्य ।
तस्याशु संसृतिदवानलतीव्रघोर-
तापः प्रशान्तिमुपयाति चितिप्रसादात् ॥ ६ ॥

जो कोणी मनुष्य या पांच श्लोकांचें पठण करील आणि चित्त स्थिर ठेवून रोजच्या रोज यांच्या अर्थाचें मनन करील त्याचा संसारताप वणव्याप्रमाणें कितीहि तीव्र आणि घोर असला तरी तो तावडतोब आत्मप्रसादानें शांत होईल



## काशीपञ्चकम्

[ आपल्याला काशी घडावी काशी केव्हा घडेल ? आपली काशी केव्हा होईल ? असा ध्यास अनेकांच्या चित्तानें घेतलेला असतो प्रत्यक्ष काशीला गेलें म्हणजे मात्र तेथील वातावरण पाहून ही श्रद्धा उरत नाहीं तेव्हा खरी काशी कोणती ? श्रीशंकराचार्यांनीं दिलेलें उत्तर नीट लक्षात घ्या म्हणजे कळेल ]

मनोनिवृत्तिः परमोपशान्तिः
सा तीर्थवर्या मणिकर्णिका च ।
ज्ञानप्रवाहा विमलादिगङ्गा
सा काशिकाऽहं निजबोधरूपा ॥ १ ॥

मन सर्व विषयापासून परावृत्त होणें व चित्ताला पूर्ण शांति मिळणें हीच सर्व तीर्थांत श्रेष्ठ असलेली मणिकर्णिका होय शुद्ध निर्मल आत्मज्ञानाचा

प्रवाह हींच मुख्य गंगा आणि सत्य ज्ञान अनंतनिजबोधस्वरूप जो आत्मा ( मी ) हींच खरी काशी होय

यस्यामिदं कल्पितमिन्द्रजालं
चराचरं भाति मनोविलासम् ।
सच्चित्सुखैका परमात्मरूपा
सा काशिकाऽहं निजबोधरूपा ॥ २ ॥

या आत्मस्वरूपी काशीच्या ठिकाणीं हें सर्व चराचर विश्व प्रतीतीला येत आहे तें केवळ गारुड्याच्या खेळाप्रमाणें कल्पित आहे तें खरें नव्हे केवळ मनाचा खेळ आहे तो ! सच्चिदानंद परमात्मा हींच खरी मुख्य काशी आणि मी सच्चिदानंद निजबोधस्वरूप असलेल्या त्या परमात्म्याहून निराळा नसल्यामुळें मीच काशी होय तात्पर्य, निजबोधस्वरूप आत्मा, सच्चिदानंद परमात्मा हींच खरी काशी आहे

कोशेषु पञ्चस्वधिराजमाना
बुद्धिर्भवानी प्रतिदेहगेहम् ।
साक्षी शिवः सर्वगतोऽन्तरात्मा
सा काशिकाऽहं निजबोधरूपा ॥ ३ ॥

प्रत्येक प्राण्याच्या देहरूपी मंदिरामध्यें अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय असे जे पांच कोश आहेत, त्या पांच कोशांत विराजमान असलेली जी बुद्धि तीच पार्वती अन्नपूर्णा होय आणि सर्वांच्या अंतर्यामी विराजमान असलेला साक्षी अंतरात्मा हाच विश्वनाथ भगवान् श्रीशंकर याप्रमाणें निजबोधस्वरूप जो मी आत्मा, तोच खरी काशी होय

काश्यां हि काशते काशी
काशी सर्वप्रकाशिका ।
सा काशी विदिता येन
तेन प्राप्ता हि काशिका ॥ ४ ॥

बुद्धि ही सर्व विषयांना प्रकाशित करते म्हणून तिला काशी असें म्हणतात त्या बुद्धीमध्यें स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश असा जो आत्मा, तो प्रकाशत

असतो, म्हणून त्या आत्म्यालाहि काशीच म्हणतात आत्मा हा अनादि, अनंत, सर्वव्यापी, स्वतःसिद्ध आणि स्वयंप्रकाश असल्यामुळें, बुद्धीसह सर्व वस्तूंना तोच प्रकाशित करीत असतो तात्पर्य, आत्मा हा काशी व तो सर्व वस्तूंना प्रकाशित करीत असल्यामुळें "काशी सर्वप्रकाशिका" असें म्हटलें आहे अशी ही आत्मस्वरूपी काशी ज्यानें जाणली त्यालाच खरी काशी घडली त्यालाच खरा काशीचा लाभ झाला

काशीक्षेत्रं शरीरं त्रिभुवनजननी व्यापिनी ज्ञानगङ्गा
भक्तिः श्रद्धा गयेयं निजगुरुचरणध्यानयोगः प्रयागः।
विश्वेशोऽयं तुरीयः सकलजनमनःसाक्षिभूतोऽन्तरात्मा
देहे सर्वं मदीये यदि वसति पुनस्तीर्थमन्यत्किमस्ति ॥५॥

आपलें शरीर हेंच काशीक्षेत्र होय सर्व विश्वाला व्यापणारी त्रैलोक्यजननी ज्ञानरूपी गंगा हीच गंगा समजावी परमेश्वराविषयीं अनन्यभक्ति आणि दृढ श्रद्धा हीच गया होय आपल्या श्रीगुरूंच्या चरणकमलाचें ध्यान हेंच तीर्थराज प्रयाग क्षेत्र होय तुरीय म्हणजे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थांच्या पलीकडचा किंवा स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन अवस्थांच्या पलीकडचा आणि सगळ्या जगाच्या अन्तःकरणाचा साक्षी असलेला अन्तरात्मा हाच या काशींत वास्तव्य करणारा भगवान् विश्वेश्वर होय याप्रमाणें सर्व कांहीं माझ्याच देहामध्यें विराजमान असता यापेक्षा आणखी दुसरें पावन तीर्थ या जगात कोणतें आहे ? तात्पर्य, आचार्यांनीं सांगितलेल्या या काशीपंचकाच्या आधारें खऱ्या काशीची ओळख करून घेऊन सर्वांनीं काशीयात्रेचें श्रेय संपादन करावें



## वैराग्यपञ्चकम् ।

[ पांच श्लोकांचें हें वैराग्यपंचक, वैराग्य अंगीं बाणण्याकरितां वैराग्या संबंधानें आपण कसे विचार करावेत या बाबतींत अत्यंत उत्तम मार्गदर्शन करीत आहे. वैराग्य हा बाह्य आचरणाचा विषय नसून तो एक अंतरंगातील विचाराचाच विषय आहे अंतःकरणांतील वैराग्याचें बाह्य आचरणांत प्रति-

चित्त उमटलें पाहिजे. बहिरंग वैराग्यानें नटलेलें व अंतरंग विषयानें थाटलेलें अशी जर अवस्था असेल तर तें खरें वैराग्य होऊं शकत नाहीं. घरदार सोडलें, अंगाला राख फासली, दाढी-जटा राखल्या, भगवीं वस्त्रें घेतलीं, रानावनांत राहिला म्हणजे विरक्त झाला अशांतला भाग नाहीं. समाजांत राहून, घरीं राहून आपल्यावर अवलंबून असलेल्या कुटुंबीयांचें परिपालन करणें, कष्टानें व न्यायानें धन मिळविणें, समाजाची व राष्ट्राची यथाशक्य सेवा करणें व हें सर्व करतांना धनाची, मानाची व सुखाची चित्तांत अपेक्षा न ठेवणें, आपलें कर्तव्य कर्म करीत असतां यदृच्छेनें प्राप्त होणाऱ्या धनांत, मानांत व सुखांत संतोष मानणें, चित्तवृत्ति ईश्वरस्वरूपीं स्थिर ठेवणें, हींच खरीं वैराग्याचीं लक्षणें होत. विषयोन्मुख होणाऱ्या मनाची संसारांत राहून कशी समजूत घालावी हें या वैराग्यपञ्चकावरून चांगलें लक्षांत घेतां येतें. या स्तोत्राच्या शेवटीं 'इति श्रीशंकराचार्यकृतं' असा उल्लेख नाहीं. यावरून हें आद्य शंकराचार्यांचें आहे की नाहीं असा संशय येतो. तथापि, स्तोत्राची भाषा, यमक, अनुप्रास, वृत्तांचें वैविध्य, भक्ति, ज्ञान आणि वैराग्य यांचा परिपोष या सर्व गुणांवरून हें स्तोत्र आचार्यांचें असावें असें वाटतें. हें स्तोत्र मोठें मनोहर आहे पहा ।

दुरीश्वरद्वारबहिर्वितर्दिकादुरासिकायै रचितोऽयमञ्जलिः
यदञ्जनाभं निरपायमस्ति नो धनञ्जयस्यन्दनभूषणं धनम् ॥२॥

दुष्ट राजाच्या दरवाजाबाहेर असलेल्या ओट्यावर, त्याच्या भेटीसाठीं तळमळत वाट पहात बसण्याला मी आता हात जोडले आहेत कारण अर्जुनाच्या रथाला भूषणास्पद असलेलें, कधींहि नाश न पावणारें, कृष्णवर्ण व कृष्णसंज्ञक — अर्थात् कृष्ण या नावानें प्रसिद्ध असलेलें असें उत्तम धन आमच्या हातीं आलें आहे

काचाय नीचं कमनीयवाचा
मोचाफलस्वादमुचा न याचे ।
दयाकुचेले धनदत्कुचेले
स्थितेऽकुचेले श्रितमाकुचेले ॥ ३ ॥

पिकलेल्या रंभाफळाचाहि स्वाद जिच्यापुढें फिका पडेल अशा माझ्या मधुर वाणीनें मी आता हिऱ्यामाणकासारख्या तुच्छ नाशवंत धनासाठीं नीच श्रीमंताची याचना करणार नाहीं

दयेचा सागर आणि कुबेरहि ज्याच्यापुढें दरिद्री ठरेल असा श्रीमान् आणि चरणकमलाचा नित्य आश्रय करून राहिलेल्या लक्ष्मीचा व पृथ्वीचाहि अधिपति (प्रेरक) असलेला भगवान् श्रीहरि विद्यमान असता आम्ही नीचाची याचना का करावी ?

क्षोणीकोणशतांशपालनखलद्दुर्वारगर्वानल-
क्षुभ्यत्क्षुद्रनरेन्द्रचाटुरचनां धन्यां न मन्यामहे ।
देवं सेवितुमेव निश्चिनुमहे योऽसौ दयालुः पुरा
धानामुष्टिमुचे कुचेलमुनये धत्ते स्म वित्तेशताम् ॥ ४ ॥

पृथ्वीच्या कोपऱ्याच्या एकशतांश प्रदेशाचें राज्य असलें तरी तेवढ्या सत्तेनें उत्तरोत्तर अंतःकरणांत वृद्धिंगत होणाऱ्या, अनिवार अशा अहंकाररूपी अग्नीनें संतप्त झालेल्या क्षुद्र राजाचें गुणगौरव लिहिण्यांत आम्हाला धन्यता वाटत नाहीं

आलें त्याला जवळ बोलावलें पाहिलें ऐंशीच्या घरात आलेला म्हातारा तो! आता व्याकरणशास्त्राचा अभ्यास करून काय मिळविणार? आचार्यांचें अंतकरण कळवळलें आचार्यांनीं त्याला मोठा गोड उपदेश केला तोच उपदेश चर्पटपंजरिका व द्वादशपंजरिका या स्तोत्राच्या रूपानें आपणास पहावयास सापडतो हा उपदेश केवळ त्या वृद्ध ब्राह्मणालाच नव्हे, तर आपणा सर्वांनाहि अत्यंत उपयुक्त व बोधप्रद आहे चर्पट म्हणजे खमंग खुसखुशीत पंजरी म्हणजे एक प्रकारचें खाद्य चर्पटपंजरिका म्हणजे खमंग खाद्य आचार्यांचीं हीं दोन्हीं स्तोत्रें म्हणायला अत्यंत गोड आहेत भाषेमध्यें प्रसाद आहे, ओज आहे, माधुर्य आहे यमक, अनुप्रास, लालित्य इत्यादि काव्याचे सर्वच गुण आहेत अंतःकरणाची तळमळ आहे आणि हिताचा उपदेश आहे याच स्तोत्रांना काहीं ठिकाणीं 'मोहमुद्गर' असेंहि नाव दिलेलें आढळतें ]

भज गोविन्दं भज गोविन्दं भज गोविन्दं मूढमते ।
प्राप्ते संनिहिते मरणे न हि न हि रक्षति 'डुकृञ् करणे' ॥

मरण जवळ आलें असतां हें 'डुकृञ् करणे' काहीं उपयोगाला येणार नाहीं व तुझें रक्षण करणार नाहीं वेड्या! गोविंदाला भज गोविंदाला शरण जा गोविंदाचा आश्रय घे (हें पालुपद अथवा ध्रुवपद प्रत्येक पद्याच्या शेवटीं म्हणावें)

दिनमपि रजनी सायं प्रातः
शिशिरवसन्तौ पुनरायातः ।
कालः क्रीडति गच्छत्यायुस्
तदपि न मुञ्चत्याशावायुः ॥

भज गोविन्दं भज गोविन्दं भज गोपालं मूढमते ।
प्राप्ते संनिहिते मरणे न हि न हि रक्षति डुकृञ् करणे ॥ १ ॥

दिवसरात्र, सकाळ संध्याकाळ, शिशिर ऋतु वसंत ऋतु, पुनः पुन्हा येतात व जातात अशा प्रकारें कालाची लीला नित्य चालली आहे कालचक्र सतत फिरत आहे आयुष्य निघून जात आहे तरी पण आशेचा वारा आशारूपी पिशाचिका ही काहीं पिंड (देह) सोडीत नाहीं देहाची आशा काहीं कमी होत

नाहीं ! अरे वेड्या ! गोविंदाला भज गोपाळकृष्णाला भज मूर्खा ! मरण जवळ आल्यानंतर 'हें डुकृञ् करणे' तुझ्या काय उपयोगाला येणार ? तें तुझें रक्षण करणार नाहीं

अग्रे वह्निः पृष्ठे भानू
रात्रौ चुबुकसमर्पितजानुः ।
करतलभिक्षा तरुतलवासस्
तदपि न मुञ्चत्याशापाशः ॥

भज गोविन्दं भज गोविन्दं भज गोविन्दं मूढमते ।
प्राप्ते संनिहिते मरणे न हि न हि रक्षति डुकृञ् करणे ॥ २ ॥

दारिद्र्य तर येथढें की, हिवाळ्यात सकाळीं सध्याकाळीं थडी भागविण्या-करिता पुरेसें वस्त्र देखील नाहीं ! पुढें विस्तव आणि पाठीवर सूर्याचे किरण ! रात्रीच्या वेळीं तर गुडघ्यात हनुवटी खुपसून मुरकुडी वळून पडतात (हल्लीं शहरातून फुटपाथवर दिवस कठिण असलेले असे लोक पुष्कळ दिसतात) हातावर भिक्षा व झाडाखालीं मुक्काम ! अशी स्थिति असते, तरी पण आशेचा पाश ( बधन ) सुटत नाहीं ! मूर्खा ! गोविंदाला भज हें मी तुला निवार सागतों मरण जवळ आल्यानंतर दुसरें काहीं उपयोगाला येणार नाहीं

यावद्वित्तोपार्जनसक्तस्
तावन्निजपरिवारो रक्तः ।
पश्चाद्धावति जर्जरदेहे
वार्तां पृच्छति कोऽपि न गेहे ॥ भज० ॥ ३ ॥

जोंपर्यंत तू पैसा मिळविण्याचा प्रयत्न करशील तोंपर्यंत तुझ्या कुटुबातील लोक तुझ्यावर प्रेम करतील तुझ्या पाठीमागें धावतील पुढें पुढें करतील म्हातारपणानें देह जर्जर झाल्यावर मात्र घरात कोणीहि कुशल वार्ता देखील विचारणार नाहीं वेड्या ! तू निरतर गोविंदाला भज तेंच तुझ्या उपयोगाला येईल मृत्यु जवळ आला असता हें 'डुकृञ् करणे' तुझें रक्षण करणार नाहीं

जटिलो मुण्डी लुञ्चितकेशः
काषायाम्बरबहुकृतवेषः ।
पश्यन्नपि च न पश्यति मूढ
उदरनिमित्तं बहुकृतवेषः ॥ भज० ॥ ४ ॥

कोणी जटा धारण करतो तर कोणी मुंडण करतो कोणी केश लुंचन करतो तर कोणी भगवीं वस्त्रें धारण करतो कळून असूनहि लोक विचार करीत नाहींत! केवढा हा मूर्खपणा आहे! पोटासाठीं अनेक सोंगें घेतो पण परमेश्वराला मात्र शरण जात नाहीं! वेड्या! तू तरी गोविंदाला भज मृत्यु जवळ आला असता ही 'डुकृञ् करणे' घोकपट्टी तुझ्या काय उपयोगाला येणार? ती तुझें रक्षण करणार नाहीं

भगवद्गीता किंचिदधीता
गङ्गाजललवकणिका पीता ।
सकृदपि यस्य मुरारिसमर्चा
तस्य यमः किं कुरुते चर्चाम् ॥ भज० ॥ ५ ॥

ज्यानें भक्तिपूर्वक भगवद्गीतेचें किंचित पठण केलें आहे, श्रद्धापूर्वक गंगाजलाचा अत्यल्प कण सेवन केला आहे, त्याचप्रमाणें प्रेमपूर्वक एकदा जरी श्रीहरीची पूजा—समाराधना केली आहे, त्याची यम चर्चा तरी करू शकेल काय? अरे! बुद्धीचा मोह दूर कर आणि गोविंदाला भज

अङ्गं गलितं पलितं मुण्डं
दशनविहीनं जातं तुण्डम् ।
वृद्धो याति गृहीत्वा दण्डं
तदपि न मुञ्चत्याशा पिण्डम् ॥ भज० ॥ ६ ॥

सर्व शरीराचा गळाठा झाला. शरीर थकलें डोक्याचे केस पांढरे झाले तोंडात दात उरले नाहींत म्हातारा झाला आहे वसा तरी काठी टेकीत चालतो आहे तरी पण आशा काहीं त्याचा पिंड सोडीत नाहीं पिंड म्हणजे देह

बालस्तावत्क्रीडासक्तः
तरुणस्तावत्तरुणीरक्तः ।

वृद्धस्तावच्चिन्तामग्नः
परमे ब्रह्मणि कोऽपि न लग्नः ॥ भज० ॥ ७ ॥

बालपणीं खेळण्यात गुतला तरुणपणीं तरुणीच्या मोहात गुतला म्हातारपणचा काळ चिंतेत घालविला म्हातारपणीं घरादाराच्या व मुलाबाळाच्या चिंतेत मग्न होऊन राहिला पण परब्रह्मस्वरूपी कोणीहि संलग्न झालेला दिसत नाहीं मूढानो ! भजा गोविंदाला भजा काळ ओढवल्यावर कोण तुमचें रक्षण करणार ?

पुनरपि जननं पुनरपि मरणं
पुनरपि जननीजठरे शयनम् ।
इह संसारे बहुदुस्तारे
कृपयाऽपारे पाहि मुरारे ॥ भज० ॥ ८ ॥

या संसारामध्यें पुन पुन्हा जन्म घ्यावा लागतो पुन पुन्हा मरावें लागतें पुन पुन्हा आईच्या उदरात रहावें लागतें अशा या अत्यंत दुस्तर आणि अपार असलेल्या संसारातून – संसारसागरातून हे मुररिपो श्रीकृष्णा ! कृपा करून मला पार कर अशी प्रार्थना करीत गोविंदाला भजा त्याच्यावाचून दुसरा कोणी त्राता नाहीं

पुनरपि रजनी पुनरपि दिवसः
पुनरपि पक्षः पुनरपि मासः ।
पुनरप्ययनं पुनरपि वर्षं
तदपि न मुञ्चत्याशामर्षम् ॥ भज० ॥ ९ ॥

रात्र, दिवस, पंधरवडा, महिना, ऋतु, अयन आणि वर्ष पुन पुन्हा येतात आणि पुन पुन्हा जातात अशा रीतीनें आयुष्य संपुष्टात येत असतें तरी पण मनुष्य आशा, ईर्षा, काम, क्रोध, द्वेष मत्सर इत्यादि विकाराना सोडीत नाहीं अरे ! सावध हो अजून तरी श्रीहरीला शरण जा मृत्युकाळ जवळ आला असता तोच तुमचें रक्षण करील या वेळीं समर्थांच्या वचनाची आठवण होते 'घटका जाती पळें जातीं तास वाजे घणाणा, आयुष्याचा नाश होतो राम का रे म्हणाना ?'

वयसि गते कः कामविकारः
शुष्के नीरे कः कासारः ।
नष्टे द्रव्ये कः परिवारो
ज्ञाते तत्त्वे कः संसारः ॥ भज० ॥ १० ॥

वय निघून गेल्यावर कामविकाराला काय अर्थ आहे ? पाणी आटल्यानंतर तळ्याचा काय उपयोग ? जवळचें द्रव्य नष्ट झाल्यावर कुटुंब-परिवार रहात नाहीं ( सर्व लोक सोडून जातात. ) तत्त्व म्हणजे विश्वाचें अधिष्ठान अथवा आत्म्याचें यथार्थ रूप. तें जाणल्यावर संसार – संसार या रूपानें शिल्लक रहात नाही. ( तत्त्वज्ञानानें संसारांतील सर्व दुःखें मावळतात, कायमचीं शमतात. तें तत्त्वज्ञान परमेश्वराच्या कृपेशिवाय प्राप्त होत नाहीं. ) म्हणून वेड्यांनो ! गोविंदाला भजा. तोच तुम्हांला मृत्युपाशांतून सोडवील.

नारीस्तनभरनाभीदेशं
दृष्ट्वा मा गा मोहावेशम् ।
एतन्मांसवसादिविकारं
मनसि विचिन्तय वारं वारम् ॥ भज० ॥ ११ ॥

स्त्रियांचीं मुखें, स्तन, नाभि इत्यादि अवयवांचें अवलोकन करून मोहाला बळी पडूं नकोस. त्यांचें सतत चिंतन करूं नकोस. ज्या शरीराबद्दल एवढा मोह आणि अभिनिवेश ठेवावयाचा, तें शरीर तरी रक्त, मांस, हाडें आणि चरबी इत्यादि विकारांपेक्षां निराळें असें काय आहे ? या सर्व गोष्टींचा मनामध्यें वारंवार विचार कर आणि गोविंदाला शरण जा. तोच तुझें रक्षण करील.

कस्त्वं कोऽहं कुत आयातः
का मे जननी को मे तातः
इति परिभावय सर्वमसारं
विश्वं त्यक्त्वा स्वप्नविचारम् ॥ भज० ॥ १२ ॥

तू कोण आहेस ? मी कोण आहे ? मी कोठून आलों ? माझी आई कोण या सर्व गोष्टींचा विचार कर. हें सर्व विश्व असार आहे. यांत कांहीं राम नाहीं यांत रमण्यासारखें कांहीं नाहीं. विचार केला असतां तें स्वप्नतुल्य असल्या-

प्रतीतीस येतें. म्हणून हें सर्व सोडून देऊन भल्या माणसा! गोविंदाला भज. मृत्यु जवळ आला असतां त्याच्याशिवाय दुसरें कोणीहि तुझें संरक्षण करणार नाहीं.

गेयं गीतानामसहस्रं
ध्येयं श्रीपतिरूपमजस्रम् ।
नेयं सज्जनसङ्गे चित्तं
देयं दीनजनाय च वित्तम् ॥ भज० ॥ १३ ॥

गीता आणि विष्णुसहस्रनाम नेहमीं म्हणत जावें श्रीपति भगवान् विष्णु याच्या स्वरूपाचें निरंतर चिंतन करीत जावें चित्ताला सज्जनांच्या संगतीमध्यें लावीत जावें आपल्याजवळ असलेलें धन दीन, दुबळे, अपंग अशा लोकांना देत जावें वेड्या! गोविंदाला भज. मृत्यु जवळ आला असतां तो श्रीहरीच तुझें संरक्षण करील

यावज्जीवो निवसति देहे
कुशलं तावत्पृच्छति गेहे ।
गतवति वायौ देहापाये
भार्या बिभ्यति तस्मिन्काये ॥ भज० ॥ १४ ॥

जोंपर्यंत या देहात जीव आहे, प्राण आहे, तोंपर्यंत लोक घरांतील कुशल वार्ता विचारतात. देहांतील प्राण निघून गेला म्हणजे देह विद्रूप होऊन पडतो मग त्या देहाजवळ जायला बायको देखील भीते, तर मग इतरांची कथा काय? तात्पर्य, बहुमोलाचा देह वाया जाऊ देऊ नका गोविंदाला भजा तोच तुमचें रक्षण करील दुसरें कांहीं उपयोगी पडणार नाहीं

सुखतः क्रियते रामाभोगः
पश्चाद्धन्त शरीरे रोगः ।
यद्यपि लोके मरणं शरणं
तदपि न मुञ्चति पापाचरणम् ॥ भज० ॥ १५ ॥

स्त्रीविषय सेवन करतांना सुख वाटतें, पण दुःखाची गोष्ट अशी की, पाठीमागून शरीरांत अनेक रोग उत्पन्न होतात. यद्यपि शेवटीं मरण हें ठरलेलेंच आहे सर्व पण लोक दुराचरण — पापाचरण सोडीत नाहींत भल्या गृहस्था!

तू तरी गोविंदाला शरण जा तोच तुझें रक्षण करील 'डुकृञ् करणे' हें रटणें काही उपयोगाला येणार नाहीं

रथ्याकर्पटविरचितकन्थः
पुण्यापुण्यविवर्जितपन्थः ।
नाहं न त्वं नायं लोकस्
तदपि किमर्थं क्रियते शोकः ॥ भज० ॥ १६ ॥

रस्त्यात पडलेल्या चिंध्या गोळा करून – त्या जोडून – वस्त्र धारण करतो पापाचा व पुण्याचाहि मार्ग म्हणजे विचार सोडून देतो तू, मी व हें सारें विश्व, खोटें आहे असेंहि म्हणतो, मग व्यर्थ शोक का बरें करतो ? हें सर्व ज्ञानाचें व वैराग्याचें ढोंग आहे वेड्या ! तू तरी श्रीहरीला शरण जा गोविंदाला भज मृत्यु जवळ येऊन ठेपल्यानंतर त्याच्याशिवाय दुसरें कोणी तुझें रक्षण करणार नाहीं

काहीं ठिकाणी उत्तरार्धाचा पाठ निराळा असल्याचें दिसून येतें 'योगी योगनियोजित चित्तो रमते बालोन्मत्तवदेव' असा तो पाठ आहे त्याचा अर्थ – अष्टांग योगाच्या अभ्यासामध्यें चित्ताला गढवून योगी बनतो लहान मुलाप्रमाणें, वेड्याप्रमाणें किंवा पिशाचाप्रमाणें तो आपल्याच आनंदात रमतो आम्हाला 'भज गोविन्द 'च्या प्रकरणात या पाठापेक्षा वरचाच पाठ अधिक श्रेयस्कर वाटतो

कुरुते गङ्गासागरगमनं
व्रतपरिपालनमथवा दानम् ।
ज्ञानविहीनः सर्वमतेन
मुक्तिं न भजति जन्मशतेन ॥ भज० ॥ १७ ॥

गंगासागर, काशी, प्रयाग, गया इत्यादि तीर्थक्षेत्रांना जातो अनेक व्रतांचें परिपालन करतो दान धर्म करतो पण लक्षात ठेवा, काय वाटेल तें केलें तरी – शेंकडो जन्म घालविले तरी ज्ञानावाचून मोक्ष मिळणार नाहीं हा सर्व शास्त्रांचा सिद्धान्त आहे ज्ञान गुरुकृपेशिवाय मिळणार नाहीं गुरुकृपा ईश्वर-कृपेशिवाय होणार नाहीं व ईश्वरकृपा भक्तीवाचून मिळणार नाहीं म्हणून गोविंदाला भजा त्याला शरण जा तोच तुमचें रक्षण करील दुसरें काहीं उपयोगाला येणार नाहीं

• •

# द्वादशपञ्जरिकास्तोत्रम्

[ कांहीं पुस्तकांतून 'मोहमुद्गर' या प्रकरणांतच द्वादशपंजरिका स्तोत्राचा अन्तर्भाव केलेला दिसून येतो. द्वादशपंजरिकेचीं तेरा पद्यें आहेत. तेराव्या पद्यांत एक प्रकारें फलश्रुतीच वर्णिलेली आहे. याची म्हणण्याची चाल – पद्धत – चर्पटपंजरिकेप्रमाणेंच आहे. मात्र ' भज गोविन्दं ' हें ध्रुवपद या पद्यांना लावलेलें दिसत नाहीं. चर्पटपंजरिकेचा निर्भर भगवद्भक्तीवर आहे, तर द्वादशपंजरिकेचा निर्भर ज्ञान आणि वैराग्य यावर असल्याचें दिसून येतें.

अत्यंत श्रीमंत मनुष्य आपल्या श्रीमंतीच्या घमेंडींत चूर होऊन जातो. मी, माझें धन, माझी बायको व माझीं मुलेंबाळें या पलीकडे त्याची दृष्टीच जात नाहीं अशा लोकांना धनाचे दुष्परिणाम पटवून देऊन त्यांच्यांत वास्तविक कर्तव्याची व आत्मप्रवणतेची जाणीव निर्माण करण्याकरितां आचार्यांनी या स्तोत्राची रचना केली आहे.

याच स्तोत्रांत असलेल्या 'अर्थमनर्थं भावय नित्यं ' या वचनाचा आधार घेऊन कांहीं लोक 'आचार्यांनीं समाजाला असला उपदेश करून निरुद्योगी बनविलें, दरिद्री बनविलें ' असा आक्षेप घेतात, पण तो आक्षेप अज्ञानमूलक आहे. उद्योगानें विपुल धन मिळवून, योग्य प्रकारें दानधर्म न करतां कृपणाप्रमाणें धनाच्या मोहांत गुतलेल्या लोकांना उद्देशून तो उपदेश आहे. निरुद्योगी व आळशी लोकांना तर 'कर्म स्वनुष्ठीयताम्' – आपलें विहित कर्तव्य-कर्म निरलसपणानें करीत रहा' असाच आचार्य उपदेश करीत आहेत. धनाच्या लोभांत व मोहांत गुतलेल्या लोकांनी आचार्यांच्या या द्वादशपंजरिकास्तोत्राचा अवश्य विचार करावा. इतरांनीहि पण हें स्तोत्र मनन करण्यासारखेंच आहे. ]

मूढ जहीहि धनागमतृष्णां
कुरु सद्बुद्धिं मनसि वितृष्णाम् ।
यल्लभसे निजकर्मोपात्तं
वित्तं तेन विनोदय चित्तम् ॥ १ ॥

वेड्या ! धनसंचय करण्याचा लोभ सोडून दे. चांगली बुद्धि ठेव. मनामध्यें वैराग्य धारण कर. आपल्या प्रारब्धकर्मानुसार योग्य मार्गानें जेवढें धन मिळेल तेवढ्यांत आपल्या मनाला संतुष्ट ठेव. ( मनाला रमव आणि देवाला भज ).

अर्थमनर्थं भावय नित्यं
नास्ति ततः सुखलेशः सत्यम् ।
पुत्रादपि धनभाजां भीतिः
सर्वत्रैषा विहिता रीतिः ॥ २ ॥

अर्थ म्हणजे पैसा हा अनर्थकारक आहे त्याच्या परिणामाचा नित्य विचार करा. त्याच्यापासून खऱ्या सुखाचा खरोखर लेशहि मिळणार नाहीं. धनवान् लोकांना आपल्या मुलापासूनहि भीति असते सर्व ठिकाणीं हाच न्याय दिसून येतो

का ते कान्ता कस्ते पुत्रः
संसारोऽयमतीव विचित्रः ।
कस्य त्वं कः कुत आयातस्
तत्त्वं चिन्तय यदिदं भ्रातः ॥ ३ ॥

कोण तुझी बायको ? कोण तुझा पुत्र ? हा संसार अत्यंत विचित्र आहे. तूं कोणाचा आहेस ? कोण आहेस ? कोठून आला आहेस ? भावा रे ! सर्व गोष्टींतील रहस्याचा नीट विचार कर

मा कुरु धनजनयौवनगर्वं
हरति निमेषात्कालः सर्वम् ।
मायामयमिदमखिलं हित्वा
ब्रह्मपदं त्वं प्रविश विदित्वा ॥ ४ ॥

आपल्या धनाचा गर्व करूं नकोस आई बाप, बहिण भाऊ, मुलें बाळें, बायको आणि सोयरेधायरे याच्याबद्दलहि गर्व करूं नकोस तारुण्याचाहि अभिमान बाळगू नकोस एका क्षणात काळ सर्व हिरावून नेईल हा सर्व मायिक प्रपंच मायेचा पसारा सोडून दे आणि ब्रह्मस्वरूप लक्षात घेऊन तेथें तू तल्लीन हो.

कामं क्रोधं लोभं मोहं
त्यक्त्वात्मानं भावय कोऽहम् ।
आत्मज्ञानविहीना मूढा-
स्ते पच्यन्ते नरकनिगूढाः ॥ ५ ॥

काम, क्रोध, लोभ, मोह इत्यादि सर्व विकार सोडून तूं आत्मस्वरूपाचा विचार कर. मी कोण आहे ? हें शोधून पहा. आत्मज्ञानानें विरहित असलेले मूर्ख लोक अनेक काळ नरकामध्यें खितपत पडतात — व अनेक यातना भोगीत असतात.

सुरमन्दिरतरुमूलनिवासः
शय्या भूतलमजिनं वासः ।
सर्वपरिग्रहभोगत्यागः
कस्य सुखं न करोति विरागः ॥ ६ ॥

निवांत देवमंदिरांत वास्तव्य करणें अथवा एखाद्या झाडाच्या मुळाशीं शांतपणें रहाणें, भूतल हींच शय्या, मृगाजिन अथवा वल्कल हेंच वस्त्र, सर्व विषयांचा संग्रह आणि भोग यांचा त्याग, अशा तऱ्हेचें वैराग्य कोणाला सुखकर होणार नाहीं ? तात्पर्य, वैराग्य धारण कर आणि परमेश्वराला भज.

शत्रौ मित्रे पुत्रे बन्धौ
मा कुरु यत्नं विग्रहसन्धौ ।
भव समचित्तः सर्वत्र त्वं
वाञ्छस्यचिराद्यदि विष्णुत्वम् ॥ ७ ॥

शत्रु, मित्र, पुत्र, बंधु वगैरे लोकांशीं भांडणतंटा करूं नकोस आणि कोणाच्या स्नेहांतहि गुंतूं नकोस. तुला जर याच देहीं याच डोळां विष्णु-स्वरूपाचा — सच्चिदानंद ब्रह्मस्वरूपाचा सोहाळा लवकर अनुभवावा अशी इच्छा असेल, तर चित्तामध्यें सर्वत्र समभाव ठेव उच्च-नीच, आपला-परका, श्रीमंत-दरिद्री इत्यादि भेदभाव सोडून दे. देवाला भज.

त्वयि मयि चान्यत्रैको विष्णुर्
व्यर्थं कुप्यसि मय्यसहिष्णुः ।
सर्वस्मिन्नपि पश्यात्मानं
सर्वत्रोत्सृज भेदज्ञानम् ॥ ८ ॥

मल्या गृहस्था ! तूं, मी इतर सर्व लोक, पशु, पक्षी, कीट, पतंग या सर्वांमध्यें एकच परमात्मा भरलेला आहे. सहनशीलतेला सोडून उगीच

माझ्यावर रागावत आहेस मी तुला हिताची गोष्ट सांगत असताना का रागावतोस ? अथवा कोणावर तरी का रागवावें ? टाकून बोलावें ? शिव्या द्याव्यात ? 'सर्वसहिष्णु' असा पाठ घेतल्यास, सर्व सहन करण्याची बुद्धि धारण कर, असा अर्थ करावा सर्वत्र एकच आत्मा विराजमान आहे, हें लक्षात घे कोठेंहि भेदबुद्धि ठेवू नकोस 'भेदाज्ञानम्' असा पाठ असल्यास सर्वत्र भेदबुद्धीनें पहाणें हें अज्ञानाचें लक्षण आहे तें सोडून दे असा अर्थ करावा

प्राणायामं प्रत्याहारं
नित्याऽनित्यविवेकविचारम् ।
जाप्यसमेतसमाधिविधानं
कुर्ववधानं महदवधानम् ॥ ९ ॥

प्राणायाम कर मनाला आणि इंद्रियांना अंतर्मुख कर त्यांना विषयोन्मुख होऊं देऊं नकोस या जगांत नित्य काय आहे, याचा विवेकपूर्वक विचार कर इष्टदेवतेच्या मंत्राचा जप किंवा नामस्मरण करीत आपलें चित्त इष्टदेवतेच्या स्वरूपीं एकाग्र कर इकडे लक्ष दे खूप लक्ष दे उपेक्षा करू नकोस

नलिनीदलगतसलिलं तरलं
तद्वज्जीवितमतिशयचपलम् ।
विद्धि व्याध्यभिमानग्रस्तं
लोकं शोकहतं च समस्तम् ॥ १० ॥

कमळाच्या पानावर पडलेला पाण्याचा थेंब जसा चंचल असतो तसेंच आपलें जीवितहि अतिशय अस्थिर आहे सर्व लोक व्याधींनीं आणि अभिमानानें अथवा अभिमानरूपी व्याधीनें ग्रासल्यामुळें दुःखी आहेत शोकानें व्याकुळ झालेले आहेत ही गोष्ट लक्षात घे आणि ईश्वराला भज

का तेऽष्टादशदेशे चिन्ता
वातुल तव किं नास्ति नियन्ता ।
यस्त्वां हस्ते सुदृढनिबद्धं
बोधयति प्रभवादिविरुद्धम् ॥ ११ ॥

तू अठरा देशाची चिंता कशाला करतोस? वाऱ्याप्रमाणें भटकणाऱ्या गृहस्था! जो तुझ्या हाताला पक्के धरून तुला जन्ममृत्युरहित अशा शुद्ध आत्मतत्त्वाचा अधिकारवाणीनें उपदेश करील असा कोणी नियता अधिकारी गुरु नाहीं काय? अरे! मी तुला शीर तोडून सांगतों जा श्रीहरीला भज

कांहीं ठिकाणीं या पद्याचा पहिला चरण ' का ते कान्ताधनगतचिन्ता ' असा आहे स्त्री आणि धन इत्यादि विषयांची किती चिंता वाहतोस! असा त्याचा अर्थ करावा उत्तरार्धाचे दोन चरण तर अगदींच निराळे आहेत. ' त्रिजगति सज्जनसंगतिरेका, भवति भवार्णवतरणे नौका ' या त्रैलोक्यात फक्त सज्जन संगतीच भवसागरांतून तारून नेण्याला नौकेप्रमाणें उपयुक्त आहे, असा त्याचा अर्थ आहे

[ काही पुस्तकांतून खाली लिहिलेली दोन पद्यें अधिक आढळतात त्यांतील विचार व उपदेश फार महत्त्वाचा असल्यामुळें वाचकांकरिता आम्ही तीं मुद्दाम उद्धृत करीत आहोंत ]

सत्सङ्गत्वे निःसङ्गत्वं
निःसङ्गत्वे निर्मोहत्वम् ।
निर्मोहत्वे निश्चलितत्वं
निश्चलितत्वे जीवन्मुक्तिः ॥ १४ ॥

सत्संगति धारण करा म्हणजे चित्तामध्यें विषयाबद्दल अनासक्ति निर्माण होईल चित्त विषयांचे ठिकाणीं अनासक्त झालें म्हणजे चित्तांतील मोह दूर होईल चित्तांतील मोह दूर झाला म्हणजे चित्त निश्चल होईल चित्त निश्चल होणें म्हणजेच चित्तामध्यें पूर्ण शांति निर्माण होणें अशा रीतीनें चित्तांत पूर्ण शांति निर्माण झाली कीं, जीवन्मुक्ति प्राप्त झालीच समजा चित्ताचें ब्रह्मस्वरूपाशीं समरस होऊन रहाणें हीच जीवन्मुक्तावस्था होय हा श्लोक कारणमाला अलंकाराचें उत्तम उदाहरण आहे

योगरतो वा भोगरतो वा
सङ्गरतो वा सङ्गविहीनः ।
यस्य ब्रह्मणि रमते चित्तं
नन्दति नन्दति नन्दत्येव ॥ १५ ॥

ज्याचें चित्त ब्रह्मस्वरूपीं रमलें, जो जीवनमुक्त अवस्थेला पोहोंचला, तो अष्टांगयोगाच्या अभ्यासांत रमलेला असो अथवा यदृच्छेनें प्राप्त झालेले भोग भोगण्यांत गढून गेलेला दिसत असो तो विषयासक्तीनें विरहित झालेला असो अथवा विषयाच्या आसक्तींत गुरफटलेला दिसो तो कसाहि असो तो आनंदांतच असतो सगदीं पूर्णपणें आनंदांत निमग्न झालेला असतो यांत संशय नाहीं

• •

# मनीषापञ्चकम्

[ काशीस मुक्काम असताना एकदा प्रत्यक्ष विश्वेश्वरानेंच पार्वतीसह चांडालाचा वेष धारण करून शंकराचार्यांना अडविलें व त्याच्यापुढें मोठा मार्मिक व पेंचाचा प्रश्न टाकला। आचार्यांनीं पांच श्लोकांनीं त्या प्रश्नाचें समर्पक उत्तर दिलें. या पांच श्लोकांनाच 'मनीषापंचक' असें म्हणतात. प्रत्येक श्लोकाच्या चौथ्या चरणांत 'मनीषा' या शब्दाचा उपयोग केलेला आहे, म्हणूनच या प्रकरणाला मनीषापंचक हें नांव दिलेलें दिसतें.

विद्वान् आणि ब्रह्मसाक्षात्कारी असा महात्माच गुरु म्हणण्याला योग्य असतो. मग तो वयानें लहान असो अथवा मोठा असो. जातीनें ब्राह्मण असो अथवा शूद्र असो. श्रीमंत असो अथवा दरिद्री असो. स्त्री असो अथवा पुरुष असो. तेथें कोणताहि भेदभाव कल्पिणें योग्य होणार नाहीं असा स्पष्ट अभिप्राय आचार्य या स्तोत्रांत देत आहेत. स्तोत्र सुंदर आणि गंभार आहे.

आचार्यांचीं उत्तरें ऐकून भगवान् श्रीशंकर आणि पार्वती यांनीं चांडाल-वेष टाकला आणि आपल्या मूळ स्वरूपांत शंकराचार्यांना दर्शन दिलें. शंकरांनीं तर आचार्यांना कडकडून आलिंगन दिलें असें गुरुपरंपरेनें कळतें. ]

सत्याचार्यस्य गमने कदाचिन्मुक्तिदायकम् ।
काशीक्षेत्रं प्रति सह गौर्या मार्गे तु शंकरम् ॥ १ ॥
अन्त्यवेषधरं दृष्ट्वा गच्छ गच्छेति चाब्रवीत् ।
शंकरः सोऽपि चाण्डालस्तं पुनः प्राह शंकरम् ॥ २ ॥
अन्नमयादन्नमयमथवा चैतन्यमेव चैतन्यात् ।
द्विजवर दूरीकर्तुं वाञ्छसि किं ब्रूहि गच्छ गच्छेति ॥ ३ ॥

एकदा भगवत्पूज्यपाद श्रीमान् आद्य शंकराचार्य हे मुक्तिदायक अशा श्रीकाशीक्षेत्राला गेले असता पार्वतीसह भगवान् शंकर चांडालाचा वेष धारण करून शंकराचार्यांच्यापुढें रस्त्यांत येऊन उभे राहिले. तेव्हां शंकराचार्य त्याला म्हणाले, "अरे जा, जा दूर हो." तेव्हां चांडाळाचा वेषधारण केलेले भगवान् शंकर शंकराचार्यांना म्हणाले, "हे द्विजश्रेष्ठा यतिवरा! तुम्ही कोणापासून कोणाला दूर करूं इच्छितां? माझ्या देहापासून तुम्ही आपल्या देहाला दूर करूं इच्छितां? क

तुमच्या देहात रहाणाऱ्या चैतन्यापासून माझ्या देहात रहाणाऱ्या चैतन्याला दूर करू इच्छिता ? देहापासून देहाला दूर करू इच्छित असाल तर तुमचाहि देह अन्नमय व माझाहि देह अन्नमयच आहे दोन्ही देह हाडामासाचे पुतळे सारखेच आहेत मग दूर हो म्हणण्यात काय अर्थ आहे ? बरें, चैतन्यापासून चैतन्याला दूर करू इच्छित असाल तर त्यातहि काही अर्थ नाहीं कारण दोन्ही देहातील चैतन्य एकच आहे आणि तें तर स्वरूपत. शुद्ध व निरंजन आहे *मग तुम्ही ' गच्छ गच्छ ' या शब्दानीं कोणाला दूर करू इच्छिता ?"*

किं गङ्गाम्बुनि बिम्बितेऽम्बरमणौ चण्डालवाटीपयः-
पूरे चान्तरमस्ति काञ्चनघटीमृत्कुम्भयोर्वाऽम्बरे ।
प्रत्यग्वस्तुनि निस्तरङ्गसहजानन्दावबोधाम्बुधौ
विप्रोऽयं श्वपचोऽयमित्यपि महान् कोऽयं विभेदभ्रमः ॥४॥

अंबरमणि म्हणजे आकाशातील रत्न, चंद्र किंवा सूर्य त्याचें प्रतिबिंब गंगेच्या पवित्र प्रवाहात पडलें काय किंवा चांडाळाच्या झोंपडीभोंवताली साठलेल्या पाण्यात पडलें काय ! दोन्ही सारखेंच प्रतिबिंबात काय फरक आहे ? किंवा सोन्याच्या कलशात असलेलें आकाश आणि मातीच्या घड्यात गाडग्यामडक्यात असलेलें आकाश यात काय फरक आहे ? आकाश दोन्हीकडे एकच आहे त्याचप्रमाणें सर्वान्तर्यामी प्रशात आणि स्वत सिद्ध, आनंदाचा व ज्ञानाचा जणु काही महासागर असा आत्मा सर्वत्र एकच एक ओतप्रोत भरला असता त्या आत्म्याच्या ठिकाणीं हा ब्राह्मण आणि हा चांडाल, असा हा तुमच्या मनात केवढा द्वैतभ्रम आहे ?

*[ यावर आचार्यांनीं दिलेलीं उत्तरें ]*

जाग्रत्स्वप्नसुषुप्तिषु स्फुटतरा या संविदुज्जृम्भते
या ब्रह्मादिपिपीलिकान्ततनुषु प्रोता जगत्साक्षिणी
सैवाहं न च दृश्यवस्त्विति दृढप्रज्ञाऽपि यस्यास्ति चे-
च्चाण्डालोऽस्तु स तु द्विजोऽस्तु गुरुरित्येषा मनीषा मम ॥ ५ ॥

जाग्रत्, स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थेमध्यें ज्या चिच्छक्तीचा अगदीं स्पष्ट प्रत्यय येत असतो, जागृतीमध्यें ज्ञाता म्हणून मी ची व ज्ञेय म्हणून

घटपटादि पदार्थांची जी प्रतीति येते, तें चिच्छक्तीचेंच स्फुरण होय. स्वप्नामध्येंहि मी आणि इतर अनेक प्रकारचे स्वाप्निक पदार्थ भासत असतात तेंहि चिच्छक्तीचेंच स्फुरण होय. आणि गाढ निद्रेमध्यें 'आतापर्यंत मी सुखानें झोंपलों होतों, मला कांहीं कळलें नाहीं' असें आपण जागे झाल्याबरोबर म्हणत असतो. यावरून सुखाचा व ज्ञानाच्या अभावाचा साक्षी म्हणून मीच्या रूपानें चिच्छक्तीचीच सत्ता विराजत असते त्या चिच्छक्तीलाच 'संविद्' असें म्हणतात.

जी चिच्छक्ति ब्रह्मदेवापासून तो किडामुंगीपर्यंत सर्व प्राण्यांच्या देहांत ओतप्रोत भरलेली आहे, आणि जी सर्व जगाची साक्षी आहे, ती चिच्छक्तीच मी आहे. मी देह-इंद्रियादि दृश्यजडवस्तुस्वरूप नव्हे. असा ज्याला पूर्ण अनुभव आला — अशी ज्याची खात्री झाली, तो चाण्डाल असो अथवा द्विज म्हणजे वैश्य, क्षत्रिय अथवा ब्राह्मण कोणीहि असो, तो गुरूच होय अशी माझी बुद्धि आहे.

ब्रह्मैवाहमिदं जगच्च सकलं चिन्मात्रविस्तारितं
सर्वं चैतदविद्यया त्रिगुणयाऽशेषं मया कल्पितम् ।
इत्थं यस्य दृढा मतिः सुखतरे नित्ये परे निर्मले
चाण्डालोऽस्तु स तु द्विजोऽस्तु गुरुरित्येषा मनीषा मम ॥ ६ ॥

मी ब्रह्मस्वरूपच आहें आणि हें सर्व जगहि ब्रह्मस्वरूपच आहे. हें केवळ चैतन्याचा विस्तार किंवा विलास मात्र आहे. आणि हें सर्व मीच त्रिगुणात्मक — सत्व, रज आणि तम या तीन गुणांनी बनलेल्या अविद्येनें, पूर्णपणें [illegible] ठिकाणीं कल्पिलेलें आहे. अशारीतीनें नित्य निर्मळ परब्रह्मस्वरूपाविषयीं ज्याचा दृढ निश्चय झाला, तो द्विज म्हणजे ब्राह्मण असो अथवा चांडाळ असो, माझा गुरूच होय अशी माझी बुद्धि आहे. [illegible] याचा अर्थ [illegible]

शश्वन्नश्वरमेव विश्वमखिलं निश्चित्य वाचा गुरोः
नित्यं ब्रह्म निरन्तरं विमृशता निर्व्याजशान्तात्मना ।
भूतं भावि च दुष्कृतं प्रदहता संविन्मये पावके
प्रारब्धाय समर्पितं स्ववपुरित्येषा मनीषा मम ॥ ७ ॥

हें सर्व विश्व निरंतर विनाशशील आहे हें [illegible] गुरूच्या [illegible]
लक्षात घेऊन जो कोणी निष्कपट अथवा निरोगी [illegible]

नित्य ब्रह्माचा विचार करीत राहील, तसेंच संचित आणि क्रियमाण कर्मांचा ज्ञानरूपी अग्नीमध्यें दाह करून ज्यानें आपला देह प्रारब्धकर्माला अर्पण केला तो ब्राह्मण असो अथवा चांडाल जातींत जन्मलेला असो, तो माझा गुरूच आहे अशी माझी दृढ बुद्धि आहे मी त्याला गुरुप्रमाणें मानतों असा याचा अर्थ ( प्रारब्धाला देह अर्पण करणें म्हणजे प्रारब्धकर्मानें जीं सुखें अथवा दु खें प्राप्त होतील तीं भोगीत रहाणें दु खानें उद्विग्न व्हावयाचें नाहीं व सुखाचाहि लोभ ठेवावयाचा नाहीं )

या तिर्यङ्नरदेवताभिरहमित्यन्तः स्फुटा गृह्यते
यद्भासा हृदयाक्षदेहविषया भान्ति स्वतोऽचेतनाः ।
तां भास्यैः पिहितार्कमण्डलनिभां स्फूर्तिं सदा भावयन्
योगी निर्वृतमानसो हि गुरुरित्येषा मनीषा मम ॥ ८ ॥

पशु, पक्षी, मानव आणि देव इत्यादि सर्व प्राण्याकडून ज्या चिच्छक्तीचें, अतरगात मी म्हणून स्पष्ट ग्रहण केलें जातें, ज्या चिच्छक्तीच्या प्रकाशानेंच देह, इद्रियें, मन आणि शब्दस्पर्शादि विषय भासत असतात, कारण ते स्वत अचेतन आहेत सूर्यमडल जसें डोळ्यापुढें असलेल्या मेघमडलानें किंवा वस्त्रा दिकाच्या पटलानें झाकल्यासारखें वाटतें तसेंच तें चैतन्यतत्त्वहि स्वयप्रकाश व ती चिच्छक्ति सर्वव्यापी असूनहि भास्य पदार्थांच्या व्यवधानानें प्रतीतीला येत नाहीं स्फूर्तिरूपानें शुद्ध चैतन्यच सदा सर्वत्र विराजमान आहे अशी सर्वकाळ भावना ठेवून ज्या योग्याचें मन पूर्ण सुखी झालें आहे, शात समाहित झालें आहे, तो कोणीहि असो, तो गुरूच आहे अशीही माझी दृढ भावना आहे

यत्सौख्याम्बुधिलेशलेशत इमे शक्रादयो निर्वृता
यच्चित्ते नितरां प्रशान्तकलने लब्ध्वा मुनिर्निर्वृतः ।
यस्मिन्नित्यसुखाम्बुधौ गलितधीर्ब्रह्मैव न ब्रह्मविद्
यः कश्चित्स सुरेन्द्रवन्दितपदो नूनं मनीषा मम ॥ ९ ॥

परब्रह्म हें अपार महासागराप्रमाणें आनदानें पूर्ण भरलेलें आहे त्याच्या आनदाचा अत्यत अल्प अश प्राप्त करून घेऊनच इद्रादि देवहि पूर्ण आनदी बनलेले आहेत ज्याचे सर्व व्यापार अत्यत शात झाले आहेत अशा एकाग्र

चित्तामध्यें, ज्याचा अनुभव घेऊन मुनि म्हणजे मननशील महात्मा पूर्ण सुखी बनतो. नित्य निरतिशय आनंदाचा महासागर असलेल्या त्या चित्तत्वामध्यें ज्याची बुद्धि पूर्णपणें विलीन झाली, तो ब्रह्मच झाला, ब्रह्मविद् नव्हे. कारण ब्रह्मविद् या शब्दांत ब्रह्म आणि ब्रह्मवेत्ता हा भेदभाव शिल्लक रहातोच. म्हणून ब्रह्मस्वरूपीं ज्याची बुद्धि पूर्णपणें समरस झाली तो ब्रह्मच होय असा जो कोणी महात्मा असेल त्याच्या चरणीं देवांच्या राजानेंहि वंदन करावें. तो कोणीहि असो, तो गुरूच होय असा माझा स्पष्ट अभिप्राय आहे



# गुर्वष्टकम्

[ 'गृणाति ज्ञानं', आणि 'गिरति अज्ञानं' इति गुरुः अशी गुरु शब्दाची व्युत्पत्ति आहे आत्मज्ञानाचा प्रकाश देऊन अज्ञानाचा निरास करणारा सद्गुरु किंवा भगवान् श्रीहरि हा गुरु शब्दाचा अर्थ आहे. सद्गुरूंच्या अथवा श्री-हरीच्या चरणकमलीं ज्याचें मन सलग्न झालें नाहीं, त्याचा जन्म व्यर्थ होय. जन्माला येऊन जें मिळवावयाचें तें जर मिळविलें नाहीं तर त्या जन्माचा आणि वित्त, वैभव, विद्या, कीर्ति इत्यादि इतर गोष्टींचा काय उपयोग? म्हणून सद्गुरूंच्या चरणीं अथवा श्रीहरीच्या चरणीं मन सलग्न करा, असा उपदेश आचार्य या स्तोत्रांत करीत आहेत. स्तोत्रांतील श्लोकांच्या तिसऱ्या चरणांत 'गुरोरङ्घ्रिपद्मे' यापेक्षां 'हरेरङ्घ्रिपद्मे' असाहि पाठ कांहीं पुस्तकांतून आढळतो. वाचकांनीं दोन्ही पाठांचा उपयोग करावयास हरकत नाहीं. या स्तोत्राचें वृत्त भुजंगप्रयात आहे. ]

शरीरं सुरूपं तथा वा कलत्रं
यशश्चारु चित्रं धनं मेरुतुल्यम् ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरङ्घ्रिपद्मे
ततः किं ततः किं ततः किं ततः किम् ॥ १ ॥

शरीर देखणें आहे. तशीच बायकोहिपण सुंदर आहे. वक्ता, लेखक, विद्वान्, प्रेमळ नेता, लोककल्याणकर्ता इत्यादि रूपानें अनेक प्रकारची कीर्ति आहे, पर्वतप्राय धनाच्या राशि आहेत, सर्व कांहीं आहे; पण मन जर सद्गुरूच्या,

श्रीहरीच्या चरणकमलीं सलग्न झालेलें नसेल, तर तें सर्व व्यर्थ होय त्याचा काय उपयोग ?

कलत्रं धनं पुत्रपौत्रादि सर्वं
गृहं बान्धवाः सर्वमेतद्धि जातम् ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरङ्घ्रिपद्मे, ततः किं० ॥ २ ॥

बायको आहे पैसा आहे मुलें आहेत नातवडें पतवडें वगैरे सर्व काहीं आहे बगले आहेत आप्त इष्ट सोयरे धायरे इत्यादि सर्व काहीं झालें आहे, पण सद्गुरूच्या अथवा श्रीहरीच्या चरणकमलीं मन लागलें नाहीं तर या सर्वांचा काय उपयोग ?

षडङ्गादिवेदो मुखे शास्त्रविद्या
कवित्वादि गद्यं सुपद्यं करोति ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरङ्घ्रिपद्मे, ततः किं० ॥ ३ ॥

सागोपाग वेदाचें अध्ययन केलें शास्त्रविद्या मुखोद्गत केली उत्तम गद्याची व पद्याचीहि रचना करतो कवि म्हणून मरयात झाला, पण सद्गुरूच्या अथवा श्रीहरीच्या चरणीं मन जर लागलें नाहीं, तर या सर्व गुणाचा काय उपयोग ?

विदेशेषु मान्यः स्वदेशेषु धन्यः
सदाचारवृत्तेषु मत्तो न चान्यः ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरङ्घ्रिपद्मे ततः किं० ॥ ४ ॥

परदेशामध्यें मान्यता पावला स्वदेशात धन्य झाला सदाचारानें वाग ण्यात आणि नीतिन्यायानें चालण्यात माझ्यासारखा दुसरा कोणी नाहीं असेंहि म्हणतो पण मन सद्गुरूच्या अथवा श्रीहरीच्या चरणकमलीं सलग्न झालें आहे काय ? तें जर तसें असेल, तर सर्व काहीं ठीक आहे नाहीं तर या सर्वांचा काय उपयोग ?

क्षमामण्डले भूपभूपालवृन्दैः
सदा सेवितं यस्य पादारविन्दम् ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरङ्घ्रिपद्मे, ततः किं० ॥ ५ ॥

# अवतार मेहरबाबा



Those who lose their All in Me,
find their all in Me ever-after
– Meher Baba

जो मुझमे अपना सर्वस्व खोते है वे
उसके पश्चात अपना सर्वस्व मुझमे पाते है।
– मेहरबाबा

## ब्रह्मीभूत श्रीकेवलानन्दस्वामी




नमः श्रीकेवलानन्दगुरवे ब्रह्मरूपिणे ।
यत्पादाम्बुरुहद्वन्द्वसेवाऽऽनन्दप्रदायिनी ॥

सपूर्ण भूमडलाचा अधिपति झाला सम्राट् झाला राजे रजवाड्यानीं ज्याच्या रणकमलाची सर्वकाळ सेवा केली हें सर्व काही झालें, पण मन जर श्रीहरीच्या अथवा सद्गुरूंच्या चरणकमलीं सलग्न झालें नसेल तर याचा काय उपयोग ?

यशो मे गतं दिक्षु दानप्रतापा-
ज्जगद्वस्तु सर्वं करे मत्प्रसादात ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरङ्घ्रिपद्मे, ततः किं० ॥ ६ ॥

माझ्या दानधर्मानें व पराक्रमानें माझी कीर्ति दाही दिशा पसरली माझ्या कृपेनें कोणतीहि जगातील वस्तु हस्तगत होऊं शकते ! ( असें अभिमानानें बोलतो ) पण मन श्रीगुरूंच्या अथवा श्रीहरीच्या चरणीं रत झालेलें नसेल तर याचा काय उपयोग ? हें सर्व व्यर्थ होय

न भोगे न योगे न वा वाजिराजौ
न कान्तामुखे नैव वित्तेषु चित्तम् ।
मनश्चेन्न लग्नं गुरोरङ्घ्रिपद्मे, ततः किं० ॥ ७ ॥

माझें मन आता भोगात रमत नाहीं व योगातहि रमत नाही घोड्याची पागा माझ्या मनाला रुचत नाहीं व प्रिय पत्नीचें मुख अवलोकन करीत बस ण्यातहि माझ्या मनाला सुख वाटत नाहीं वित्तवैभवातहि माझें मन रमत नाहीं इतकें वैराग्य आहे, पण आचार्य म्हणतात, बाबा रे ! तुझें तें मन श्रीहरीच्या अथवा सद्गुरूंच्या चरणकमलीं तरी सलग्न झालें आहे का ? तसें जर नसेल तर मग हें वैराग्यहि काय उपयोगाचें ?

अरण्ये न वा स्वस्य गेहे न कार्ये
न देहे मनो वर्तते मे त्वनर्घ्ये ।
मनश्चेन्न लग्नं हरेरङ्घ्रिपद्मे, ततः किं० ॥ ८ ॥

अरण्यामध्येंहि माझें मन रमत नाहीं व स्वतःच्या घरातहि माझें मन लागत नाहीं कोणत्याहि कामात माझें मन लागत नाहीं माझा देह इतका सुंदर बहुमोलाचा, पण त्याचीहि आसक्ति आता माझ्या मनात उरली नाहीं, इतका मी विरक्त झालों आहे असें म्हणतो, पण श्रीहरीच्या चरणीं तें मन लागलें असेल तर ठीक आहे नाहीं तर या वैराग्याचा काय उपयोग ?

अनर्घ्याणि रत्नानि भुक्तानि सम्यक्
समालिङ्गिता कामिनी यामिनीषु ।
मनश्चेन्न लग्नं हरेरङ्घ्रिपद्मे
ततः किं ततः किं० ॥ ९ ॥

बहुमोलाचीं रत्नें अर्थात् रत्नजडित सुवर्णाचे अलंकार व केवळ रत्नांचेहि हार अंगावर आणि गळ्यांत घालून त्यांचें यथेच्छ सुख अनुभविलें, कांतेच्या समागमांत रात्रीच्या रात्रीं घालविल्या, सगळें कांहीं केलें पण श्रीहरीच्या अथवा सद्गुरूंच्या चरणकमलीं मन जर संलग्न झालें नसेल तर त्या सर्व सुखांचा काय उपयोग ? ( वस्तुतः आठ श्लोकांनींच या अष्टकाची पूर्णता झाली आहे, तथापि कांहीं पुस्तकांत हा नववा श्लोक अधिक दिसून आला. वाचकांच्या विचारासाठीं तो आम्ही उद्धृत केला आहे. )

गुरोरष्टकं यः पठेत्पुण्यदेही
यतिर्भूपतिर्ब्रह्मचारी च गेही ।
लभेद्वाञ्छितार्थं पदं ब्रह्मसंज्ञं
गुरोरुक्तवाक्ये मनो यस्य लग्नम् ॥ १० ॥

मोठ्या पुण्यानें नरदेहाचा लाभ झाला असतां जो कोणी या गुर्वष्टकाचें पठण करील आणि ज्याचें मन गुरूंनीं सांगितलेल्या वाक्यांवर "तत्त्वमसि" इत्यादि महावाक्यांच्या अर्थावर संलग्न झालेलें असेल, तो कोणीहि असो, तो ब्रह्मचारी असो अथवा गृहस्थाश्रमी असो, तो संन्यासी असो अथवा सम्राट् असो, त्याला अभीष्ट असलेलें, ब्रह्म या नांवानें ओळखलें जाणारें, नित्य आणि निरतिशय आनंदरूप असलेलें उत्तमपद प्राप्त होईल.

• •

## धन्याष्टकम्

[ आपण धन्य व्हावें असें कोणास वाटत नाहीं ? सर्वांसच आपण धन्य व्हावें असें वाटत असतें; पण धन्य कोणास म्हणावें ? अथवा धन्यता कशानें प्राप्त होते हेंच नेमकें माहीत नसल्यामुळें धन्य होण्याची इच्छा असूनहि

आपणांस धन्य होता येत नाहीं. आचार्यांनीं धन्याष्टकांत धन्यता संपादन करण्याचें मार्गदर्शन फारच बहारीनें केलेलें आहे. या धन्याष्टकाचें मनन करा. धन्य कोणास म्हणावें हें ओळखा आणि धन्य मनुष्याला दिलेलीं विशेषणें लक्षांत घेऊन त्यांचा अभ्यास करा. ते गुणधर्म आपणहि संपादन करा म्हणजे आपणहि धन्य व्हाल. नवव्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें आपण परमहंस व्हाल. आपला जयजयकार होईल आपण सर्व दुःखांतून मुक्त व्हाल. आणि दहाव्या श्लोकांत वर्णन केल्याप्रमाणें हें सर्व जगच नंदनवन असल्याचें आपल्या प्रतीतीला येईल. ]

तज्ज्ञानं प्रशमकरं यदिन्द्रियाणां
तज्ज्ञेयं यदुपनिषत्सु निश्चितार्थम् ।
ते धन्या भुवि परमार्थनिश्चितेहाः
शेषास्तु भ्रमनिलये परिभ्रमन्ति ॥ १ ॥

*ज्या ज्ञानानें इंद्रियें विषयांपासून परावृत्त होतात आणि मन शांत होतें तेंच खरें ज्ञान होय ज्याच्या स्वरूपाचा निर्णय उपनिषदांतून केलेला आहे तें परमात्मतत्त्वच खरें ज्ञेय आहे. हें ज्ञान संपादन करून ज्यांनीं आत्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतला ते या भूलोकीं धन्य होत ज्यांची सर्व हालचाल परमार्थाच्या प्राप्तीकरिताच निश्चितपणें चालू असते तेच लोक खरोखर या भूमंडलावर धन्य होत बाकीचे मात्र सर्व भ्रांतीच्या चक्रव्यूहांत भटकत असतात.*

आदौ विजित्य विषयान्मदमोहराग-
द्वेषादिशत्रुगणमाहृतयोगराज्याः ।
ज्ञात्वा मतं समनुभूय परात्मविद्या-
कान्तासुखं वनगृहे विचरन्ति धन्याः ॥ २ ॥

प्रथम विषयांना व मद, मोह, राग आणि द्वेष इत्यादि अंतस्थ शत्रूंना जिंकून ज्यांनीं स्वानंदसाम्राज्य संपादन केलें आहे आणि अभीष्ट असलेल्या ब्रह्मविद्यारूपी कांतेच्या सुखाचा पूर्ण आस्वाद घेऊन वनरूपी गृहामध्यें जे आपलें जीवन घालवितात ते महात्मे खरोखर धन्य होत. अथवा घरालाहि वन समजून निरंतर ब्रह्मविद्येच्या सुखाचा जे आस्वाद घेतात ते धन्य होत.

त्यक्त्वा गृहे रतिमधोगतिहेतुभूता-
मात्मेच्छयोपनिषदर्थरसं पिबन्तः ।
वीतस्पृहा विषयभोगपदे विरक्ता
धन्याश्चरन्ति विजनेषु विमुक्तसङ्गाः ॥ ३ ॥

अधोगतीला कारणीभूत असलेली घरादाराबद्दलची आसक्ति सोडून आत्मप्राप्तीसाठीं उपनिषदें, ब्रह्मसूत्रें, गीता इत्यादि ग्रंथांच्या अर्थरूपी रसाचें किंवा उपनिषदांचें तात्पर्य असलेल्या ब्रह्मरूपी रसाचें जे कोणी सेवन करतात, तसेंच निःस्पृह राहून विषयभोगाच्या स्थानापासून जे विरक्त होतात – दूर रहातात आणि सर्वसंगपरित्याग करून जे एकांतामध्यें आत्मचिंतन करीत फिरतात ते खरोखर धन्य होत.

त्यक्त्वा ममाहमिति बन्धकरे पदे द्वे
मानावमानसदृशाः समदर्शिनश्च ।
कर्तारमन्यमवगम्य तदर्पितानि
कुर्वन्ति कर्मपरिपाकफलानि धन्याः ॥ ४ ॥

*अहंता आणि ममता या दोन्ही गोष्टी बंधनकारक आहेत. या दोहोंचाहि त्याग करून जे कोणी मान आणि अपमान सारखे समजतात व सर्वांच्या ठिकाणीं समदृष्टि ठेवतात. कर्ताकरविता तो एक परमात्माच आहे असें समजून जे सर्व कर्मांच्या परिणामाचीं फळें त्यालाच अर्पण करतात, खरोखर ते लोक धन्य होत.*

त्यक्त्वैषणात्रयमवेक्षितमोक्षमार्गा
भैक्षामृतेन परिकल्पितदेहयात्राः ।
ज्योतिः परात्परतरं परमात्मसंज्ञं
धन्या द्विजा रहसि हृद्यवलोकयन्ति ॥ ५ ॥

लौकिकाची, स्त्रीपुत्रादिकांची व धनाची आकांक्षा ( एषणात्रय ) सोडून जे मोक्षमार्गाचाच विचार करीत असतात, तसेंच भिक्षारूपी अमृताचें अथवा यदृच्छेनें अयाचितवृत्तीनें प्राप्त होणाऱ्या अन्नाचें सेवन करून जे आपली देहयात्रा – उपजीविका चालवितात, जे श्रेष्ठापेक्षांहि अधिक श्रेष्ठ असलेल्या, परब्रह्म परमात्मा या नांवानें ओळखल्या जाणाऱ्या, तेजाचें – आत्मचैतन्याचें

हृदयामध्यें एकान्तात अवलोकन करतात ते द्विज खरोखर धन्य होत (इतर नुसते नामधारी समजावेत)

नाऽसन्न सन्न सदसन्न महन्न चाणु
न स्त्री पुमान्न च नपुंसकमेकबीजम् ।
यैर्ब्रह्म तत्सममुपासितमेकचित्तैर्
धन्या विरेजुरितरे भवपाशबद्धाः ॥ ६ ॥

जें असत् नाहीं, सत् नाहीं, सत् व असत् उभयस्वरूपहि नाहीं, जें स्थूल नाहीं व सूक्ष्महि नाहीं, स्त्री नाहीं, पुरुष नाहीं व नपुंसकहि नाहीं (पण काहींच नाहीं, शून्य आहे असें मात्र समजू नका कारण) विश्वरूपी विशाल वृक्षाचें तें एकमात्र बीज आहे जगाचें तें कारण आहे अशा त्या ब्रह्माची ज्यानीं उत्तम उपासना केली व चित्त एकाग्र केलें ते धन्य होत तेच या जगात शोभतात व बाकीचे ससारपाशात गुतून पडतात ससारपाशानीं बद्ध होतात

अज्ञानपङ्कपरिमग्नमपेतसारं
दुःखालयं मरणजन्मजरावसक्तम् ।
संसारबन्धनमनित्यमवेक्ष्य धन्या
ज्ञानासिना तदवशीर्य विनिश्चयन्ति ॥ ७ ॥

जें अज्ञानरूपी चिखलानें बरबटलेलें आहे, ज्यात काही सार नाहीं, रस नाहीं, राम नाहीं, दु खाचें जणु वसतिस्थान जन्म मृत्यु वार्धक्य इत्यादि विकारानीं ग्रासलेलें आणि अनित्य आहे, असें हें ससाराचें बधन लक्षात घेऊन ज्ञानरूपी शस्त्रानें जे कोणी त्याला तोडून टाकतात व आत्मतत्त्वाचा निश्चय करून घेतात ते धन्य होत

शान्तैरनन्यमतिभिर्मधुरस्वभावै-
रेकत्वनिश्चितमनोभिरपेतमोहैः ।
साकं वनेषु विदितात्मपदस्वरूपैस्
तद्वस्तु सम्यगनिशं विमृशन्ति धन्याः ॥ ८ ॥

जे शात आहेत, ज्याची बुद्धि ब्रह्मस्वरूपीं तन्मय झालेली आहे, ज्याचा स्वभाव गोड आहे, अर्थात् जे दयाळु मायाळु आहेत, ज्यानीं आपल्या शुद्ध

अंतःकरणानें एकमेव अद्वितीय आत्मतत्त्वाचा दृढ निश्चय केलेला आहे, ज्यांच्या बुद्धींतील मोह नाहींसा झालेला आहे, सच्चिदानंदरूप आत्मपदाच्या स्वरूपाचा ज्यांनीं साक्षात्कार करून घेतला आहे, अशा अत्यंत थोर महात्म्यांच्याबरोबर वनामध्यें – एकान्तांत बसून, रात्रंदिवस अध्यात्मतत्त्वाची जे उत्तम चर्चा करतात आणि आत्मपदाला आत्मसात् करून घेतात ते खरोखर धन्य होत.

अहिमिव जनयोगं सर्वदा वर्जयेद्यः
कुणपमिव सुनारीं त्यक्तुकामो विरागी।
विषमिव विषयान् यो मन्यमानो दुरन्तान्
जयति परमहंसो मुक्तिभावं समेति ॥ ९ ॥

सर्पाप्रमाणें जनसंपर्कापासून जो नेहमीं दूर रहातो, वैराग्यबुद्धीनें सुंदर स्त्रीच्या देहालाहि प्रेताप्रमाणें जो उपेक्षितो, विषय हे परिणामीं विषाप्रमाणें घातक आहेत असें समजून जो त्यांना दूर सारतो, तो धन्य होय अशा परमहंसाचा– अत्यंत शुद्ध – समदर्शी महात्म्याचा सर्वत्र जयजयकार होतो. तोच मोक्षपदाला – परमात्मपदाला प्राप्त होतो.

सम्पूर्णं जगदेव नन्दनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमा
गाङ्गं वारि समस्तवारिनिवहः पुण्याः समस्ताः क्रियाः।
वाचः प्राकृतसंस्कृताः श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी
सर्वावस्थितिरस्य वस्तुविषया दृष्टे परब्रह्मणि ॥ १० ॥

ज्याला परब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला त्याला सर्व जगच नंदनवनासारखें दिसतें. सर्वच वृक्ष कल्पवृक्षासारखे होतात. जगांतील सारे जलाशय त्याला गंगोदक बनतात व त्याचीं सर्व कर्में हीं पुण्यकर्मेंच होतात. त्याचें बोलणें संस्कृत असो अथवा प्राकृत असो. तें उपनिषदासारखें बोधप्रदच असतें. संपूर्ण पृथ्वी ही त्याची वाराणसी म्हणजे मुक्तिक्षेत्र काशीच असते व तो कोणत्याहि अवस्थेंत असला तरी त्याची ती अवस्था समाधिस्थिति अथवा ब्रह्मस्वरूपीं एकरूप होऊन रहाणेंच होय.

• •

# कौपीनपञ्चकम्

[ खरा भाग्यवान् कोण ? ज्याला मुलेंबाळें आहेत, घरदार आहे, धन-दौलत आहे, उत्तम बायको आहे, मानमान्यता आहे, विद्वत्ता आहे, आरोग्य आहे तो भाग्यवान् समजावा, असा सर्वसाधारण लोकव्यवहार आहे; पण हें खरें भाग्याचें लक्षण नव्हे. कारण हें सर्व असूनहि ज्ञान, वैराग्य व भक्ति नसेल तर तो भाग्यवान् नव्हे, करटाच समजावा. खरा भाग्यवान् कोण ? या प्रश्नाचें उत्तर आचार्यांच्या या कौपीनपंचकात आपणास मिळेल. 'कौपीनवन्त' हें पद किंवा हा शब्द पांचहि श्लोकाच्या चौथ्या चरणात आलेला असल्यामुळें याला 'कौपीनपंचक' असें नाव पडलें. कांही ठिकाणी याला 'यतिपंचक' असेंहि नाव दिलेलें आढळतें. ]

वेदान्तवाक्येषु सदा रमन्तो
भिक्षान्नमात्रेण च तुष्टिमन्तः ।
विशोकमन्तःकरणे रमन्तः
कौपीनवन्तः खलु भाग्यवन्तः ॥ १ ॥

जे सदा सर्वकाळ केवळ वेदांतवाक्यामध्यें अर्थात् वेदांतवाक्यामध्यें सांगितलेल्या अर्थाचें मनन करण्यामध्यें रमतात, आणि केवळ भिक्षेमध्यें जें अन्न मिळेल त्यातच संतोष मानतात, ( भिक्षेचा अधिकार नसल्यास केवळ यदृच्छेनें जें मिळेल त्यातच जे संतोष मानतात असाहि अर्थ विवक्षित आहेच ) जे कोणत्याहि प्रकारचा कधी शोक करीत नाहींत, जे आपल्याच अंतःकरणात आत्मस्वरूपीं रममाण झालेले असतात, असे ते कौपीन म्हणजे लंगोटी धारण करणारे लोकच खरोखर भाग्यवन्त असतात. ( या ठिकाणीं कौपीन हा शब्द उपलक्षण म्हणजे दिग्दर्शन करणारा आहे. यदृच्छेनें प्राप्त झालेलें अल्पस्वल्प वस्त्र असाहि त्याचा अर्थ करावा. या ठिकाणीं ज्ञान, वैराग्य आणि भक्ति हें प्राधान्यानें विवक्षित आहे. हें पराकाष्ठेनें ज्याच्या ठिकाणीं असेल तो भाग्यवान् असा याचा अर्थ आहे. )

मूलं तरोः केवलमाश्रयन्तः
पाणिद्वयं भोक्तुममन्त्रयन्तः ।

कन्थामिव श्रीमपि कुत्सयन्तः
कौपीनवन्तः खलु भाग्यवन्तः ॥ २ ॥

जे केवळ झाडाच्या मुळाचाच आश्रय करून रहातात, दोन्ही हातांची ओंजळ हेंच ज्यांनीं आपलें भोजनपात्र बनविलेलें असतें, गोधडीप्रमाणें लक्ष्मी-चाहि वैराग्यानें ज्यांनीं तिरस्कार केलेला असतो, ते कौपीनवंत लोकच खरोखर भाग्यवंत असतात.

देहादिभावं परिमार्जयन्त
आत्मानमात्मन्यवलोकयन्तः ।
नान्तं न मध्यं न बहिः स्मरन्तः
कौपीनवन्तः खलु भाग्यवन्तः ॥ ३ ॥

देहाभिमानाचें अथवा देह हाच आत्मा अशा तऱ्हेचें जें अंतःकरणांत अज्ञान असतें त्या अज्ञानाचें विवेकानें जे परिमार्जन करतात, अर्थात् अहंकाराचें अथवा देहात्मभावाचें विवेकानें जे निरसन करतात, जे आपल्या अंतः-करणांतच आत्मस्वरूपाचें अवलोकन करीत असतात, रात्रंदिवस ब्रह्मस्वरूपा-मध्यें चित्त रमल्यामुळें ज्याना आदि, अंत, आंत, मध्यें, बाहेर वगैरे कोणत्याहि प्रकारचें स्मरण होत नसतें, आत्मस्वरूपाव्यतिरिक्त कशाचेंहि भान उरत नसतें ते कौपीनवंत म्हणजे लंगोटी धारण करणारे लोकच खरोखर भाग्यवंत असतात.

स्वानन्दभावे परितुष्टिमन्तः
संशान्तसर्वेन्द्रियवृत्तिमन्तः ।
अहर्निशं ब्रह्मणि ये रमन्तः
कौपीनवन्तः खलु भाग्यवन्तः ॥ ४ ॥

आत्मानंदस्वरूपामध्यें जे संतुष्ट होऊन रहातात व ज्यांच्या सर्व इंद्रियांचे व्यापार पूर्णपणें शांत झालेले असतात, 'सशान्त' याच्यापेवजीं कांहीं पुस्तकांत 'स्वशान्त' असा पाठ दिसतो. स्व म्हणजे आत्मा. आत्मस्वरूपीं ज्यांच्या सर्व इंद्रियवृत्ति शांत झालेल्या आहेत असे आणि रात्रंदिवस ब्रह्मस्वरूपामध्यें जे रमतात ते कौपीनवंत म्हणजे लंगोटी घालणारे लोकच खरोखर भाग्यवंत असतात.

पञ्चाक्षरं पावनमुच्चरन्तः
पतिं पशूनां हृदि भावयन्तः ।
भिक्षाशना दिक्षु परिभ्रमन्तः
कौपीनवन्तः खलु भाग्यवन्तः ॥ ५ ॥

ॐ नमःशिवाय अथवा नमःशिवाय हा श्रीशंकराचा पंचाक्षरी मंत्र अत्यंत पावन म्हणजे पवित्र करणारा आहे. (तो सर्व पापांचें निरसन करणारा आहे.) याचा जे नेहमीं जप करीत रहातात आणि सर्व जीवांचा पालक जो पशुपतीश्वर भगवान् विश्वनाथ याचें हृदयामध्यें निरंतर चिंतन करीत रहातात, तसेंच यदृच्छेनें मात्र झालेलें अथवा भिक्षेमध्यें मिळालेलें अन्न सेवन करून इतस्ततः सर्व दिशांना परिभ्रमण करीत रहातात ते कौपीनवंत म्हणजे लंगोटी धारण करणारे लोकच खरोखर भाग्यवंत होत.



## मायापञ्चकम्

[ माया म्हणजे काय असा प्रश्न मोठमोठे विद्वानहि करीत असतात. त्यांना माया हें एक मोठें कोडेंच वाटत असतें. अनेक तत्त्ववेत्ते आपआपल्या परीनें हें कोडें उलगडण्याचा प्रयत्न करीत असतात. त्यांतल्या त्यांत आचार्यांनी मायेचें स्वरूप अधिक विशद करून सांगण्याचा प्रयत्न केला आहे. तोच सक्षेपानें आचार्यांनी या पांच श्लोकांत मांडला आहे.

माया = मीयते अपरोक्षमिव क्रियते विश्वं अनया इति माया, अशी माया शब्दाची व्युत्पत्ति आहे. विश्वप्रपंच तत्त्वतः सत्य नसूनहि आपल्याला तो प्रत्यक्ष सत्यस्वरूप असल्यासारखा दिसतो. हें कार्य ज्या कारणामुळें घडून येतें त्यालाच माया असें म्हणतात. माया ही एक प्रकारची शक्ति आहे. ही स्वरूपतः अदृश्य आहे; पण विद्युच्छक्तिप्रमाणें तिचीं कार्यें मात्र दृष्टीस पडत असतात.

अविद्या, अज्ञान, प्रकृति अव्यक्त प्रधान हे शब्द मायेचे पर्यायवाचक आहेत. अविद्या आणि अज्ञान हे शब्द मायेचे पर्याय असले तरी तेवढ्यावरून माया हा अभावरूप पदार्थ आहे असें कोणी समजूं नये. अविद्या, अज्ञान या शब्दांचा अर्थ सामान्यपणें विद्येचा आणि ज्ञानाचा अभाव असा केला जातो, पण या

ठिकाणीं तसा अर्थ विवक्षित नाहीं. अविद्या किंवा अज्ञान या ठिकाणचा नञ् ( अ ) हा अभाववाचक नसून तो विरोधाचा वाचक आहे विद्येनें अविद्येचा, ज्ञानानें अज्ञानाचा निरास होत असल्यामुळें मायेला अविद्या आणि अज्ञान हे शब्द लागू पडतात. विद्या आणि अविद्या, ज्ञान आणि अज्ञान याचा विरोध प्रसिद्धच आहे

माया ही एक परमेश्वराची अनिर्वचनीय शक्ति आहे, तिच्या साहाय्यानेंच परमेश्वर विश्वप्रपंच निर्माण करतो अथवा परमेश्वराच्या साहाय्यानें माया ही विश्वप्रपंच निर्माण करते शुद्धचैतन्य हें निर्विकार असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कर्तृत्व नाहीं आणि माया ही स्वभावत जड असल्यामुळें तिच्या ठिकाणींहि कर्तृत्व नाहीं. पण चैतन्य हें मायेच्या उपाधींत गुरफटलें किंवा मायेचा चैतन्याशीं उपाधि या नात्यानें संबंध आला कीं त्या ठिकाणीं कर्तृत्व अभिव्यक्त होतें माया विशिष्ट चैतन्यालाच ईश्वर, परमेश्वर अथवा परमात्मा असें म्हणतात माया ही त्याची शक्ति आहे ती अनिर्वचनीय आहे ती 'सत्' आहे असें म्हणता येत नाहीं कारण आत्मस्वरूपाच्या ज्ञानानें, साक्षात्कारानें तिचा बाध होतो, निरास होतो ज्याचा बाध होतो त्याला सत् किंवा सत्य म्हणता येत नाहीं बरें मायेला असत् म्हणावें तर हा अवाढव्य विश्वप्रपंच तिच्यामुळेंच निर्माण होतो म्हणून तिला असत्‌हि म्हणता येत नाहीं जें असत् आहे त्याच्यापासून काहींच निर्माण होत नसतें म्हणून मायेला अनिर्वचनीय म्हटलें आहे

मायाही भावरूप आहे अविद्या, अज्ञान हे शब्द जरी मायेचे वाचक असले तरी माया ही अभावरूप मानता येत नाहीं ती भावरूपच आहे माया जर अभावरूप असेल तर तिच्यापासून भावरूप जगाची उत्पत्ति होणार नाहीं अभावातून भाव पदार्थ उत्पन्न होत नसतो उत्पन्न होणारें जग ज्या अर्थी भावरूप आहे त्या अर्थी त्याचें कारणहि भावरूपच असलें पाहिजे माया ही जगाचें कारण आहे म्हणून ती भावरूप असलीच पाहिजे.

मायाविशिष्टचैतन्य हें जगाचें कारण असल्यामुळें चैतन्यहि जगाचें कारण आहे व मायाहि पण जगाचें कारण आहे आणि असें आहे म्हणूनच जगाचेंहि स्वरूप जड व चेतन असें उभयविध पहावयास सापडतें त्यात जड हा अंश मायेचा व चेतन हा अंश चैतन्याचा समजावा मायेपासून जग उत्पन्न होत असल्यामुळें मायेला प्रकृति असेंहि म्हणतात. मायेमुळेंच जग हें त्रिगुणात्मक

दिसतें तर चैतन्यामुळें तें सद्रूप, चिद्रूप व आनंदरूप असतें अघटित घटना घडवून आणणें हें मायेचें मुख्य कार्य आहे त्यात ती अत्यंत चतुर आहे म्हणूनच आचार्यांनीं मायापंचकांतील पांचहि श्लोकांच्या चौथ्या चरणात 'अघटितघटनापटीयसी माया' असें तिचें वर्णन केलें आहे ]

निरुपमनित्यनिरंशकेऽप्यखण्डे
मयि चिति सर्वविकल्पनादिशून्ये ।
घटयति जगदीशजीवभेदं,
अघटितघटनापटीयसी माया ॥ १ ॥

मी म्हणजे आत्मा तो शुद्ध चित्स्वरूप आहे तो नित्य निरतिशय आनंदरूप असल्यामुळें त्याला उपमा देता येईल असा त्याच्यासारखा दुसरा कोणीहि या जगात नाहीं म्हणून त्याला निरुपम असें म्हटलें आहे तो नित्य म्हणजे अविनाशी आहे निरंश म्हणजे निरवयव आहे अखंड म्हणजे एक रूप एकजिनसी आहे तो आत्मा सर्व प्रकारच्या विकल्पानीं म्हणजे भेदानीं विरहित आहे अशा निर्गुणनिराकार, निर्विकार शुद्ध सच्चिदानंदस्वरूप आत्म्याच्या ठिकाणीं जीवात्मा, परमात्मा आणि जग असा भेदभाव जी घडवून आणते तीच ही अघटित घटना घडवून आणण्यात कुशल असलेली माया होय

श्रुतिशतनिगमान्तशोधका-
नप्यहह धनादिनिदर्शनेन सद्यः ।
कलुषयति चतुष्पदाद्यभिन्नान्,
अघटितघटनापटीयसी माया ॥ २ ॥

शेंकडो वेद ग्रंथांचें आणि वेदांतांचें संशोधन करण्यात निष्णात असलेल्या मोठमोठ्या विद्वानानांहि वित्तवैभवाचें प्रलोभन दाखवून त्यांची बुद्धि तात्काळच कलुषित करते आणि त्यांना पशु बनविते । पशुप्रमाणें विद्वानानांहि धनिकांच्या येथें जी रावावयास लावते तीच माया होय ती अघटित घटना घडवून आणण्यात मोठी कुशल आहे

सुखचिदखण्डविबोधमद्वितीयं
वियदनलादिविनिर्मिते नियोज्य ।

भ्रमयति भवसागरे नितान्तं,
अघटितघटनापटीयसी माया ॥ ३ ॥

आत्मा हा एकमेव अद्वितीय अखंड ज्ञानस्वरूप व सच्चित्सुखस्वरूप आहे. असें असूनहि त्या आत्म्याला पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश या पंच-महाभूतांनीं निर्माण केलेल्या शरीररूपी पिंजऱ्यांत अडकवून जी या अफाट भवसागरांत भटकावयाला लावते व गटंगळ्या खावयाला लावते तीच माया होय. अघटित घटना घडवून आणण्यांत ती मोठी चतुर आहे.

अपगतगुणवर्णजातिभेदे
सुखचिति विप्रविडाद्यहंकृतिं च ।
स्फुटयति सुतदारगेहमोहं
अघटितघटनापटीयसी माया ॥ ४ ॥

आत्मा हा तत्त्वतः नित्य-शुद्ध-बुद्ध व मुक्तस्वभाव आहे. त्याच्या ठिकाणीं गुण, वर्ण आणि जाति इत्यादि स्वरूपाचा कोणताहि भेदभाव नाहीं. तो केवळ चित्स्वरूप आनंदरूप आहे. पण असें असूनहि त्या आत्म्याच्या ठिकाणीं हा ब्राह्मण, हा क्षत्रिय, हा वैश्य, हा शूद्र, हा अंत्यज हा विद्वान्, हा मूर्ख, हा श्रीमान्, हा दरिद्री, हा तूं, हा मी, अशा तऱ्हेचा भेदभाव जी निर्माण करते तीच माया होय. मीच काय तो शहाणा मीच एक सर्वश्रेष्ठ अधिकारी, विद्वान्, श्रीमान्, वक्ता, नेता सर्व कांहीं मीच आहें. अशा तऱ्हेचा अहंकार व अभिनिवेशहि हीच माया निर्माण करते. हीं माझी मुलें, ही माझी बायको, हें माझें घर असा मोहहि पण या आत्म्याच्या ठिकाणीं हीच माया उत्पन्न करते. याप्रमाणें अघटित घडवून आणणारी ती हीच माया होय. जिचा थांगपत्ता कांहीं लागत नाहीं, पण अकल्पित घटना आपल्यापुढें आणून जी उभी करते तीच माया.

विधिहरिहरभेदमप्यखण्डे
बत विरचय्य बुधानपि प्रकामम् ।
भ्रमयति हरिहरविभेदभावान्-
अघटितघटनापटीयसी माया ॥ ५ ॥

आत्मा सच्चिदानंद परिपूर्ण परब्रह्म अखंड एकरूप असूनहि त्याच्या ठिकाणीं हा ब्रह्मदेव, हा विष्णु, हा शंकर असा हा भेदभाव करून ही माया देवानाहि खूप भ्रमविते व विद्वानानाहि छकविते तत्त्वत एकच देव असूनहि तेथें अनेक देवाची कल्पना निर्माण करणारी अशी ही अघटित घटना घडवून आणण्यात कुशल असलेली तीच माया होय ( या मायापंचकाच्या आधारें मनन करून मायेचें यथार्थ स्वरूप जाणलें तर मनुष्य मायेच्या मोहातून मुक्त होईल आणि मोहामुळें जी त्याला असह्य दु खें भोगावीं लागतात त्या दु खा तूनहि तो मुक्त होईल मायेचें पटल निरस्त झाल्यानतर त्याला जिकडे तिकडे आत्मस्वरूपाचा आनदच आनद प्रतीतीला येईल )



## अनात्मश्रीविगर्हणम्

[ योग, याग, जप, तप, पूजा, पाठ तीर्थक्षेत्र, दानधर्म, व्रतवैकल्यें, प्रायश्चित्त इत्यादि सर्व गोष्टींचें साध्य – अतिम साध्य जर काहीं असेल तर तें ' आत्मस्वरूपाचा साक्षात्कार ', यथार्थ आत्मदर्शन ' हेंच होय विद्या, वैभव, सत्ता, पराक्रम, कीर्ति, लोकप्रियता इत्यादि गोष्टींचीहि आत्मसाक्षात्कार असला तरच खरी शोभा आहे आयुष्याचाहि खरा उपयोग आत्मसाक्षात्कार करून घेणें हाच आहे जन्माचें या मानवदेहाचेंहि सार्थक्य आत्मसाक्षात्कारानेंच होतें आपण काहींहि करीत असा पण आत्मसाक्षात्कार करून घेण्याचा प्रयत्न अवश्य करा आत्मसाक्षात्काराचा काय महिमा आहे हें, आचार्यांचें 'अनात्मश्रीविगर्हण' प्रकरण वाचून सहज लक्षात घेता यतें

आत्मसाक्षात्कारावाचून इष्ट वाटणाऱ्या गोष्टी कितीहि आपण मिळविल्या किंवा त्या आपणास मिळाल्या तरी व्यर्थ होत असा आचार्यांनीं आपला स्पष्ट अभिप्राय या प्रकरणाच्या द्वारा केलेला आहे अत करणात वैराग्याची जागृति निर्माण करून अत करणाला आत्मसाक्षात्काराच्या मार्गाकडे वळविण्यास या प्रकरणातील श्लोकाच्या अर्थाचें मनन करणें अत्यत उपयुक्त होईल इतर स्तोत्राप्रमाणेंच याहि श्लोकाची रचना सरळ, सुबोध व गोड आहे ]

**लब्धा विद्या राजमान्या ततः किं**
**प्राप्ता संपत्प्राभवाढ्या ततः किम् ।**

भुक्ता नारी सुन्दराङ्गी ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ १ ॥

शुद्ध सच्चिदानंद परिपूर्ण परब्रह्मस्वरूप असलेल्या आत्म्याचा ज्यानें साक्षात्कार करून घेतला नाहीं त्यानें कितीहि राजमान्य विद्या संपादन केली व अत्युच्च पदव्या मिळविल्या तरी त्याचा काय उपयोग? वरिष्ठ अधिकारासह विपुल संपत्ति मिळविली तरी त्याचा काय उपयोग? सुंदर स्त्रीच्या समागमांत सुखानें आयुष्य घालविलें तरी काय त्याचा उपयोग? जोंपर्यंत आत्मसाक्षात्कार झाला नाहीं तोंपर्यंत या सर्व गोष्टी मनाला आत्यंतिक समाधान देऊं शकणार नाहींत.

केयूराद्यैर्भूषितो वा ततः किं
कौशेयाद्यैरावृतो वा ततः किम्।
तृप्तो मृष्टान्नादिना वा ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ २ ॥

पोंचे, बाजुबंद इत्यादि अलंकार घातले तरी त्यांचा काय उपयोग? रेशमी वस्त्रें आणि शाली-दुपेटे वगैरे अंगावर घातले तरी त्यांचा काय उपयोग? लाडू, करंज्या, श्रीखंड, पुऱ्या इत्यादि मिष्ट – गोड पदार्थ आणि भजीं, कढवोळीं, चटण्या, कोशिंबिरी इत्यादि खमंग स्वादिष्ट पदार्थ खाऊन तृप्त झाला पण त्याचा उपयोग काय? ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याला कशानेंहि समाधान लाभणार नाहीं.

दृष्टा नाना चारुदेशास्ततः किं
पुष्टाश्चेष्टा बन्धुवर्गास्ततः किम्।
नष्टं दारिद्र्यादि दुःखं ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ३ ॥

तुम्हीं सृष्टिसौंदर्यानें नटलेले अनेक देश फिरून पाहिले. आमेष्ट, सोयरे-धायरे यांना मेजवान्या घालून धष्टपुष्ट केलें. अमाप धन मिळालें व दैन्य, दारिद्र्य इत्यादि दुःखांचा परिहारहि झाला; पण आत्मसाक्षात्कार झाला नसेल तर यांचा काय उपयोग?

स्नातं तीर्थे जह्नुजादौ ततः किं
दानं दत्तं द्व्यष्टसंख्यं ततः किम् ।
जप्ता मन्त्राः कोटिशो वा ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ४ ॥

गंगा-गोदावरी इत्यादि तीर्थांत स्नान केलें पण त्याचा काय उपयोग ? सोळा महादानें केलीं पण त्याचा काय उपयोग ? कोट्यवधि मन्त्रांचा जप केला पुरश्चरणें केलीं पण त्यांचा काय उपयोग ? आत्मसाक्षात्कारावांचून हें सर्व व्यर्थ होय.

गोत्रं सम्यग्भूषितं वा ततः किं
गात्रं भस्माच्छादितं वा ततः किम् ।
रुद्राक्षादिः संधृतो वा ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ५ ॥

सदाचरणानें अथवा उत्तम विद्येनें आपल्या कुलाला भूषित केलें पण त्याचा काय उपयोग ? सर्व अंगाला भस्म चर्चिलें आणि रुद्राक्षमाळाहि धारण केल्या पण ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याला यांचा काय उपयोग ?

अन्नैर्विप्रास्तर्पिता वा ततः किं
यज्ञैर्देवास्तोषिता वा ततः किम् ।
कीर्त्या व्याप्ताः सर्वलोकास्ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ६ ॥

अन्नदान करून ब्राह्मणांना तृप्त केलें अर्थात् सहस्रभोजनें घातलीं, सतर्पणें केलीं. यज्ञयागादि कर्में करून देवांना संतुष्ट केलें. आपल्या कीर्तीनें त्रिभुवन व्यापून टाकलें, पण ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याच्या या सर्व गोष्टींचा काय उपयोग ? एका आत्मसाक्षात्कारावांचून हें सर्व व्यर्थ होय कारण आत्मसाक्षात्कारावांचून हृदयाचें आत्यंतिक समाधानच होऊं शकत नाहीं

कायः क्लिष्टश्चोपवासैस्ततः किं
लब्धाः पुत्राः स्वीयपत्न्यास्ततः किम् ।

प्राणायामः साधितो वा ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ७ ॥

उपास तापास करून शरीराला क्लेश दिले त्याचा काय उपयोग ? धर्मपत्नीपासून विपुल संतति झाली, त्याचा काय उपयोग ? यम नियम आणि आसनाचा अभ्यास करून प्राणायाम साधला त्याचा काय उपयोग ? आत्मसाक्षात्कार झाला असेल तरच या सर्व गोष्टी ठीक आहेत नाहीं तर याचा कांहीं उपयोग नाहीं

युद्धे शत्रुर्निर्जितो वा ततः किं
भूयो मित्रैः पूरितो वा ततः किम् ।
योगैः प्राप्ताः सिद्धयो वा ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ८ ॥

युद्धामध्यें पराक्रम करून शत्रूंना जिंकलें पण त्याचा काय उपयोग ? बहुसंख्य मित्रपरिवारानें वेढला — मित्रांच्या मेळाव्यात रमला, पण त्याचा काय उपयोग ? अष्टांगयोगाचा अभ्यास करून अणिमा महिमा इत्यादि सिद्धि मिळविल्या त्याचा काय उपयोग ? ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याच्या या सर्व गोष्टी व्यर्थ होत.

अब्धिः पद्भ्यां लङ्घितो वा ततः किं
वायुः कुम्भे स्थापितो वा ततः किम् ।
मेरुः पाणावुद्धृतो वा ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ९ ॥

पाण्यावरून चालण्याची सिद्धि मिळविली समुद्रावरून पायांनीं चालत गेला कुंभक प्राणायामाचा अभ्यास करून वायूला शरीरांत कोंडून ठेवलें शरीर निश्चल ठेवून चिरकाल समाधींत राहिला पण त्याचा उपयोग काय ? मेरु पर्वत हातावर उचलून धरला ! काय उपयोग ? ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याचें हें सर्व व्यर्थ होय

क्ष्वेलः पीतो दुग्धवद्वा ततः किं
वह्निर्जग्धो लाजवद्वा ततः किम् ।

प्राप्तश्चारः पक्षिवत्खे ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ १० ॥

दुधाप्रमाणें घटाघट विष प्राशन केलें विरवाचे निखारे लाह्यासारखे भक्षण केले पक्ष्याप्रमाणें आकाशात सचार करण्याचें सामर्थ्य मिळविलें एवढ्या सिद्धि मिळविल्या पण त्याचा काय उपयोग ? ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याच्या या सर्व गोष्टी व्यर्थ आहेत

बद्धाः सम्यक्पावकाद्यास्ततः किं
साक्षाद्विद्धा लोहवर्यास्ततः किम् ।
लब्धो निक्षेपोऽञ्जनाद्यैस्ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ ११ ॥

अग्नि, वायु, जल इत्यादिकाचा प्रतिबंध करण्याचें उत्तम सामर्थ्य मिळविलें, त्याचा चागलाच प्रतिबंध केला, पण त्याचा काय उपयोग ? किमया करण्याची शक्ति मिळविली लोखंडाचें सोनें करता येऊ लागलें, पण त्याचा उपयोग काय ? डोळ्यामध्यें अजनें वगैरे घालून भूमिगत धनाचे साठे पाहिले व मिळविले पण त्याचा काय उपयोग ? ज्यानं आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याच्या या सर्व गोष्टी व्यर्थ होत

भूपेन्द्रत्वं प्राप्तमुर्व्यां ततः किं
देवेन्द्रत्वं संभृतं वा ततः किम् ।
मुण्डीन्द्रत्वं चोपलब्धं ततः किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ १२ ॥

भूलोकीं अखड भूमडलाचें आधिपत्य मिळविलें, राजाचा राजा झाला, पण त्याचा काय उपयोग ? शंभर अश्वमेध यज्ञ करून स्वर्गांचें इंद्रपद मिळविलें, देवाचा राजा झाला पण त्याचा काय उपयोग ? ( विरक्ताचा शिरोमणि ) सन्यासीलोकाचा अधिपति झाला — जगद्गुरूची गादी मिळविली त्याचा काय उपयोग ? जोंपर्यंत आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं तोंपर्यंत हें सर्व व्यर्थ आहे

मन्त्रैः सर्वैः स्तम्भितो वा ततः किं
बाणैर्लक्ष्यो भेदितो वा ततः किम् ।

कालज्ञानं चापि लब्धं तत: किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ १३ ॥

मंत्रसामर्थ्यानें सर्वांचें स्तंभन केलें, पण त्याचा काय उपयोग? बाणानीं लक्ष्यवेध केला पण त्याचा काय उपयोग? कालज्ञान संपादन केलें, लोकांचें भूत, भविष्य अचूक सांगू लागला पण त्याचा काय उपयोग? ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याचें हें सर्व व्यर्थ आहे. या सर्व गोष्टींनीं हृदयाला शांति मिळणार नाहीं.

कामातङ्क: खण्डितो वा तत: किं
कोपावेश: कुण्ठितो वा तत: किम् ।
लोभाश्लेषो वर्जितो वा तत: किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ १४ ॥

कामरूपी व्याधी जिंकला, क्रोधरूपी शत्रूचें आक्रमण थोपविलें, लोभाची मगरमिठी टाळली, पण इतकें करूनहि ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याचें तें सर्व व्यर्थच होय.

मोहध्वान्त: पेषितो वा तत: किं
जातो भूमौ निर्मदो वा तत: किम् ।
मात्सर्यार्तिर्मीलिता वा तत: किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ १५ ॥

मोहरूपी अंधकाराचा चक्काचूर केला, निरहंकार झाला, या भूमीवर निगर्वी म्हणून कीर्ति मिळविली, मात्सर्यरूपी विकाराची पीडा मिटविली, याप्रमाणें षड्रिपु जिंकले पण ज्यानें आत्मसाक्षात्कार करून घेतला नाहीं त्याचें हें सर्व व्यर्थ होय.

धातुर्लोक: साधितो वा तत: किं
विष्णोर्लोको वीक्षितो वा तत: किम् ।
शंभोर्लोक: शासितो वा तत: किं
येन स्वात्मा नैव साक्षात्कृतोऽभूत् ॥ १६ ॥

रडतर तपश्चर्या करून महादेवाचा लोक — सत्यलोक मिळविला, पण त्याचा काय उपयोग ? विष्णूचा लोक — वैकुंठलोक पाहिला, वैकुंठीचे सुख अनुभविले, पण त्याचा काय उपयोग ? शंकराचा लोक म्हणजे कैलास, त्याचा शास्ता झाला, पण ज्याने आत्मसाक्षात्कार करून घेतला नाही त्याला त्याचा काय उपयोग ?

**यस्येदं हृदये सम्यगनात्मश्रीविगर्हणम् ।**
**सदोदेति स एवात्मसाक्षात्कारस्य भाजनम् ॥ १७ ॥**

आत्मसाक्षात्कारावांचून राहिलेल्या मनुष्याचे विद्यावैभवादि गुण कितीहि उत्कृष्ट असले तरी ते शोभत नाहीत. त्यांची तुच्छता दाखविणारें हें स्तोत्र अथवा प्रकरण ज्याच्या अंतःकरणामध्यें उत्तम प्रकारें विराजेल — अर्थाच्या दृष्टीनें ठसेल तोच खरा सर्वकाळ आत्मसाक्षात्काराला योग्य होईल.

**अन्ये तु मायिकजगद्भ्रान्तिव्यामोहमोहिताः ।**
**न तेषां जायते क्वाऽपि स्वात्मसाक्षात्कृतिर्भुवि ॥ १८ ॥**

इतर लोक मात्र या मायिक जगाच्या भ्रांतिजालांत गुरफटून गोंधळतात इहलोकीं त्यांना कधींहि आत्मसाक्षात्कार होत नाहीं

• •

## प्रातःस्मरणस्तोत्रम्

[ "ब्राह्मे मुहूर्ते उत्थाय चिन्तयेदात्मनो हितम्" रात्रीच्या चौथ्या प्रहराला म्हणजेच पहाटेच्या वेळेला ब्राह्ममुहूर्त असें म्हणतात यालाच लोकभाषेत राम प्रहर असें म्हणतात पहाटेच उठल्याबरोबर हातपाय धुऊन चूळ भरून "कराग्रे वसते लक्ष्मीः करमध्ये सरस्वती। करमूले तु गोविन्दः प्रभाते करदर्शनम्" हा श्लोक म्हणून आपल्या तळहातानें साग्र दर्शन घ्यावें, नंतर आत्महिताचें चिंतन करावें असा मनु महर्षींचा आदेश आहे. यथार्थ आत्मस्वरूपाची जाणीव असणें यातच खरें आत्महित आहे. आचार्यांनी या तीन श्लोकीं प्रातःस्मरणांत यथार्थ आत्मस्वरूपाची उत्तम जाणीव दिलेली आहे हे श्लोक रोजच्या रोज प्रातःस्मरण या दृष्टीनें अर्थाकडे लक्ष देऊन अवश्य म्हणावेत. ]

प्रातः स्मरामि हृदि संस्फुरदात्मतत्त्वं
सच्चित्सुखं परमहंसगतिं तुरीयम् ।
यः स्वप्नजागरसुषुप्तमवैति नित्यं
तद्ब्रह्म निष्कलमहं न च भूतसङ्घः ॥ १ ॥

जें आत्मतत्त्व आपल्या हृदयामध्यें 'मी आहें' या शब्दानीं स्फुरण पावतें, 'मी' या शब्दानें सुस्पष्ट प्रतीतीला येतें, पण जीवात्मा मात्र नव्हे तर तें सत् चित् सुखस्वरूप आहे सत् म्हणजे सदासर्वकाळ तिन्हीं त्रिकाळ असणारें कधींहि नाहींसें न होणारें चित् म्हणजे ज्ञानस्वरूप, प्रकाशस्वरूप, सर्वसाक्षी सुख म्हणजे नित्य निरतिशय आनंदरूप

देहेंद्रियादि उपाधींच्या संबंधामुळें त्या आत्म्या-या ठिकाणीं दुःखें प्रतीतीला येतात तत्त्वतः दुःखाचा त्याच्या ठिकाणीं तिळमात्रहि संबंध नाहीं, म्हणून तें आत्मतत्त्व सुखस्वरूप आहे तें आत्मतत्त्व परमहंसाचें प्राप्तव्य स्थान आहे परमहंसहि त्याला प्राप्त करून घेण्यासाठीं उत्कंठित असतात व परमहंसच त्याला प्राप्त करून घेऊ शकतात

मिसळलेलें दूध आणि पाणी याचें पृथक्करण करण्याचें सामर्थ्य ज्या पक्ष्यामध्यें असतें त्याना राजहंस म्हणतात त्याचप्रमाणें सत्यस्वरूप आत्मा आणि अनृत म्हणजे मिथ्यास्वरूप देहेंद्रियादि समुदाय, याचें अज्ञानानें तादात्म्य भासत असतें यांच्यातील असार असलेल्या देहेंद्रियादि समुदायाला बाजूला सारून सारभूत आत्मतत्त्वाला जे हस्तगत करून घेतात त्याना परमहंस म्हणतात ते अत्यंत विरक्त आणि शमदमादि साधनानीं संपन्न असतात म्हणूनच सच्चित्सुखरूप आत्मतत्त्वाला प्राप्त करून घेऊ शकतात

तें आत्मतत्त्व 'तुरीय' म्हणजे स्थूल, सूक्ष्म आणि कारण किंवा जागृति स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थांच्या पलीकडचें, तिन्ही अवस्थांचें साक्षी असें आहे जें जागृति स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थाना जाणतें तें आत्मतत्त्व नित्य म्हणजे अविनाशी आहे निष्कल म्हणजे निरवयव आहे ब्रह्म म्हणजे सर्वापेक्षा मोठें ज्याच्यापेक्षा मोठें कोणींहि नाहीं असें जें निर्गुण, निराकार, निर्विकार, सच्चिदानंदघन, परिपूर्ण परब्रह्मस्वरूप आत्मतत्त्व त्याचें मी प्रातःकाळीं स्मरण करतों तें आत्मतत्त्वच मी आहें पंचमहाभूताचा विशिष्ट रूपानें परिणत झालेला जो देहेंद्रियादि समुदाय तो मी नव्हे

**प्रातर्भजामि मनसां वचसामगम्यं**
**वाचो विभान्ति निखिला यदनुग्रहेण ।**
**यन्नेति नेति वचनैर्निगमा अवोचं-**
**स्तं देवदेवमजमच्युतमाहुरग्र्यम् ॥ २ ॥**

ज्या आत्मतत्त्वाच्या अनुग्रहानें वाणी, डोळे, कान इत्यादि सर्व इंद्रियें आपापले विषय ग्रहण करतात व आपआपलीं कार्यें करतात, जें मनाला कळत नाहीं व वागिंद्रिय ज्याचें वर्णन करू शकत नाहीं, डोळे ज्याला पाहू शकत नाहींत व इतर कोणतेंहि इंद्रिय ज्याचें ग्रहण करू शकत नाहीं; म्हणून जें मनाला आणि वाणीलाहि अगम्य आहे असें म्हटलें जातें वेद देखील ज्याचें वर्णन 'नेति नेति ' अशा निषेध वाक्यानींच करतात देह म्हणजे आत्मा नव्हे प्राण म्हणजे आत्मा नव्हे मन म्हणजे आत्मा नव्हे बुद्धि म्हणजे आत्मा नव्हे अशा रीतीनें जें काहीं दिसतें आहे, कळतें आहे, तें आत्मा न हे मग आत्मा कोण आहे ? काहीं सांगता येत नाहीं सर्व निषेधाचा अवधिभूत — मर्यादाभूत — जो तोच आत्मा

या तऱ्हेच्या प्रतिपादनाला 'अतद्व्यावृत्ति' असें म्हणतात 'अ तत्' म्हणजे आत्मस्वरूप नसलेलें त्याची व्यावृत्ति म्हणजे निषेध आत्मस्वरूप नसलेल्या सर्व वस्तूंचा निषेध केला म्हणजे जें शिल्लक रहातें तोच आत्मा

नुकतेंच लग्न झालेल्या कुलीन मुलीला तिच्या नवऱ्यासह चार तरूण एकत्र जमले असता यातील तुझे मालक कोण ? असा जर तिच्या मैत्रिणींनी प्रश्न केला तर ती काहींच उत्तर देत नाहीं मग चतुर मैत्रीण तिला विचारते, तो खादीची पांढरी टोपी घातलेला का ग ? ती उत्तर देते, नाहीं मग ती लोकरीची काळी टोपी घातलेला ? नाहीं तो कोल्हापुरी फेटा घातलेला ? छे, तो नव्हे तो हॅट घातलेला ? छे, तोहि पण नव्हे मग आता कोण ? तो राहिलेला डोक्यावर भांग आणि गळ्यात नेकटाय असलेला ? या शेवटच्या प्रश्नाच्या वेळेला मात्र ती काहीं एक उत्तर न देता लज्जेनें किंचित् खालीं मान करून मौन धारण करून उभी रहाते त्या मौनानेंच ती आपल्या पतीची ओळख करून देते हीच अवस्था आत्मस्वरूपाचें प्रतिपादन करताना श्रुतींची होत असते 'नेति नेति ' वाक्यानीं सर्व दृश्य वस्तूंचा निरास केल्यानंतर जें शिल्लक रहातें तोच आत्मा

ज्याच्यामुळें डोळे पाहूं शकतात पण जो डोळ्याला दिसत नाहीं. ज्याच्यामुळें कान ऐकूं शकतात पण जो कानानें ऐकूं येत नाहीं, ज्याच्यामुळें वाणी बोलूं शकते पण जो वाणीनें बोलून दाखवतां येत नाहीं, ज्याच्यामुळें मन विचार करूं शकतें पण मनानें ज्याचें आकलन करतां येत नाहीं, ज्याच्यामुळें बुद्धि सर्व कांहीं जाणूं शकते पण बुद्धीला जो जाणतां येत नाहीं, ज्याच्यामुळें हात काम करूं शकतात, पाय चालू शकतात, वारा वाहूं शकतो, सूर्य प्रकाशू शकतो तोच तो आत्मा होय, असें त्याचें प्रतिपादन वेदांनीं केलेलें आहे. तोच आत्मा होय. तो देवांचा देव आहे. तो सर्वांचें आदिकारण आहे. पण त्याचें आदिकारण कोणीच नाहीं. तो अज म्हणजे जन्मरहित आहे. अच्युत म्हणजे निर्विकार आहे. तो सर्वश्रेष्ठ आहे. असा जो आत्मा त्याचें मी प्रातःकाळीं भजन करतों. भजन म्हणजे त्याच्या ठिकाणीं तत्पर होऊन रहाणें.

प्रातर्नमामि तमसः परमर्कवर्णं
पूर्णं सनातनपदं पुरुषोत्तमाख्यम् ।
यस्मिन्निदं जगदशेषमशेषमूर्तौ
रज्ज्वां भुजङ्गम इव प्रतिभासितं वै ॥ ३ ॥

जो आत्मा 'अशेषमूर्ति' म्हणजे अखिल विश्वाच्या रूपानें नटलेला आहे, मंद अंधकारामध्यें रज्जूच्या ठिकाणीं सर्प असा प्रतीतीला येतो, प्रकृष्ट प्रकाशाच्या अभावीं दोरीच जशी सर्परूप भासते त्याचप्रमाणें आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान नसल्यामुळें अज्ञानानें आत्माच विविध विश्वप्रपंचाच्या रूपानें प्रतीतीला येतो, अर्थात् आत्म्याच्याच ठिकाणीं हें सर्व विश्व प्रतीतीला येतें. आत्माच विश्वरूपानें प्रतीतीला येत असल्यामुळें आत्म्याला अशेषमूर्ति म्हटलेलें आहे. ज्या आत्म्याच्या ठिकाणीं दोरीवर भासणाऱ्या सर्पाप्रमाणें हें सर्व प्रतिभासित झालेलें आहे, त्या आत्म्याला मी पहांटेचा नमस्कार करीत आहें.

आत्मा अज्ञानाचाहि साक्षी असल्यामुळें तो अज्ञानाचा विषय होऊ शकत नाहीं म्हणून त्याला 'तमसः परं' अज्ञानाच्या पलीकडचा असें म्हटलें आहे. तो आत्मा 'अर्कवर्ण' म्हणजे सूर्यासारखा देदीप्यमान चित्प्रकाशस्वरूप आहे. तो पूर्ण आहे म्हणजे सर्वकाळ सर्व ठिकाणीं सर्वरूपानें विराजमान आहे, म्हणूनच त्याला 'सनातनपद' म्हणजे शाश्वत स्थान असें म्हणतात. त्याला

'पुरुषोत्तम' असेंहि म्हणतात कारण तो क्षर आणि अक्षर याच्या पलीकडचा आहे क्षर म्हणजे सर्वभूतें अक्षर म्हणजे कूटस्थ आत्मा या दोहोंच्या पली कडचा अत्युत्तम म्हणून त्याला पुरुषोत्तम म्हणतात त्यालाच परमात्मा म्हणतात 'उत्तम पुरुषस्त्वन्य परमात्मेत्युदाहृत ' 'अतोऽस्मि लोके वेदे च प्रथित पुरुषोत्तम ' असें गीतमध्यें ज्याचें वर्णन केलेलें आहे त्या परमेश्वराला मी मात काळीं वदन करीत आहें

श्लोकत्रयमिदं पुण्यं लोकत्रयविभूषणम्
प्रातःकाले पठेद्यस्तु स गच्छेत्परमं पदम् ॥ ४ ॥

हे तीन श्लोक अत्यत पुण्यकारक आहेत ते त्रैलोक्याचे जणू काहीं अलकारच आहेत त्रैलोक्याला भूषणास्पद असलेल्या आत्मतत्त्वाचें मतिपादन या तीन श्लोकात असल्यामुळें हे तीन श्लोकहि त्रैलोक्याचें भूषणच आहेत मात काळीं या स्तोत्राचें जो पठण करील तोहि ईश्वरकृपेनें परम पदाला मात होईल



## परा पूजा

[ ही शकराचार्यांची 'परा पूजा फारच उच्च कोटीची आहे यात वर्णिल्याप्रमाणें परमेश्वराचें स्वरूप नित्य आपल्या अत करणात राहिलें तर त्या सारखी उत्कृष्ट दुसरी पूजा नाहीं म्हणून या श्लोकाना परा पूजा' हें अत्यत सार्थ नाव दिलें आह ह श्लोक नित्य म्हणावेत व अर्थाचें मनन करावें ही परमेश्वराची अत्यत महत्त्वाची पूजा आहे ]

अखण्डे सच्चिदानन्दे निर्विकल्पैकरूपिणि ।
स्थितेऽद्वितीयभावेऽस्मिन्कथं पूजा विधीयते ॥ १ ॥

अखड सच्चिदानद निर्विकार निराकार भेदशू य एकरूप अशा या परब्रह्म स्वरूपीं अद्वैतभाव चित्तामध्यें स्थिर झाल्यानतर परमेश्वराची कशी पूजा करणार ?

पूर्णस्यावाहनं कुत्र सर्वाधारस्य चासनम् ।
स्वच्छस्य पाद्यमर्घ्यं च शुद्धस्याचमनं कुतः ॥ २ ॥

जो परमात्मा सर्व विश्वाला व्यापून राहिला आहे त्याचें आवाहन कोठें व कसें करणार? आवाहन म्हणजे दूर असलेल्याला आदरानें जवळ बोलावणें. जो नेहमींच जवळ आहे, सर्वत्र आहे, तो नाहीं असें स्थानच नाहीं, तर मग त्याचें आवाहन कसें करणार? जो सर्वांचाच आधार आहे, आश्रयस्थान आहे, त्याला आसन कशाचें देणार? जो स्वभावतःच स्वच्छ आहे, त्याला हातपाय धुवायला अर्घ्य आणि पाद्य कसें द्यावें? जो शुद्ध आहे त्याला आचमन कशाकरितां द्यावें?

निर्मलस्य कुतः स्नानं वासो विश्वोदरस्य च।
अगोत्रस्य त्ववर्णस्य कुतस्तस्योपवीतकम्॥ ३॥

जो सदा सर्वकाळ निर्मळ आहे, त्याला स्नान कसें घालावें? स्नानाचा त्याला उपयोग काय? ज्याच्या उदरांत सर्व विश्व सामावलें आहे त्याला कोणतें वस्त्र नेसवावें व तें कसें नेसवावें? त्याला यज्ञोपवीत तरी कसें घालावें? यज्ञोपवीत हें वर्ण, आश्रम गोत्र यज्ञयागादि कर्में इत्यादींवर अवलंबून असतें. ज्याला ब्राह्मण, क्षत्रिय इत्यादि कोणताहि वर्ण नाहीं, ब्रह्मचर्य, गृहस्थ इत्यादि कोणताहि आश्रम नाहीं, ज्याला कोणतेंहि गोत्र नाहीं व ज्याला कोणतेहि कर्माधिकार नाहींत त्याला यज्ञोपवीत कसें द्यावें?

निर्लेपस्य कुतो गन्धः पुष्पं निर्वासनस्य च।
निर्विशेषस्य का भूषा कोऽलङ्कारो निराकृतेः॥ ४

जो स्वभावतःच निर्लेप आहे, ज्याला कशाचाहि लेप लागू शकत नाहीं त्याला गंध कसें लावावें? ज्याला कशाचीच वासना नाहीं, जो सर्व वासना-विनिर्मुक्त आहे तो फुलाचा वास कसा घेणार? त्याला फुलें कशीं अर्पण करावींत? निर्विशेष म्हणजे सर्वत्र समरूपानें राहून जो सर्व विश्वाला भूषवितो त्याची आम्हीं काय आरास करणार? ज्याला कांहीं आकारच नाहीं त्याला काय अलंकार घालणार?

निरञ्जनस्य किं धूपैर्दीपैर्वा सर्वसाक्षिणः।
निजानन्दैकतृप्तस्य नैवेद्यं किं भवेदिह॥ ५॥

जो निरंजन म्हणजे सर्व संसारधर्मांच्या पलीकडचा आहे त्याला धूप काय घालणार? जो सर्वसाक्षी आहे त्याला दीप काय अर्पण करणार? जो

स्वस्वरूपाच्या आनंदांतच नित्य तृप्त आहे त्याला नैवेद्याचा काय उपयोग? त्याला नैवेद्य कशाचा दाखवावयाचा व तो का दाखवावयाचा?

विश्वानन्दयितुस्तस्य किं ताम्बूलं प्रकल्प्यते ।
स्वयंप्रकाशचिद्रूपो योऽसावर्कादिभासकः ॥
गीयते श्रुतिभिस्तस्य नीराजनविधिः कुतः ॥ ६ ॥

जो विश्वाला आनंद देतो त्याला मुखशुद्धीकरितां तांबूल अर्पण करून आम्ही काय आनंद देणार? त्याला तांबूल कसा अर्पण करावयाचा?

जो स्वयंप्रकाश चिद्रूप आहे, सूर्य चंद्र आणि अग्नि इत्यादिकांनाहि प्रकाशित करणारा आहे, अशा रीतीनें वेदाकडून ज्याचें वर्णन केलें जातें त्याला आम्ही नीराजन दीप दाखवून काय प्रकाशित करणार?

प्रदक्षिणमनन्तस्य प्रणामोऽद्वयवस्तुनः ।
वेदवाचामवेद्यस्य किं वा स्तोत्रं विधीयते ॥ ७ ॥

जो विश्वंभर आणि अनंत आहे त्याला आम्ही दक्षिणा काय देणार? आणि प्रदक्षिणा तरी कशी घालणार? जो अद्वितीय एकरूप आहे त्याला नमन कसें करणार?

वेदांनाहि ज्याचें स्वरूप आकलन होत नाहीं, वेदहि ज्याचें वर्णन करतांना मौनावतात, त्याचें आम्ही स्तुतिस्तोत्र काय गाणार?

अन्तर्बहिश्च पूर्णस्य कथमुद्वासनं भवेत् ।
एवमेव परा पूजा सर्वावस्थासु सर्वदा
एकबुद्ध्या तु देवेशे विधेया ब्रह्मवित्तमैः ॥ ८ ॥

जो आतबाहेर सर्वत्र परिपूर्ण भरलेला आहे त्याचें उद्वासन – विसर्जन कसें करणार? याप्रमाणें ब्रह्मवेत्त्या लोकांनी सदा सर्वकाळ सर्वदेवांचा अधिपति सच्चिदानंद भगवान् श्रीहरि जो परमात्मा त्याची एकाग्रबुद्धीनें सर्व अवस्थांमध्यें पूजा करावी.

'आत्मा त्वं गिरिजा मतिः सहचराः प्राणाः शरीरं गृहं' हा श्लोक पण पूजेच्या दृष्टीनें म्हणण्याचा प्रघात आहे. या श्लोकाचा अर्थ शिवमानस-पूजास्तोत्रांत दिलेलाच आहे. वाचकांनी तो अवश्य लक्षांत घ्यावा.

● ●

# स्वरूपानुसन्धानाष्टकम्

या अष्टकाचें नाव काहीं ठिकाणीं 'विज्ञाननौका' असें आढळतें तर काहीं ठिकाणीं 'स्वरूपानुसधान' असें आढळतें स्वत आचार्यांनीं शेवटच्या श्लोकात ' स्वरूपानुसन्धानरूपा स्तुति ' असें स्पष्टच म्हटलेलें असल्यामुळें, 'स्वरूपानुसधान' हेंच नाव आचार्यांना अभिप्रेत असावें काहीं असो हें अष्टक साधकाला यथार्थ आत्मस्वरूपाची जाणीव करून देऊन या भवसागरातून तारून नेणारी विज्ञानरूपी नौकाच आहे या अष्टकाच्या अर्थाचें मनन केलें असता स्वरूपाची – सच्चिदानद परिपूर्ण परब्रह्मस्वरूपाची – जाणीव होईल मी कोण आहें हें लक्षात येईल या अष्टकाच्या मिषानें आत्मचिंतन अवश्य करा ]

तपोयज्ञदानादिभिः शुद्धबुद्धिर्
विरक्तो नृपादेः पदे तुच्छबुद्ध्या ।
परित्यज्य सर्वं यदाप्नोति तत्त्वं
परं ब्रह्म नित्यं तदेवाहमस्मि ॥ १ ॥

राज्यवैभवादि पदाबद्दल तुच्छ बुद्धि निर्माण होऊन जो विरक्त होतो व सर्व विषयाचा परित्याग करून तप यज्ञ दान इत्यादि सत्कर्मांनीं आपली बुद्धि शुद्ध करून घेतो आणि अशा शुद्धबुद्धीनें ज्या तत्त्वाचें आकलन करतो, जें तत्त्व प्राप्त करून घेतो तेंच अविनाशी परब्रह्म मी आहें

दयालुं गुरुं ब्रह्मनिष्ठं प्रशान्तं
समाराध्य भक्त्या विचार्य स्वरूपम् ।
यदाप्नोति तत्त्वं निदिध्यास्य विद्वान्
परं ब्रह्म नित्यं तदेवाहमस्मि ॥ २ ॥

दयाळु ब्रह्मनिष्ठ आणि अत्यत शात अशा गुरूजवळ जाऊन, त्याचा उपदेश श्रवण करून, जो आपल्या बुद्धीनें आत्मस्वरूपाचा विचार करतो व निदिध्यासनानें त्या आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घेतो आणि अशा रीतीनें ज्या तत्त्वाला तो प्राप्त करून घतो तेंच अविनाशी परब्रह्मतत्त्व मी आहें

यदानन्दरूपं प्रकाशस्वरूपं
निरस्तप्रपञ्चं परिच्छेदहीनम् ।

अहंब्रह्मवृत्त्यैकगम्यं तुरीयं
परं ब्रह्म नित्यं तदेवाहमस्मि ॥ ३ ॥

जें आनंदस्वरूप आहे, प्रकाशस्वरूप आहे, ज्याच्या साक्षात्कारानें सर्व प्रपंचाचा निरास होतो, ज्याला परिच्छेद नाहीं, म्हणजे मोजमाप नाहीं अथवा जें तत्त्व सदा सर्वकाळ विराजमान असल्यामुळें कालदृष्ट्या ज्याचा अंत नाहीं, सर्वदेशीं असल्यामुळें देशदृष्ट्याहि ज्याला अंत नाहीं व सर्व वस्तूंच्या रूपानें तेंच परब्रह्मतत्त्व नटलेलें असल्यामुळें वस्तुदृष्ट्याहि ज्याचा अंत नाहीं म्हणूनच अखंड, अनंत, त्रिविध परिच्छेदशून्य असें ज्याचें स्वरूप आहे, 'अहं ब्रह्मास्मि' इत्याकारक अंतःकरणवृत्तीनेंच ज्याचें भान होऊं शकतें असें जें तुरीय म्हणजे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थांच्या पलीकडचें सर्व साक्षि नित्य म्हणजे अविनाशी परब्रह्मतत्त्व तेंच मी आहें

यदज्ञानतो भाति विश्वं समस्तं
विनष्टं च सद्यो यदात्मप्रबोधे ।
मनोवागतीतं विशुद्धं विमुक्तं
परं ब्रह्म नित्यं तदेवाहमस्मि ॥ ४ ॥

यदानन्दलेशैः समानन्दि विश्वं
यदाभाति सत्त्वे तदाभाति सर्वम् ।
यदालोचिते हेयमन्यत्समस्तं
परं ब्रह्म नित्यं तदेवाहमस्मि ॥ ६ ॥

ज्याच्या आनंदाच्या लेशानें सर्व विश्व आनंदानें पूर्ण भरलें आहे, जेव्हां ते चित्तांत प्रकाशतें तेव्हां त्याच्याच प्रकाशानें सर्वांचें भान होतें, जें पाहिलें असतां बाकीचें सर्व कांहीं पाहिल्यासारखें होतें, पहाण्यासारखें दुसरें कांहीं शिल्लक रहात नाहीं अथवा ज्यापुढें बाकीचें सर्व तुच्छ वाटतें असें जें अविनाशी परब्रह्म तेंच मी आहें.

अनन्तं विभुं सर्वयोनिं निरीहं
शिवं सङ्गहीनं यदोङ्कारगम्यम् ।
निराकारमत्युज्ज्वलं मृत्युहीनं
परं ब्रह्म नित्यं तदेवाहमस्मि ॥ ७ ॥

जें तत्त्व अनंत, सर्वव्यापि आणि सर्वांचें कारण आहे, ज्याला हालचाल किंवा स्पंदन नाहीं, अथवा ज्याला कशाची इच्छा नाहीं. जें मंगलमय, सर्वसंगविरहित आणि प्रणवोपासनेनें ज्ञात होतें, जें निराकार, अत्यंत उज्ज्वल आणि मृत्युविरहित आहे, ज्याचा कधीं नाश होत नाहीं, असें जें परिपूर्ण परमब्रह्मतत्त्व तेंच मी आहें.

यदानन्दसिन्धौ निमग्नः पुमान्स्या-
दविद्याविलासः समस्तप्रपञ्चः ।
तदा न स्फुरत्यद्भुतं यन्निमित्तं
परं ब्रह्म नित्यं तदेवाहमस्मि ॥ ८ ॥

ज्याच्या आनंदसागरांत अर्थात् सागराप्रमाणें अथांग असलेल्या ज्याच्या आनंदांत निमग्न झालेल्या जीवाला हा सर्व विश्वाचा पसारा अविद्येचा खेळ वाटतो. आनंदस्वरूप परब्रह्माच्या ठिकाणीं चित्त तन्मय झालें असतां दुसऱ्या कशाचेंहि स्फुरण होत नाहीं. ज्याच्या निमित्तानें हें अद्भुत विश्व प्रतीतीला येतें, असें जें अविनाशी परब्रह्म तेंच मी आहें.

स्वरूपानुसन्धानरूपां स्तुतिं यः
पठेदादराद्भक्तिभावो मनुष्यः ।
शृणोतीह वा नित्यमुद्युक्तचित्तो
भवेद्विष्णुरत्रैव वेदप्रमाणात् ॥ ९ ॥

आत्मस्वरूपाची जाणीव करून देणाऱ्या या स्तोत्राचें जो कोणी मनुष्य आदरानें व भक्तिभावानें पठण करील अथवा तत्परचित्तानें नित्य श्रवण करील तो याच जन्मीं विष्णुपदाला — विश्वव्यापि परिपूर्ण परब्रह्मपदाला — प्राप्त होईल तो प्रत्यक्ष विष्णुस्वरूपच होईल 'अत्र ब्रह्म समश्नुते' याच जन्मीं नित्य निरतिशय अशा ब्रह्मसुखाचा तो अनुभव घेतो 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' ब्रह्मसाक्षात्कारी महात्मा ब्रह्मस्वरूपच होतो इत्यादि वेदवाक्येंच या बाबतींत प्रमाण आहेत अशी ही विज्ञाननौका मोठी उपकारक आहे



## जीवन्मुक्तानन्दलहरी

[ पूज्यपाद श्रीशंकराचार्यांची ही आनंदलहरी चित्तांत खरोखरच आनंदाचे तरंग निर्माण करणारी आहे जीवन्मुक्त महात्मा व्यवहारांत कसा वागतो याचें उत्तम उत्तर यामध्यें मिळेल सद्गुरूकडून मिळालेल्या उपदेशानें ज्याचें अज्ञान नाहींसें झालेलें आहे असा मुनि म्हणजे आत्मस्वरूपाचें मनन करणारा — मननशील — महात्मा संसारांत राहूनहि कधीं स्त्रीपुत्र, वित्तवैभव इत्यादिकांच्या व्यामोहांत सांपडत नाहीं, विषयासक्तींत गुंतत नाहीं, असा सोळाहि श्लोकांच्या चौथ्या चरणाचा अर्थ आहे हें स्तोत्र मोठें मननीय आहे ]

पुरे पौरान्पश्यन्नरयुवतिनामाकृतिमयान्
सुवेषान्स्वर्णालंकरणकलितांश्चित्रसदृशान् ।
स्वयं साक्षी द्रष्टेत्यपि च कलयंस्तैः सह रमन्
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ १ ॥

आत्मचिंतनामध्यें निमग्न असलेला महात्मा संसारांत वावरत असतांना मी केवळ साक्षीभूत सर्व लोकव्यवहाराचें अवलोकन करणारा द्रष्टा आत्माच

आहें ब्रह्मच आहें अशा दृढ निश्चयानें वागत असतो त्यामुळें संसारांतील विविध दृश्यें पाहून त्याच्या बुद्धीला व्यामोह उत्पन्न होत नाहीं त्याची बुद्धि कोठेंच आसक्त होत नाहीं उत्तम पोषाख घातलेल्या, सोन्यामोत्याचे उत्तम अलंकार अंगावर धारण केलेल्या आणि चित्राप्रमाणें सुरेख असलेल्या तरुण व तरुणी या शब्दांनीं ओळखल्या जाणाऱ्या शहरांतील अनेक प्रकारच्या जोडप्यांना शहरांत भटकतांना तो पहात असतो त्यांच्यामध्यें रमतो, खेळतोहि तरी पण मी द्रष्टा साक्षी आहें असें समजून तिळमात्रहि बुद्धीमध्यें मोह निर्माण होऊं देत नाहीं कारण सद्गुरूंच्या उपदेशानें त्याचें अज्ञान नाहींसें झालेलें असतें

वने वृक्षान्पश्यन्दलफलभरान्नम्रसुशिखान्
घनच्छायाच्छन्नान्बहुलकलकूजद्द्विजगणान् ।
भजन्घस्रे रात्राववनितलतल्पैकशयनो
मुनिर्नं व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ २ ॥

कधीं कधीं हिरण्यागार दाट पानांच्या समूहानीं व फळांच्या घोसांनीं भारावलेल्या आणि म्हणूनच ज्यांच्या फांद्या नम्र झालेल्या आहेत, वाकलेल्या आहेत, अशा, दाट छायेनें व्यापलेल्या किंवा मेघांच्या छायेनें आच्छादित असलेल्या, ज्यांच्यावर पुष्कळ पक्ष्यांचे समुदाय मधुर शब्द करीत आहेत अशा अरण्यांत किंवा बागेंत तो महात्मा अनेक वृक्षांचें अवलोकन करीत फिरत राहील दिवसा किंवा रात्रीं झोंप येईल त्या वेळीं केवळ भूतलरूपी शय्येवर आनंदानें शयन करील अशा रीतीनें आनंदानें काळ घालवीत तो राहील परंतु त्याची बुद्धि कोठेंहि आसक्त होणार नाहीं कारण सद्गुरूंच्या उपदेशानें त्याचें अज्ञान नाहींसें झालेलें असतें तत्त्वतः तो आत्मस्वरूपांतच रमलेला असतो

कदाचित्प्रासादे क्वचिदपि च सौधे च धवले
कदा काले शैले क्वचिदपि च कूलेषु सरिताम् ।
कुटीरे दान्तानां मुनिजनवराणामपि वसन्
मुनिर्नं व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ ३ ॥

जीवन्मुक्त महात्मा कधीं राजवाड्यांत राहील तर कधीं चुनेगचीच्या किंवा संगमरवरी पाषाणाच्या भव्य आणि शुभ्र अशा महालांत राहील कधीं पर्वताच्या शिखरावर तर कधीं नदीच्या तीरावर शांतपणें बसेल एखाद्या वेळीं मुनींच्या

समुदायामध्यें श्रेष्ठ असलेल्या शांत, दांत व समाहित अशा योगीजनांच्या पर्ण कुटींत राहील अशा विविध ठिकाणीं वास्तव्य करीत असतांना त्याच्या मनाला हर्षहि होत नाहीं व विषादहि वाटत नाहीं सुखदुःखाच्या काळीं हर्ष व विषाद उत्पन्न होणें हाच बुद्धीचा व्यामोह होय तो योग्याच्या बुद्धींत उत्पन्न होत नाहीं कारण सद्गुरूच्या उपदेशानें त्याचें अज्ञान समूळ नष्ट झालेलें असतें

क्वचिद्बालैः सार्धं करतलजतालैश्च हसितैः
क्वचिद् तारुण्याऽऽढ्यैश्चतुरनार्यां सह रमन् ।
क्वचिद् वृद्धैश्चिन्ताकुलितहृदयैश्चाऽपि विलपन्
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ ४ ॥

आत्मस्वरूपी तन्मय झालेल्या तत्त्ववेत्त्याचें वैराग्य गुरूच्या उपदेशानें पूर्ण दृढ झालेलें असतें त्याचें मन चंचल होऊं शकत नाहीं तो लहान मुलांच्या बरोबर टाळ्या वाजवीत हसतखेळत रहातो, त्यांच्यामध्यें रमतो कधीं कधीं तारुण्यानें मुसमुसलेल्या चतुर स्त्रियामध्यें गप्पागोष्टी करीत रमलेला असेल कधीं कधीं चिंतेनें ज्यांचीं अंतःकरणें व्याकुळ झालेलीं आहेत अशा वृद्ध लोकांबरोबर त्यांच्याशीं समरस होऊन विलाप करीत असलेला दिसेल, त्यांचें सांत्वनहि करीत राहील अशा रीतीनें सर्वांत असूनहि सर्वांपासून तो अलिप्तच असेल कारण त्याचें वैराग्य दृढ झालेलें असतें बुद्धींतील व्यामोह नाहींसा झालेला असतो व गुरूच्या उपदेशानें अज्ञान नाहींसें झालेलें असतें

कदाचिद्विद्वद्भिर्विविदिषुभिरत्यन्तनिरतैः
कदाचित्काव्यालंकृतिरसरसालैः कविवरैः ।
कदाचित्सत्तर्कैरनुमितिपरैस्तार्किकवरैर्
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ ५ ॥

आत्मवेत्ता मुनि कधीं कधीं आपआपल्या विषयांत अत्यन्त तत्पर असलेल्या जिज्ञासु विद्वज्जनांबरोबर पांडित्यपूर्ण चर्चा करीत बसेल ( तर कधीं पौराणिक वाङ्मयाचा आनंद लुटणाऱ्या लोकांमध्यें पुराणांतील गोष्टी सांगत बसेल ) कधीं विविध काव्यें काव्यांतील उपमा, श्लेष, अर्थान्तरन्यास इत्यादि अलंकार आणि शृंगार, वीर, करुणा इत्यादि रस यांचा आस्वाद घेणाऱ्या मोठमोठ्या कवींमध्यें काव्याचा आनंद लुटीत असेल, तर कधीं कधीं उत्तम

निर्दुष्ट तर्कानीं अनुमानें करीत वमन्याचा छंद असलेल्या बड्या बड्या तार्किक लोकांबरोबर नार्किक पद्धतीनें वादविवादहि करीत बसलेला दिसेल पण मी विद्वान्, मी बहुश्रुत, मी कवि किंवा मी मोठा नार्किक, अशा प्रकारच्या गर्वाचा लेशहि त्याच्या अंत करणाला स्पर्श करणार नाहीं, कारण गुरूच्या उपदेशानें त्याचें अज्ञान नाहींसें झालेलें असतें व बुद्धीतील व्यामोहाचा निरास झालेला असतो

कदा ध्यानाभ्यासैः कचिदपि सपर्यां विकसितैः
सुगन्धैः सत्पुष्पैः कचिदपि दलैरेव विमलैः।
प्रकुर्वन् देवस्य प्रमुदितमनाः संस्तुतिपरो
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः॥ ६॥

आत्मस्वरूपी रत असलेला महात्मा योगी कधीं कधीं ध्यानयोगाचा अभ्यास करीत असलेला दृष्टीस पडेल, तर कधीं कधीं अत्यंत टवटवीत व सुगंधि अशी उत्तम फुलें, निर्मल दूर्वांकुर, बिल्वदलें व तुळशीचीं पानें यानीं परमेश्वराची समाराधना करीत असलेला दृष्टीस पडेल कधीं कधीं प्रसन्न चित्तानें परमेश्वराचीं स्तोत्रें व भक्तिरसानें परिपूर्ण अशीं पदेंहि म्हणण्यात गर्क झालेला असेल त्याच्या बुद्धीला कधींहि व्यामोह उत्पन्न व्हावयाचा नाहीं (कर्तव्य कर्माबद्दल आलस्य, उपेक्षा, तुच्छ बुद्धि, विमुखता इत्यादि गोष्टी त्याच्या ठिकाणीं दृष्टीस पडणार नाहींत.) कारण सद्गुरूच्या कृपेनें व उपदेशानें त्याचें सर्व अज्ञान नाहींसें झालेलें असतें.

शिवायाः शम्भोर्वा कचिदपि च विष्णोरपि कदा
गणाध्यक्षस्याऽपि प्रकटतपनस्यापि च कदा।
पठन्वै नामालिं नयनरचितानन्दसलिलो
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः॥ ७॥

आत्मस्वरूपीं रमलेला योगी सर्व देवाना अभेदबुद्धीनेंच भजत असतो; कारण सद्गुरूंच्या उपदेशानें त्याच्या बुद्धींतील अज्ञान नाहींसें झालेलें असतें हा विष्णु, हा शंकर, हा गणपति, ही देवी असा भेदभाव त्याच्या चित्तात राहिलेला नसतो त्या भेदभावालाच व्यामोह असें म्हणतात तो त्याच्या चित्तांतून नाहींसा झालेला असतो तो कधीं देवीची, कधीं शंकराची, कधीं विष्णूची तर कधीं गणपतीची, कधीं सूर्यनारायणाची तर कधीं दुसऱ्या एखाद्या

समुदायामध्यें श्रेष्ठ असलेल्या शात, दात व समाहित अशा योगीजनाच्या पर्ण कुटींत राहील अशा विविध ठिकाणीं वास्तव्य करीत असताना त्याच्या मनाला हर्षहि होत नाहीं व विषादहि वाटत नाहीं सुखदु खा या काळीं हर्ष व विषाद उत्पन्न होणें हाच बुद्धीचा व्यामोह होय तो योग्याच्या बुद्धींत उत्पन्न होत नाहीं कारण सद्गुरूच्या उपदेशानें त्याचें अज्ञान समूळ नष्ट झालेलें असतें

क्वचिद्बालैः सार्धं करतलजतालैश्च हसितैः
क्वचिद्वै तारुण्याङ्कितचतुरनार्या सह रमन् ।
क्वचिद् वृद्धैश्चिन्ताकुलितहृदयैश्चाऽपि विलपन्
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ ४ ॥

आत्मस्वरूपीं तन्मय झालेल्या तत्त्ववेत्त्याचें वैराग्य गुरूच्या उपदेशानें पूर्ण दृढ झालेलें असतें त्याचें मन चचल होऊ शकत नाहीं तो लहान मुलाच्या बरोबर टाळ्या वाजवीत हसतखेळत रहातो, त्याच्यामध्यें रमतो कधीं कधीं तारुण्यानें मुसमुसलेल्या चतुर स्त्रियामध्यें गप्पागोष्टी करीत रमलेला असेल कधीं कधीं चितेनें ज्याचीं अत करणें व्याकुळ झालेलीं आहेत अशा वृद्ध लोकाबरोबर त्याच्याशीं समरस होऊन विलाप करीत असलेला दिसेल, त्याचें सात्वनहि करीत राहील अशा रीतीनें सर्वांत असूनहि सर्वांपासून तो अलिप्तच असेल कारण त्याचें वैराग्य दृढ झालेलें असतें बुद्धींतील व्यामोह नाहींसा झालेला असतो व गुरूच्या उपदेशानें अज्ञान नाहींसें झालेलें असतें

कदाचिद्विद्वद्भिर्विविदिषुभिरत्यन्तनिरतैः
कदाचित्काऽपालंकृतिरसरसालैः कविवरैः ।
कदाचित्सत्तर्कैरनुमितिपरैस्तार्किकवरैर्
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ ५ ॥

आत्मवेत्ता मुनि कधीं कधीं आपआपल्या विषयात अत्यत तत्पर असलेल्या जिज्ञासु विद्वज्जनाबरोबर पाडित्यपूर्ण चर्चा करीत बसेल ( तर कधीं पौराणिक वाङ्मयाचा आनद लुटणाऱ्या लोकामध्यें पुराणातील गोष्टी सागत बसेल ) कधीं विविध काव्यें काव्यातील उपमा, श्लेष, अर्थांतरन्यास इत्यादि अलकार आणि शृगार, वीर, करुणा इत्यादि रस याचा आस्वाद घेणाऱ्या मोठमोठ्या कवींमध्यें काव्याचा आनद लुटींत असेल, तर कधीं कधीं उत्तम

ब्रह्मरूपी रमलेला योगी कशाहि परिस्थितींत शांतच असतो एखाद्या वेळेला अंगावर वस्त्र नसलें तरी तो दिगंबर स्वरूपात आनंदानें असेल, तर एखाद्या वेळेला अंगावर दिव्य वस्त्रें परिधान करून फिरतहि असेल एखाद्या वेळेला कमरेभोंवतीं व्याघ्रचर्म गुंडाळूनहि फिरत राहील तो मनानें अत्यंत उदार असतो, निर्भय असतो सुजनांच्या हृदयाला तो आनंद देत असतो त्याची बुद्धि कधीं व्यामोह पावत नाहीं कारण सद्गुरूंच्या उपदेशानें त्याचें सर्व अज्ञान पार विलयास गेलेलें असतें

कदाचित्सत्त्वस्थः क्वचिदपि रजोवृत्तियुगत-
स्तमोवृत्तिः क्वाऽपि त्रितयरहितः क्वापि च पुनः ।
कदाचित्संसारी श्रुतिपथविहारी क्वचिदहो
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ ११ ॥

गुरूंच्या उपदेशामुळें ज्याचें अज्ञान नाहींसें झालेलें आहे असा ज्ञान विज्ञानसंपन्न योगी कधीं सत्त्वगुणसंपन्न असेल, कधीं तमोगुणानें युक्त असेल, तर कधीं त्रिगुणातीतहि वृत्ति धारण करील शुद्धसत्त्वगुणसंपन्न होऊन राहील एखाद्या वेळीं सर्वसाधारण मनुष्याप्रमाणें तो संसारात गुरफटलेला दिसेल, तर एखादी वेळेस वेदशास्त्रविहित कर्माचें तत्परतेनें आचरण करीत बसलेला असेल तो कोणत्याहि स्थितीत असला तरी, त्याच्या बुद्धीत कधी व्यामोह म्हणजे गोंधळ उत्पन्न होणार नाहीं

कदाचिन्मौनस्थः क्वचिदपि च वाग्वादनिरतः
कदाचित्स्वानन्दे हसति रभसा त्यक्तवचनः ।
कदाचिल्लोकानां व्यवहृतिसमालोकनपरो
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ १२ ॥

ब्रह्मनिष्ठ योगी गुरूंच्या उपदेशानें अंतःकरणातील अज्ञान पार नाहींसें झालेलें असल्यामुळें व्यवहारात वागताना एखाद्या वेळीं मौन धारण करून बसेल, तर एखाद्या वेळीं वक्तृत्वपूर्ण वाणीनें वेदान्ततत्त्वाचें पूर्णपणें निरूपण करीत बसेल कधी बोलावयाचें सोडून देऊन, मोठ्या वेगानें आपल्या आनंदात हसत राहील कधी कधी लोकांच्या व्यवहाराचें बारकाईनें निरीक्षण करीत

राहील, परतु हें सर्व करीत असताना त्याच्या बुद्धीला तिळमात्रहि व्यामोह निर्माण होणार नाहीं

कदाचिच्छक्तीनां विकचमुखपद्मेषु कवलान्
क्षिपंस्तासां क्वापि स्वयमपि च गृह्णन्स्वमुखतः ।
तदद्वैतं रूपं निजपरविहीनं प्रकटयन्
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ १३ ॥

ब्रह्मनिष्ठ योगी एखाद्या वेळेला 'ताराबा', 'भ्रमराबा', 'ललिताबा' इत्यादि रूपानें शक्तींची उपासना करताना त्या शक्तींच्या प्रसन्न—विकसित मुखकमलामध्यें घास घालील, तर त्याच्या मुखातील घास आपल्या मुखानें सेवन करीत राहील कधीं कधीं आपपरभावरहित परम अद्वैतरूपाला प्रकट करीत राहील हें सर्व करीत असताना त्याच्या अत करणात मी मोठा सिद्ध, शाक्त किंवा मी मोठा उच्च कोटीचा अद्वैत तत्त्ववेत्ता, ब्रह्मसाक्षात्कारी इत्यादि प्रकारचा व्यामोह निर्माण होणार नाहीं कारण गुरूच्या उपदेशानें त्याच्या बुद्धीतील अज्ञान नाहींसें झालेलें असतें

क्वचिच्छैवैः सार्धं क्वचिदपि च शाक्तैः सह रमन्
कदा विष्णोर्भक्तैः क्वचिदपि च सौरैः सह वसन् ।
कदाचिद्गाणेशैर्गतसकलभेदोऽद्वयतया
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ १४ ॥

ब्रह्मस्वरूपीं रमलेला जीवन्मुक्त महात्मा एखाद्या वेळीं म्हणजे शिवभक्ताच्या मेळाव्यात रमलेला असेल, तर कधीं कधीं शाक्ताच्या म्हणजे देवीभक्ताच्या किंवा श्रीविद्येची उपासना करणाऱ्या भक्ताच्या समुदायात समरस होऊन बसलेला दिसेल कधीं वैष्णव मडळीमध्यें तन्मय होऊन बसलेला दिसेल, तर कधीं सौराच्या म्हणजे सूर्यभक्ताच्या समूहात सूर्यभक्तांशीं एकरूप होऊन बसलेला दिसेल एखाद्या वेळेला गाणपत्याच्या म्हणजे गणपतीची उपासना करणाऱ्या लोकाच्या समाजात गणेशार्चादि उपासना करण्यामध्यें गर्क होऊन गेलेला दिसेल

तात्पर्य शैवात शैव, वैष्णवात वैष्णव, शाक्ता त शाक्त, गाणपत्यात गणपतिभक्त याप्रमाणें सर्वांशीं समरस होऊन बसेल पण त्याच्या बुद्धींत मी अमुक एका

संप्रदायाचा किंवा अमुक एका देवाचा भक्त असा व्यामोह म्हणजे अभिनिवेश असणार नाहीं. गणपति, शक्ति, सूर्य, हरि आणि हर इत्यादि सर्व देवांना तो अभेदरूपानें, एकरूपानें म्हणजे ब्रह्मरूपानें पहात असतो. त्याच्या चित्तांतील सगळा भेदभाव नाहींसा झालेला असतो. गुरूंच्या उपदेशानें त्याचें अज्ञान मावळलेलें असतें.

निराकारं क्वापि क्वचिदपि च साकारममलं
निजं शैवं रूपं विविधगुणभेदेन बहुधा ।
कदाश्चर्यं पश्यन् किमिदमिति हृष्यन्नपि कदा
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ १५ ॥

आपल्या शिवस्वरूपी उपास्यतत्त्वाला ब्रह्मनिष्ठ जीवन्मुक्त महात्मा कधीं निर्गुण निराकार रूपानें पहात रहातो, तर कधीं कधीं निर्मल, शुद्ध, सगुण, साकार रूपानें पहात रहातो आपलेंच उपास्यतत्त्व विविध नामरूप भेदानें भिन्न होऊन, विश्वरूपानें विविध गुणभेदानें अनेक रूपानें प्रतीतीला येतें. हें सर्व पहात असतांना तो कधीं कधीं आश्चर्यचकित झाल्यासारखा दिसतो, तर कधीं "काय मौज आहे !", "किती आनंद आहे !" अशा तऱ्हेनें आनंदाचे उद्‌गार काढीत आनंदमग्न होऊन जातो.

त्या ब्रह्मनिष्ठ योग्याच्या चित्तांत कधीं व्यामोह म्हणजे बुद्धीचा गोंधळ उत्पन्न व्हायचा नाहीं. कारण सद्‌गुरूंच्या उपदेशानें त्याच्या चित्तांत अज्ञानाचा लेशहि उरलेला नसतो निर्गुणाकडे व सगुणाकडे तो अभेद बुद्धीनें पहात रहातो.

कदा द्वैतं पश्यन्नखिलमपि सत्यं शिवमयं
महावाक्यार्थानामवगतिसमभ्यासवशतः ।
गतद्वैताभासः शिव शिव शिवेत्येव विलपन्
मुनिर्न व्यामोहं भजति गुरुदीक्षाक्षततमाः ॥ १६ ॥

ब्रह्मनिष्ठ जीवन्मुक्त महात्मा व्यवहार करतांना विश्वप्रपंचाकडे द्वैतबुद्धीनें पहात असला, तरी तें द्वैत तत्त्वतः सत्य नसून द्वैतरूपानें प्रतीतीला येणारें सर्वच विश्व 'सत्यं शिवं सुन्दरं' या न्यायानें अविनाशी, आनंदमय ब्रह्मस्वरूपच आहे, हें तत्त्व त्याच्या बुद्धीला पटलेलें असतें. कारण त्यानें 'प्रज्ञानं ब्रह्म', 'ब्रह्माहमस्मि', 'तत्त्वमसि', 'अयमात्मा ब्रह्म' इत्यादि महावाक्यांच्या

अर्थाचा सतत विचार करून — अभ्यासानें प्राप्त झालेल्या अनुभवाच्या योगानें त्याचा द्वैताभास पार मावळलेला असतो तो योगी शिव शिव शिव, शंकरा ! विष्णो ! प्रभो ! नारायणा ! श्रीहरे ! माधवा ! विश्वनाथा ! जगन्नाथा ! विश्वंभरा ! परमेश्वरा ! हे जगद्वंद्य जगज्जननी अशा रीतीनें भक्तिरसपूर्ण वाणीनें नामोच्चार करीत रहातो गुरूच्या उपदेशानें त्याचें सर्व अज्ञान मावळलेलें असल्यामुळें त्याच्या बुद्धीत कधींहि व्यामोह निर्माण होत नाहीं.

इमां मुक्तावस्थां परमशिवसंस्थां गुरुकृपा-
सुधापाङ्गावाप्यां सहजसुखवाप्यामनुदिनम् ।
मुहुर्मज्जन् मज्जन् भजति सुकृतैश्चेन्नरवर-
स्तदा त्यागी योगी कविरिति वदन्तीह कवयः ॥ १७ ॥

या सोळा श्लोकांनीं वर्णन केलेल्या अवस्थेला मुक्तावस्था — जीवन्मुक्ताची अवस्था असें म्हणतात ज्याच्या पदरीं पुण्याचें पाठबळ असेल त्याच नरश्रेष्ठाला ती प्राप्त होऊं शकेल ही मुक्तावस्था प्राप्त झाली असतां परम कल्याणमय, आनंदरूप ब्रह्मस्वरूपाच्या ठिकाणीं त्या योग्याला स्थिति स्थैर्य लाभतें. ही स्थिति याच देहीं गुरूच्या अमृतमय कृपादृष्टीनें प्राप्त होऊं शकतें स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश अशा महासुखाची ती पुष्करणीच होय जो कोणी भाग्यवान् मनुष्य या महासुखरूपी पुष्करणीमध्यें रोजच्या रोज वारंवार अवगाहन करतो त्या वेळीं त्याला तत्त्ववेत्ते लोक त्यागी, योगी, तत्त्ववेत्ता, साक्षात्कारी असें म्हणतात धन्य होय तो महात्मा, कारण त्याचा जन्म सफल झाला तो कृतकृत्य झाला

मौने मौनी गुणिनि गुणवान् पण्डिते पण्डितश्च
दीने दीनः सुखिनि सुखवान् भोगिनि प्राप्तभोगः
मूर्खे मूर्खो युवतिषु युवा वाग्मिनि प्रौढवाग्मी
धन्यः कोऽपि त्रिभुवनजयी योऽवधूतेऽवधूतः ॥ १८ ॥

जीवन्मुक्त महात्मा या जगांत कसा वागेल ? तो मौन धारण करणाऱ्याजवळ मौन धारण करून राहील दया, दान, दाक्षिण्य इत्यादि गुणांनीं संपन्न असलेल्या लोकामध्यें तो त्याच गुणांनीं अधिक संपन्न असलेला दिसेल.

पण्डा म्हणजे विवेकशील बुद्धि ही ज्यांच्याजवळ असेल अशा पंडित लोकांमध्यें हा योगी महात्मा त्यांच्यापेक्षां अधिक पंडित म्हणजे ज्ञानविज्ञान-संपन्न असा दिसेल.

दुःखी लोकांमध्यें, शोकानें व्याकुळ झालेल्या लोकांमध्यें तो अधिक दुःखी व अधिक शोकाकुल झालेला दृष्टीस पडेल. ( त्यांच्या अंतःकरणाशीं समरस होऊन त्यांच्या दुःखशोकांचा परिहार करीत असलेला दिसेल. )

धनदारादि वैभवानें संपन्न असलेल्या सुखी लोकांच्या सान्निध्यांत त्यांच्या सुखानें आनंदी असलेला दृष्टीस पडेल. भोगी लोकांमध्यें भोगसंपन्न असल्यासारखा तो समाधानी दिसेल. मूर्खांजवळ तो मूर्खासारखा वागेल. ( कारण मूर्खांपुढें शहाणपण कांहीं कामाचें नाहीं याची त्याला जाणिव असते. ) तरुण स्त्रीपुरुषांमध्यें तो तरुणासारखा वागेल. ( त्यांच्यामध्यें तो हास्यविनोदहि करीत राहील. ) प्रौढ संभाषण करणाऱ्या बहुश्रुत लोकांमध्यें हा जीवन्मुक्त योगी त्यांच्याहिपेक्षां प्रौढ संभाषण करणारा व बहुश्रुत असलेला असाच दृष्टीस पडेल. तात्पर्य, लहानांत लहान व थोरांत थोर अशा स्वरूपाचें त्याचें वागणें असलेलें दृष्टीस पडेल.

कोणी अवधूत म्हणजे शुद्ध निर्मल अलख निरंजन परम विरक्त भेटल्यास हा त्यांच्याजवळ त्यांच्याच सारखा किंबहुना त्यांच्यापेक्षांहि सरस असा दिसेल. असा त्रिभुवनांत थोर असलेला अथवा त्रैलोक्यांतहि आदरणीय, पूजनीय असलेला धन्य महात्मा क्वचितच एखादा दृष्टीस पडेल.



## आत्मषट्कम्

[ वेदांतील 'नेति नेति' इत्यादि निषेधवाक्यांच्या अनुरोधानें, जाणिवेंत येणाऱ्या सर्व वस्तूंचा 'त्या आत्मा नव्हेत' असा निषेध केल्यानंतर सर्व निषेधांचा अवधि म्हणून जें शिल्लक रहातें तोच आत्मा होय तो सर्व विश्वाचें अधिष्ठान असून अत्यंत शुद्ध व सच्चिदानंदस्वरूप आहे. तो शिव म्हणजे सुख-स्वरूप, मंगलमय, आनंदमय आहे. त्यालाच ब्रह्म म्हणतात आणि तेंच मी आहें. मी दुसरा कोणी नाहीं. असा दृढ निश्चय या आत्मषट्काच्या मननानें साधकास करून घेतां येईल.

या स्तोत्राला 'निर्वाणषट्क' असेंहि नाव दिलेलें आढळतें निर्वाण शब्दाचा अर्थ पूर्ण सुख, पूर्ण आनद असा आहे पूर्ण आनदातच चित्ताला पूर्ण शाति मिळते म्हणून निर्वाण शब्दाचा 'पूर्ण शाति' असाहि अर्थ होतो या सहा श्लोकाच्या अर्थाचें मनन केल्यास निश्चित पूर्ण शातीचा लाभ होईल ]

मनोबुद्ध्यहंकारचित्तानि नाहं
न च श्रोत्रजिह्वे न च घ्राणनेत्रे ।
न च व्योमभूमिर्न तेजो न वायु-
श्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥ १ ॥

मी कोण आहें ? मन, बुद्धि, अहकार आणि चित्त मी नव्हे श्रोत्रेंद्रिय किंवा रसनेंद्रिय मी नव्हे घ्राणेंद्रिय किंवा चक्षुरिन्द्रिय मी नव्हे पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश हीं पचमहाभूतें म्हणजे मी नव्हे शुद्धचैतन्य आणि आनद हेंच माझें रूप आहे मी शिव म्हणजे मगलमय परिपूर्ण परब्रह्म आहें मी चिदानदरूप शिवस्वरूप आहें मी शिवस्वरूप आहें

न च प्राणसंज्ञो न वै पञ्चवायुर्
न वा सप्तधातुर्न वा पञ्चकोषः ।
न वाक् पाणिपादौ न चोपस्थपायू
चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥ २ ॥

शरीरामध्यें सचार करणारा जो प्राणवायु तो मी नव्हे प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हे पचप्राणहि पण मी नव्हे रस, रक्त, मास, मेद, अस्थि, मज्जा आणि शुक्र हे सप्तधातुहि मी नव्हे रसरक्तादि सप्तधातु शरीराची धारणा करतात म्हणून त्याना धातु असे म्हणतात ते दृश्य म्हणजे डोळ्यानीं दिसणारे किंवा बहिरिंद्रियानीं कळणारे आहेत ते आत्मा कसे असू शकतील ? अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनदमय हे आत्म्याचे पाच कोश आहेत तलवार जशी म्यानामध्यें झाकली जाते त्याप्रमाणें आत्म्याला झाकून टाकतात आत्मस्वरूपाची प्रतीति येऊ देत नाहींत म्हणून याना आत्म्याचे कोश म्हटलें आहे हे दृश्य आहेत, ज्ञेय आहेत आत्मा या सर्वांचा द्रष्टा आहे, ज्ञाता आहे तोच मी आहें म्हणून मी पचकोशहि नव्हे हात, पाय, तोंड, गुद आणि उपस्थ हीं पचकर्मेंद्रियें मी नव्हे मी चिदानदरूप शिवस्वरूप आहें मी पूर्ण ब्रह्मस्वरूप आहें

न मे द्वेषरागौ न मे लोभमोहौ
मदो नैव मे नैव मात्सर्यभावः।
न धर्मो नचार्थो न कामो न मोक्ष-
श्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥ ३ ॥

मला कोणाचाहि द्वेष नाहीं व कशाचीहि आसक्ति नाहीं. मला कशाचाहि लोभ नाहीं. मला कशाचाहि गर्व नाहीं व कोणाबद्दल मत्सरहि नाहीं. मला आतां धर्म, अर्थ, काम आणि मोक्ष या चतुर्विध पुरुषार्थांचीहि अपेक्षा उरली नाहीं मी चिदानंदरूप शिवस्वरूप आहें. मी शिव म्हणजे परब्रह्मस्वरूप आहें.

न पुण्यं न पापं न सौख्यं न दुःखं
न मन्त्रो न तीर्थं न वेदा न यज्ञाः।
अहं भोजनं नैव भोज्यं न भोक्ता
चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥ ४ ॥

मला पुण्य नाहीं, पाप नाहीं, सुख नाहीं व दुःखहि नाहीं. मंत्र, तीर्थ, वेद आणि यज्ञ इत्यादि कोणत्याहि गोष्टींची मला आतां आवश्यकता राहिली नाहीं. मी भोजन नव्हे, भोज्य नव्हे आणि भोक्ताहि नव्हे. याचप्रमाणें दृश्य दर्शन आणि द्रष्टा इत्यादि कोणतीहि त्रिपुटी मी नव्हे. मी चिदानंदरूप परब्रह्म आहें. मी शिवस्वरूप आहें. मी ब्रह्मस्वरूप आहें.

न मे मृत्युशङ्का न मे जातिभेदः
पिता नैव मे नैव माता न जन्म।
न बन्धुर्न मित्रं गुरुर्नैव शिष्य-
श्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥ ५ ॥

मला मृत्यूचें भय नाहीं. ब्राह्मण किंवा शूद्र, अंत्यज किंवा चांडाळ इत्यादि जातिभेदहि मला उरला नाहीं. मला कोणी माता किंवा माझा कोणी पिताहि नाहीं. जन्मच नाहीं मला, मग मृत्यु कसा असणार? मला कोणी बंधु नाहीं. मित्र नाहीं. गुरु नाहीं व शिष्यहि नाहीं. मी केवळ चिदानंदरूप सत् चित् आनंदघन परिपूर्ण परब्रह्म आहें. मी शिवस्वरूप आहें. मी शिव आहें.

अहं निर्विकल्पो निराकाररूपो
विभुर्व्याप्य सर्वत्र सर्वेन्द्रियाणि।

सदा मे समत्वं न मुक्तिर्न बन्ध-
श्चिदानन्दरूपः शिवोऽहं शिवोऽहम् ॥ ६ ॥

मी निर्विकल्प म्हणजे भेदातीत आहें मी निर्विकार निराकार आहें मी विभु म्हणजे सर्व विश्वाला व्यापून रहाणारा आहें सर्वव्यापी आहें सर्वस्वरूप आहें सर्व ठिकाणीं आहें सर्व इंद्रियानाहि व्यापून राहिलों आहें मी सदा सर्व काळ समस्वरूप म्हणजे एकरूप आहें मला मुक्ति नाहीं व ससाराचें बधनहि नाहीं मी चिदानदरूप परब्रह्म आहें मी शिवस्वरूप आहें



## आत्मपञ्चकम्

[ अद्वैतपचकाचे हे श्लोक जिज्ञासु लोकांच्या चित्तात यथार्थ आत्म स्वरूपाचा आविष्कार होण्यास अत्यत उपयुक्त आहेत या श्लोकाना कांहीं ठिकाणीं 'अद्वैतपचरत्न' असेंहि नाव दिलेलें आढळतें आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं प्रतीतीला येणारा विश्वप्रपच हा तात्त्विक नसून तो प्रातिभासिक आहे मद अधकारामध्यें वाकड्या तिकड्या पडलेल्या दोरीवर भासलेला सर्प प्रकृष्ट प्रकाशात जसा नाहींसा होतो, बाधित होतो, किंवा झोंपेंतून जागे झाल्याबरोबर स्वप्नप्रपच जसा मावळतो त्याप्रमाणें आत्मस्वरूपाचा यथार्थ साक्षात्कार झाल्या बरोबर द्वैतप्रपचाची मिथ्या कल्पना मावळते व आपण शुद्ध सच्चिदानद परब्रह्म स्वरूप असल्याचा दृढनिश्चय होऊन अत करणाला अद्वितीय समाधानाचा लाभ होतो कांहीं पुस्तकांतून सहावा श्लोक अधिक असल्याचें दिसून येतें येथें वाचकासाठीं तोहि श्लोक दिला आहे या श्लोकाचें अवश्य मनन करावें हें आत्मषट्क व आत्मपचक स्तोत्राप्रमाणें नित्य पाठात ठेवावें ]

नाहं देहो नेन्द्रियाण्यन्तरङ्गो
नाहंकारः प्राणवर्गो न बुद्धिः ।
दारापत्यक्षेत्रवित्तादिदूरः
साक्षी नित्यः प्रत्यगात्मा शिवोऽहम् ॥ १ ॥

मी कोण आहें ? मी देह नव्हे हात, पाय, कान, नाक इत्यादि कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियेंहि मी नव्हे अत करण म्हणजे मी नव्हे अहकारहि पण माझें स्वरूप

संबंध ? शोक, मोह हे चित्ताचे धर्म आहेत. चित्त म्हणजे मी नव्हे. मग शोक-मोहाचा माझ्याशीं काय संबंध ? कर्तृत्व हाहि धर्म माझा नव्हे. मी कर्ता नाहीं. बंध आणि मोक्ष हे कर्त्यांचे धर्म आहेत. माझ्याशीं त्यांचा काय संबंध ? अर्थात् भोक्तृत्व हाहि धर्म माझ्या ठिकाणीं नाहीं. वरील पांच श्लोकांत सांगितल्या-प्रमाणें मी निर्विकार शुद्ध आनंदमय आत्मस्वरूप आहें.



## निर्वाणमञ्जरी

[ अद्वैतपञ्चरत्न, निर्वाणषट्क आणि विज्ञाननौका या स्तोत्रांत जो विषय ज्या रीतीनें प्रतिपादन केलेला आहे त्याच विषयाचें त्याच रीतीनें निर्वाणमञ्जरींत चिंतनच केलेलें आहे. बुद्धीमध्यें विषय ठसण्याकरितां अशा तऱ्हेचें चिंतन करणें आवश्यकच असतें. मंजरी शब्दाचा अर्थ तुरा असा आहे. या स्तोत्राच्या मननानें आनंदाचा तुराच हातीं आल्यासारखा वाटेल. ]

अहं नामरो नैव मर्त्यो न दैत्यो
न गन्धर्वरक्षःपिशाचप्रभेदः ।
पुमान् नैव न स्त्री तथा नैव षण्ढः
प्रकृष्टप्रकाशस्वरूपः शिवोऽहम् ॥ १ ॥

*मी कोण आहें ? मी देव नव्हे, मी मनुष्य नव्हे व मी दैत्यहि नव्हे. मी* गंधर्व, राक्षस किंवा पिशाच यांपैकीं कोणीहि नव्हे. मी पुरुष नाहीं, स्त्री नाहीं किंवा नपुंसकहि नाहीं. हे सर्व प्रकृतीचे व देहेंद्रियादिकांचे धर्म आहेत. माझा अर्थात् आत्म्याचा त्यांच्याशीं कांहीं संबंध नाहीं. मी सर्वोत्कृष्ट स्वयंप्रकाश परिपूर्ण परब्रह्म आहें

अहं नैव बालो युवा नैव वृद्धो
न वर्णी न च ब्रह्मचारी गृहस्थः ।
वनस्थोऽपि नाहं न संन्यस्तधर्मा
जगज्जन्मनाशैकहेतुः शिवोऽहम् ॥ २ ॥

*मी बाल नव्हे, तरुण नव्हे किंवा म्हाताराहि नव्हे.* मी ब्राह्मण, क्षत्रिय, वैश्य किंवा शूद्र या कोणत्याहि वर्णाचा नव्हे अथवा मी व्रती किंवा ब्रह्मचारीहि

नव्हे मी गृहस्थाश्रमी, वानप्रस्थाश्रमी किंवा चतुर्थाश्रमीहि नव्हे मग मी कोण आहें ? मी सर्व विश्वाचा उत्पत्ति प्रलयाचा अधिष्ठाता परिपूर्ण परब्रह्म आहें मी मंगलमय आहें आनंदमय आहें

अहं नैव मेयस्तिरोभूतमाय-
स्तथैवेक्षितुं मां पृथङ्नास्त्युपायः ।
समाश्लिष्टकायत्रयोऽप्यद्वितीयः
सदाऽतीन्द्रियः सर्वरूपः शिवोऽहम् ॥ ३ ॥

मी प्रमेय नव्हे किंवा ज्याचें अज्ञान निरस्त झालेलें असा एखादा कोणी प्रमाताहि नव्हे तसेंच मला पहाण्याकरिता माझ्यापेक्षा निराळ्या साधनाची आवश्यक्ता लागत नाहीं माझ्याच प्रकाशानें इतर सर्व प्रकाशित होतात, मला मात्र कोणीहि प्रकाशित करू शकत नाहीं माझा मीच प्रकाशित होत असतों, म्हणून मी स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश आहें स्थूलदेह, लिंगदेह आणि कारणदेह या तिन्ही देहांचा माझ्याशी संपर्क भासत असला तरी मी तत्त्वतः अद्वितीय म्हणजे निरुपाधिक एकरूपच आहें मी केव्हांहि बहिरिंद्रियांना गोचर होत नाहीं मी सर्वरूप आहें मी मंगलमय ब्रह्मस्वरूप आहें

अहं नैव मन्ता न गन्ता न वक्ता
न कर्ता न भोक्ता न मुक्ताश्रमस्थः ।
यथाऽहं मनोवृत्तिभेदस्वरूप-
स्तथा सर्ववृत्तिप्रदीपः शिवोऽहम् ॥ ४ ॥

मी मनन करणारा नव्हे, मी जाणारा नव्हे आणि बोलणाराहि नव्हे कोणत्याहि क्रियेशीं माझा कांहीं संबंध नाहीं मी कर्ताहि नव्हे आणि भोक्ताहि नव्हे मी कोणी जीवन्मुक्तावस्थेंत वावरणारा महात्मा नव्हे जसा मी निरनिराळ्या मनोवृत्तींच्या रूपानें नटतों तसाच मनाच्या व इंद्रियांच्या सर्व वृत्तींना मीच प्रकाशित करतों माझ्याचमुळें मनाचें, सर्व इंद्रियांचे व देहाचेंहि सर्व व्यवहार चाललेले असतात मी सर्वांचा अधिष्ठाता मंगलमय परिपूर्ण परब्रह्मस्वरूप आहें

न मे लोकयात्राप्रवाहप्रवृत्ति-
र्न मे बन्धबुद्ध्या दुरीहानिवृत्तिः ।

प्रवृत्तिर्निवृत्तिश्च चित्तस्य वृत्तिर्
यतस्त्वन्वहं तत्स्वरूपः शिवोऽहम् ॥ ५ ॥

लोकांमध्यें जाणें-येणें सतत करीत रहाण्याची मला प्रवृत्ति नाहीं व अमुक रीतीनें वागलें असतां मला बंधन किंवा दुःख मात्र होईल म्हणून त्यापासून भिऊन पराङ्मुत्त होण्याचीहि बुद्धि माझ्या ठिकाणीं नाहीं. प्रवृत्ति आणि निवृत्ति हे दोन्ही चित्ताचे धर्म आहेत. ज्याच्या सत्तेमुळें चित्तामध्यें प्रवृत्ति आणि निवृत्ति हे धर्म निर्माण होतात तो मंगलमय सच्चिदानंदस्वरूप आत्माच मी आहें. मी परब्रह्म आहें.

( या श्लोकाचा तिसरा चरण 'प्रवृत्तिर्निवृत्याऽस्य चित्तस्य वृत्तिः' असा आहे. याचा अर्थ लावतांना ओढाताण होते वरचा पाठ सुगम वाटला म्हणून घातला आहे. वाचकांनीं योग्य तो स्वीकारावा. )

यतोऽहं न बुद्धिर्न मे कार्यसिद्धिर्
यतो नाहमङ्गं न मे लिङ्गभङ्गः ।
हृदाकाशवर्ती गताङ्गत्रयार्तिः
सदा सच्चिदानन्दमूर्तिः शिवोऽहम् ॥ ६ ॥

मी बुद्धिस्वरूप नव्हे. कोणत्याहि कार्याची सिद्धि अथवा हानि मला सुखी अथवा दु.खी करूं शकत नाहीं. मी स्थूलशरीरस्वरूप नव्हे व मला स्त्री, पुरुष किंवा नपुंसक असा लिंगभेदहि नाहीं. मी सर्वांच्या हृदयाकाशांत विराजमान आहे. स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिन्ही प्रकारच्या देहांचा — उपाधींचा मला उपसर्ग नाहीं. मी सदा सर्वकाळ सद्घन चिद्घन व आनंदघन आहें, हेंच माझें रूप आहे. मी मंगलमय परब्रह्म आहें.

निदानं यदज्ञानकार्यस्य कार्यं
विना यस्य सत्त्वं स्वतो नैव भाति ।
यदाद्यन्तमध्यान्तरालान्तराल-
प्रकाशात्मकं स्यात्तदेवाहमस्मि ॥ ७ ॥

जें चित्तत्व अज्ञानाचें कार्य असलेल्या संपूर्ण विश्वप्रपंचाचें मूलकारण म्हणजे अधिष्ठान आहे, ज्याच्या सत्तेशिवाय, अस्तित्वाचा आधार मिळाल्या-

शिवाय, कोणतेंहि कार्य स्वत प्रकट होऊ शकत नाहीं, जें आदि अतीं व मध्यें सतत प्रकाशत असतें आदि आणि मध्य याच्या अतरालातहि प्रकाशत असतें व अतरालाच्याहि अतरालात प्रकाशत असतें, तें सदा सर्वकाळ सर्वत्र प्रकाशमान असलेलें चित्तत्त्व, तेंच मी आहें

यदासीद्विलासाद् विकारो जगद्य-
द्विकाराश्रयो नाद्वितीयत्वतः स्यात् ।
मनोबुद्धिचित्ताहमाकारवृत्ति-
प्रवृत्तिर्यतः स्यात्तदेवाहमस्मि ॥ ८ ॥

जें चित्तत्त्व विलासानें विकृतसें झालें व ज्याचा विकार म्हणजेच हें सर्व जग होय तत्त्वत पाहू गेलें असता तें तत्त्व विकाराचा आश्रय होऊ शकत नाहीं तें विकृत होऊ शकत नाहीं कारण तें अद्वितीय आहे एकरूप आहे एकजिनसी आहे मन, बुद्धि, चित्त आणि अहकार या सर्वांच्या वृत्तींचें तें प्रेरक आहे त्याच्यामुळेंच अत करणवृत्ति प्रवृत्त होतात अशा रीतीनें सर्वांचें प्रवर्तक व अधिष्ठान असलेलें जें चित्तत्त्व तेंच मी आहें

यदन्तर्बहिर्व्यापकं नित्यशुद्धं
यदेकं सदा सच्चिदानन्दकन्दम्
यतः स्थूलसूक्ष्मप्रपञ्चस्य भानं
यतस्तत्प्रसूतिस्तदेवाहमस्मि ॥ ९ ॥

जें आत्मतत्त्व आत आहे, बाहेर आहे, खालीं वर, मागें-पुढें चहूकडे आहे सर्वत्र आहे सर्वांना व्यापून राहिलेलें आहे जें नेहमींच निर्मल आहे, जें सदा सर्वकाळ सत्यस्वरूप, चित्स्वरूप आणि आनदकदस्वरूप आहे, ज्याच्यापासून स्थूल आणि सूक्ष्म अशा सर्व विश्वप्रपचाचें भान होतें, तसेंच स्थूल आणि सूक्ष्म अशा विश्वप्रपचाची उत्पत्तीहि ज्याच्यापासून होतें तेंच आत्मतत्त्व मी आहें

यदर्केन्दुविद्युत्प्रभाजालमाला-
विलासास्पदं यत्स्वभेदादिशून्यम् ।
समस्तं जगद्यस्य पादात्मकं स्याद्
यतः शक्तिभानं तदेवाहमस्मि ॥ १० ॥

जें आत्मतत्त्व सूर्य चंद, विद्युल्लता आणि अग्नि वगैरे तेजस्वी पदार्थांच्या तेजाच्या — तेज समूहाचा दिसत असलेला जो विलास, त्या विलासाचें अधिष्ठान आहे, जें आत्मतत्त्व स्वगतभेद सजातीयभेद आणि विजातीयभेद यांनीं रहित आहे आत्मा निरंश, निरवयव असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं स्वगतभेद संभवत नाहीं हात म्हणजे संपूर्ण शरीर नव्हे पाय म्हणजे संपूर्ण शरीर नव्हे अशा रीतीनें शरीराच्या ठिकाणीं जो भेद दृष्टीस पडतो त्याला स्वगतभेद म्हणतात रामाचें शरीर तें गोविंदाचें शरीर नव्हे व गोविंदाचें शरीर तें रामाचें नव्हे अशा रीतीनें दिसणाऱ्या भेदास सजातीय भेद असें म्हणतात मानवाचें शरीर तें पशूचें शरीर नव्हे व पशूचें शरीर तें मानवाचें शरीर नव्हे या तऱ्हेच्या भेदास विजातीय भेद असें म्हणतात आत्मतत्त्वासारखें दुसरें तत्त्व या जगात नसल्यामुळें आत्म्याच्या ठिकाणीं सजातीय भेद संभवत नाहीं व आत्मतत्त्वाहून विजातीय असें या जगात दुसरें कांहींच नाहीं विजातीय म्हणून जें भासतें तें तत्त्वत सत्य नाहीं यामुळें आत्म्याच्या ठिकाणीं विजातीय भेद संभवत नाहीं म्हणून आत्मतत्त्वाला स्वभेदादिशून्य म्हटलें आहे आत्म्याचें स्वरूप एवढें विशाल आहे की, कल्पना करावयाचीच झाल्यास हें विशाल जग आत्म्याचा एक अंशमात्र आहे असें म्हणता येईल त्याचप्रमाणें जेथें कोठें जी काहीं शक्ति दृष्टीस पडते ती देखील त्या आत्म्याच्याचमुळें तात्पर्य, सर्वप्रकाशक, अखड आणि अत्यंत विशाल तसेंच सर्व शक्तींचें अधिष्ठान असलेलें असें जें आत्मतत्त्व तेंच मी आहें

यतः कालमृत्युर्बिभेति प्रकामं
यतश्चित्तबुद्धीन्द्रियाणां विलासः ।
हरिब्रह्मरुद्रेन्द्रचन्द्रादिनाम-
प्रकाशो यतः स्यात्तदेवाहमस्मि ॥ ११ ॥

ज्याला पाहून काळ अत्यंत घाबरतो, मृत्यु भितो, मन, बुद्धि, इंद्रियें यांचा विलास ज्याच्या आश्रयानेंच चाललेला आहे, ब्रह्मा, विष्णु, महेश, इंद्र, चंद्र इत्यादिकांच्या नामांचा महिमाहि ज्याच्यामुळेंच आहे असें जें परमात्म तत्त्व तेंच मी आहें

यदाकाशवत्सर्वगं शान्तरूपं
परं ज्योतिराकारशून्यं वरेण्यम् ।

यदाद्यन्तशून्यं परं शङ्कराख्यं
यदन्तर्विभाव्यं तदेवाहमस्मि ॥ १२ ॥

जें आकाशाप्रमाणें सर्वत्र विराजमान आहे, शांत आहे, सर्वोत्कृष्ट प्रकाश स्वरूप आहे, निराकार आहे, सर्वश्रेष्ठ आहे, ज्याला आदि नाहीं व अंतहि नाहीं, *ज्याला परमेश्वर म्हणतात, महेश म्हणतात, परम महान् लोक कल्याण* कर्ता शंकर असें म्हणतात, ज्याचा आपल्या हृदयातच सूक्ष्म बुद्धीनें विचार करता येतो, असें जें सच्चिदानंदघन परमात्मतत्त्व तेंच मी आहें

• •

## हस्तामलकस्तोत्रम्

[ आद्य श्रीशंकराचार्यांच्या चार पट्टशिष्यांपैकीं हस्तामलकाचार्य हे एक होते ते अगदीं लहान असताना कोणाशीं कांहीं बोलतहि नसत व कोणाचें कांहीं ऐकतहि नसत अगदीं जडभरतासारखें वागणें होतें त्याचें लोकांना ते वेडे वाटत होते ]

असें सांगतात कीं, यमुनेच्या कांठीं कोणी एक सिद्ध योगी महात्मा रहात असे एकदा एक ब्राह्मणाची बाई आपल्या लहान मुलाला बरोबर घेऊन तेथें स्नानास आली तिनें त्या योग्याजवळ आपलें मूल ठेवलें 'महाराज ! मी स्नान करून येतें, तोंपर्यंत आपण या मुलाकडे लक्ष ठेवा ' अशी विनंती करून ती स्नानास गेली इकडे योग्याची समाधि लागली व भान हरपलें तें मूल रांगत रांगत प्रवाहाकडे गेलें व प्रवाहात पडलें ! ती बाई जेथें स्नान करीत होती तेथेंच तें मूल वहात आलें ! आपलें मूल गतप्राण झालेलें पाहून त्या बाईनें हंबरडाच फोडला ! त्या मृत मुलाला घेऊन ती त्या योग्याजवळ आली आक्रोश करूं लागली इतक्यात योग्याची समाधि उतरली व ते भानावर आले तिचें दुःख व आक्रान्त पाहून योग्याचें मन कळवळलें आणि त्यानें योगबलानें आपला देह सोडून त्या मुलाच्या मृत शरीरात प्रवेश केला ! तें मूल जिवंत झालें ! तेच हे हस्तामलक होत अशा रीतीनें ते बालपणींच स्वतः सिद्ध व ज्ञानी झाले

आईबापाना मात्र आपला मुलगा बहिरा, मुका व जडमति आहे असें वाटूं लागलें ! त्याचें योग्य वेळीं उपनयन केलें पण तो कांहीं केल्या कांहीं

ऐकेना, शिकेना, बोलेना व चालेना लोकहि त्याचा उपहास करू लागले त्याला वेडा म्हणू लागले तो दिसायला मात्र अत्यंत तेजस्वी व रूपवान् असा होता.

योगायोगानें आद्य श्रीशंकराचार्य दक्षिणेकडील तीर्थयात्रा करीत करीत हस्तामलकाच्या श्रीवलि नावाच्या गावीं आले आचार्यांचा प्रभाव, अलौकिक विद्वत्ता वैभव आणि तेज पाहून मुग्ध झालेल्या वेदशास्त्रसपन्न प्रभाकरानें आपल्या पत्नीसह त्या मुलाला ( हस्तामलकाला ) बरोबर घेतलें व आचार्यांचें आदर-पूर्वक दर्शन घेऊन आचार्यांच्या चरणीं त्याला अर्पण केलें।

लोकाचा व आई-वडिलाचा अभिप्राय लक्षात घेऊन आचार्यांनीं सर्वांच्या देखत त्याला काहीं प्रश्न केले तेच प्रश्न या स्तोत्राच्या पहिल्या श्लोकात आहेत पुढच्या बारा श्लोकानीं प्रश्नांचीं उत्तरें दिलीं आहेत चौदावा श्लोक मात्र स्तोत्राच्या सदर्भात बसत नाहीं ' स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ' हा सर्व प्रश्नाच्या उत्तराचा मानबिंदु आहे चौदाव्या श्लोकात विश्वव्यापी विष्णूच्या यथार्थ स्वरूपाचें स्तवन आहे आतापर्यंत कधींहि कोणाशीं एक अक्षरहि न बोलणाऱ्या मुलाच्या तोंडून जेव्हा घडाघडा म्हटल्या जाणाऱ्या श्लोकाच्या रूपानें आचार्यांनीं विचारलेल्या प्रश्नाचीं उत्तरें ऐकलीं तेव्हा त्या मुलाची माता पितरें व सर्व लोक याच्या आश्चर्याला पारावार राहिला नाहीं तो जरी सर्वांना वेडा, बहिरा, मुका व जडमति वाटत होता तरी त्याला आत्मज्ञान 'करतलामलकवत्' म्हणजे तळहातावरील आवळ्याप्रमाणें अत्यंत स्पष्ट — नि सदिग्ध झालेलें होतें म्हणूनच पुढें ते हस्तामलकाचार्य याच नावानें प्रसिद्धीस आले हस्तामलकस्तोत्र वेदान्त प्रकरणात अत्यंत महत्त्वाचें आहे यावर एक सस्कृत टीका आहे ती शंकराचार्यांची आहे असें समजतात श्रीसंत एकनाथानीं यावर विस्तृत ओवीबद्ध टीका लिहिलेली आहे ]

कस्त्वं शिशो ! कस्य कुतोऽसि गन्ता
किं नाम ते त्वं कुत आगतोऽसि ।
एतन्मयोक्तं वद चार्भक ! त्वं
मत्प्रीतये प्रीतिविवर्धनोऽसि ॥ १ ॥

आचार्यांनीं विचारलें, बाळ ! तू कोण आहेस ? कोणाचा आहेस ? तुला कोठें जावयाचें आहे ? तुझें नाव काय आहे ? तू कोठून आला आहेस ? बाळ !

माझ्या संतोषासाठीं तूं, मी विचारलेल्या या प्रश्नांचीं उत्तरें दे. तुझ्याकडे पाहून मला मोठा संतोष वाटतो. तूं संतोष वाढविणारा आहेस.

( हस्तामलक उवाच )

नाहं मनुष्यो न च देवयक्षौ
न ब्राह्मणक्षत्रियवैश्यशूद्राः ।
न ब्रह्मचारी न गृही वनस्थो
भिक्षुर्न चाहं निजबोधरूपः ॥ २ ॥

हस्तामलक म्हणाले, महाराज! मी मनुष्य नाहीं. मी देव नाहीं अथवा यक्षहि नाहीं मी ब्राह्मण नाहीं, क्षत्रिय नाहीं, वैश्य नाहीं व शूद्रहि नाहीं. मी ब्रह्मचारी नाहीं, गृहस्थाश्रमी नाहीं. मी वानप्रस्थ किंवा संन्यासीहि पण नाहीं. सांगूं मी कोण आहें तें? अहो! मी निजबोधस्वरूप आत्मा आहें. मी निजानंदस्वरूप आहें मी शुद्ध सच्चिदानंदघन परिपूर्ण परब्रह्म आहें.

निमित्तं मनश्चक्षुरादिप्रवृत्तौ
निरस्ताखिलोपाधिराकाशकल्पः ।
रविर्लोकचेष्टानिमित्तं यथा यः
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ३ ॥

जो मन, बुद्धि, चित्त आणि अहंकार, त्याचप्रमाणें हात, पाय, कान, नाक, डोळे इत्यादि कर्मेंद्रियें व ज्ञानेंद्रियें यांच्या प्रवृत्तीचें निमित्त आहे; ज्याच्यामुळें हे सर्व आपआपले कार्य करण्यास प्रवृत्त होतात; ज्याला तत्त्वतः कोणताहि उपाधि नाहीं; जो आकाशासारखा अत्यंत निर्मल व सर्वव्यापी आहे; सूर्य जसा सर्व लोकांच्या व्यवहाराला निमित्त होतो त्याचप्रमाणें सर्वांच्या व्यवहाराला निमित्त होणारा असा जो नित्यज्ञानस्वरूप आत्मा, तोच मी आहें।

यमग्न्युष्णवन्नित्यबोधस्वरूपं
मनश्चक्षुरादीन्यबोधात्मकानि ।
प्रवर्तन्त आश्रित्य निष्कम्पमेकं
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ४ ॥

नेहमीं उष्ण असणें हा जसा अग्नीचा स्वभाव आहे त्याचप्रमाणें नित्यज्ञानस्वरूप असणें हा आत्म्याचा स्वभाव आहे. स्वभावतः जडस्वरूप असलेलीं मन, डोळे इत्यादि इंद्रियें ज्याच्या आश्रयानेंच आपआपलें कार्य करण्यास प्रवृत्त होतात; जो निष्कंप म्हणजे स्पंदनरहित अर्थात् निर्विकार आहे; एकमेव, अद्वितीय, नित्यज्ञानस्वरूप आत्मा आहे; तोच मी आहें.

मुखाभासको दर्पणे दृश्यमानो
मुखत्वात्पृथक्त्वेन नैवास्ति वस्तु ।
चिदाभासको धीषु जीवोऽपि तद्वत्
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ५ ॥

आरशांत दिसणाऱ्या मुखाच्या प्रतिबिंबाला मुखापेक्षां निराळें असें तत्त्वतः काय अस्तित्व आहे ? आरसा हा उपाधी पुढें आल्यामुळें प्रतिबिंबरूपानें मुखच तेथें प्रतीतीला येतें. पण प्रतिबिंब हें मुखाहून निराळें भासतें आणि आरसे अनेक असल्यास तीं प्रतिबिंबेंहि परस्परांहून निराळीं भासतात. त्याचप्रमाणें बुद्धीमध्यें पडलेलें चैतन्याचें प्रतिबिंब म्हणजेच जीव होय. बुद्धिरूपी उपाधीमुळें शुद्धचैतन्यच बुद्धींत प्रतिबिंबित होऊन जीवरूपानें प्रतीतीला येतें. तो जीव शुद्धचैतन्याहून निराळा भासतो. बुद्धि म्हणजे अंतःकरण, हीं अंतःकरणें अनेक असल्यामुळें ते जीवहि परस्परभिन्न असे प्रतीतीला येतात. तत्त्वतः पाहू गेलें असतां त्या चैतन्याच्या प्रतिबिंबाला चैतन्यापेक्षां निराळें असें काय अस्तित्व आहे ? मुखाचा आभास असलेलें प्रतिबिंब जसें मुखाहून निराळें नाहीं त्याचप्रमाणें शुद्धचैतन्याचा आभास असलेला जीव शुद्धचैतन्याहून निराळा नाहीं. शुद्धचैतन्य हें नित्यज्ञानस्वरूप आहे. त्यालाच आत्मा म्हणतात, आणि तोच मी आहें. मी नित्यज्ञानस्वरूप आत्मा आहें.

यथा दर्पणाभाव आभासहानौ
मुखं विद्यते कल्पनाहीनमेकम् ।
तथा धीवियोगे निराभासको यः
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ६ ॥

प्रतिबिंब हें कल्पनामात्र आहे. स्वच्छ आरशांत पडलेली मुखाची छाया म्हणजेच प्रतिबिंब. मुखापुढील आरसा नाहींसा झाला कीं प्रतिबिंब कल्पना

मावळते व मुख मात्र शिल्लक रहातें. त्याचप्रमाणें धीवियोग म्हणजे बुद्धिरूपी उपाधीचा निरास, तो झाला कीं आभासरहित शुद्धचैतन्यच शिल्लक रहातें. तेंच नित्यज्ञानस्वरूप आत्मा होय, आणि तोच मी आहें.

मनश्चक्षुरादेर्वियुक्तः स्वयं यो
मनश्चक्षुरादेर्मनश्चक्षुरादिः।
मनश्चक्षुरादेरगम्यस्वरूपः
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ७ ॥

जो आत्मा स्वतः मन, कान, नाक व डोळे इत्यादि इंद्रियें आणि देहादिक यांच्याहून अगदीं निराळा आहे; जो मनाचें मन आणि डोळ्याचा डोळा आहे; मनाला मनन करण्याची शक्ति व डोळ्याला पहाण्याची शक्ति ज्याच्यामुळें येतें, अथवा घटादिस्थूल पदार्थांचें ज्ञान, मन आणि डोळा यांच्यामुळें होतें, पण मन आणि डोळा यांचें ज्ञान आत्म्यामुळें होतें म्हणून आत्म्याला मनाचें मन आणि डोळ्याचा डोळा असें म्हणतात. मन व डोळा वगैरे कोणींहि ज्याचें स्वरूप जाणूं शकत नाहींत, असें ज्याचें स्वरूप आहे, तो सर्वसाक्षी नित्यज्ञानस्वरूप आत्मा, तोच मी आहें.

य एको विभाति स्वतः शुद्धचेताः
प्रकाशस्वरूपोऽपि नानेव धीषु।
शरावोदकस्थो यथा भानुरेकः
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ८ ॥

जो एकच एक स्वतःसिद्ध शुद्धचैतन्यस्वरूप व प्रकाशस्वरूप असूनहि अंतःकरणरूपी उपाधि अनेक असल्यामुळें अनेकरूप असल्यासारखा प्रतीतीला येतो; सूर्य जसा स्वतः एकच आहे, पण येळण्या, परळ, खापरें इत्यादिकांमध्यें सांठलेल्या पाण्यांत प्रतिबिंबित होऊन अनेक रूपांनीं प्रतीतीला येतो, तीच स्थिति आत्म्याची आहे. महाराज! असा जो एकमेव, अद्वितीय, स्वयंप्रकाश, नित्यज्ञानस्वरूप आत्मा, तोच मी आहें.

यथानेकचक्षुःप्रकाशो रविर्न
क्रमेण प्रकाशीकरोति प्रकाश्यम्।

अनेका धियो यस्तथैकः प्रबोधः
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ९ ॥

प्रकाशस्वरूप सूर्य जसा सर्व डोळ्यांना, प्रकाश्यस्वरूप असलेल्या घटपटादि पदार्थांना पहाण्याचें सामर्थ्य एकदम देतो, तो कांहीं क्रमाक्रमानें एकेक विषय दाखवतो असें नाहीं. त्याचप्रमाणें प्रकृष्ट बोधस्वरूप चित्स्वरूप असलेला एकमेव अद्वितीय आत्मा देखील अनेक बुद्धींना आपआपला विषय ग्रहण करण्याची शक्ति एकदमच देतो; तो कांहीं क्रमानें देत नाहीं. असा जो नित्यज्ञानस्वरूप आत्मा तोच मी आहें. तात्पर्य, सूर्य जसा एकदम सर्व चक्षुरिंद्रियांच्या ठिकाणीं अधिष्ठित होऊन चक्षुरिंद्रियांना आपआपले घटपटादि विषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य देतो त्याचप्रमाणें स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश असलेला प्रकृष्ट ज्ञानस्वरूप जो आत्मा तो सर्व बुद्धींच्या ठिकाणीं अधिष्ठित होऊन सर्व बुद्धींना आपआपले विषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य देतो. तोच नित्यज्ञानस्वरूप असलेला आत्मा मी आहें.

विवस्वत्प्रभातं यथारूपमक्षं
प्रगृह्णाति नाभातमेवं विवस्वान् ।
यदाभात आभासयत्यक्षमेकः
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ १० ॥

सूर्याच्या प्रकाशानें प्रकाशित झालेल्या घटपटादि विषयांनाच चक्षुरिंद्रिय प्रकाशित करूं शकतें. सूर्यप्रकाशानें प्रकाशित नसलेल्यांना तें प्रकाशित करूं शकत नाहीं. त्याचप्रमाणें सूर्य देखील चैतन्याच्या प्रकाशानें प्रकाशित असेल तरच तो चक्षुरादि इंद्रियांना प्रकाशित करूं शकतो अथवा घटपटादि विषय ग्रहण करण्याचें सामर्थ्य देऊं शकतो. नाहीं तर नाहीं. तात्पर्य, घटपटादि विषयांना चक्षुरादि इंद्रियें प्रकाशित करतात. चक्षुरादि इंद्रियांना सूर्य प्रकाशित करतो व सूर्याला चिदात्मा प्रकाशित करीत असतो. तो मात्र स्वतःसिद्ध स्वयंप्रकाश आहे. नित्यज्ञानस्वरूप आहे. असा जो नित्यज्ञानस्वरूप आत्मा तोच मी आहें.

यथा सूर्य एकोऽप्स्वनेकश्चलासु
स्थिरास्वप्यनन्यद्विभाव्यस्वरूपः ।

चलासु प्रभिन्नासु धीष्वेक एव
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ ११ ॥

सूर्य जसा एकच आहे, पाण्याच्या हालचालीमुळें पाण्यात प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या ठिकाणीं चचलत्व भासतें, तसेंच पाण्याच्या स्थिरत्वामुळें पाण्यात प्रतिबिंबित झालेल्या सूर्याच्या ठिकाणीं स्थिरत्व प्रतीतीला येतें वस्तुत पाहू गेलें असता तें चचलत्व किंवा स्थिरत्व सूर्याच्या ठिकाणीं नसतें तें पाण्याच्याच ठिकाणीं असतें चचलत्व स्थिरत्व हे पाण्याचे धर्म आहेत पाण्याच्या सपर्कामुळें ते सूर्याच्या ठिकाणीं भासतात एवढेंच त्याचप्रमाणें बुद्धीच्या अनेकत्वामुळें अनेकरूपानें प्रतीतीला येणारें किंवा बुद्धीच्या चाचल्यामुळें चचल, अस्थिर म्हणून प्रतीतीला येणारें चित्तत्वाहि तत्वत एकरूप, कूटस्थ, अचल, निर्विकार असेंच आहे तें नित्यज्ञानस्वरूप आहे व त्यालाच आत्मा असें म्हणतात महाराज ! असा जो नित्यज्ञानस्वरूप आत्मा तोच मी आहें

घनच्छन्नदृष्टिर्घनच्छन्नमर्कं
यथा निष्प्रभं मन्यते चातिमूढः ।
तथा बद्धवद्भाति यो मूढदृष्टेः
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ १२ ॥

मनुष्याच दृष्टिमडळ मेघमडळानें आच्छादित झालेलें असतें, त्यामुळें त्याला सूर्य दिसत नाहीं पण मनुष्य मात्र असें समजतो की, मेघमडळानें सूर्यमडळच झाकून गेलें आहे ! वस्तुत मेघमडळापेक्षा सूर्यमडळ कितीतरी पटींनी मोठें असतें तें मेघमडळानें झाकलें कसें जाणार ? पण हें त्या मूढदृष्टि असलेल्या मनुष्याला कळत नाहीं तो भ्रांत असतो तो ढगानें सूर्य झाकला गेला असेंच समजतो सूर्य स्वभावत प्रकाशस्वरूप असूनहि तो निष्प्रभ झाला, निस्तेज झाला, असेंच समजतो त्याचप्रमाणें आत्मा हा नित्यमुक्त, निर्मल, स्वयप्रकाश आणि चित्स्वरूप असूनहि अविवेकी मूढ मनुष्याला तो बद्ध, मलिन व जडस्वरूप भासतो, कारण त्याच्या बुद्धीला अविवेकानें पछाडलेलें असतें अज्ञानामुळें तो बुद्धीलाच आत्मा समजतो आणि बुद्धीचे धर्म जे सुख-दुःख, दैन्य व शोक इत्यादि ते सर्व आत्म्याच्या ठिकाणीं मानतो वस्तुत आत्म्याच्या ठिकाणीं या कोणत्याहि धर्माचा तिळमात्रहि सबध नाहीं आत्मा हा नित्यज्ञानस्वरूप आहे, आणि महाराज ! तोच आत्मा मी आहें.

समस्तेषु वस्तुष्वनुस्यूतमेकं
समस्तानि वस्तूनि यन्न स्पृशन्ति ।
वियद्वत्सदा शुद्धमच्छस्वरूपं
स नित्योपलब्धिस्वरूपोऽहमात्मा ॥ १३ ॥

जें तत्त्व सर्व वस्तूमध्यें एकच एक गोवलें गेलेलें आहे, सर्वत्र ओतप्रोत भरलेलें आहे, असें असूनहि जगातील कोणतीहि वस्तु त्याला स्पर्श करू शकत नाहीं जगातील कोणत्याहि पदार्थानें त्याचें साकल्यानें आकलन होऊ शकत नाहीं

जें तत्त्व आकाशाप्रमाणें सदा सर्वकाळ शुद्ध व स्वच्छ आहे, त्यालाच नित्यज्ञानस्वरूप आत्मा म्हणतात, व तोच मी आहें मी दुसरा कोणीहि नव्हे

( तत्वत या ठिकाणीं हें स्तोत्र संपलें आहे चौदाव्या श्लोकानें विश्व व्यापी व आत्मस्वरूपी अशा विष्णूची स्तुति आहे वाचकाच्या जिज्ञासेसाठीं तो श्लोक व त्याचा अर्थ दिला आहे )

उपाधौ यथा भेदता सन्मणीनां
तथा भेदता बुद्धिभेदेषु तेऽपि ।
यथा चन्द्रिकाणां जले चञ्चलत्वं
तथा चञ्चलत्वं तवापीह विष्णो ॥ १४ ॥

ज्याप्रमाणें प्रतिबिंबाना व्यक्त करणारे आरसे किंवा मणि म्हणजे रत्नें हीं अनेक असतात, अनेकता हा उपाधींचा धर्म आहे त्यात प्रतिबिंबित होणारें बिंब ( तत्त्व ) हें एकच असतें, त्याचप्रमाणें सिद्धान्तामध्यें उपाधिभूत बुद्धि म्हणजे अंत करणें ही अनेक असतात, पण भिन्न भिन्न अंत करणामध्यें प्रतिबिंबित होणारें आत्मतत्त्व हें मात्र एकच आहे

हे विष्णो ! विश्वव्यापी अनंता ! हे परमेश्वरा ! तें आत्मतत्त्व म्हणजे तूच आहेस या जगात सर्वत्र सर्वरूपानें सर्वकाळ तूच तू विराजमान आहेस तुझ्याशिवाय दुसरें काहीं नाहीं

ज्याप्रमाणें जलात प्रतिबिंबित झालेल्या चंदिकेच्या ठिकाणीं दिसणारें चचलत्व हें त्या चंदिकेचें नसून तें जलाचें आहे, त्याचप्रमाणें हे परमेश्वरा ! उपाधींमुळें तुझ्या ठिकाणीं प्रतीतीला येणारे गुणधर्म तत्त्वत तुझे नसून ते उपाधींचेच आहेत तू मात्र सर्वोपाधिविनिर्मुक्त, निर्गुण, निराकार, निर्विकार

सकल संसार धर्म विरहित, शुद्ध, अखंड, अनंत, सच्चिदानंदघन, नित्यज्ञानस्वरूप, स्वयंप्रकाश, परिपूर्ण, परब्रह्मच आहेस तात्पर्य, तुझ्याशिवाय दुसरें कांहीं नाहीं, असें म्हटल्यानंतर मी देखील तूच म्हणजे परिपूर्ण परब्रह्मच आहें, असा अर्थ झाला याप्रमाणें 'कस्त्वम्?' या पहिल्या प्रश्नाच्या उत्तरांतच बाकीच्या प्रश्नांचीं उत्तरें सामावलीं असल्यामुळें बाकीच्या प्रश्नांना निराळें उत्तर देण्याची आवश्यकता रहात नाहीं माता पिता, जन्म मृत्यु, जाणें येणें इत्यादि कोणत्याहि गोष्टी परिपूर्ण परब्रह्माच्या ठिकाणीं संभवतच नाहींत



# हरिमीडेस्तोत्रम्

[ भगवत्पूज्यपाद श्रीमान् आद्यशंकराचार्य यांनीं केलेलीं सर्वच स्तोत्रें अत्यंत उत्तम आहेत त्यांत हें मत्तमयूर वृत्तांतील हरिमीडेस्तोत्रहि अत्यंत महत्त्वाचें व उत्तम गणलें जातें उपनिषदांतील महत्त्वाच्या भागाचें यांत संक्षेपानें वर्णन केलेलें आहे प्रत्येक श्लोकाच्या शेवटीं 'हरिमीडे' हीं अक्षरें असल्यामुळें या स्तोत्राला 'हरिमीडे स्तोत्र' असें नांव पडलें याचें 'हरिस्तुति' असें दुसरेंहि नांव आढळतें

यांत भक्ति आणि तत्त्वज्ञान यांचें अपूर्व मीलन पहावयास सांपडतें स्वस्वरूपाच्या आविष्कारानें जीवाचीं सर्व दुःखें हरण करणारा तो हरि म्हणजे परब्रह्म परमात्मा, त्याची 'ईडे' म्हणजे मी स्तुति करतों असा 'हरिमीडे' या शब्दाचा अर्थ आहे ]

स्तोष्ये भक्त्या विष्णुमनादिं जगदादिं
यस्मिन्नेतत्संसृतिचक्रं भ्रमतीत्थम् ।
यस्मिन् दृष्टे नश्यति तत्संसृतिचक्रं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १ ॥

जो सर्व जगाचें आदिकारण आहे, पण ज्याचें आदिकारण कोणीच नाहीं, ज्याच्या ठिकाणीं हें संसारचक्र आपण पहात असल्याप्रमाणें परिभ्रमण करीत आहे त्या विश्वव्यापी विष्णूची मी भक्तीनें स्तुति करतों ज्याचें दर्शन

झालें असता तें संसारचक्र नाश पावतें त्या संसाररूपी अंधकाराचा नाश करणाऱ्या हरीची मी स्तुति करतों, असा पहिल्या श्लोकाचा अन्वयार्थ आहे

विष्णु म्हणजे सर्व विश्वाला व्यापणारा परमात्मा, परब्रह्म तोच या जगाचें उपादानकारण व निमित्तकारणहि आहे म्हणून त्याला जगदादि असें म्हटलें आहे ज्याचें कार्य बनतें तें त्या कार्याचें उपादानकारण व ज्याच्याकडून कार्य बनतें तो त्या कार्याचें निमित्तकारण सोन्याचे अलंकार बनतात म्हणून सोनें हें अलंकाराचें उपादानकारण व सोनाराकडून ते बनविले जातात म्हणून सोनार हा अलंकाराचें निमित्तकारण होय

प्रकृतस्थलीं विष्णूपासून हें सर्व जग बनतें व विष्णूकडूनच बनविलें जातें म्हणून विष्णु हाच या जगाचें उपादानकारण व निमित्तकारणहि आहे कोणी म्हणेल कीं, उपादानकारण व निमित्तकारण परस्परभिन्न असतात त्याच प्रमाणें जगाचें उपादानकारण आणि निमित्तकारण हीं परस्परभिन्न असावयास पाहिजेत तीं दोन्ही एकच कशीं असू शकतील?

यावर उत्तर असें कीं, झाडावरची आळी आपला शोल गेल्याबरोबर आपल्या शरीरातून एक तंतु निर्माण करते व त्या तंतूला लटकून वर चढण्याचा प्रयत्न करीत असते हा प्रकार आपण पहात असतों या ठिकाणीं त्या तंतूचें उपादानकारण तीच आहे व निमित्तकारणहि तीच आहे तेव्हा उपादानकारण व निमित्तकारण हीं भिन्नच असावयाला पाहिजेत असा कांहीं नियम नाहीं

यावर कोणी म्हणेल कीं, अहो! ती आळी शरीरद्वारा त्या तंतूचें उपादानकारण व स्वरूपत निमित्तकारण आहे, असा त्यात सूक्ष्म फरक आहेच यावर उत्तर असें कीं, आम्ही सुद्धा मायोपाधिक ब्रह्मचैतन्य हेंच जगाचें कारण मानीत असल्यामुळें, त्याच्या ठिकाणीं मायाद्वारा जगाचें उपादानकारणत्व आणि स्वरूपत निमित्तकारणत्व मानण्यास कांहींच हरकत नाहीं, असेंच आमचें म्हणणें आहे तात्पर्य, मायोपाधिक ब्रह्मचैतन्य म्हणजेच भगवान् विष्णु व तोच या जगाचें आदिकारण आहे, हें निर्विवाद होय म्हणूनच त्याला जगदादि म्हटलें आहे

तो भगवान् विष्णु स्वत मात्र अनादि आहे अनादि म्हणजे कारणविरहित तो कशापासूनहि उत्पन्न होत नाहीं व कोणी त्याला उत्पन्नहि करू शकत नाहीं तो सर्वांच्या पलीकडे आहे त्याच्या पलीकडे कोणीच नाहीं, म्हणून त्याला अनादि म्हटलें आहे अनादि शब्दाचा अर्थ ज्याला जन्म नाहीं तो, असाहि होतो.

ज्याच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान न झाल्यामुळें, ज्याच्या ठिकाणीं हें ससारचक्र आपल्या नेहमींच्या अनुभवाप्रमाणें सतत चालू असल्याचें प्रतीतीला येतें तोच भगवान् विष्णु परमात्मा होय ससृति म्हणजे ससार ज्याच्यामुळें जीव सारखा इकडे तिकडे भटकत रहातो त्याला ससार म्हणतात 'ससरति जीव अनया इति ससृति' अशी ससृति शब्दाची व्युत्पत्ति आहे अज्ञान, मोह, आशा, तृष्णा आणि अहकार हेंच खरें ससाराचें कारण होय यामुळेंच जीवाला इकडे तिकडे भटकावें लागतें अनेक जन्म घ्यावे लागतात व सुख दु खें भोगावीं लागतात अहकारामुळें कर्म घडतें कर्मांमुळें फळें भोगावीं लागतात व तीं भोगण्याकरिता जन्म घ्यावा लागतो जन्म घेतला की, अहकार, त्यामुळें कर्म, कर्मांमुळें फळें व फळामुळें पुन्हा जन्म अशी ही परपरा सारखी चाललेली असते यालाच ससारचक्र म्हणतात या ससारचक्राचें अधिष्ठान परमात्मा आहे व ससारचक्रात सापडून इकडे तिकडे भटकणारा व अनत दु खें भोगणारा तो जीवात्मा होय

जीवात्मा स्वत परमात्मस्वरूपाहून भिन्न नाहीं पण अज्ञानानें कल्पिलेल्या अहकारानें तो स्वत ला परमात्मस्वरूपाहून भिन्न समजतो व ससारचक्रात गुरफटून दु खें भोगीत रहातो मग ही सर्व दु खें व हें ससारचक्र नाहींसें केव्हा होणार ? याचें उत्तर श्लोकाच्या तिसऱ्या चरणात दिलें आहे

'यस्मिन् दृष्टे नश्यति तत्ससृतिचक्र' सच्चिदानद भगवान् श्रीहरि हाच अज्ञानानें कल्पिलेल्या अहकारादि विश्वप्रपचाचें अधिष्ठान आहे त्याच्या स्वरूपाचा साक्षात्कार झाला कीं, अहकारादि विश्वप्रपचाचा निरास होतो ससारचक्र थाबतें व जीवाचीं सर्व दु खें नाश पावतात

मद अधकारामुळें दोरीवर साप भासतो त्याला आपण भीतों, घाबरतों शरीर थरथर कापू लागतें साहाय्याकरिता आपण दुसऱ्याला हाका मारतों अशी आपली त्रेधा उडते पण उत्कृष्ट प्रकाशामध्यें सापाचें अधिष्ठान असलेली दोरी लक्षात आल्याबरोबर तो साप नाहींसा होतो व भीतीहि मावळते त्याचप्रमाणें अहकारादि विश्वप्रपचाचें अधिष्ठान असलेला परमात्मा आपल्याला कळला, त्याचा साक्षात्कार झाला म्हणजे त्याच्या ठिकाणीं प्रतीतीला येणारा अज्ञानमूलक अहकारादि विश्वप्रपंच मावळतो त्याचें सत्यत्व बाधित होतें जेथें विश्वप्रपचाचें सत्यत्वच टरत नाहीं तेथें प्रपचमूलक दु खें तरी कशी शिल्लक रहातील ? अशा रीतीनें श्रीहरीचा साक्षात्कार झाला असता तें सारें

संसारचक्र आपोआप विराम पावतें. त्याचप्रमाणें ज्याचा साक्षात्कार झाला असतां संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी ध्वांताचा म्हणजे अंधकाराचा विनाश होतो त्या श्रीहरीची मी अत्यंत प्रेमानें व भक्तीनें स्तुति करीत आहें.

> यस्यैकांशादित्थमशेषं जगदेतत्
> प्रादुर्भूतं येन पिनद्धं पुनरित्थम् ।
> येन व्याप्तं येन विबुद्धं सुखदुःखै-
> स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २ ॥

ज्याच्या एका अंशापासून हें भोक्ता, भोग्य द्रष्टा आणि दृश्य इत्यादि विविध रूपानें प्रतीतीला येणारें सर्व जग उत्पन्न झालें व उत्पन्न झालेलें जग ज्यानें स्वधर्माच्या नियमांनी दृढबद्ध केलें आणि व्यवस्थित चालविलें आहे, ज्यानें हें सर्व जग व्यापून टाकलें आहे, पूर्ण भरलें आहे, तसेंच आपल्या प्रकाशानें ज्यानें सुखदुःखांनीं भरलेलें हें सर्व जग प्रकाशित केलें आहे, त्या संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी अंधकाराचा निरास करणाऱ्या श्रीहरीची मी अनन्यप्रेमानें स्तुति करीत आहें.

मागच्या श्लोकांत परब्रह्म परमात्मा हा जगाचें कारण आहे असें सांगितलें. त्याच्यापासून जग उत्पन्न होतें व तो जग उत्पन्न करतो असें म्हटलें आहे. यावर कोणी अशी शंका घेईल कीं, परमात्मा हा आपल्याहून निराळें जग उत्पन्न करतो का स्वतःच जगाच्या रूपानें नटतो? निराळें जग उत्पन्न करतो असें म्हटलें तर तो आणि त्याच्यापासून उत्पन्न होणारें निराळें जग असें हें द्वैत मानण्याची पाळी येते. बरें, तोच परमात्मा जगाच्या रूपानें नटला असें म्हटलें, तर निर्विकार, निरवय आणि एकरूप असलेलें परमात्मतत्त्व अनेकरूप कसें होणार? बरें, परब्रह्मच अनेकरूपानें नटलें असें म्हटलें, तर तें सर्वांशानें जगाच्या रूपानें नटलें का एकांशानें नटलें? सर्वांशानें नटलें असें म्हटलें, तर मग मुक्त लोकांना सुखलेशानें व बहुदुःखानें पूर्ण असलेल्या या जगाव्यतिरिक्त रहाण्यासारखें आनंदमय असें स्थानच उरत नाहीं. निष्प्रपंच ब्रह्म हेंच तर मुक्त लोकांचें रमणीय स्थान असतें. सर्वच ब्रह्म प्रपंचरूपानें नटलें, तर मग निष्प्रपंच ब्रह्म कांहीं शिल्लक रहातच नाहीं. बरें, ब्रह्म एकांशानें, प्रपंचरूपानें नटलें असें म्हटलें, तर तेंहि बरोबर होणार नाहीं, कारण ब्रह्म हें

निरवयव आहे निरवयवाला अंश कसा असणार ? या सर्व शंकाचें समाधान दुसऱ्या श्लोकानें केलें आहे

परमात्मा आपल्याहून निराळें जग निर्माण करीत नाहीं त्यामुळें परमात्म निराळा आणि जग निराळें असें द्वैत मानण्याची पाळी येत नाहीं एकच दोरी मद अधकारामुळें तिचें यथार्थ स्वरूप न कळल्यानें कोणाला ती सापासारखी भासते तर कोणाला माळेसारखी भासते कोणाला वृक्षाच्या मुळासारखी भासते तर कोणाला फकिराच्या काठीसारखी भासते अनेकांना त्याच्या त्याच्य सस्कारामप्रमाणें ती अनेक रूपानें भासते एकच दोरी अनेकाकार भासूनहि स्वरूपत ती एकरूप व निर्विकारच असते त्याचप्रमाणें एकच ब्रह्म भोक्त्याच्या किंवा जीवाच्या अदृष्ट सस्कारामुळें अनेकाकार बनतें तरी तें स्वरूपत एकरूप व निर्विकारच असतें

अज्ञानाच्या ठिकाणीं दोन शक्ति असतात एकीला आवरणशक्ति म्हणतात व दुसरीला विक्षेपशक्ति म्हणतात आवरणशक्ति ही पदार्थाच्या यथाथ स्वरूपाला झाकून टाकीत असते तर विक्षेपशक्ति ही त्या पदार्थाच्या ठिकाणीं दुसरेच पदार्थ भासवीत असते अशा रीतीनें कोणत्याहि पदार्थाचें मूळ स्वरूप झाकणें, तें प्रतीतीला येऊ न देणें हें अज्ञानाचें पहिलें कार्य होय आपल्य आवरणशक्तीनें एखाद्या पदार्थाचें मूळ स्वरूप झाकून टाकल्यानतर त्या ठिकाणीं तत्त्वत नसलेल्या दुसऱ्याच पदार्थाची कल्पना आणून देणें हें अज्ञानाचें दुसरें कार्य होय पहिल्या कार्याला आवरणशक्तीचें कार्य म्हणतात, तर दुसऱ्या कार्याला विक्षेपशक्तीचें कार्य असें म्हणतात

मद अधकारामध्यें असलेल्या दोरीची यथार्थ कल्पना येऊ न देणें हें अज्ञानाच्या आवरणशक्तीचें कार्य आहे, तर त्या दोरीच्या ठिकाणीं सर्प, दड, माळा, मुळी इत्यादि पदार्थाची कल्पना आणून देणें हें अज्ञानाच्या विक्षेप शक्तीचें कार्य आहे दोरीच्या ठिकाणीं भासणा या सर्पाचें अज्ञान हें उपादान कारण आहे, तर दोरी ही सर्पभ्रमाचें अधिष्ठान या नात्यानें सर्पाचें निमित्त कारण आहे एकच दोरी अज्ञानद्वारा सर्पादि पदार्थाचें उपादानकारण व अधिष्ठानद्वारा निमित्तकारण असली, तरी ती स्वरूपत निर्विकारच आहे सर्पादि अनेक रूपानीं प्रतीतीला आली तरी ती एकरूपच आहे त्याचप्रमाणें परब्रह्मतत्त्व मायाद्वारा अहकारादि विश्वप्रपचाचें उपादानकारण व अधिष्ठान रूपानें निमित्तकारण असलें, तरी तें स्वरूपत निर्विकारच आहे आणि विविध

विश्वप्रपंचाच्या रूपानें प्रतीतीला येत असलें, तरी तें एकरूपच आहे. तात्पर्य, एकच परमात्मा जगाच्या रूपानें नटला, तरी त्याच्या निर्विकारत्वाला किंवा एकरूपतेला कांहीं बाध येऊं शकत नाहीं, किंवा त्याचें निरवयवत्वहि विश्वप्रपंचाच्या रूपानें नटण्याला आड येऊं शकत नाहीं.

आतां आपण परमात्मा एकांशानें जगाच्या रूपानें नटतो का सर्वांशानें, नटतो, याचा विचार करूं. वस्तुतः परमात्मा हा विभु म्हणजे विश्वव्यापी आहे, निरवयव आहे. त्याच्या ठिकाणीं अंशांची कल्पना करतां येत नाहीं. आकाशाला जसे अंश नाहींत त्याचप्रमाणें परब्रह्मालाहि अंश नाहींत, तथापि घरांतलें आकाश, आंगणांतलें आकाश, मैदानांतलें आकाश, असे आपण आकाशाचे भेद कल्पितच असतो, त्याचप्रमाणें श्रुतिमाऊलीनें देखील अल्पबुद्धि लोकांचें समाधान करण्याकरितां परब्रह्माचेहि अंश कल्पिले आणि सांगितलें कीं, 'पादोऽस्य विश्वा भूतानि त्रिपादस्यामृतं दिवि' या परमेश्वराचा एक अंश म्हणजे हें सर्व विश्वप्रपंचरूप ब्रह्माण्ड होय, आणि याचे तीन अंश अमृतस्वरूपानें, मोक्षरूपानें स्वयंप्रकाश स्वस्वरूपामध्यें विराजमान आहेत, तेंच निष्प्रपंच ब्रह्म होय. तेंच मुमुक्षु लोकांनीं मिळवावयाचें असतें व मुक्तांनीं तेथेंच रहावयाचें असतें, तात्पर्य ब्रह्माचा मायोपाधिक भाग प्रपंचरूपानें नटतो व मायाविरहित असलेला भाग शुद्ध सच्चिदानंद स्वरूपांत असतो, तेंच मुक्तांचें स्थान होय आणि तेंच मुमुक्षूंचें ध्येय होय. परब्रह्माच्या ठिकाणीं अंशांशिभाव हा काल्पनिक आहे. तो तात्त्विक नाहीं.

आतां परमेश्वरानें जग निर्माण केलें असें म्हणण्यात आणखी एक शंका येते तिचा आपण विचार करूं. परमेश्वर जर जग निर्माण करतो तर तो सर्वांना सुखी कां करीत नाहीं? कोणी अत्यंत सुखी तर कोणी अत्यंत दुःखी असें हें अत्यंत विषम जग तो कां निर्माण करतो? विषम जग निर्माण केल्यामुळें त्याच्या ठिकाणीं वैषम्य हा दोष येत नाहीं का? दुःखी लोकांचें दुःख पाहून सामान्य लोकांनाहि दया येते, मग परमेश्वराला दुःखी लोकांची दया कां येत नाहीं? उलट प्रलयकाळीं सर्व जीवांचा तो संहारच करतो, त्यामुळें परमेश्वर मोठा निर्घृण आहे असें म्हणावें लागतें. याप्रमाणें परमेश्वराच्या ठिकाणीं नैर्घृण्य हाहि दोष आला. बरें, परमेश्वराच्या ठिकाणीं दया आहे, पण तो दुःखी लोकांचें दुःख दूर करूं शकत नाहीं, असें म्हटलें तर तो असमर्थ आहे असें म्हणावें लागेल. मग 'कर्तुं अकर्तुं अन्यथा कर्तुं समर्थः' असें त्याचें वर्णन करणें योग्य कसें होईल?

या शंकेचें समाधान असें की, ईश्वर जरी स्वसंकल्पाच्या बलानें जग निर्माण करीत असला तरी वैषम्य आणि नैर्घृण्य हे दोष त्याच्या ठिकाणीं येऊं शकत नाहीत. उलट तो सर्वत्र समवृत्ति असाच आहे. तसाच तो दयेचा सागरहि आहे. त्याच्या समवृत्तित्वाची कल्पना येण्याकरिता श्रीशंकराचार्यांनीं पर्जन्याचें म्हणजे पावसाचें उदाहरण घेतलें आहे.

'ईश्वरस्तु पर्जन्यवद्द्रष्टव्य' ईश्वर हा पावसासारखा आहे हें लक्षांत घ्या. पाऊस सर्व ठिकाणीं समरूप एकरस असला, तरी ऊंसाचा रस गोड तर कुटकीचा कडु, आवळ्याचा रस तुरट तर चिंचेचा आंबट. कांहीं वनस्पति सुवासिक असतात तर कांहीं दुर्गंधि असतात. कांहीं वनस्पति वामक म्हणजे ओकायला लावणाऱ्या असतात तर कांहीं विरेचक म्हणजे रेच करणाऱ्या असतात. कांहीं तारक असतात तर कांहीं मारक असतात. पावसाचें स्वरूप सर्वत्र सारखें असूनहि वनस्पतींच्या गुणधर्मामध्यें हा एवढा फरक कां दिसावा?

याला उत्तर असेंच द्यावें लागेल कीं, सर्व वनस्पतींची उत्पत्ति आणि स्थिति ही जरी पर्जन्यामुळें होत असली, तरी त्यांच्या गुणधर्मांचा फरक हा कांहि पर्जन्यामुळें होत नाहीं, तर तो त्या वनस्पतींच्या बीजामध्यें असलेल्या संस्काराचाच परिणाम होय. तात्पर्य, जसा वनस्पतींतील गुणधर्मांच्या वैषम्याचा संबंध तिळमात्रहि पर्जन्याकडे येत नाहीं तसाच जगांतील प्राणिमात्रांच्या सुख दु:खादि वैषम्याचा संबंधहि परमेश्वराकडे येत नाहीं. 'यथा बीजं तथाङ्कुर' जसें बीज असेल तसा अंकुर निर्माण होतो. याच न्यायानें जशीं कर्में असा तील तशीं फळें भोगावीं लागतात. यांत परमेश्वराकडे काय दोष आहे?

आतां राहिला नैर्घृण्य हा दोष. त्याचा आपण विचार करूं. कांहीं लोक परमेश्वराला तो मोठा निर्घृण म्हणजे निष्ठुर आहे असें म्हणतात. पण हें म्हणणें बरोबर नाहीं. परमेश्वर निर्घृण तर नाहींच, उलट तो अत्यंत दयेनें भरलेला आहे. म्हणूनच त्याला दयासागर म्हणतात. कृपाघन म्हणतात. कोणी त्याला मेहेरबान म्हणतात. परवरदिगार म्हणतात, तर पाश्चात्य त्याला 'ओशन ऑफ मर्सी' ( Ocean of mercy ) असें म्हणतात.

सच्चिदानंदघन अशा स्वस्वरूपापासून दूर गेलेल्या अज्ञानी जीवांना आत्मस्वरूपाची कल्पना यावी म्हणून त्यानें जगावरोवर आत्मस्वरूपाची यथार्थ कल्पना देणारे वेदहि निर्माण केले. त्या वेदांचा अर्थ सांगणारीं शास्त्रें निर्माण केलीं. त्याचें आकलन करण्याला योग्य असें मन दिलें, बुद्धि दिली,

पहावयास डोळे दिले, ऐकावयास कान दिले, बोलावयास वाणी दिली. आत्मकल्याणासाठीं प्रयत्न करावयास हात-पाय दिले. केवढी ही त्याची दया आहे! 'डोळ्यानें बघतों ध्वनी परिसतों कानीं पदीं चालतों, जिव्हेनें रस चाखितों मधुरही वाचें आम्हीं बोलतों, हातानें बहुसाळ काम करितों, विश्रांतिही घ्यावया, घेतों झोंप सुखें फिरूनि उठतों ही ईश्वराची दया!' हें जें कोणीं म्हटलें आहे तें अगदीं बरोबर आहे. पण हें पाहील त्याला दिसेल. विचार न करणाऱ्याला कांहींच कळणार नाहीं.

असा तो दयासागर विराजमान असूनहि जीवांना जी दुःखें भोगावीं लागतात तीं त्यांच्या कर्मांचींच फळें होत. त्यांत ईश्वराचा कांहीं दोष नाहीं. अपराधाप्रमाणें दंड देणाऱ्या न्यायाधीशानें फांशीची शिक्षा दिली, तरी न्यायाधीशाला निष्ठुर मानतां येत नाहीं. मग कर्माप्रमाणें फळें देणाऱ्या परमेश्वराला निष्ठुर किंवा निर्घृण असें म्हणतां येईल ? अशा रीतीनें परमेश्वराच्या ठिकाणीं नैर्घृण्य हाहि दोष येत नाही.

परमेश्वराच्या सामर्थ्याबद्दल संशय घेणें हें देखील अविचाराचेंच द्योतक आहे. जरा सूक्ष्म विचार केल्यास असें आढळून येईल कीं, या एकाच नव्हे तर अशा अनंतकोटि ब्रह्मांडाचीहि घडामोड त्या परमेश्वराच्या सत्तेने चालली आहे. संपूर्ण पृथ्वीच्या तोलाचें इंधन एकत्र करून तें चोहोंकडून एकदम पेटविलें असतां जी उष्णता निर्माण होईल ती सूर्याच्या उष्णतेबरोबर फक्त पंधरा मिनिटें टिकूं शकेल असें शास्त्रज्ञ म्हणतात. एवढी प्रचंड उष्णता ज्यांच्यामध्यें सतत राहील असे अनंत सूर्य ज्यानें निर्माण केले! सूर्याच्या उष्णतेचा प्रतिकार करून आपल्या अमृतमय किरणांनीं साऱ्या विश्वाला शांति, पुष्टि व तुष्टि देणारे चंद्र ज्यानें निर्माण केले! ग्रह, नक्षत्रें, तारे, पंचमहाभूतें व पांचभौतिक विशाल सृष्टि ज्यानें निर्माण केली; मनानेंहि ज्यांची कल्पना करतां येणार नाहीं अशा विविध वैचित्र्यपूर्ण रचना ज्यानें घडवून आणल्या, 'विश्वस्य कर्ता भुवनस्य गोप्ता' जगाचा जनक आणि विश्वाचा पालक म्हणून वेद ज्याचें वर्णन करीत आहेत, त्या परमेश्वराच्या सामर्थ्याबद्दल शंका घेणें किती अज्ञानाचें द्योतक आहे! तात्पर्य, परमेश्वराच्या ठिकाणीं वैषम्य, नैर्घृण्य किंवा असामर्थ्य इत्यादि कोणत्याहि दोषाचा लेशहि स्पर्श करू शकत नाहीं. हा सर्व अभिप्राय लक्षांत घेऊन आचार्यांनीं या श्लोकाच्या दुसऱ्या चरणांत 'येन पिनद्धं पुनरित्थम्' असें म्हटलें आहे.

हें जग याप्रमाणें परमेश्वरानें मर्यादाच्या बंधनानीं बांधून टाकलें आहे त्यानेंच व्यापलें आहे. सुखदु:खांनीं युक्त असें हें सर्व जग आत्मप्रकाशानें त्यानेंच प्रकाशित केलें आहे. संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणाऱ्या त्या श्रीहरीची मी भक्तिपूर्वक स्तुति करीत आहें.

सर्वज्ञो यो यश्च हि सर्वः सकलो यो
यश्चानन्दोऽनन्तगुणो यो गुणधामा ।
यश्चाऽव्यक्तो व्यस्तसमस्तः सदसद्य-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३ ॥

जो सर्वज्ञ आहे, सर्वस्वरूप आहे, सगळें कांहीं आहे. जो आनंदस्वरूप आहे, अनंत गुणांनीं युक्त आहे. त्रिगुणात्मक माया हें ज्याचें धाम म्हणजे उपाधिस्थान आहे. जो अव्यक्त आहे, व्यष्टिरूपहि आहे व समष्टिरूपहि आहे. जो सत् म्हणजे ब्रह्मस्वरूपहि आहे व असत् म्हणजे कार्यस्वरूपहि आहे. अशा त्या संसाररूपी अंधकाराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहें.

कोणतेंहि कार्य कर्त्यावांचून उत्पन्न होत नसतें. या जगांत अशीं पुष्कळ कार्यें घडून येत असतात कीं, ज्यांचें कर्तृत्व सामान्य जीव अथवा मानव यांचे ठिकाणीं संभवत नाहीं. सूर्य, चंद्र, ग्रह, नक्षत्रें, भूगोल, खगोल, पर्वत, सागर, वृक्ष, लता, वेली, वनस्पति, पशु, पक्षी, कीट, पतंग, पंचमहाभूतें व पांचभौतिक शरीरें अथवा शरीरबीजें हीं कार्यें अशीं आहेत कीं, त्यांचें कर्तृत्व मानवाच्या कक्षेंत येत नाहीं. इतर कोणी कर्ता संभवत नाहीं. हीं सर्व कार्यें कर्त्यावांचून उत्पन्न झालीं किंवा होतात हें म्हणणेंहि युक्तीशीं विसंगत आहे. कर्ता कोणी तरी असलाच पाहिजे हें निर्विवाद होय. जर कर्ता कोणी नसेल तर कार्यच उत्पन्न होणार नाहीं. कार्यें तर दृष्टीस पडतात. अर्थात् या सर्व कार्यांचा जो कर्ता त्यालाच शास्त्रज्ञ परमात्मा किंवा परमेश्वर असें म्हणतात.

जगाला उत्पन्न करणारा परमेश्वर हा सर्वज्ञ आहे. कोणतेंहि कार्य करावयाचें असल्यास तें कार्य करणाऱ्याला त्या कार्याचें सर्व ज्ञान असावें लागतें असा नियम आहे. या दृष्टीनें पहातां जग निर्माण करणाऱ्या परमेश्वराला जगाविषयीं सर्व ज्ञान असलेंच पाहिजे हें सहजच सिद्ध होतें. म्हणूनच वेदानें देखील परमेश्वराचें वर्णन करतांना ' यः सर्वज्ञः सर्ववित् ' सामान्यरूपानें आणि विशेषरूपानेंहि तो सर्व कांहीं जाणतो असेंच त्याचें वर्णन केलेलें आहे.

कोणतेंहि कार्य निर्माण करताना तें कार्य निर्माण करणाऱ्याला त्या कार्याबद्दलचें सर्व ज्ञान असावें लागतें. कार्य निर्माण करण्याची इच्छा असावी लागते व कार्याला अनुरूप अशी कृतीहि घडून यावी लागते असा नियम असल्यामुळेंच सांख्याचें प्रधान किंवा प्रकृतितत्त्व हें जगाचें उत्पादक होऊ शकत नाहीं कारण तें जड म्हणजे ज्ञान, इच्छा आणि कृति यांनीं विरहित म्हणजे शून्य आहे आणि म्हणूनच काल, स्वभाव किंवा निसर्ग आणि मीमांसकाचें कर्म हेंहि जगाचें जनक होऊ शकत नाहींत तात्पर्य, जगाचें कारण परमात्माच आहे आणि तो सर्वज्ञ आहे तोच सर्व काहीं आहे कारणहि तोच आहे आणि कार्यहि तोच आहे विश्वांतील प्रत्येक पदार्थाच्या रूपानें तोच नटला आहे विश्वाची प्रकृति म्हणजे उपादानकारण तोच आहे व अधिष्ठाता म्हणजे आधार निमित्तकारणहि तोच आहे असा 'सर्व' आणि 'सकल' या शब्दाचा अर्थ समजावा 'सर्व खल्विदं ब्रह्म', 'इदं सर्वं यदयमात्मा' खरोखर हें सर्व ब्रह्मच आहे हें सर्व काहीं आत्माच आहे अशा रीतीनें वेदहि त्याचें वर्णन करीत आहेत

तो परमात्मा श्रीहरि आनंदस्वरूप आहे 'नित्य विज्ञानमानन्द ब्रह्म' 'रसो वै स' ब्रह्म हें नित्यविज्ञान आणि आनंदस्वरूप आहे तो परमात्मा आनंदस्वरूप आहे इत्यादि श्रुतिवाक्यांनीं तो आनंदमय असल्याचें वर्णन केलेलें आहे

सर्वज्ञत्व सर्वशक्तिमत्त्व सर्वैश्वर्यसंपन्नत्व इत्यादि अनंत गुणांनीं तो संपन्न आहे. 'गुणधामा' गुण म्हणजे त्रिगुणात्मक माया सत्त्व, रज आणि तम या तीन गुणांनीं संपन्न असलेली माया हें ज्याचें धाम म्हणजे गृह किंवा उपाधिस्थान आहे, तो मायोपाधिक परमात्मा असा या गुणधामा शब्दाचा अर्थ समजावा अथवा 'अगुणधामा' असें म्हटलें तर तो परमात्मा सर्व गुणांचें आश्रयस्थान असूनहि स्वरूपत निर्गुणच आहे, असा अर्थ समजावा

तो परमात्मा अव्यक्त आहे अव्यक्त म्हणजे बहिरिन्द्रियांनीं ज्याचें ज्ञान होऊं शकत नाहीं तो बहिरिंद्रियांनीं ज्याचें ज्ञान होत असतें त्याच्या ठिकाणीं शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे किंवा यांच्यापैकीं काहीं गुण असावे लागतात परब्रह्माच्या ठिकाणीं हे गुण नाहींत 'अशब्दमस्पर्शमरूपमव्ययं तथाऽरसं नित्यमगन्धवच्च यत्' तेथें शब्द नाहीं स्पर्श नाहीं रूप नाहीं रस नाहीं आणि गंधहि नाहीं तें तत्त्व अव्यय आणि नित्य आहे असें त्याचें उपनिषदानीं वर्णन केलेलें आहे म्हणूनच त्याला अव्यक्त असें म्हणतात

मुळाशीं असलेलें अधिष्ठानभूत सच्चिदानंद परमात्मतत्त्वच सत्य असतें व तें बाह्य इंद्रियांनीं प्रतीतीला येत नाहीं अशाच अभिप्रायानें तो परमात्मा दृश्य वस्तूहून निराळा आहे असें म्हटलें आहे

परमात्मतत्त्व निर्विषयज्ञानस्वरूप असल्यामुळेंहि दृश्य होऊं शकत नाहीं तें अन्त संवेद्य आहे तें स्वसंवेद्य आहे अन्त संवेद्य वस्तु दृश्य असू शकत नाहीं सुखें आणि दु खें हीं अन्त संवेद्य असतात बहिरिंद्रियांनीं त्यांचें ग्रहण होऊं शकत नाहीं म्हणून तीं अदृश्य आहेत परमात्मतत्त्वाचेंहि बहिरिन्द्रियांनीं ग्रहण होत नाहीं तें स्वसंवेद्य आहे म्हणून हि तें दृश्य वस्तूहून निराळें आहे मी आहे, तू आहेस स्त्री आहे, पुरुष आहे घट आहे, पट आहे इत्यादि सर्व व्यवहारामध्यें अनुभवास येणारें अस्तित्व म्हणजे सत्ता आणि प्रतीति म्हणजे स्फुरण हेंच परमात्म्याचें रूप आहे तू मी, स्त्री पुरुष, घट पट इत्यादि सर्व विषय ज्ञानानें प्रकाशतात म्हणून या ज्ञानाला सविषयज्ञान म्हणतात ज्याच्या सत्तेनें, अस्तित्वानें अथवा स्फुरणानें विषयज्ञानाचें स्फुरण होतें तो परमात्मा स्वत निर्विषयज्ञान स्वरूप आहे घट पटादि पदार्थ सूर्यप्रकाशाचे विषय होतात, पण सूर्य मात्र कोणाच्या प्रकाशाचा विषय होत नाहीं म्हणून व्यवहारदृष्ट्या सूर्याला स्वयंप्रकाश म्हणतात त्याचप्रमाणें विश्वातील सर्व पदार्थ परमात्मतत्त्वाच्या स्फुरणानें प्रकाशित होतात, पण परमात्मतत्त्व मात्र दुसऱ्या कोणाच्याहि स्फुरणानें प्रकाशित होत नाहीं तें स्वयंस्फूर्त स्वप्रकाश आहे म्हणूनच त्याला 'निर्विषयज्ञानमय' असें म्हटलें आहे आणि निर्विषयज्ञानमय आहे म्हणूनच तें दृश्य वस्तूहून भिन्न आहे

ज्ञाता म्हणजे ज्ञानाचा आश्रय ज्ञान म्हणजे विषयाकार अंत करणवृत्ति आणि ज्ञेय म्हणजे घट पटादि दृश्य पदार्थ या सर्वांहून तो विहीन म्हणजे निराळा असूनहि सदा सर्वकाळ तो सर्व विषयांना प्रकाशित करीत असल्यामुळें त्या परमात्म्याला 'ज्ञ म्हणजे सर्वज्ञ, सर्वप्रकाशक असें म्हटलें आहे तात्पर्य, जग हेंच काल्पनिक असल्यामुळें परमेश्वराचें जगत्कारणत्वहि तत्त्वत सत्य मानतां येत नाहीं ब्रह्म हें जगाचें कारण आहे असें म्हणणें हेंसुद्धा औपचारिकच आहे सत्, चित् आणि आनंद हेंच त्या परमात्मतत्त्वाचें तात्त्विक स्वरूप आहे त्यालाच श्रीहरि म्हणतात संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानाचा निरास करणाऱ्या त्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहें

आचार्येभ्यो लब्धसूक्ष्माऽच्युततत्त्वा
वैराग्येणाभ्यासबलाच्चैव द्रढिम्ना ।
भक्त्यैकाग्र्यध्यानपरा यं विदुरीशं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ५ ॥

विश्वकर्त्या परमेश्वराचें ज्ञान कसें होईल, याचें उत्तर या पांचव्या श्लोकांत देत आहेत.

अत्यंत सूक्ष्म असलेल्या परमेश्वराचें अच्युताचें तत्त्व म्हणजे यथार्थ स्वरूप ज्यांनी अत्यंत योग्य अशा अर्थात् विरक्त तत्त्वज्ञ आणि भगवद्भक्त अशा आचार्यांकडून नीट समजून घेतलें आहे, स्वतः त्या अंगीं ज्यांनी दृढ वैराग्य धारण केलेलें आहे, मननानें व निदिध्यासनानें आत्मस्वरूपाच्या अभ्यासाचें ज्यांनी पाठबळ संपादन केलेलें आहे, भक्तियुक्त अंतःकरणानें निरंतर परमात्मस्वरूपाचें जे एकाग्र होऊन ध्यान करतात तेच परमात्मस्वरूपाला जाणूं शकतात. तात्पर्य, शुद्ध भक्ति, विवेकयुक्त तीव्र वैराग्य, योग्य आणि अधिकारी अशा गुरूची कृपा, आत्मस्वरूपाचें श्रवण, मनन आणि निदिध्यासन या साधनांनीं ज्याचें ज्ञान होऊं शकतें, त्या संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी अंधकाराचा निरास करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहें.

आत्मनि । ज्ञानमात्मनि महति नियच्छेत्तद्यच्छेच्छान्त आत्मनि ' प्रथम वागिंद्रियाचा संयम करावा. मौन धारण करावें. नंतर त्वगिंद्रिय, श्रवणेंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय आणि घ्राणेंद्रिय या सर्व बहिरिंद्रियांचा संयम करावा. शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध या विषयांपासून इंद्रियांना परावृत्त करावें. प्रथम निषिद्ध विषयांपासून परावृत्त व्हावें. नंतर हळूहळू विहित विषयांपासूनहि परावृत्त व्हावें. इंद्रियांचे व्यापार आवरावेत. एकान्तांत एका आसनावर शांत बसावें. या वेळीं मनाची हालचाल होत राहील. मन हें अत्यंत चंचल असतें. त्याला एकदम आवरतां येत नाहीं. हळूहळू त्या मनालाहि आत्मस्वरूपाकडे वळवावें. वित्त-वैभव, पुत्र-मित्र, देह-इंद्रियें आणि मन हे सर्व आत्म्याहून निराळे आहेत. ते आत्मा होऊं शकत नाहींत. ते नाशवंत आहेत. आत्मा अविनाशी आहे. असा मनानें विचार करीत त्या मनाला सच्चिदानंद चित्प्रकाश साक्षिचैतन्यस्वरूप जो आत्मा त्या आत्म्यामध्यें स्थिर करावें. त्या आत्मस्वरूपाचेंच चिंतन करावें. पुढें साक्षिचैतन्यहि निर्गुण, निराकार, निर्विकार, अखंड, अनंत, शुद्ध, सद्घन, चिद्घन, आनंदघन परिपूर्णस्वरूप आहे अशी भावना करावी व शेवटीं तेंच मी आहें. मी त्याच्याहून निराळा नाहीं. तें माझ्याहून निराळें नाहीं. विश्व त्याच्याहून निराळें नाहीं व तें विश्वाहून निराळें नाहीं. मी विश्वाहून निराळा नाहीं व विश्व माझ्याहून निराळें नाहीं. अशा रीतीनें विश्व, मी आणि ब्रह्म सर्व एकरूप आहेत, अशी भावना करावी. शेवटीं या भावनेचा पूर्ण परिपाक झाला म्हणजे ध्याता, ध्यान आणि ध्येय ही वृत्ति — ही कल्पनाहि मावळते व ध्यान करणारा परब्रह्मस्वरूप होऊन रहातो.

तात्पर्य, वर सांगितलेल्या रीतीनें ध्यान केलें असतां ज्याच्या स्वरूपाचा साक्षात्कार होतो त्या, संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहें.

यं ब्रह्माख्यं देवमनन्यं परिपूर्णं
हृत्स्थं भक्तैर्लभ्यमजं सूक्ष्ममतर्क्यम् ।
ध्यात्वात्मस्थं ब्रह्मविदो यं विदुरीशं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ७ ॥

ज्याची मी स्तुति करीत आहें तो भगवान् विष्णु देव आहे म्हणजे स्वयंप्रकाश आहे. आपल्या प्रकाशानें सर्वांना प्रकाशित करणारा आहे. अनन्य

म्हणजे एकरूप आहे सर्वस्वरूप असल्यामुळें कोणत्याहि वस्तूहून तो निराळा नाही, किंवा कोणतीहि वस्तु त्याच्याहून निराळी नाहीं म्हणूनच त्याला वस्तुकृत परिच्छेदशून्य असें म्हटलें आहे. घट म्हणजे पट नव्हे पट म्हणजे घट नव्हे याप्रमाणें घटपटादि वस्तूंच्या ठिकाणीं जो भेद पहावयास सापडतो त्याला वस्तु कृत परिच्छेद म्हणतात परिच्छेद म्हणजे मोजमाप हें उत्पन्न होणाऱ्या आणि एकमेकाहून भिन्न असलेल्या सर्व वस्तूंच्या ठिकाणीं असतें परब्रह्माव्यतिरिक्त प्रतीतीला येणारे सर्व पदार्थ हे परस्परभिन्न असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं वस्तुकृत परिच्छेद असतो, पण परब्रह्म परमात्मतत्त्व हें सर्वरूपानें नटलेलें असल्यामुळें व सर्वच विश्व तत्त्वत परमात्मस्वरूप असल्यामुळें परमात्म्याच्या ठिकाणीं वस्तुकृत परिच्छेद येऊ शकत नाहीं म्हणून त्याला अनन्य म्हटलें आहे तो परमात्मा परिपूर्ण आहे म्हणजे सदा सर्वकाळ सर्वत्र ओतमोत भरलेला आहे तो सर्वकाळ असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं कालपरिच्छेद नाहीं आणि सर्वच ठिकाणीं तो विराजमान असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं देशपरिच्छेदहि नाहीं जी वस्तु अमुक एका काळात आहे व अमुक एका काळात नाहीं असें पहावयास सापडतें त्या वस्तूच्या ठिकाणीं कालपरिच्छेद असतो जी वस्तु अमुक एका प्रदेशात आहे व अमुक एका प्रदेशात नाहीं असें पहावयास सापडतें त्या वस्तूच्या ठिकाणीं देशपरिच्छेद असतो परमात्मा सर्वत्र व सर्वकाळ असल्यामुळें तेथें देशपरिच्छेद नाहीं व कालपरिच्छेदहि नाहीं अशा रीतीनें परमात्मा त्रिविध परिच्छेदशून्य आहे म्हणूनच त्याला परब्रह्म असें म्हणतात

तो परमात्मा सर्वांच्याच हृदयात रहातो पण भक्तानाच केवळ त्याचें दर्शन होऊ शकतें, इतराना नाहीं म्हणून 'भक्तैर्लभ्य' अशा शब्दानी त्याचें वर्णन केलें आहे त्याला जन्म नाहीं म्हणून 'अज' म्हणतात तो परम सूक्ष्म आहे अणूपेक्षाहि अणु आहे कारण बहिरिंद्रियानीं तर त्याचें ग्रहण होत नाहींच, पण अतरिंद्रियहि त्याचें ग्रहण करू शकत नाहीं म्हणूनच 'अवाङ्मनसगोचरम्' असें त्याचें वर्णन केलें आहे याच अभिप्रायानें 'सूक्ष्म' असें म्हटलें आहे केवळ तर्कानें त्याचें ज्ञान होऊ शकत नाहीं म्हणून त्याला 'अतर्क्य' म्हणतात

आपल्याच देहात विराजमान असलेल्या त्या परमात्मतत्त्वाचें योगी लोक आपल्याच हृदयात ध्यान करून ब्रह्मवेत्ते होतात अतर्यामीरूपानें सर्वांच्याच देहात तो राहून सर्वांचें नियमन करतो म्हणून त्याला 'ईश' असें म्हणतात तो

ससाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी अधकाराचा नाश करतो अशा त्या सच्चिदानदघन श्रीहरीची मी स्तुति करीत आहे

मात्रातीतं स्वात्मविकाशात्मविबोधं
ज्ञेयातीतं ज्ञानमयं हृद्युपलभ्यम् ।
भावग्राह्यानन्दमनन्यं च विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ८ ॥

ज्याच्या योगानें शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गध हे विषय जाणले जातात त्याना मात्रा असें म्हणतात मात्रा म्हणजे चक्षुरादि इद्रियें परमात्मा हा इद्रियाच्या ग्रहणशक्तीच्या पलीकडचा आहे बाह्य इद्रियानीं त्याचें ज्ञान होऊ शकत नाहीं म्हणून त्याला मात्रातीत म्हटलें आहे इद्रियानीं तो कळत नाहीं म्हणून तो नाहीं असें मात्र म्हणता येत नाहीं कारण अतर्यामी चैतन्यानें प्रकाशित होणाऱ्या अत करणामध्यें, बुद्धीमध्यें त्याचा साक्षात्कार होऊ शकतो बुद्धीमध्यें त्याचा साक्षात्कार होतो म्हणून कोणी त्याला बुद्धिगम्य किंवा ज्ञेय समजू नये कारण तो सर्व ज्ञेय वस्तूच्या — बुद्धीच्याहि पलीकडचा आहे तो ज्ञानमय आहे तथापि आपल्या हृदयातच, बुद्धीतच तो प्रकाशू शकतो आपल्या बुद्धीतच त्याची उपलब्धि म्हणजे ज्ञान होऊ शकतें

यावर कोणी म्हणेल की, हीं दोन्ही विधानें परस्पर विरुद्ध आहेत एकदा म्हणायचें बुद्धीनें त्याचें आकलन होऊ शकत नाहीं पुन्हा म्हणायचें बुद्धीतच तो प्रकाशित होऊ शकतो याचा अर्थ तरी काय ? यावर उत्तर असें की, घट पटादि वस्तूचें ज्ञान होण्याकरिता अत करणवृत्ति ही आपल्यामध्यें असलेल्या चैतन्याच्या प्रतिबिंबासह घट पटादि वस्तूना जाऊन व्यापते अत करणवृत्तीनें घट पटादि वस्तूविषयींच्या अज्ञानाचें आवरण नाहींसें होतें व बुद्धिवृत्तीतील चैतन्याच्या प्रतिबिंबानें घट पटादि वस्तूचें स्फुरण म्हणजे भान होतें त्यालाच आपण घटज्ञान, पटज्ञान असें म्हणतो बुद्धिवृत्तीनें विषयाना जाऊन व्यापणें याला शास्त्रामध्यें वृत्तिव्याप्ति असें म्हणतात आणि बुद्धिवृत्तीतील चैतन्याच्या प्रतिबिंबानें विषयाचें स्फुरण होणें याला फलव्याप्ति असें म्हणतात आत्मस्वरूपाच्या ज्ञानाला अज्ञानाचें आवरण नाहींसें होण्याकरिता वृत्तिव्याप्तीची अपेक्षा आहे, पण अज्ञानाचें आवरण नाहींसें झाल्यानतर आत्मस्वरूप स्वत सिद्ध स्वय

प्रकाश असल्यामुळें त्याचें स्फुरण होण्याकरितां बुद्धिवृत्तींतील चैतन्याच्या प्रति-बिंबाची आवश्यकता नसते ज्या वस्तूच्या ज्ञानाला वृत्तिव्याप्ति आणि फलव्याप्ति या दोहोंची आवश्यकता असते त्या वस्तूंना ज्ञेय किंवा ज्ञानगम्य असें म्हणतात. आत्मस्वरूपाच्या ज्ञानाला फक्त वृत्तिव्याप्तीची गरज असते म्हणून आत्मतत्त्व हें ज्ञेय किंवा ज्ञानगम्य आहे असें म्हणतां येत नाहीं तथापि, आत्मस्वरूपाच्या साक्षात्काराला बुद्धीची अपेक्षा असतेच. याच दृष्टीनें आत्मतत्त्वाला 'बुद्धिगम्य' असें म्हटलें आहे. 'दृश्यते त्वग्र्यया बुद्धया' अत्यंत शुद्ध, निर्मल सूक्ष्म-बुद्धींतच आत्मतत्त्व प्रकाशू शकतें. अशा सूक्ष्म विचारानें पाहिल्यास कोणताहि विरोध उरत नाहीं.

तो परमात्मा 'भावग्राह्य' आहे म्हणजे भक्तांनेंच त्याचा साक्षात्कार होऊं शकतो किंवा भावरूपानें 'अस्ति' 'भाति' इत्यादि रूपानें तो प्रतीतीला येतो म्हणून त्याला 'भावग्राह्य' असें म्हटलें आहे तो परमात्मा नित्य, निरतिशय, आनंदस्वरूप आहे तो अनन्य म्हणजे अद्वितीय आहे, एकरूप आहे. असें ज्याचें स्वरूप तत्त्ववेत्ते व भगवद्भक्त जाणतात त्या, संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानाचा निरास करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करतों.

> यद्यद्वेद्यं वस्तुसतत्त्वं विषयाख्यं
> तत्तद्ब्रह्मैवेति विदित्वा तदहं च ।
> ध्यायन्त्येवं यं सनकाद्या मुनयोऽजं
> तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ९ ॥

शब्द, स्पर्श, रूप, रस आणि गंध हे पांच विषय आहेत. यांतील प्रत्येक विषय या जीवाला बांधून टाकतो संसारांत गुंतवितो म्हणून त्याला विषय म्हणतात वि उपसर्गपूर्वक सि धातूपासून हा शब्द बनला. 'विषिणोति इति विषय ' अशी त्याची व्युत्पत्ति आहे विशेषेकरुन जीवाला संसाराशी शिवून टाकतो म्हणून त्याला विषय असें म्हणतात. शब्दस्पर्शादिविशिष्ट सर्वहि पदार्थ विषयच समजले जातात या जगांत जे जे वेद्य विषय आहेत ते सर्व तत्त्वत ब्रह्मस्वरूपच आहेत. दोरीवर भासलेला साप जसा तत्त्वतः दोरीच असतो, त्याचप्रमाणें ब्रह्मावर भासणारें जग तत्त्वतः ब्रह्मस्वरूपच आहे. म्हणून सनक-सनंदनादि ऋषि मुनि जे जे दृश्य विषय आहेत ते ते तत्त्वतः ब्रह्मच आहेत असें जाणून आणि तेंच ब्रह्म मी आहें असें लक्षांत घेऊन ज्याचें ध्यान करतात त्या,

संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी अंधकाराचा निरास करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करतों.

यद्यद्वेद्यं तत्तदहं नेति विहाय
स्वात्मज्योतिर्ज्ञानमयानन्दमवाप्य ।
तस्मिन्नस्मीत्यात्मविदो यं विदुरीशं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १० ॥

स्त्री-पुत्र, देह, इंद्रियें, मन, बुद्धि इत्यादि सर्व पदार्थ वेद्य आहेत; म्हणजे ते ज्ञानाचे विषय होऊं शकतात. आत्मा हा ज्ञानाचा विषय होऊं शकत नाहीं. तो ज्ञाता आहे, विज्ञाता आहे. 'विज्ञातारमरे ! केन विजानीयात् ?' जो सर्वांना जाणतो त्याला कोणीं जाणावें ? तात्पर्य, आत्मा हा ज्ञाता आहे व त्याच्याव्यतिरिक्त असलेलें सर्व कांहीं ज्ञेय आहे. ज्ञेय पदार्थांनाच वेद्य किंवा दृश्य असें म्हणतात. ज्ञानी लोक जें जें वेद्य आहे तें तें मी नव्हे असें जाणून वेद्य वस्तूंची उपेक्षा करतात. कारण वेद्य वस्तु आत्म्याहून व्यतिरिक्त असल्यामुळें काल्पनिक असतात, मिथ्या असतात, नाशवंत असतात. म्हणूनच ज्ञानी लोक त्यांचा त्याग करून स्वयंप्रकाश, ज्ञानस्वरूप व आनंदमय असा जो आत्मा त्यालाच प्राप्त करून घेतात. म्हणजे त्याला यथार्थ रूपानें जाणतात. सर्वांतर्यामी स्वयंप्रकाश, ज्ञानस्वरूप व आनंदघन जो आत्मा तोच मी आहें असें जाणतात, त्याचा साक्षात्कार करून घेतात. म्हणूनच त्यांना आत्मविद् असें म्हणतात. अशा तऱ्हेचे आत्मवेत्ते ज्या जगदीशाला जाणतात त्या, संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करतों.

हित्वा हित्वा दृश्यमशेषं सविकल्पं
मत्वा शिष्टं भादृशिमात्रं गगनाभम् ।
त्यक्त्वा देहं यं प्रविशन्त्यच्युतभक्ता-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ११ ॥

आत्मज्ञान दृढ झाल्याशिवाय सर्व संसारदुःखाची निवृत्ति होणार नाहीं म्हणून तत्त्वजिज्ञासू लोक विविध नामरूपात्मक विश्वप्रपंचाचा पुनः पुन्हा विचार करून तो नाशवंत आहे ही गोष्ट लक्षांत घेतात. तूं मी, माझें तुझें, शत्रु मित्र इत्यादि सारे विकल्प सोडून देतात. अंतर्बाह्य सर्व दृश्य प्रपंचाचा

त्याग करतात म्हणजे तेथून आपल्या मनाला परावृत्त करतात आणि तें मन, आकाशासारखें अत्यंत निर्मल असलेल्या शुद्ध चित्स्वरूप, केवळ आनंदमय अशा परमात्मतत्त्वाच्या ठिकाणीं लावतात सतत त्याचाच विचार करीत रहातात देह आत्मा नव्हे, कारण तो नश्वर आहे इंद्रियें आत्मा नव्हेत कारण तीं ज्ञानाचीं साधनें आहेत मनहि आत्मा नव्हे कारण तें सुखदुःखाच्या ज्ञानाचें साधन आहे बुद्धीलाहि आत्मा म्हणता येत नाहीं, कारण ती अन्तःकरणाचाच एक भाग आहे स्त्री, पुत्र, मित्र हेहि आत्मा होऊ शकत नाहींत कारण ते देखील आपल्या आनंदाचींच साधनें होत वित्तवैभव वगैरे हेहि आत्मा होऊ शकत नाहींत, कारण ते आत्म्याच्या सुखासाठींच उपयुक्त असतात अशा रीतीनें सर्वांचा निषेध केल्यानंतर निषेधाचा अवधि किंवा निषेधकर्ता म्हणून जो शिल्लक रहातो तोच आत्मा निरपेक्ष प्रेमाचा जो विषय तोच आत्मा तो केवळ स्वप्रकाश, चिन्मात्र स्वरूप आहे आकाशासारखा सर्वव्यापी आहे

देहादि सर्व विषयांचा त्याग करून सच्चिदानंदघन श्रीहरीच भक्त परमात्म स्वरूपामध्यें प्रवेश करतात परमात्मस्वरूपांत प्रवेश करणें म्हणजे परमेश्वराच्या अनन्यचिंतनानें परमात्मस्वरूपाशीं समरस होऊन रहाणें ज्याच्या स्मरणानें संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानाचा निरास होतो त्या श्रीहरीची मी भक्तिपूर्वक स्तुति करीत आहें

*या श्लोकाचा अन्वयार्थ असा* —भेदयुक्त अखिल दृश्य वस्तूंचा पुनः पुन्हा निरास करून, शिल्लक राहिलेल्या गगनतुल्य निर्मल स्वयंप्रकाश आत्मतत्त्वाचें मनन करून, देहेंद्रियादि संघाताच्या ठिकाणींहि अनासक्त होऊन हरिभक्त ज्या परमात्मतत्त्वामध्यें प्रवेश करतात त्या, संसारतिमिराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करतों

सर्वेनास्ते सर्वशरीरी न च सर्वः
सर्वं वेत्त्येवेह न यं वेत्ति हि सर्वः ।
सर्वेनान्तर्यामितयेत्थं यमयन् य-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १२ ॥

तो भगवान् श्रीहरि अंतर्यामीरूपानें आत्मस्वरूपानें सर्वत्र आहे सर्वच त्याचें शरीर आहे, पण तो सर्व नव्हे अधिष्ठानरूपानें तो सर्वांमध्यें ओतप्रोत भरलेला आहे तो सर्वांना जाणतो पण सर्व त्याला जाणत नाहींत याप्रमाणें

अंतर्यामीरूपानें सर्वांमध्यें राहून जो सर्वांचें नियमन करतो, सर्वांना आपआपल्या कार्यामध्यें प्रवृत्त करतो त्या, संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी तिमिराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी भक्तिपूर्वक स्तुति करतों.

'बृहदारण्यकोपनिषदां'त अशी एक गोष्ट आहे कीं, एकदां जनक राजानें एक मोठा यज्ञ सुरू केला. अनेक विद्वान् ब्राह्मण, ऋषि-मुनि त्या यज्ञाला आले. यज्ञांत दक्षिणाहि खूप मिळणार होती. यानिमित्तानें विद्वान् ब्राह्मणांचें जणूं एक संमेलनच भरलें ! तें पाहून जनक राजाच्या मनांत आलें कीं, यांमध्यें सर्वांत अधिक ब्रह्मवेत्ता कोण आहे ? तो आपण शोधून काढावा व त्याच्याकडून ब्रह्मज्ञान मिळवावें.

जनकानें एक हजार गायी सोन्यानें शिंगें मढवून आणि रेशमी वस्त्रें पाठीवर घालून ब्राह्मणांच्या सभामंडपाजवळ आणून उभ्या केल्या आणि जाहीर केलें कीं, या सभेंत जो कोणी सर्वश्रेष्ठ ब्रह्मवेत्ता असेल त्यानें या गायी घ्याव्यात. सर्व विद्वान् ब्राह्मण एकमेकांच्या तोंडाकडे पाहूं लागले. कोणी गायी घेण्यास धजेना. सर्व गुपचूप बसले. तेव्हां याज्ञवल्क्य ऋषींनीं आपल्या शिष्याला सांगितलें कीं, अरे ! या गायी आपल्या आश्रमाला घेऊन जा. त्यानें गायी आश्रमाकडे वळविल्या. तें पाहून सर्व ब्राह्मण खवळले ! याज्ञवल्क्यांनीं त्यांना विनयानें नमस्कार केला. आम्हांला गायी पाहिजे आहेत म्हणून आम्ही गायी आश्रमाकडे वळविल्या, असें ते म्हणाले. तेव्हां संतापलेल्या त्या ब्राह्मणांनीं याज्ञवल्क्यांना वादविवाद करण्याचें आव्हान दिलें. मोठा कडाक्याचा वादविवाद झाला. त्यामध्यें आश्वल ऋषि, आर्तभाग ऋषि, भ्युज्यु, लाह्यायनि, उषस्त, कहोल इत्यादि बड्या बड्या पंडितांचा याज्ञवल्क्यांनीं तावडतोब पराभव केला ! तेव्हां उद्दालक ऋषि पुढें आले आणि त्यांनीं याज्ञवल्क्यांना प्रश्न केला कीं, अहो ! अंतर्यामी आत्मा कोणाला म्हणतात ? त्याचें काय स्वरूप आहे ? तें सांगा.

याज्ञवल्क्यांनीं उत्तर दिलें, अहो ! जो पृथ्वीमध्यें रहातो तो अंतर्यामी आत्मा. पृथ्वीमध्यें घट-पटादि पदार्थ रहातात त्यांना अंतर्यामी म्हणावें काय ? याज्ञवल्क्य म्हणाले, अहो तसें नव्हे. जो पृथ्वीच्या अगदीं आंत रहातो, डोळ्यानें दिसत नाहीं तो अंतर्यामी आत्मा होय. पृथ्वीच्या अगदीं आंत पृथ्वीची अभिमानिनी देवता रहाते मग तिला अंतर्यामी आत्मा म्हणावयाचें काय ? याज्ञवल्क्य म्हणाले, तसें नव्हे. तिच्याहि तो पलीकडे आहे. ती पृथ्वी देवता त्याला जाणूं शकत नाहीं. पृथ्वी हें जणुं कांहीं त्याचें शरीर आहे. जो

पृथ्वीमध्यें राहून पृथ्वीचें नियमन करतो, पण पृथ्वी त्याला जाणू शकत नाहीं तो अंतर्यामी अमृत म्हणजे अविनाशी आहे हे उद्दालक महर्षे ! तोच तुमचाहि पण अंतर्यामी आत्मा आहे तो जलांत रहातो, तेजांत रहातो, वायूंत रहातो, पण जल-तेज आणि वायु यांच्या अभिमानी देवता त्याला जाणू शकत नाहींत जल-तेज, वायु ही जणु त्याचीं शरीरें आहेत तो जल-तेज आणि वायु यांच्या मध्यें राहून त्याचें नियमन करतो तोच अंतर्यामी आत्मा होय जो सर्वांच्या आंत रहातो, सर्व त्याला जाणू शकत नाहींत, सर्वच जणू काहीं त्याचीं शरीरें आहेत जो सर्वांच्या आंत राहून सर्वांचें नियमन करतो तोच अंतर्यामी आत्मा होय हे उद्दालक महर्षे ! तोच तुमचाहि अंतर्यामी आत्मा आहे अशा रीतीनें 'सर्वान्तर्यामी' म्हणून त्या ब्रह्मवेत्त्याच्या सभेंत याज्ञवल्क्यानीं ज्या तत्त्वाचें प्रतिपादन केलें तो सच्चिदानंदघन भगवान् श्रीहरि त्याची मी स्तुति करीत आहें

सर्वं दृष्ट्वा स्वात्मनि युक्त्या जगदेतद्
दृष्ट्वात्मानं चैवमजं सर्वजनेषु ।
सर्वात्मैकोऽस्मीति विदुर्यं जनहृत्स्थं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १३ ॥

हें सर्व विश्व आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं आहे व आत्मा हा विश्वामध्यें ओतप्रोत भरलेला आहे हें युक्तीनें जाणून मी सर्वात्मस्वरूप एकरूप आहें असें ज्याला तत्त्ववेत्ते जाणतात तो सर्वांच्या हृदयांत वास्तव्य करणारा, संसार तिमिराचा नाशकर्ता भगवान् श्रीहरि त्याची मी भक्तीनें स्तुति करतों

ब्रह्माचें अद्वितीयत्व व जीवाचें ब्रह्मरूपत्व हा अध्यात्मतत्त्वज्ञानाचा सिद्धान्त आहे वदानीं तो प्रामुख्यानें प्रतिपादन केला आहे व तत्त्ववेत्त्यानीं युक्तीनें जाणला आहे तत्त्ववेत्ते लोक मोठ्या युक्तीनें हें सर्व विश्व आत्म-स्वरूपांत अंतर्भूत आहे असें पहातात अलंकार हे सुवर्णांतून निर्माण होतात सुवर्णाच्या अस्तित्वामुळेंच अलंकाराचें अस्तित्व प्रतीतीला येतें अलंकार नाश पावले तरी सुवर्णच शिल्लक रहातें यावरून सुवर्ण आणि अलंकार यांच्यामध्यें तत्वत भेद नाहीं त्याचप्रमाणें विश्व हें आत्मस्वरूपांतून अभिव्यक्त होतें, आत्म्याच्या सत्तेनेंच प्रतीतीला येतें व शेवटीं आत्मस्वरूपांतच विलीन होत असतें म्हणून विश्व हें आत्मस्वरूपाहून निराळें नाहीं ' आत्मैवेदं सर्वं ' इत्यादि श्रुतिवाक्येंहि पण हेंच सांगत आहेत

हें सर्व विश्व भिन्न भिन्न नामरूपानें प्रतीतीला येतें खरें, पण तें सत्य मानता येत नाहीं कारण त्याचा बाध होतो कालांतरानें तें नाश पावत असतें बरें, तें खोटें आहे असें म्हणावें तर तें दिसत असतें हेंहि तितकेंच खरें आहे मग हें जग दिसतें तें खरें का खोटें ?

ज्याप्रमाणें प्रकाशाशीं संबंध आल्याशिवाय घटादि दृश्य पदार्थांचें भान होऊं शकत नाहीं त्याचप्रमाणें चित्प्रकाशस्वरूप आत्म्याशीं संबंध आल्याशिवाय विश्वांतील दृश्य अथवा जड पदार्थांचें भान होऊं शकणार नाहीं जे पदार्थ दिसतात अथवा इंद्रियांनीं ज्यांचें ग्रहण होतें त्यांना दृश्य, जड किंवा ज्ञेय म्हणतात चैतन्याशीं संबंध असल्याशिवाय दृश्य पदार्थांचें भान होऊं शकत नाहीं म्हणूनच चैतन्याला दृग्, ज्ञान किंवा प्रकाश म्हणतात तेव्हां घटादि दृश्य पदार्थ व चैतन्य यांचा संबंध अवश्य मानलाच पाहिजे मग तो संबंध कोणता मानणार ? संयोगसंबंध का समवायसंबंध ? आत्मा आणि घटादि पदार्थ यांचा संयोगसंबंध कोणी मानतात पण तें बरोबर नाहीं ज्या दोन वस्तूंचा संयोग होत असतो त्या वस्तु संयुक्त होण्यापूर्वीं अप्राप्त म्हणजे किंवा असलग्न असतात आत्मा हा विभु म्हणजे विश्वव्यापी असल्यामुळें तो नित्यप्राप्त किंवा नित्यसलग्न आहे मग त्याचा संयोग कसला ? संयोग हा सावयव द्रव्याचा असतो निरवयवाचा तो असत नाहीं आत्मा हा तर निरवयव आहे मग त्याचा घटादि पदार्थांशीं संयोग कसा असूं शकणार ? दुसरें असें कीं, संयोग हा द्रव्याद्रव्याचा असतो आत्मस्वरूप चैतन्य हें कांहीं द्रव्य नव्हे मग त्याचा संयोग कसा असणार ?

आत्मचैतन्य आणि घटादि पदार्थ यांचा समवाय संबंध मानतां येत नाहीं ज्या दोन पदार्थांमध्यें समवाय संबंधअसतो त्या दोन पदार्थांपैकीं एक जाति तर एक व्यक्ति, एक गुण तर दुसरा गुणी, एक क्रिया तर दुसरा क्रियावान, एक अवयव तर दुसरा अवयवी अशा तऱ्हेचें स्वरूप असलेलें पहावयास सापडतें असें स्वरुप आत्मा आणि आत्म्याच्या ठिकाणीं भासणारा विश्वप्रपंच यांच्यामध्यें नाहीं मग त्यांचा समवाय संबंध कसा मानणार ?

बरें, घटादि पदार्थ आणि आत्मचैतन्य यांचा विषयविषयिभाव हा संबंध मानावा तर तोहि मानतां येत नाहीं कारण जेथें जेथें विषयविषयिभाव हा संबंध असतो तेथें तेथें संयोग किंवा समवाय हा संबंध असतोच आपल्याला घट

पगादि विषयाचें ज्ञान होत असतें तेव्हा त्या ज्ञानाचा घट पटादि विषयाशीं जो सबध असतो त्याला विषयविषयिभाव म्हणतात त्या ठिकाणीं ज्ञानाचा आत्म्याशीं समवायसबध आणि घटादि विषयाचा इद्रियाशीं सयोगसबध हा असतोच त्या शिवाय घटादि पदार्थ आणि त्याचें ज्ञान याचा विषयविषयिभाव सिद्ध होत नाहीं आत्म्याच्या ठिकाणीं कोणाचाच समवायसबध नसल्यामुळें विश्व आणि आत्मा याचा विषयविषयिभाव हा सबध मानता येत नाहीं शिवाय इद्रियानीं होणारें ज्ञान आणि घटादि विषय याच्यामध्यें विषयविषयिभाव हा सबध असतो आत्मा तर ज्ञाता आहे ज्ञाता आणि ज्ञेय याच्यामध्यें विषयविषयिभाव हा सबध कसा असणार ! तात्पर्य, आत्मा आणि जग याच्यामध्यें सयोग, समवाय, दैशिक, कालिक, विषयविषयिभाव इत्यादि कोणताहि सबध सभवत नाहीं सबध मानल्याशिवाय तर काहीं गति नाहीं विश्व आहे आणि विश्वव्यापी आत्मा आहे तर विश्व आणि आत्मा याचा काहींना काहीं सबध असलाच पाहिजे

अशा रीतीनें विचार करता करता अध्यात्मतत्त्ववेत्यानीं तो सबध अध्यस्तत्व किंवा अध्यास हा मानला आहे त्याशिवाय आत्मचैतन्य आणि विश्व याच्यासबधाची उपपत्तिच लागत नाहीं याप्रमाणें विश्व आणि चैतन्य याचा अध्यस्तत्व किंवा अध्यास हा सबध मानल्यानतर ज्या दोन पदार्थांमध्यें अध्यस्तत्व सबध असतो ते दोन पदार्थ तत्त्वत एकच असतात शिंपला हा चादी म्हणून जेव्हा भासतो तेव्हा ती चादी आणि तो शिंपला तत्त्वत निराळे नसतात दोरी साप म्हणून जेव्हा भासते तेव्हा साप आणि दोरी हे दोन पदार्थ निराळे नसतात त्याचप्रमाणें आत्मा हा विश्वरूपानें जेव्हा भासतो तेव्हा विश्व हें आत्म्याहून तत्त्वत निराळें नसतें अध्यास यासबधानें प्रतीतीला येणारे चादी आणि शिंपला एकच अध्यास यासबधानें प्रतीतीला येणारे दोरी आणि सर्प एकच त्याचप्रमाणें अध्याससबधानें प्रतीतीला येणारे विश्व आणि आत्मा एकच आहेत तात्पर्य अध्यस्त आणि अधिष्ठान याच्यामध्यें एकरूपता असते

अशा युक्तीनें तत्त्ववेत्ते हें सर्व जग आत्म्याच्या ठिकाणीं पहातात व त्या अनादि आत्म्यालाहि विश्वातील सर्व पदार्थांमध्यें पहातात सर्व लोकाच्या हृदयात रहाणारा व सर्वस्वरूपानें नटणारा जो एक आत्मा तोच मी आहें असा ज्याचा साक्षात्कार करून घेतात त्या, ससारतिमिराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहें

सर्वत्रैकः पश्यति जिघ्रत्यथ भुङ्क्ते
स्प्रष्टा श्रोता बुध्यति चेत्याहुरिमं यम् ।
साक्षी चास्ते कर्तृषु पश्यन्निति चान्ये
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १४ ॥

महादेवापासून तो गवताच्या काडीपर्यंत जो आत्मा सर्व स्थावर व जगम पदार्थांमध्यें एकच भरलेला आहे तो वस्तुत एकरूप असूनहि अनेक रूपानीं प्रतीतीला येतो तोच डोळ्यानें पहातो नाकानें वास घेतो मुखानें घास घेतो त्वचेनें शीत, उष्ण, मृदु, कठीण जाणतो कानानें ऐकतो बुद्धीनें सर्व लक्षात घेतो सर्व इंद्रियानीं सर्व प्रकारची हालचाल करतो. अशा रीतीनें सर्व कार्यें करणारा म्हणून सर्व लोकाच्या प्रतीतीला येतो श्रोता, मता, कर्ता, ज्ञाता म्हणून सर्व लोक ज्याचा उल्लेख करतात, पण हें सर्व त्याचें सोपाधिक स्वरूप आहे इतर म्हणजे विवेकी तत्त्ववेत्ते मात्र आत्म्याचें निरुपाधिक वास्तव स्वरूप लक्षात घेऊन तो केवळ साक्षी आहे असें मानतात देह, इंद्रियें, मन, बुद्धि इत्यादिकामध्यें राहून त्याना आपआपल्या कार्यामध्यें तो प्रवृत्त करीत असतो व त्याचीं कार्यें पहात रहातो प्रकाशित करतो, स्वत काहीं करीत नाहीं हा जो सर्वसाक्षी परमात्मा, ससाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानाचा निरास करणारा भगवान श्रीहरि त्याची मी भक्तियुक्त अत करणानें स्तुति करीत आहें

पश्यन् शृण्वन्नत्र विजानन् रसयन् सन्
जिघ्रन् बिभ्रद्देहमिमं जीवतयेत्थम् ।
इत्यात्मानं यं विदुरीशं विषयज्ञं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १५ ॥

आत्मा जीवन रूपानें देह धारण करून पहाणें, ऐकणें, जाणणें, रस चाखणें, वास घेणें इत्यादि अनेक क्रिया या देहात करीत असतो म्हणून त्याला सर्व विषयाचा ज्ञाता कर्ता, असें म्हणतात तत्त्वत तो जीव नसून सर्व जीवाचा अधिष्ठाता ईश आहे अशा रीतीनें तत्त्ववेत्ते त्याला जाणतात ससारतिमिराचा नाश करणाऱ्या त्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहे

वेदामध्यें आत्म्याला काहीं ठिकाणीं कर्ता, भोक्ता असें म्हटलें आहे, तर काहीं ठिकाणीं तो कर्ताहि नाहीं व भोक्ताहि नाहीं असें म्हटलें आहे दोन्हीं

प्रकारचें वर्णन वेदच करीत असल्यामुळें दोन्ही पक्ष सत्यच आहेत असें म्हटलें पाहिजे आता कोणी असें म्हणेल कीं, परस्परविरुद्ध असे हे दोन्ही प्रकार सत्य कसे असू शकतील ? यावर उत्तर असें कीं, आत्मा हा औपाधिकरूपानें कर्ता, भोक्ता असा आहे; तर तो स्वाभाविकरूपानें कर्ताहि नाहीं व भोक्ताहि नाहीं, अशा रीतीनें स्वाभाविकत्व आणि औपाधिकत्व या दोन धर्मांमुळें दोन्ही पक्ष बरोबर आहेत, पण तत्त्वत दोन्ही पक्ष सत्य आहेत असें मात्र म्हणता येत नाहीं

एकाच अधिकरणावर एकाच वेळीं अत्यंत विरुद्ध अशा दोन गुणधर्मांची प्रतीति आली, तर त्यापैकीं कोणती तरी एक सत्य असणार व एक मिथ्या असणार हें निश्चित समजावें अशा स्थितींत कोणती प्रतीति मिथ्या मानावयाची व कोणती सत्य मानावयाची, असा प्रश्न पुढें येतो एकदर विचार केला असता औपाधिक प्रतीति हीच मिथ्या ठरते व स्वाभाविक प्रतीति ही सत्य ठरते स्फटिक स्वभावत पांढरा व स्वच्छ असतो तो जास्वंदीच्या फुलाशेजारीं ठेवला म्हणजे तांबडा दिसतो स्फटिकाचा रक्तवर्ण औपाधिक असल्यामुळें तो खोटा ठरतो व स्वाभाविक असलेला पांढरेपणा व स्वच्छत्व हा धर्म सत्य असतो जलाचें उष्णत्व हें औपाधिक असल्यामुळें मिथ्या असतें व शीतत्व हें स्वाभाविक असल्यामुळें सत्य असतें तसेंच प्रकृतस्थळीं आत्म्याचें कर्तृत्व, भोक्तृत्व हें औपाधिक असल्यामुळें खोटें आहे व कर्तृत्व भोक्तृत्व नसणें हें स्वाभाविक असल्यामुळें सत्य आहे हीच गोष्ट या पधरा या श्लोकात स्पष्ट केली आहे

आत्मा हा जीवरूपानें या देहात प्रवेश करतो देहेंद्रियादि समूहाला तो धारण करतो देहेंद्रियादिकाचा तो आधार बनतो मग डोळ्याच्या द्वारा रूप ग्रहण करून तो द्रष्टा बनतो कानाच्या द्वारा शब्द ग्रहण करून तो श्रोता बनतो अत करणाच्या द्वारा तो ज्ञाता बनतो रसनेंद्रियाच्या द्वारा तो रसज्ञ बनतो घ्राणेंद्रियाच्या द्वारा तो गधाचा ग्राहक बनतो याप्रमाणें या देहात एकच आत्मा अनेक उपाधींच्या द्वारा अनेक विषयाचा ज्ञाता बनतो हें त्याचें द्रष्टृत्व श्रोतृत्वादि सर्व धर्म औपाधिक असल्यामुळें मिथ्या आहेत तत्त्वत त्याच्या ठिकाणीं कर्तृत्व, भोक्तृ व वगैरे काहीं नाहीं उपाधींमुळें आत्म्याला जीवभाव आला कीं हे सर्व धर्म त्याच्या ठिकाणीं प्रतीतीला येतात गुरुकृपेनें व ईशकृपेनें आत्म्याचा जीवभाव निमाला कीं तोच परब्रह्म होतो। अशा त्या परब्रह्मरूप श्रीहरीची मी स्तुति करीत आहें

जाग्रद् दृष्ट्वा स्थूलपदार्थानथ मायां
दृष्ट्वा स्वप्नेऽथाऽपि सुषुप्तौ सुखनिद्राम् ।
इत्यात्मानं वीक्ष्य मुदास्ते च तुरीये
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १६ ॥

जो परमात्मा सर्व प्राण्याच्या देहामध्यें जीवरूपानें प्रविष्ट होऊन जागृत अवस्थेमध्यें सर्व स्थूल पदार्थांना पहातो, स्वप्नामध्यें मायिक प्रपंचाला पहातो आणि सौषुप्त अवस्थेमध्यें सुखनिद्रेचा अनुभव घेतो, याप्रमाणें तिन्ही अवस्थेंत विविध विषयाचा अनुभव घेत घेत शेवटीं तुरीय म्हणजे चतुर्थ अथवा समाधि अवस्थेंत आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून घेतो आणि सर्व विषयापासून अलिप्त रहातो, त्या संसारतिमिराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहें

आत्मतत्त्वाची पूर्ण कल्पना यावी म्हणून माण्डूक्योपनिषदांत आत्म्याची चार अंशानीं कल्पना मांडली आहे जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तीन अवस्थाचा किंवा स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तीन शरीराचा अभिमानी आत्मा, हे त्याच्या तीन अंशाचें सोपाधिक स्वरूप होय आणि राहिलेल्या शुद्ध सच्चिदानद स्वरूपाला तुरीय आत्मा असें म्हणतात हा आत्म्याचा चौथा अंश होय वस्तुत निरुपाधिक, निरवयव आणि विश्वव्यापी अशा आत्मस्वरूपाला अंश कसे असू शकतील ? तथापि आत्मतत्त्वाची कल्पना येण्याकरिता या ठिकाणीं अंशाची कल्पना गृहीत धरलेली आहे

ॐकार हा आत्म्याचा वाचक आहे. ॐकारामध्यें अ, उ, म आणि अर्धमात्रा असे चार अंश असतात जागृत अवस्थेचा जो अभिमानी तोच स्थूल शरीरसमुदायाचा अभिमानी होय जागृत अवस्थेंत तो देहाच्या बाहेर असलेल्या घटपटादि सर्व विषयाचा अनुभव घेत असतो त्याची सात अंगें आहेत स्वर्गलोक हें त्याचें मस्तक आहे सूर्य त्याचा डोळा आहे, अग्नि त्याचें मुख आहे वायु त्याचा प्राण आहे, आकाश हा त्याच्या देहाचा मध्यभाग आहे, समुद्र त्याचा बस्ति म्हणजे मूत्राशय होय आणि पृथ्वी हे त्याचे पाय, अशी हीं त्याचीं सात अंगें आहेत त्याला एकोणीस मुखें आहेत मुख म्हणजे विषय ग्रहण करण्याचें किंवा क्रियेचें साधन श्रवणेंद्रिय, त्वगिंद्रिय, चक्षुरिंद्रिय, रसनेंद्रिय आणि घ्राणेंद्रिय ही पाच ज्ञानेंद्रियें,

वागिंद्रिय, हात, पाय, गुद आणि उपस्थ हीं पाच कर्मेंद्रियें प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान हें पाच वायु आणि मन, बुद्धि, चित्त आणि अहकार हीं चार अत करणें हींच तीं आत्म्याचीं एकोणीस मुखें होत स्थूल म्हणजे इद्रियग्राह्य विषय त्याचें तो सेवन करतो म्हणून त्याला स्थुलभुक् असें म्हटलें आहे त्यालाच विश्व किंवा वैश्वानर असें म्हणतात हा आत्म्याचा एक अश होय हाच प्रणवातील अकाराचा अर्थ समजावा

प्रणवाचा दुसरा अश म्हणजे उकार त्याचें वर्णन करताना त्याला 'स्वप्नस्थान' म्हणजे वासनामय पदार्थांचा भोक्ता असें म्हटलें आहे तो स्वप्नामध्यें देहाच्या आतच वासनामय विश्वप्रपचाचा अनुभव घेत असतो म्हणूनच त्याला सूक्ष्म पदार्थांचा भोक्ता अथवा प्रविविक्तभुक् असें म्हटलें आहे याला तैजस असेंहि म्हणतात तेज म्हणजे लिंगशरीर अथवा सूक्ष्म देह त्याचा हा अभिमानी म्हणून याला तैजस असें नाव पडलें हाच आत्म्याचा दुसरा अश होय

प्रणवाचा तिसरा अश मकार आहे तो कारणदेहाचा अथवा सौषुप्त अवस्थेचा सूचक आहे सुषुप्ति म्हणजे गाढ निद्रा ज्या अवस्थेत बुद्धिपूर्वक कोणतीहि हालचाल नाहीं, ज्ञान नाहीं, इच्छा नाहीं, ज्या अवस्थेला मूर्च्छा किंवा समाधि म्हणता येत नाहीं अशी जी अवस्था तिला सौषुप्त अवस्था असें म्हणतात या अवस्थेंत आत्मा प्रविष्ट झाला म्हणजे तो सत्स्वरूपाशीं एकरूप होऊन जातो भिन्न भिन्न विषयाची प्रतीति त्या अवस्थेंत येत नाहीं, पण आत्म्याचें ज्ञान हें अव्याहत असतें म्हणून त्या काळीं आत्म्याला प्रज्ञानघन' असें म्हटलें आहे आत्मा त्या काळात स्वस्वरूपाचाच आनद अनुभवीत असतो त्यामुळें त्याला आनदभुक् असेंहि म्हटलें आहे परम सूक्ष्म चित्प्रतिबिंबसहित अज्ञानवृत्ति हीच त्याच्या आनदाच्या अनुभवाचें साधन आहे म्हणून त्याला 'चेतोमुख' असेंहि म्हटलें आहे या अवस्थेंत आत्म्याला प्रकृष्ट रूपानें अतर्बाह्य विषयाचें ज्ञान असू शकत नाहीं म्हणून श्रुतीनें त्याला 'प्राज्ञ' असेंहि म्हटलें आहे हा आत्म्याचा तिसरा अश होय अश म्हणजे भाग

अशा रीतीनें आत्म्याचे भाग कल्पिले, तरी जागृति स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थेंत आत्मा एकच आहे माळेंतले मणि भिन्न भिन्न असल, तरी सर्व मण्यातून जसें एकच सूत्र गोवलेलें असतें त्याचप्रमाणें जागृति, स्वप्न

आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थातून एकच आत्मा अनुस्यूत आहे अनुस्यूत म्हणजे ओवलेला — भरलेला

या तिन्ही अवस्थेच्या पलीकडे असलेलें निरुपाधिक शुद्धचैतन्य हाच आत्म्याचा चौथा अंश होय यालाच 'तुरीय' असें म्हणतात हा आत्म्याचा तुरीय भाग ज्ञानेंद्रियाना कळू शकत नाहीं म्हणून त्याला 'अदृश्य' म्हटलें आहे कर्मेंद्रियाची तेथे गति नाहीं त्याचे बाबतीत देणें घेणें इत्यादि व्यवहारहि सभवत नाहीं म्हणून त्याला 'अव्यवहार्य' आणि 'अग्राह्य' असें म्हटलें आहे अनुमानानें त्याचें आकलन होत नाहीं म्हणून त्याला 'अलक्षण' असें म्हणतात अत करणाचा तो विषय होऊ शकत नाहीं म्हणून त्याला अचिंत्य' असें म्हणतात तें वाणीनें बोलून दाखविता येत नाहीं म्हणून त्याला 'अव्यपदेश्य असें म्हटलें आहे एकमेव अद्वितीय आत्मरूपानें तो स्वयप्रकाशित आहे म्हणून त्याला 'एकात्मप्रत्ययसार' असें श्रुतीनें म्हटलें आहे तेथें सर्व प्रपचाचा उपशम होतो म्हणून त्याला 'प्रपचोपशम म्हटलें आहे त्याला या अवस्थेंत ' शात, शिव व अद्वैत ' असेंहि म्हणतात शात म्हणजे निर्विकार, शिव म्हणजे आनद रूप आणि अद्वैत म्हणजे एकरूप हेंच आत्म्याच्या तुरीय भागाचें स्वरूप आहे तोच आत्मा षड्गुणैश्वर्यसपन्न भगवान् विष्णु श्रीहरि होय त्याची या सोळाव्या श्लोकात स्तुति केली आहे

पश्यन् शुद्धोऽप्यक्षर एको गुणभेदान्
नानाकारान् स्फाटिकवद्भाति विचित्रः ।
भिन्नश्छिन्नश्चायमजः कर्मफलैर्य-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १७ ॥

आत्मा-परमात्मा तत्त्वत शुद्ध अज, अक्षर आणि एकरूप असूनहि देहरूपी उपाधिभेदानें अनेक आकाराना अनुभवील, निरनिराळ्या रगाच्या सान्निध्यात निरनिराळ्या रगानीं प्रतीतीला येणाऱ्या स्फटिकाच्या तुकड्याप्रमाणें अनेक रूपानीं प्रतीतीला येतो तो देहभेदानें भिन्न भासतो देहाच्या लहान मोठ्या आकारामुळें तोहि लहानमोठा परिच्छिन्न परिमित भासतो आणि कर्म फलामुळें सुखी दु खी असा प्रतीतीला येतो असें असलें तरी तत्त्वत तो अज म्हणजे ज मरहित आहे शुद्ध म्हणजे निर्मल पापपुण्यविरहित किंवा कर्माचीं फलें जीं सुखें आणि दु ख याच्या सबधानें विरहित आहे अक्षर म्हणजे

अविनाशी आहे एक म्हणजे अद्वितीय आहे तोच भगवान् विष्णु श्रीहरि भक्तजनांच्या सांसारिक दु खांना कारणीभूत असलेला अज्ञानरूपी अंधकाराचा नाश करतो त्या श्रीहरीची मी भक्तिभावानें स्तुति करीत आहे

आत्मा जर सर्वत्र एक आहे, तर मग तू मी, हा तो, आपला-परका असा भेद का मतीतीला येतो? कोणी सुखी तर कोणी दु खी असें का आढळून येतें? जगात कोणी एखादा जरी सुखी असला, तरी सर्वच सुखी असावयास पाहिजेत किंवा कोणी एखादा दु खी असल्यास सर्वच दु खी असावयास पाहिजेत कारण सर्वांचा आत्मा एकच आहे या शंकेचें समाधान या श्लोकात केलेलें आहे

मायेचे अथवा मूळ प्रकृतीचे सत्त्व, रज आणि तम हे जे तीन गुण आहेत, या गुणांचाच परिणामविशेष म्हणजे पंचमहाभूतें व पांचभौतिक शरीरें होत म्हणून शरीरांनाहि गुणच म्हणतात गुणभेदामुळें अर्थात् शरीराच्या भेदामुळेंच आत्मा तत्त्वत एकरूप असूनहि भिन्न भिन्न रूपानें प्रतीतीला येतो. आत्मा तत्त्वत निराकार व अपरिच्छिन्न असूनहि लहानमोठ्या अशा विविध देहाच्या आकारामुळेंच तोहि लहान मोठा, उंच-ठेंगणा इत्यादि विविध आकारानें प्रतीतीला येतो व परिच्छिन्न परिमित असा भासतो आकार, भेद, परिच्छेद हे सर्व देहाचे धर्म आहेत ते आत्म्याचे धर्म नाहींत, पण आत्मा हा देहरूपी उपाधीशीं संलग्न झाल्यामुळें त्याच्या ठिकाणीं हे सर्व धर्म भासतात अग्नीला स्वत चा आकार नसतो, पण इंधनाच्या आकारानें तो जसा प्रतीतीला येतो त्याचप्रमाणे आत्म्याची स्थिति आहे

स्वभावत स्वच्छ व पांढराशुभ्र असलेला स्फटिकमणि हा जसा उपाधीच्या सान्निध्यामुळें हिरवा, तांबडा, पिवळा इत्यादि विविध रंगाचा भासावा तीच स्थिति आत्म्याची उपाधीच्या सान्निध्यामुळें होत असते सुखें आणि दु खें हे अंत करणाचे धर्म आहेत ते आत्म्याचे धर्म नाहींत उपाधीच्या सान्निध्यामुळें ते आत्म्याच्या ठिकाणीं भासतात म्हणून आत्मा सुखी दु खी असा प्रतीतीला येतो अंत करणें हीं असंख्य व परस्पर भिन्न असल्यामुळें एकाच्या सुखानें सर्व सुखी किंवा एकाच्या दु खानें सर्व दु खी असें होण्याची किंवा मानण्याची आपत्तीहि येत नाहीं. सुख हा आत्म्याचा धर्म नसून आत्मा हाच निर्विषय सुखस्वरूप आहे तोच भगवान् श्रीहरि आहे त्याची मी स्तुति करतों.

ब्रह्मा विष्णू रुद्रहुताशौ रविचन्द्रा-
विन्द्रो वायुर्यज्ञ इतीत्थं परिकल्प्य ।
एकं सन्तं यं बहुधाहुर्मतिभेदात्
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १८ ॥

उपाधिभेदानें आत्माच अनेक देवतांच्या रूपानें नटला आहे व तो अनेक कार्ये करीत आहे. तोच ब्रह्मदेवाचें रूप धारण करून सर्व सृष्टि उत्पन्न करतो. विष्णूचें रूप धारण करून सर्व विश्वाचें प्रतिपालन करतो. स्वतः सात्विक असूनहि तमोगुणप्रधान साधनांचा अंगीकार करून प्रलयकाळीं सर्व विश्वाच्या संहाराचें कार्य करणारा भगवान् शंकरहि तोच आहे. अग्नि, सूर्य, चंद्र, इंद्र, वायु आणि यज्ञ इत्यादि अनेक देवतांच्या रूपानें तोच नटला आहे. वास्तविक तो परमात्मा तत्त्वतः एकरूप असूनहि औपाधिक मतिभेदामुळें त्याच्याबद्दल अनेक कल्पना केल्या जातात. तो संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानाचा निरास करणारा भगवान् श्रीहरि, त्याची मी अनन्यप्रेमानें स्तुति करीत आहें.

सत्यं ज्ञानं शुद्धमनन्तं व्यतिरिक्तं
शान्तं गूढं निष्कलमानन्दमनन्यम् ।
इत्याहादौ यं वरुणोऽसौ भृगवेऽजं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १९ ॥

त्याच्या ठिकाणीं या तिन्ही मर्यादा संभवत नाहींत म्हणून त्याला अनंत म्हटलेलें आहे. अंत म्हणजे मर्यादा ती त्याच्या ठिकाणीं संभवत नाहीं म्हणून तो अनंत आहे.

या श्लोकांत आत्म्याला 'व्यतिरिक्त' असें म्हटलेलें आहे. व्यतिरिक्त म्हणजे अन्नमय, प्राणमय, मनोमय, विज्ञानमय आणि आनंदमय या पांचहि कोशांहून निराळा, त्यांचा साक्षी. 'शान्त' म्हणजे जेथें कोणत्याहि प्रकारचा उपप्लव किंवा चांचल्य शिल्लक राहिलेलें नाहीं असा. 'गूढ' म्हणजे झाकलेला. वाणीला व मनालाहि ज्याचा थांग-पत्ता लागत नाहीं, मग इतर इंद्रियांची कथा काय ? 'निष्कल' म्हणजे निरवयव, अर्थात् अवयवरहित. 'आनंद' म्हणजे निरतिशय आणि निरपेक्ष अशा प्रेमाचें स्थान, परमप्रिय. 'अनन्य' म्हणजे एकरूप, अद्वितीय. वरुण नांवाच्या तत्त्ववेत्त्या महर्षीनें भृगु नांवाच्या आपल्या मुलास, त्यानें ब्रह्म जाणण्याची इच्छा व्यक्त केली असतां अशा रीतीनें ज्या तत्त्वाचें वर्णन करून सांगितलें तोच 'अन्न' म्हणजे अनादि, आत्मा, परमात्मा भगवान् श्रीहरि त्याची मी अनन्यचित्तानें स्तुति करीत आहें.

> कोशानेतान् पञ्च रसादीनतिहाय
> ब्रह्मास्मीति स्वात्मनि निश्चित्य दृशिस्थः ।
> पित्रा शिष्टो वेद भृगुर्यं यजुरन्ते
> तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २० ॥

पित्याच्या उपदेशाप्रमाणें अन्नमयादि पंच कोशांचें निरसन करून आत्म-स्वरूपाच्या ठिकाणींच मी साक्षिचैतन्यस्वरूप परब्रह्म आहें. अशा रीतीनें ज्या तत्त्वाला जाणलें तोच भगवान् श्रीहरि सकल संसाररूपी तिमिराचा नाश करणारा, त्याची मी स्तुति करीत आहें.

कोश म्हणजे आच्छादन. म्यान ही तलवारीला झाकून टाकते म्हणून तिला कोश म्हणतात. आत्मस्वरूपालाहि झाकून टाकणारे म्हणजे यथार्थ आत्मस्वरूपाची प्रतीति येऊं न देणारे असे आत्म्याचे पांच कोश आहेत. अन्न-मय कोश, प्राणमय कोश, मनोमय कोश, विज्ञानमय कोश आणि आनंदमय कोश अशीं त्यांचीं नांवें आहेत. रसरक्तादि धातूंनीं बनलेल्या स्थूल देहाला अन्नमय कोश म्हणतात. हा अन्नमय कोशच आत्मा आहे असें कित्येकांना वाटतें, पण

तो खरा आत्मा नव्हे. देहाच्या ठिकाणीं जन्म, जरा, मृत्यु इत्यादि धर्म दिसतात. आत्म्याच्या ठिकाणीं ते नाहींत म्हणून अन्नमय कोश हा आत्मा नव्हे. पंचप्राण आणि पंचकर्मेंद्रियें यांच्या समूहाला प्राणमय कोश म्हणतात. शरीराची क्रिया व सर्व प्रकारची हालचाल याच्याकडूनच होत असते. कित्येकांना हाच आत्मा वाटतो, पण हा आत्मा नव्हे. जाणें-येणें, घेणें, टाकणें, बोलणें इत्यादि क्रिया व क्षुधा-पिपासा हे प्राणमय कोशाचें धर्म आहेत. आत्मा या धर्मांपासून अलिप्त आहे म्हणून प्राणमय कोश हा आत्मा नव्हे

पंचज्ञानेंद्रियें आणि मन हाच मनोमय कोश होय. याच्याकडून विषय ग्रहण करण्याचें व त्याचा विचार करण्याचें कार्य होत असतें. कांहीं लोक यालाच आत्मा समजतात पण हा आत्मा नव्हे. सुख-दुःख, लज्जा, भीति इत्यादि धर्म मनोमय कोशाच्या ठिकाणीं रहातात. या धर्मांचा तत्त्वतः आत्म्याशीं कांहीं संबंध नाहीं म्हणून मनोमयकोश हा आत्मा नव्हे. पंचज्ञानेंद्रियें आणि बुद्धि यांना विज्ञानमयकोश म्हणतात. विषयग्रहण करून त्यासंबंधीं निश्चय करण्याचें कार्य त्याच्याकडून होत असतें. या विज्ञानमयकोशालाच कित्येक आत्मा मानतात. पण हा आत्मा होऊं शकत नाहीं. इंद्रियें आणि बुद्धि हीं पांचभौतिक आहेत. आत्मा पंचमहाभूतांच्या पलीकडचा आहे. विज्ञानमय-कोश हा ज्ञानाचें व निश्चयाचें साधन आहे, तर आत्मा हा ज्ञाता आहे म्हणून विज्ञानमयकोशाला आत्मा म्हणतां येत नाहीं.

अन्नमय, प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय या चारहि कोशांच्या पलीकडे एक आनंदमय नांवाचा कोश आहे. अज्ञानरूप कारणदेहालाच आनंद-मयकोश असें म्हणतात. स्थूलदेह हा अन्नमयकोशस्वरूप आहे, तर प्राणमय, मनोमय आणि विज्ञानमय हे तीन कोश लिंगदेह अथवा सूक्ष्मदेह या स्वरूपाचे आहेत. राहिलेला कारणदेह अज्ञान. या अज्ञानामुळेंच लिंगदेहाची व स्थूल-देहाची उत्पत्ति होत असते. यामुळेंच या अज्ञानाला कारणदेह असें म्हटलें आहे. हें च अज्ञान स्थूल, सूक्ष्म सर्व विश्वप्रपंचाचें मूळ कारण होय, म्हणूनच या अज्ञानाला मूलाविद्या असेंहि म्हणतात.

या अवस्थेंत आत्मा स्वस्वरूपाशीं संपन्न म्हणजे एकरूप होऊन राहिलेला असतो. स्वस्वरूपाचा आनंद तो अनुभवित असतो. अज्ञानाच्या परम सूक्ष्म वृत्तींतून मोद आणि प्रमोद यांचा आविर्भाव होत असलेला तो अनुभवीत

असतो, म्हणूनच या अवस्थेला आनंदमयकोश असें म्हटलें आहे तोहि खरा आत्मा नव्हे आनंदमयकोश हा अज्ञानमय आहे, तर आत्मा हा ज्ञानमय आहे मग आनंदमयकोश हा आत्मा कसा असू शकेल ?

खरा आत्मा म्हणजे स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिन्ही देहाच्या पलीकडे अथवा जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थांच्या पलीकडे असलेला तुरीय, शुद्ध, निरुपाधिक, सच्चिदानंदघन आणि परिपूर्ण असा परमात्माच होय त्यालाच परब्रह्म असें म्हणतात हेंच आत्म्याचें खरें स्वरूप होय

वरुण ऋषींचा पुत्र जो भृगु त्यानें कृष्णयजुर्वेदातील तैत्तिरीयोपनिषदात वडिलांचा उपदेश श्रवण करून याच आत्मतत्त्वाला जाणलें याच परब्रह्माला—अमृततत्त्वाला जाणलें विवेकानें अन्नमयादि पंचकोशाचें निरसन करून तुरीय आत्मस्वरूपामध्यें 'मी विश्वप्रपंचाचा साक्षी आहें' 'मी परब्रह्मस्वरूप आहें' 'मी आनंदस्वरूप आहें' अशा दृढ निश्चयानें तो यथार्थ आत्मस्वरूपाशी एकरूप झाला सर्व संसारदुःखातून तो मुक्त झाला तो निर्भय झाला त्याच, संसारतिमिराचा नाश करणाऱ्या परब्रह्मस्वरूप श्रीहरीची मी स्तुति करीत आहें

येनाविष्टो यस्य च शक्त्या यदधीनः
क्षेत्रज्ञोऽयं कारयिता जन्तुषु कर्तुः ।
कर्ता भोक्तात्मात्र हि यच्छक्त्यधिरूढ-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २१ ॥

हा क्षेत्रज्ञ म्हणजे जीवात्मा ज्याच्या आवेशानें दुष्कर अशीहि कामें करतो, ज्याच्या शक्तीनें म्हणजे मायेनें पछाडलें असता स्वतःला दीन, दुःखी, अज्ञ आणि मूढ समजतो, ज्याच्या अधीन राहून आपले सर्व व्यवहार करीत रहातो, ज्याच्या चित्शक्तीवर अधिष्ठित होऊनच स्वतःला कर्ता व भोक्ता समजतो, तो सकल संसारतिमिराचा हर्ता भगवान श्रीहरी त्याची मी भक्तिपूर्वक स्तुति करीत आहें

ज्याची भीति मानावी किंवा ज्याच्या जोरावर निर्भय व्हावें असा कोणी जगाचा कर्ता या जीवाहून निराळा नाहींच, असें कांही लोकांचें मत आहे ते म्हणतात, जगाची परंपरा नित्य अव्याहत चालू आहे जन्माला येणारे जीव बरीवाईट कर्में करीत रहातात त्या कर्मांची सुखदुःखात्मक फळेंहि त्यांना

भोगावीं लागतात. त्यासाठींच ते आपल्या अदृष्टानें जग निर्माण करीत असतात. वेदांतामध्यें आत्मा हा अजर, अमर, निराकार, निर्विकार, शुद्ध आणि सच्चिदानंदस्वरूप आहे, असें जें आत्म्याचें वर्णन केलेलें आहे, तें खरें नसून जीवांनीं चांगलीं कर्में करण्याकडे प्रवृत्त व्हावें म्हणून जीवात्म्याची त्या वाक्यांनीं स्तुति केलेली आहे, येवढाच त्याचा अर्थ समजावा. प्रत्यक्ष प्रमाणाशीं विरुद्ध अशी सर्वज्ञ व सर्वशक्तिसंपन्न परमेश्वराची कल्पना करणें चूक आहे, असें या लोकांचें म्हणणें असतें. याला उत्तर या एकविसाव्या श्लोकांत दिलें आहे.

जीवच या सर्व जगाचे कर्ते आहेत हें म्हणणें बरोबर नाहीं, कारण जीवांचें ज्ञान आणि जीवांची शक्ति जगाच्या मानानें फारच लहान आहे. कर्त्याला जें कार्य निर्माण करावयाचें असतें त्या कार्याविषयींचें सर्व ज्ञान आणि तें कार्य करण्याकरितां लागणारी सर्व शक्ति त्याच्या ठिकाणीं असावी लागते. जीवांच्या ठिकाणीं तें ज्ञान आणि ती शक्ति नाहीं म्हणून जगाचें कर्तृत्व जीवाच्या ठिकाणीं मानतां येत नाहीं. अनेक जीवांनीं मिळून जग उत्पन्न केलें म्हणावें तर तेंहि शक्य नाहीं; कारण सर्वज्ञ आणि सर्वशक्तिसंपन्न अशा अनेक जीवांचें ऐकमत्य होणें शक्य नसतें. त्यामुळें जगाच्या नैसर्गिक जीवनांत जी एक सुसंगति आणि व्यवस्था दृष्टीस पडते ती दिसूं शकणार नाहीं. त्यामुळें जगाचें कर्तृत्व जीवांच्या ठिकाणीं मानतां येत नाहीं व तें संभवतहि नाहीं.

जीव जर सर्वज्ञ आणि सर्वशक्तिमान् मानला तर तो दुःखपर्यवसायी असें पापकर्म करावयाला कधींच प्रवृत्त होणार नाहीं. पापकर्म हातून झालेंच तर त्याचें दुःखरूपी फळहि भोगावयास तो कधीं तयार होणार नाहीं. आपण होऊन दुःख भोगावयास कोण प्रवृत्त होणार ? जीवांना सर्वज्ञ आणि सर्वशक्तिसंपन्न मानण्यांत अशा अनेक अडचणी आहेत. प्रत्यक्ष अनुभवानें पहतांहि जीवांच्या ठिकाणीं सर्वज्ञता आणि सर्वशक्तिसंपन्नता कोठेंच दिसून येत नाहीं. याकरितां सर्व जीवांचें नियमन करणारा, त्यांना त्यांच्या बऱ्यावाईट कर्मांचीं फळें देणारा सर्वज्ञ आणि सर्वशक्तिसंपन्न असा ईश्वर मानल्याशिवाय गतीच नाहीं. हा झाला तर्क. याला श्रुतींची, भक्तांच्या व तत्ववेत्त्यांच्या अनुभवांचीहि अनुकूलता आहे.

जीवांचीं कर्मेंच जीवांना सुखदुःखात्मक फळें देतील व तदनुसार जगहि निर्माण करतील असें म्हणावें, तर तेंहि शक्य नाहीं. कारण कर्में हीं स्वभावतः

जिज्ञासू लोक आपल्या अंतःकरणामध्यें ज्याच्या स्वरूपाचा साक्षात्कार करून घेतात आणि शेवटीं सच्चिदानंद परमात्मस्वरूपाशीं एकरूप होतात, त्या संसारतिमिराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करतों

श्रद्धाभक्तिध्यानशमाद्यैर्यतमानै-
र्ज्ञातुं शक्यो देव इहैवाशु य ईशः ।
दुर्विज्ञेयो जन्मशतैश्चाऽपि विना तै-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २४ ॥

ईश्वरसाक्षात्कार कोणाला होऊं शकतो ? या प्रश्नाचें उत्तर देऊन आचार्य चोविसाव्या श्लोकांत श्रीहरीची स्तुति करीत आहेत श्रद्धा म्हणजे वेद, शास्त्रें व गुरु यांच्या शब्दावर विश्वास भक्ति म्हणजे माता पिता गुरुजन, संत, भक्त व ईश्वर यांच्याविषयीं अत्यंत प्रेम ध्यान म्हणजे इष्ट तत्त्वाचें एकाग्र अंतःकरणानें निरंतर चिंतन करणें तसेंच शम-दम इत्यादि साधनसंपत्तीचा अभ्यास

शम म्हणजे मनाचा निग्रह करणें परमात्मतत्त्वाच्या चिंतनाशिवाय इतर विषयाचें चिंतन न करणें दम म्हणजे बहिरिंद्रियांचा निग्रह अर्थात् परमात्मचिंतनाला प्रतिकूल असे विषय न पहाणें, न ऐकणें इत्यादि उपरति म्हणजे वैराग्य आत्मचिंतनाला प्रतिकूल असलेल्या विषयाचें स्मरणहि होऊं न देणें सर्व प्रतिकूल विषयांचा व कर्मांचा त्याग करणें तितिक्षा म्हणजे शीत, उष्ण, लाभ, हानि, मान, अपमान व सुख-दुःख इत्यादि द्वन्द्वें सहन करणें समाधान म्हणजे संतोष अथवा चित्ताची पूर्ण एकाग्रता, ध्यानाच्या पुढची अवस्था समाधि इत्यादि साधनांनीं जे कोणी त्या परमेश्वराला पहाण्याचा प्रयत्न करतात त्यांनाच तो देव म्हणजे स्वयंप्रकाश परिपूर्ण प्रभु परमात्मा याच जन्मांत, याच देहांत सत्वर प्रत्यक्ष पहातां येणें शक्य आहे या साधनांचा उत्तम अभ्यास न करतां जे कोणी त्या परमेश्वराला पाहूं इच्छितात त्यांनीं शेंकडो जन्म जरी घालविले, इतर शेंकडो शास्त्रांचा अभ्यास केला आणि पांडित्य संपादन केलें, तरी त्या परमेश्वराचा साक्षात्कार होणें शक्य नाहीं अशा त्या संसारतिमिराचा नाश करणाऱ्या भगवान् श्रीहरीची मी भक्तिपूर्वक स्तुति करतों

जे दुराचरणापासून परावृत्त होत नाहींत, ज्यांचें मन शांत नाहीं, एकाग्र नाहीं, जे विषयापासून अलिप्त राहूं शकत नाहींत, जे शास्त्रोक्त पद्धतीनें परमात्मा

स्वरूपाचें चिंतन करीत नाहींत, त्यांना ईश्वरसाक्षात्कार होणें शक्य नाहीं आणि ईश्वराचा – आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाल्याशिवाय सर्व दुःखाचा परिहारहि होणें शक्य नाहीं सर्व दुःखातून मुक्त होऊं इच्छिणाऱ्यांनीं या गोष्टीचा अवश्य विचार करावा

यस्यातर्क्यं स्वात्मविभूतेः परमार्थं
सर्वं खल्वित्यत्र निरुक्तं श्रुतिविद्भिः ।
तज्जादित्वादब्धितरङ्गाभमभिन्नं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २५ ॥

परमात्मा हा स्वात्मविभूति आहे म्हणजे इतर कोणत्याहि साधनाची अपेक्षा न करता आत्मस्वरूपातूनच ज्याचें वैभव अभिव्यक्त होत असतें, असा तो आहे 'स्वे महिम्नि प्रतिष्ठित', 'स्वयंसिद्ध' अशा शब्दांनीं उपनिषदें त्याचें वर्णन करतात तो स्वतःसिद्ध व स्वतःच्या माहात्म्यानेंच प्रतिष्ठेला प्राप्त झालेला आहे त्याचें पारमार्थिक म्हणजे वास्तविक स्वरूप अवितर्क्य आहे तर्काला त्याचा थांगपत्ता लागत नाहीं

वेदवेत्ते आचार्य 'सर्वं खल्विदं ब्रह्म तज्जलान्' या श्रुतिवाक्यानें यथा कथंचित् त्याचें निर्वचन करतात हें सर्व जग त्याच्यापासून उत्पन्न होतें शेवटीं त्याच्यामध्येंच लीन होतें आणि स्थितिकालीं त्याच्याच आश्रयानें [illegible]-चाल करीत असतें म्हणून त्याला 'तज्जलान्' असें म्हटलें आहे [illegible], तस्मिन् लीयते, तस्मिन् अनिति च इति तज्जलान् अशी तज्जलान् या शब्दाची व्युत्पत्ति आहे तात्पर्य सर्व विश्वाच्या उत्पत्ति, स्थिति, आणि [illegible] अधिष्ठान आहे

स्वरूपाहून भिन्न म्हणून जें प्रतितीला येतें तें खोटें आहे आणि सकल विश्व प्रपंचाचें अधिष्ठान असलेलें, स्वभावतः निष्प्रपंच व सच्चिदानन्दघन असें जें परब्रह्म तेंच सत्य आहे, तोच आत्मा, तोच विष्णु आणि तोच भगवान् श्रीहरि. सकल संसारतिमिराचा नाश करणाऱ्या भगवान् श्रीहरीची मी भक्तिपूर्ण अंतःकरणानें स्तुति करीत आहें.

दृष्ट्वा गीतास्वक्षरतत्त्वं विधिनाजं
भक्त्या गुर्व्यांऽऽलभ्य हृदिस्थं दृशिमात्रम् ।
ध्यात्वा तस्मिन्नस्म्यहमित्यत्र विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २६ ॥

विधिपूर्वक गुरूंच्या चरणीं शरण जाऊन त्यांनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें श्रीमद्भगवद्गीतादि अध्यात्मग्रंथांत प्रतिपादन केलेलें अनादि अक्षरतत्त्व जाणावें. तें अक्षरतत्त्व म्हणजे परमात्मा. तो शुद्धचैतन्यस्वरूप आहे. तो सर्वांच्या हृदयांत आहे. ही गोष्ट मोठ्या भक्तीनें, अनन्यप्रेमानें त्याचें चिंतन करून लक्षांत घ्यावी. शेवटीं अनन्यचित्तानें 'तोच मी आहें' असें त्याचें ध्यान करून तद्रूप व्हावें. हाच त्याला पहाण्याचा मार्ग आहे. याच मार्गानें तत्त्ववेत्ते व भक्तजन ज्याला जाणतात त्या, संसाररूपी तिमिराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करीत आहें.

कांहीं लोक अशी शंका घेतात कीं, कपिल ऋषि हे प्रत्यक्ष परमेश्वराचे अवतार आहेत. त्यांनीं तर आपल्या सांख्यतत्त्वज्ञानांत प्रधान म्हणजे प्रकृति हीच जगाचें कारण आहे. तीच जग उत्पन्न करते. जीवात्मा आणि परमात्मा हे परस्पर भिन्न आहेत. जीवात्मे देखील परस्परांहून भिन्नच आहेत. जगदि पण सत्यस्वरूपच आहे. इत्यादि सिद्धान्त प्रतिपादलेले आहेत आणि तुम्ही तर ब्रह्मच तेवढें सत्य आणि बाकी सर्व खोटें आहे असें म्हणतां. तुमच्या या म्हणण्यामुळें कपिल ऋषि हे खोटें कांहीं तरी सांगत आहेत असें म्हणण्याची पाळी येते.

यांवर उत्तर असें की, जे सिद्धान्त श्रुतीशीं विरुद्ध आहेत ते सत्य म्हणतां येत नाहींत. सर्व प्रमाणामध्यें श्रुति हेंच प्रबळ प्रमाण आहे. श्रुतीशीं अविरुद्ध असलेले सिद्धान्तच प्रमाण म्हणून मानले जातात. अशा स्थितीत

कपिल ऋषींचें म्हणणें बरोबर नाहीं असें म्हणण्याची पाळी येते ही गोष्ट खरी आहे तथापि कपिल ऋषींचें सांख्यशास्त्र हें सर्वस्वी अप्रमाण आहे असें म्हणण्याचें कारण नाहीं सांख्यशास्त्रांतील जे सिद्धान्त श्रुतीशीं अविरुद्ध आहेत ते प्रमाणभूत आहेत शिवाय आत्मतत्त्वाचें प्रतिपादन करणें हा सांख्यशास्त्राचा मुख्य विषय नव्हे दृश्य विश्वांतील स्थूल, सूक्ष्म पदार्थांचा विचार करून त्यांचा कार्यकारणभाव निश्चित करणें, विश्वांतील मूलभूत तत्त्वांचा विचार करणें, प्रकृति आणि पुरुष यांचें स्वरूप निदर्शनाला आणून देणें, कर्तृत्व भोक्तृत्व हे धर्म प्रकृतीचे असून जीवात्म्याचा त्याच्याशीं कांहीं संबध नाहीं जीवात्मा हा साक्षी, चेता, केवल आणि निर्गुणस्वरूप आहे असें प्रतिपादन करणें हाच सांख्यशास्त्राचा मुख्य विषय आहे ज्याचा जो मुख्य विषय असतो त्या विषयांतच त्याचें प्रामाण्य मानणें हें युक्त आहे जीवात्मे एकरूप आहेत का अनेक आहेत? जीवात्मा आणि परमात्मा यांचा परस्पर संबध कोणता? आत्म्याचें तात्विक स्वरूप काय आहे? हा सर्व विषय प्राधान्यानें उपनिषदांचा, वेदान्तशास्त्राचा आहे म्हणून आत्मविचाराच्या बाबतींत उपनिषदांनाच मुख्य प्रामाण्य आहे ही गोष्ट लक्षांत घ्यावी 'दृढत्वमेत-द्विषयप्रबोध प्रयाति वेदान्तनिषेवणेन' आत्मस्वरूपाचा यथार्थ दृढनिश्चय वेदान्तशास्त्राच्या अभ्यासानेंच होईल असें पूर्वमीमांसाकारहि स्पष्ट सांगत आहेत नैयायिक वगैरे इतर दार्शनिकहि हेंच मानतात अशा रीतीनें विचार केल्यास सर्व शास्त्रांचें प्रामाण्य आपआपल्या विषयाच्या दृष्टीनें अबाधित आहे

उपनिषदांनीं प्रतिपादलेल्या सिद्धान्ताला अनुसरूनच मन्वादि स्मृति आणि प्रत्यक्ष भगवान् श्रीकृष्णप्रभु यांनीं सांगितलेली भगवद्गीता यांच्याहि वचनांचा विचार केला असता शुद्ध ( सच्चिदानदघन, परिपूर्ण, एकमेव अद्वितीय ) परब्रह्म तत्त्वच सत्य असल्याचें प्रतिपादन केलेलें ठिकठिकाणीं आढळून येईल त्याच तत्त्वाला अक्षर म्हणतात तेंच जीवात्म्याचें तात्त्विक स्वरूप आहे हें गुरुकृपेनेंच कळूं शकतें अशा रीतीनें सर्व शंकांचें समाधान करून आचार्यांनीं या श्लोकांत श्रीहरींची स्तुति केली आहे

क्षेत्रज्ञत्वं प्राप्य विभुः पञ्चमुखैर्यो
भुङ्क्तेऽजस्रं भोग्यपदार्थान् प्रकृतिस्थः ।
क्षेत्रे क्षेत्रेऽप्स्विन्दुवदेको बहुधास्ते
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ १७ ॥

तो विभु म्हणजे विश्वव्यापी परमात्मा प्रकृतिरूप म्हणजे अविद्या आणि अविद्येचीं कार्ये स्थूलदेह व सूक्ष्म देह यामध्यें प्रतिबिंबित होऊन राहिलेला व जीवरूपानें प्रतीतीला येणारा क्षेत्रज्ञ बुद्धीमध्यें प्रतिबिंबित झालेल्या परमात्म तत्त्वालाच जीव म्हणतात त्यालाच क्षेत्रज्ञ असेंहि म्हणतात याप्रमाणें परमात्माच जीवभावाला प्राप्त होऊन पाचा मुखानीं म्हणजे पचज्ञानेंद्रियाच्या द्वारा शब्दस्पर्शादि भोग्य विषयाचा निरतर उपभोग घेत असतो तत्त्वत तो एकच आहे, पण असख्य बुद्धीमध्यें प्रतिबिंबित झाल्यामुळें तो असख्य रूपानें प्रतीतीला येतो

बुद्धीमध्यें वासना अकुरित होतात व देहाच्या आश्रयानें कर्मे घडतात त्याच कर्मांपासून सुखदु खात्मक फलाची निष्पत्ति होते म्हणून देह आणि बुद्धि याना क्षेत्र असें म्हणतात या प्रत्येक क्षेत्रात प्रतिबिंबित झाल्यामुळें तत्त्वत एकच असलेलें परमात्मतत्त्व असख्य जीवरूपानें प्रतीतीला येत असलें तरी तें एकच आहे चद्र तत्त्वत एक असूनहि असख्य जलाशयामध्यें प्रतिबिंबित झाल्या मुळें जसा बहुसख्येनें प्रतीतीला येतो त्याचप्रमाणें आत्मा देखील प्रत्येक देहात प्रविष्ट झाल्यामुळें व प्रत्येक बुद्धींत प्रतिबिंबित झाल्यामुळें बहुसख्येनें प्रती तीला येतो तत्त्वत तो एकच आहे अशा त्या ससारतिमिराचा नाश करणाऱ्या श्रीहरीची मी स्तुति करतों

युक्त्यालोढ्य व्यासवचांस्यत्र हि लभ्यः
क्षेत्रक्षेत्रज्ञान्तरविद्भिः पुरुषाख्यः ।
योऽहं सोऽसौ सोऽस्म्यहमेवेति विद्वयं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २८ ॥

काहीं लोक असें म्हणतात कीं, सर्व शास्त्रकार द्वैतच सत्य आहे असें प्रतिपादन करतात अनेक युक्तींनीं आपलें म्हणणें सत्य असल्याचें सिद्ध करतात श्रुतिवचनाचाहि द्वैतपर अर्थ लावतात द्वैत हें सर्वांच्या प्रतीतीलाहि पण येतें सर्वांना द्वैतच आहे असें वाटतें तुम्हींच तेवढे अद्वैताचें प्रतिपादन करता! ते हा बहुमतानें मान्य होणारें द्वैतच सत्य नसेल कशावरून?

यावर उत्तर असें कीं, केवळ बहुमतावरून वास्तुतत्त्वाचा निर्णय होऊ शकत नाहीं युक्तींचें व प्रमाणाचें पाठबळ ज्या पक्षाला असेल तोच पक्ष खरा ठरेल आमच्या अद्वैत पक्षाला जितकें युक्तींचें व प्रमाणांचें पाठबळ आहे

तितकें इतर कोणत्याहि पक्षाला नाहीं ही गोष्ट भगवान् बादरायणमहर्षि अर्थात् व्यासमहर्षि यांनीं आपल्या ब्रह्मसूत्रामध्यें अत्यंत उत्तम रीतीनें स्पष्ट केली आहे भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्य या अठ्ठाविसाव्या श्लोकानें श्रीहरीची स्तुति करताना म्हणत आहेत कीं व्यासाच्या वचनाचें म्हणजेच ब्रह्मसूत्राचें युक्तिप्रयुक्तीनें आलोडन करून — अभ्यास करून — क्षेत्र म्हणजे काय ? क्षेत्रज्ञ म्हणजे काय ? याचा सूक्ष्म विचार करून क्षेत्र आणि क्षेत्रज्ञ याचा विवेक संपादन केलेले तत्त्ववेत्ते या आत्मस्वरूपाला पुरुष या नावानें ओळखतात पुरुष म्हणजे सदा सर्वकाळ सर्वत्र पूर्णपणें भरलेला अशा परमात्म्याला तत्त्ववेत्ते लोक, याच देहात याच अंतःकरणात त्याचा साक्षी म्हणून जाणू शकतात

देह, इंद्रियें, मन आणि बुद्धि यांचा जो साक्षी तोच हा परमेश्वर होय आणि जो परमेश्वर आहे तोच मी आहें तो मी आहेंच त्याच्याहून मी कोणी दुसरा निराळा नाहीं असें ज्याचें स्वरूप तत्त्ववेत्ते जाणतात तो भगवान् विष्णु, सर्व संसारतिमिराचा नाश करणारा भगवान् श्रीहरि, त्याची मी पूर्ण प्रेमानें स्तुति करीत आहें

एकीकृत्यानेकशरीरस्थमिमं ज्ञं
यं विज्ञायेहैव स एवाशु भवन्ति ।
यस्मिँल्लीना नेह पुनर्जन्म लभन्ते
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ २९ ॥

अधिकारी तत्त्ववेत्ते हे आपल्या देहातील साक्षिचैतन्याचें परब्रह्माशीं एकत्व जाणतात का सर्वांच्याच देहातील साक्षिचैतन्याचें परब्रह्माशीं एकत्व जाणतात ? आपल्याच देहातील साक्षिचैतन्याचें परब्रह्माशीं एकत्व जाणत असतील, तर मग इतरांच्या देहातील साक्षिचैतन्याला तत्त्वतः सत्य मानतात का कल्पित मानतात ? सत्य मानीत असतील, तर अनेक देहांचीं अनेक साक्षिचैतन्यें हीं सत्यस्वरूप असल्यामुळें द्वैतच सत्य आहे असें म्हणावें लागेल बरें, इतरांच्या देहातील साक्षिचैतन्य कल्पित आहे असें म्हटलें, तर त्याचप्रमाणें आपल्याहि देहातील साक्षिचैतन्य कल्पित नाहीं कशावरून, ही शंका राहणारच बरें, सर्व देहातील साक्षिचैतन्याचें परब्रह्माशीं एकत्व मानलें, तर द्वैतापत्ति टळेल आणि आपल्या देहातील साक्षिचैतन्य कल्पित असण्याचीहि शंका राहणार

नाही पण त्या अधिकारी तत्त्ववेत्याला देहादि साक्षिचैतन्याचें परब्रह्माशी ऐक्य असल्याचा साक्षात्कार ज्या वेळीं होईल त्या वेळीं त्याच्या सांसारिक दु:ख निवृत्तिबरोबर सर्वांचींच दु:खें निवृत्त व्हावयास पाहिजेत

यावर उत्तर असें कीं, ही शंका इतरांच्या दृष्टीनें आहे का अधिकारी तत्त्ववेत्याच्या दृष्टीनें आहे? इतरांच्या दृष्टीनें ही शंका असेल, तर इतरांना आपल्या साक्षिचैतन्याचा परब्रह्मस्वरूपाशीं पूर्णपणें अभेद असल्याचा साक्षात्कार झाल्याशिवाय त्यांच्या सांसारिक दु:खाची निवृत्ति होणार नाही अधिकारी तत्त्ववेत्याच्या दृष्टीनें म्हणाल, तर सर्वच आत्मे परब्रह्मस्वरूपाशीं तत्त्वत एकरूप असल्याचा त्याला दृढनिश्चय असल्यामुळें त्याच्या दृष्टीनें सर्वच आत्मे संसार-दु:खातून मुक्त आहेत असें म्हणणें इष्टापत्तिच आहे

यावर कोणी विचारील कीं, तो इतरांना तत्त्वज्ञानाचा उपदेश करायला प्रवृत्त का होतो? यावर उत्तर असें कीं, माझ्याप्रमाणें इतरांनाहि साक्षिचैतन्याचा परमात्मचैतन्याशीं असलेला अभेद कळावा व त्यांचीहि या काल्पनिक असलेल्या दु:खातून सुटका व्हावी असें त्याला वाटत असतें, म्हणून तो दुसऱ्याला तत्त्वज्ञानाचा उपदेश करण्यास प्रवृत्त होत असतो असा अभिप्राय लक्षात घेऊन या एकोणतिसाव्या श्लोकानें आचार्य परमेश्वराची स्तुति करीत आहेत

तत्त्ववेत्ते लोक देव, दानव, मानव, पशु, पक्षी इत्यादि अनेक देहांमध्यें साक्षीरूपानें रहाणाऱ्या जीवांना ब्रह्मस्वरूपाशीं एकरूप करून अर्थात् अभेद रूपानें जाणून सच्चिदानन्दघन परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतात आणि त्याच क्षणीं परमात्मस्वरूपाशीं एकरूप होतात परब्रह्मस्वरूपाशीं एकरूपता प्राप्त झाल्यानंतर त्यांना पुन्हा कर्मांच्या आधीन होऊन जन्म घ्यावा लागत नाही संसारामध्यें गुरफटून पुन्हां सांसारिक दु:खें भोगण्याची त्यांच्यावर पाळी येत नाही अशा रीतीनें जीवाच्या संसारदु:खाला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी तिमिराचा नाश करणारा जो भगवान् श्रीहरि त्याची मी भक्तियुक्त अंत:करणानें स्तुति करतों

द्वन्द्वैकत्वं यच्च मधुब्राह्मणवाक्यैः
कृत्वा शक्रोपासनमासाद्य विभूत्या ।

**योऽसौ सोऽहं सोऽस्म्यहमेवेति विदुर्यं**
**तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३० ॥**

बृहदारण्यकोपनिषदामध्यें चौथ्या अध्यायात मधुब्राह्मण नावाचें एक प्रकरण आहे. या प्रकरणात असें म्हटलें आहे कीं, ही पृथ्वी सर्व प्राणिमात्राची उपभोग्य आहे व सर्व प्राणी तिचे भोक्ते आहेत. त्याचप्रमाणें सर्व प्राणी पृथ्वीचे उपभोग्य असून पृथ्वी ही त्याचा उपभोग घेणारी आहे. याप्रमाणें पृथ्वी आणि प्राणी याच्यामध्यें एकमेकाचें भोग्यत्व असल्यामुळें त्याच्यात कार्यत्व व कारणत्वहि आहे. ते दोघेहि एकमेकाचें कार्य आणि कारण असल्यामुळें मिथ्या आहेत, पण त्याच्यात अनुगत म्हणजे व्याप्त असलेलें, तेजोमयचैतन्य, प्रकाशरूप अमृतमय म्हणजे अविनाशी, आनंदरूप असें जें चित्तत्व तें एकच आहे.

पृथ्वीचा अंतर्यामी व अभिमानी जो आत्मा त्याला अधिदैव म्हणतात. त्याचप्रमाणें शरीराचा अंतर्यामी व अभिमानी जो आत्मा त्याला अध्यात्म म्हणतात. अधिदैव आणि अध्यात्म अशीं दोन नावें एकाच चित्तत्त्वाला पृथ्वी आणि पार्थिव शरीर या उपाधिभेदामुळें मिळालीं. विवेकानें उपाधींचा भेद बाजूला केला कीं दोहोंमध्यें असलेल्या चित्तत्त्वाची एकरूपता ही सहजच सिद्ध होते. त्यालाच आत्मा म्हणतात, अमृत म्हणतात, ब्रह्म म्हणतात. याच न्यायानें जल-अग्नि वायु आणि आदित्य इत्यादि सर्व वस्तूंचा बोध घ्यावा.

कार्यरूप उपाधि आणि कारणरूप उपाधि हे अविद्याकल्पित असल्यामुळें जरी भिन्नरूपानें प्रतीतीला आले, तरी कार्योपहित चैतन्य आणि कारणोपहित चैतन्य याच्यामध्यें कधींहि भेद असू शकत नाहीं. याप्रमाणें सर्वत्र अभिन्न एकरूप असलेलें चित्तत्त्व हें परमात्माच होय.

बृहदारण्यकातील मधुब्राह्मण प्रकरणात पृथ्वी आणि शरीर, अग्नि आणि वाचा, आदित्य आणि चक्षु इत्यादि द्वंद्वांचा उल्लेख करून त्याच्यात अनुस्यूत असलेला पुरुष म्हणजे परमात्मा हा एकच असल्याचें सांगितलेलें आहे. तें लक्षात घेऊन जे कोणी ब्रह्मैक्याची उपासना करतात, ते वैभवसंपन्न होतात. त्याना ईश्वरस्वरूपता प्राप्त होते. इंद्रादि देवहि त्या तत्त्ववेत्याच्या आधीन होऊन रहातात. शेवटीं ते तत्त्ववेत्ते लोक "हा जो सर्वात्मा परमेश्वर तोच मी आहें, आणि जो मी या देहेंद्रियादिकाचा साक्षी, मनाचा व बुद्धीचा साक्षी तोच हा

परमेश्वर आहे." याप्रमाणें विचार करून अध्यात्म आणि अधिदैव यांची सांगड घालतात. त्यांची एकरूपता जाणतात.

जो परमात्मा पृथ्वींत देवतेच्या रूपानें आहे तोच शरीरांत जीवाच्या रूपानें आहे. जो आदित्यमंडलांत तेजाच्या रूपानें आहे तोच डोळ्यामध्येंहि तेजोरूपानें रहातो. जो अग्नीमध्यें आहे तोच वाणीमध्येंहि आहे. जो शरीरांत, डोळ्यांत आणि वाणींत आहे तोच पृथ्वींत, सूर्यांत आणि अग्नींत आहे. याप्रमाणें अध्यात्म आणि अधिदैव या दोन्ही उपाधीनें उपहित असलेल्या चैतन्याची एकरूपता जाणून शेवटीं परमात्मतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतात. तोच परमात्मा भगवान् श्रीहरि विष्णु होय. त्याची कृपा संसाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानाचा निरास करते आणि सर्व संसारदुःखांचा नाश करते त्याच श्रीहरींची मी अनन्यभावानें स्तुति करीत आहें.

योऽयं देहे चेष्टयिताऽन्तःकरणस्थः
सूर्ये चासौ तापयिता सोऽस्म्यहमेव ।
इत्यात्मैक्योपासनया यं विदुरीशं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ११ ॥

देहामध्यें राहून देहाला जो चालवितो तोच हा परमात्मा होय. देहाची सर्व हालचाल त्याच्यामुळेंच होत असते. यावर कोणी असें म्हणेल कीं, अहो, प्राणवायूमुळें देहाची हालचाल होत असते, त्याला परमेश्वराची काय आवश्यकता आहे ! पण हें म्हणणें बरोबर नाहीं. कारण प्राणवायु हा स्वभावतः जड असल्यामुळें त्यालाहि कोणी तरी निराळा प्रेरक पाहिजेच. त्याशिवाय तो देहाची हालचाल करूं शकणार नाहीं. तात्पर्य, तो परमात्माच प्राणांचा, देहाचा, इंद्रियांचा, मनाचा, बुद्धीचा व सर्वांचा प्रेरक होय. 'चेष्टयिता' म्हणजे देह, इंद्रियें इत्यादिकांकडून हालचाल करविणारा. 'अंतःकरणस्थ' म्हणजे सर्वांच्या हृदयांत रहाणारा सर्वांच्या अंतःकरणांत जीवरूपानें प्रतिबिंबित झालेला अंतःकरणाचा साक्षी

सूर्यामध्यें राहून सूर्याच्या द्वारा सर्वांना उष्णता व प्रकाश देणारा जो तो मीच आहें याप्रमाणें आत्म्याच्या ऐक्याची उपासना करून आत्म्याच्या एकत्वाचें जे सतत चिंतन करतात त्यानाच आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो.

तोच आत्मा सर्वसत्ताधीश आहे असें ते जाणतात. तोच परमात्मा भगवान् श्रीहरि, संसारतिमिराचा नाशकर्ता, त्याची मी भक्तिपूर्वक स्तुति करतों

विज्ञानांशो यस्य सतः शक्त्यधिरूढो
बुद्धिर्बुध्यत्यत्र बहिर्बोध्यपदार्थान् ।
नैवान्तःस्थं बुध्यति यं बोधयितारं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३२ ॥

सत्वस्वरूप असलेला आत्मा हा ज्ञानघन आहे, विज्ञानस्वरूप आहे. त्या विज्ञानाचाच जणु काय एक अंश असलेला हा जीव 'शक्त्यधिरूढ' म्हणजे अविद्या शक्तिरूप अंतःकरणामध्यें अथवा बुद्धिरूपी उपाधीमध्यें प्रतिबिंबित होऊन 'अत्र' म्हणजे या जगामध्यें अतर्बाह्य सर्व पदार्थांना जाणत असतो. बुद्धीमध्यें असलेल्या सुखदु खादि धर्मांना व बाह्य जगात असलेल्या घटपटादि पदार्थांनाहि तो जाणत असतो

बुद्धीच्या आत तो रहात असल्यामुळें त्याच्या जिवावर बुद्धि सर्व पदार्थांना जाणू शकते पण ती त्याला, त्या विज्ञानस्वरूप असलेल्या आत्म्याला मात्र जाणू शकत नाहीं. विज्ञानस्वरूप असलेला आत्मा हा सर्वांनाच जाणतो, पण त्याला त्याच्याशिवाय दुसरा कोण जाणणार ? सूर्य सर्वांनाच प्रकाशित करतो, त्याला दुसरा कोण प्रकाशित करणार ? तात्पर्य, बुद्धीचा बोधयिता, बुद्धीला विषय ग्रहण करण्याची शक्ति देणारा व विषय ग्रहण करण्याकडे प्रवृत्त करणारा असा जो परमात्मा भगवान श्रीहरि त्याची मी स्तुति करतों.

कोऽयं देहे देव इतीत्थं सुविचार्य
ज्ञाता श्रोताऽऽनन्दयिता चैष हि देवः ।
इत्यालोच्य ज्ञांश इहास्मीति विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं हरि .डे ॥ ३३ ॥

देह, प्राण, ज्ञानेंद्रियें, कर्मेंद्रियें, मन आणि बुद्धि हे सर्व दृश्य म्हणजे ज्ञेय आहेत ज्ञानाची व क्रियेची ही साधनें आहेत. ती ज्ञाता होऊ शकत नाहींत. मग या देहेंद्रियादि समुदायामध्यें ज्ञाता कोण आहे ? देव म्हणजे सर्व प्रकाशक, तो कोण आहे ? असा प्रश्न पुढें येतो याचा सूक्ष्म विचार करून असें ठरविलें आहे

कीं, या देहांत ज्ञाता म्हणून जो कोणी आहे तो आत्माच होय. कारण देह, प्राण, इंद्रियें आणि बुद्धि हे सर्वच पांचभौतिक – अर्थात् जड असल्यामुळें ते ज्ञाता होऊं शकत नाहींत. घट-पटादि जड पदार्थांना असें ज्ञातृत्व नाहीं तसेंच देहेंद्रियादि समुदायालाहि ज्ञातृत्व नाहीं. कारण देहेंद्रियादि समुदायहि घट-पटादि पदार्थांप्रमाणें ज्ञेय व पांचभौतिक आहे. आपल्याला ज्ञान तर होत असतें. मीं पाहिलें, मीं ऐकलें, मला समजलें, मला आनंद झाला, असें आपण म्हणत असतो, यावरून द्रष्टा, श्रोता, ज्ञाता व आनंदयिता म्हणजे आनंद घेणारा हा कोणी तरी देहेंद्रियादि समुदायाहून भिन्न आहे ही गोष्ट अर्थात् सिद्ध झाली. तेव्हा हा जो देहांत राहून पहाणारा, ऐकणारा, जाणणारा व आनंद घेणारा तोच आत्मा.

तो आत्मा अपरोक्षरूपानें म्हणजे प्रत्यक्ष स्वरूपानें या देहांत नित्यच प्रतीतीला येत असतो. त्यालाच देव म्हटलेलें आहे. 'कोऽयं देवः!' या शरीरांत राहणारा देव कोणता ? असा प्रश्न करून वर सांगितल्याप्रमाणें बृहदारण्यकोपनिषदांत आत्मस्वरूपाचा उत्तम विचार केला आहे. शेवटीं या देहांत राहून सर्व कार्यें करणारा म्हणून जो प्रतीतीला येतो तोच आत्मा देव होय असें उत्तर दिलें आहे. त्या आत्म्याला देव का म्हटलें, तर तो स्वप्रकाश चिद्घन असल्यामुळें आपल्या प्रकाशानें नित्य तळपत असतो म्हणून त्याला देव म्हटलें आहे.

कोणी म्हणेल कीं, अहो ! त्याच्या ठिकाणीं तर कर्तृत्व भोक्तृत्व इत्यादि धर्म नाहींत मग त्याला द्रष्टा, श्रोता, कर्ता असें कसें म्हणतां ? याला उत्तर हें कीं, तुमची शंका बरोबर आहे. आत्म्याच्या ठिकाणीं तत्त्वतः द्रष्टृत्व, श्रोतृत्व, कर्तृत्व वगैरे कांहीं नाहीं. पण तो देहेंद्रियादि संघाताशीं संलग्न झाल्यामुळें द्रष्टा, श्रोता, कर्ता इत्यादि रूपानें प्रतीतीला येतो. त्याचे द्रष्टृत्वादि धर्म हे औपाधिक असल्यामुळें ते पारमार्थिक नाहींत. परमार्थतः आत्मा अकर्ता, अभोक्ता, शुद्ध, सच्चिद्घन, आनंदरूप असाच आहे. त्याचाच अंश या देहांत 'अस्मि' म्हणजे मी आहें अशा शब्दानें प्रतीतीला येतो. वस्तुतः तो आत्मा निरवयव असल्यामुळें त्याला अंश नाहींत, पण केवळ त्याची कल्पना सुगम होण्याकरितां 'अंश' हा शब्द उपयोगांत आणला जातो. अग्नीपासून ज्याप्रमाणें स्फुलिंग निर्माण होतात त्याचप्रमाणें सर्व जीवांचा ज्याच्यापासून आविर्भाव झाला तोच आत्मा भगवान् श्रीहरि सर्व संसारदुःखांचा निवारणकर्ता आहे, त्याची मी स्तुति करतों.

को ह्येवान्यादात्मनि न स्यादयमेष
ह्येवानन्दः प्राणिति चापानिति चेति ।
इत्यस्तित्वं वक्त्युपपत्त्या श्रुतिरेषा
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३४ ॥

आकाशासारखा विश्वव्यापी आनंद जर या जगांत नसता तर या जगांत कोणालाच जगावेंसें वाटलें नसतें किंवाहि दुःखें प्राप्त झाली तरी मनुष्य किंवा इतर प्राणी जगण्याचीच इच्छा करीत असतो व प्रयत्नहि करीत असतो हें सर्व या आत्मस्वरूप असलेल्या आनंदाच्या आशेनेंच करीत असतो म्हणून आत्मा केवळ चिद्रूप नसून तो आनंदरूपहि आहे हें निर्विवाद होय हा आनंदरूप आत्माच श्रीहरि आहे अशा अभिप्रायानें या श्लोकांत त्याची स्तुति करीत आहेत

अज्ञ जनांच्या दृष्टीनें आत्मा म्हणजे कार्यकारणसंघात – देहेंद्रियादि कांचा समुदाय पण या देहामध्यें जर हा चिदानंदरूप आत्मा नसता, तर कोणींहि कसलीहि हालचाल करायला प्रवृत्त झाला नसता. जडाची हालचाल ही चेतनमूलक असते व जीवन हें आनंदमूलक असतें म्हणून देहेंद्रियादि समुदायाचा प्रवर्तक आणि जीवनाच्या आशेचें मूळ असा हा आत्मा, हा देहाहून निराळा आणि चित्स्वरूप व आनंदस्वरूप आहे हें सिद्ध होतें

हा आनंद परमात्मस्वरूप आहे तोच या देहामध्यें जीवस्वरूपाला प्राप्त होऊन सर्व हालचाल करीत असतो तोच उपाधींतून मुक्त झाला म्हणजे आनंदरूप होऊन रहातो आहेच तो आनंदरूप अशा रीतीनें ज्याचें अस्तित्व चैतन्यरूपत्व व आनंदरूपत्व मोठ्या युक्तीनें तैत्तिरीय श्रुतीनें प्रतिपादन केलेलें आहे तो सर्व सांसारिक दुःखांचा निरास करणारा भगवान् श्रीहरि त्याची मी स्तुति करीत आहें

प्राणो वाऽहं वाक्श्रवणादीनि मनो वा
बुद्धिर्वाहं व्यस्त उताहोऽपि समस्तः ।
इत्यालोच्य ज्ञप्तिरिहास्मीति विदुर्यं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३५ ॥

मला भूक लागली, मला तहान लागली, मी बोलतों, मी ऐकतों, मी विचार करतों, मी जाणतों, असें आपण नेहमीं म्हणत असतों, तहान व भूक हीं प्राणाचीं कार्यें आहेत. बोलणें हें वाणीचें कार्य आहे. ऐकणें हें श्रवणेंद्रियाचें कार्य आहे. विचार करणें हें मनाचें कार्य आहे. जाणणें निश्चय करणें हें बुद्धीचें कार्य आहे. त्याचप्रमाणें मी गोरा आहें, मी काळा आहें, मी कृश आहें, मी स्थूल आहें, असेंहि आपण म्हणत असतों. यामुळें संशय येतो कीं, मी म्हणजे कोण? मी म्हणजे देह का मी म्हणजे प्राण? मी म्हणजे इंद्रियें का मी म्हणजे मन बुद्धि? का या सर्वांचा समुदाय म्हणजे मी? मी आहें तरी कोण? या सर्व प्रश्नांचा विचार करून शेवटीं मी यांतील कोणीहि नाहीं हे सर्व बाधित होणारे आहेत. म्हणजे नाशवंत आहेत. मी अविनाशी आहें, मी केवळ ज्ञानस्वरूप आहें. मी देह, प्राण, मन, बुद्धि, ज्ञानेंद्रियें व कर्मेंद्रियें या सर्वांहून निराळा आहें. मी या सर्वांचा साक्षी केवळ चित्स्वरूप आहें. आनंदस्वरूप आहें. असें ज्याचें स्वरूप तत्त्ववेत्ते जाणतात त्या सच्चिदानंद श्रीहरीची मी स्तुति करतों.

नाहं प्राणो नैव शरीरं न मनोऽहं
नाहं बुद्धिर्नाहमहंकारधियौ च ।
योऽत्र ज्ञांशः सोऽस्म्यहमेवेति विद्वयं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३६ ॥

मी प्राण नव्हे, मी देह नव्हे, मी मन नव्हे व मी बुद्धीहि नव्हे, मी अहंकार नव्हे व मी चित्तहि नव्हे, हे सर्व दृश्य आहेत, जड आहेत, भौतिक आहेत, सावयव आहेत, अनित्य आहेत. मी मात्र तसा नाहीं मी द्रष्टा आहें, चेतन आहें, पंचमहाभूतांच्या पलीकडचा आहें, मी निरवयव आहें, मी नित्य आहें.

माझें शरीर, माझे प्राण, माझें मन, माझी बुद्धि असें आपण म्हणत असतों, यावरून या सर्वांना माझे माझे म्हणणारा या सर्वांच्यापेक्षां मी कोणी तरी निराळा आहें. हात गेला तरी चालेल, पाय गेला तरी चालेल, डोळा गेला तरी चालेल, कान गेला तरी चालेल, पण 'मी' मात्र जातां कामा नये. अशी आपली प्रवृत्ति असते, यावरून मी कोणी तरी यांच्यापेक्षां निराळा आहें. या देहेंद्रियादि समुदायामध्यें जो चिदंश प्रतीतीला येतो तोच मी आहें, असें

ज्याचें स्वरूप तत्त्ववेत्ते जाणतात तोच परमात्मा सकल संसारतिमिराचा नाश करणारा भगवान् श्रीहरि त्याची मी स्तुति करतों.

सत्तामात्रं केवलविज्ञानमजं सत्
सूक्ष्मं नित्यं तत्त्वमसीत्यात्मसुताय ।
साम्नामन्ते प्राह पिता यं विभुमाद्यं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥२७॥

छांदोग्य उपनिषदामध्यें उद्दालक महर्षि आणि श्वेतकेतु यांचा शुद्ध तार्किक पद्धतीनें आत्मस्वरूपाचा निर्णय करणारा मोठा सुंदर संवाद वर्णिलेला आहे. तो संवाद लक्षांत घेऊनच आचार्य या श्लोकानें आत्मस्वरूप श्रीहरीची स्तुति करीत आहेत.

बारा वर्षे गुरूंच्या घरी राहून, कृतविद्य होऊन घरीं परत आलेला श्वेतकेतु आपण फारच मोठे विद्वान् आहोंत अशा भावनेनें वागूं लागला. तेव्हां त्याचे वडील उद्दालक ऋषि त्याला म्हणाले बाळ ! असा एक विषय आहे कीं, जो ऐकला असतां सर्व कांहीं ऐकल्यासारखें होतें. ज्याचा विचार केला असतां सर्वांचा विचार केल्यासारखा होतो. जें जाणलें असतां अथवा निश्चित केलें असतां सर्व कांहीं जाणल्यासारखें अथवा निश्चित केल्यासारखें होतें.

हें वडिलांचें म्हणणें ऐकून श्वेतकेतु म्हणाला, बाबा असें कसें असूं शकेल ! जर एक पदार्थ सर्व पदार्थस्वरूप असेल तर तो ऐकला असतां, जाणला असतां अथवा निश्चित केला असतां सर्व ऐकल्यासारखें, जाणल्यासारखें अथवा निश्चित केल्यासारखें होईल. पण, असा एक पदार्थ सर्व पदार्थस्वरूप असेल असें मला वाटत नाहीं. सर्व पदार्थ एकमेकांहून भिन्न भिन्न स्वरूप असलेलेच प्रतीतीला येतात.

उद्दालक म्हणाले, अरे ! जा. गुरुजींना विचारून ये. श्वेतकेतु म्हणाला, बाबा गुरुजींना जर तें माहित असतें तर त्यांनीं मला सांगितलें असतें. ज्या अर्थी त्यांनी तें मला सांगितलें नाहीं त्या अर्थी त्यांना तें माहीत नसावें. त्यांना माहीत असलेले सर्व विषय त्यांनीं मला सांगितलेले आहेत. तेव्हां तुम्हीच मला ' असा विषय कोणता आहे ! ' हें कृपा करून सांगा. श्वेतकेतूचीं ही विनंती ऐकून उद्दालक म्हणाले, अरे बाळ ! 'आत्मा' हाच तो विषय आहे.

त्याचें श्रवण केलें असता सर्व ऐकल्यासारखें होतें अथवा त्याचें ज्ञान झालें असता मनुष्याला सर्व ज्ञान झाल्यासारखें होतें कारण तो आत्मा सर्वस्वरूप आहे

श्वेतकेतु म्हणाला, बाबा ! हें माझ्या लक्षात येत नाहीं हें मला युक्तीनें पटवून द्या तेव्हा उद्दालक म्हणाले, बाळ ! कुमाराचा किंवा मातीच्या चित्र काराचा कारखाना लक्षात घे गाडगीं, मडकीं, रांजण, परळ, पणत्या, वेळण्या, इत्यादि अनेक पदार्थ बनण्याच्या पूर्वी तेथें काय असतें ? किंवा राजा, शिपाई, घोडा, बैल, मोर, कोंबडा इत्यादि मातीचीं चित्रें बनण्यापूर्वी तेथें काय असतें ? फक्त एक मातीचा राधा तयार केलेला असतो या राध्यालाच मृत्पिंड म्हणतात या मृत्पिंडातूनच चित्रकार अनेक चित्रें तयार करतो त्या चित्रातील आकार आणि नावें बाजूला केल्यावर मातीशिवाय दुसरें काय शिल्लक रहातें ! आकार आणि नावें हीं कल्पित असल्यामुळें सत्य मानता येत नाहींत चित्रें फुटलीं म्हणजे आकार आणि नावें हीं नाहींशीं होतात व मातीच शेवटीं शिल्लक उरते म्हणून मातीच सत्य आहे आकार आणि नावें हीं सत्य नाहींत ही गोष्ट सिद्ध झाली

मातीचें एक चित्र तत्त्वतः माती आहे हें जाणल्यानंतर इतर चित्रेंहि तत्त्वतः मृत्तिकाच आहेत हेंहि जाणल्यासारखेंच होतें हाच न्याय सोनें आणि अलंकार इत्यादि दृष्टान्तात लागू पडतो अलंकार आणि त्याचीं नावें हीं कल्पित असतात म्हणून तीं सत्य मानता येत नाहींत अलंकार मोडले गाळले तरी सोनेंच शिल्लक रहातें म्हणून सोनेंच तत्त्वतः सत्य आहे असें म्हणावें लागतें याच दृष्टीनें पाहिलें असता हें जग उत्पन्न होण्यापूर्वी एकच सत्तत्त्व विराजमान असतें त्यालाच 'आत्मा' असें म्हणतात त्याच सत्तत्त्वातून विविध नामरूपांनीं नटलेलें हें जग उत्पन्न होतें आणि शेवटीं प्रलयकाळीं विविध नामरूपात्मक विश्वातील पदार्थांचा नाश झाल्यानंतर सत् तत्त्वच शिल्लक रहातें तेंच सत्य आहे त्यालाच आत्मा म्हणतात तोच सर्व रूपानें नटलेला असतो म्हणून एक आत्मा तत्त्वतः जाणला असतां सर्व जाणल्यासारखें होतें हें म्हणणें योग्यच आहे

श्वेतकेतूनें विचारलें, बाबा ! जग उत्पन्न होण्याच्या आगोदर सत्तत्त्वच होतें व त्यातूनच हें जग उत्पन्न झालें हें कशावरून ? उद्दालक म्हणाले, बाळ ! जर जगाच्या आगोदर सत्तत्त्व नव्हतें असें म्हटलें तर त्याच्या विपरीत 'असत्'

होतें असें म्हणावें लागेल आणि तसें म्हटलें तर मग असतातून 'सत्' म्हणून प्रतीतीला येणारें हें जग कसें बरें उत्पन्न होऊं शकेल ? कार्यामध्यें कारणाची प्रतीती येत असते अलंकार हे कार्य आहेत तर सोनें हें त्याचें कारण आहे सोनें हें अलंकारामध्यें अनुस्यूत असतें सोनेंच अलंकाराच्या रूपानें नटलेलें असतें गाडग्यामडक्यामध्येंहि त्यांचें कारण असलेली मृत्तिका ही प्रतीतीला येत असतेच ती गाडग्यामडक्यामध्यें अनुस्यूत असते तीच गाडग्या-मडक्याच्या रूपानें नटलेली असते त्याचप्रमाणें सत्तत्त्वातून उत्पन्न झालेल्या या जगात 'नद्या आहेत', 'पर्वत आहेत', 'पशु आहेत', 'पक्षी आहेत', 'वृक्ष आहेत', 'लता आहेत' अशा रीतीनें आहेत आहेत या क्रियापदावरून जी सत्ता म्हणजे अस्तित्व प्रतीतीला येतें ती सत्ता म्हणजे अस्तित्व म्हणजेच सत्तत्त्व हें या जगाच्या आरंभीं असलेंच पाहिजे आणि तेंच या जगाचें कारण असलें पाहिजे, ही गोष्ट सिद्ध होते असत् जर जगाचें मूळ कारण असतें, तर 'आहेत आहेत' च्या ऐवजीं 'नाहींत नाहींत' हीच प्रतीती आली असती शिवाय नाहींत या क्रियापदामध्येंहि जी अभावाची सत्ता प्रतीतीला येते तिचेंहि मूळ अधिष्ठान सत्ता म्हणजे सत्तत्त्व हेंच आहे त्याच्या-शिवाय अभावाचेंहि अस्तित्व प्रतीतीला येणार नाहीं म्हणून जगाच्या मुळाशीं सत्तत्त्वच आहे व तेंच या जगाचें मूळ कारण आहे, असेंच मानावें लागतें तेंच सत्य आहे त्यालाच आत्मा म्हणतात हे श्वेतकेतो ! तेंच तू आहेस तू कोणी त्याच्याहून निराळा नाहींस

तेंच सत्तत्त्व या जगात चैतन्यरूपानें व आनंदरूपानें ओतप्रोत भरलेलें आहे म्हणूनच सत्ता, चैतन्य आणि आनंद हे एकरूपच आहेत त्या सत्तत्त्वाच्या ठिकाणीं स्वगत, सजातीय व विजातीय यापैकीं कोणत्याहि प्रकारचा भेद पहाव यास सापडत नाहीं तें सत्तत्त्व निरवयव आहे एकमेव अद्वितीय आहे तें अखंड आहे अनंत आहे विश्वव्यापि आहे आणि विश्वरूपानें नटलेलें आहे त्यालाच ब्रह्म अथवा परब्रह्म म्हणतात

श्वेतकेतूनें विचारलें, बाबा ! या परब्रह्मापासून हें जग कसें उत्पन्न झालें ? उद्दालक म्हणाले, बाळा ! सृष्टीच्या आरंभीं त्या ब्रह्मानें मी बहुरूपानें नटावें असा विचार केला त्यानें आकाशादि पंचमहाभूतें निर्माण केलीं तेंच आकाश, वायु तेज, जल आणि पृथ्वी या पंचमहाभूतांच्या रूपानें नटलें त्यानें पांचभौतिक सृष्टि

निर्माण केली. अनेक शरीरें निर्माण केलीं आणि त्या सर्व शरीरांमध्यें जीवरूपानें तें परब्रह्म तत्त्वच प्रविष्ट झालें आहे. शरीरांत प्रविष्ट झालेल्या परब्रह्मालाच जीव अथवा जीवात्मा असें म्हणतात.

श्वेतकेतु म्हणाला, बाबा ! ब्रह्म जर निराकार आणि निष्क्रिय आहे, तर त्याच्या ठिकाणीं 'मी बहुरूपानें नटावें' असा विचार कसा उत्पन्न झाला ? आणि तें सृष्टीच्या रूपानें कसें नटलें ? उद्दालक म्हणाले, बाळा ! ब्रह्म जरी स्वरूपतः निर्विकार व निष्क्रिय आहे तरी त्याच्या ठिकाणीं जी एक अद्वितीय आणि अनिर्वचनीय शक्ति आहे तीच शक्ति या संकल्पस्फूर्तीचें व सर्व विश्वाच्या उत्पत्तीचें मूळ कारण आहे. याच शक्तीला माया असें म्हणतात. सृष्टीमध्यें उत्पन्न होणाऱ्या प्राणिमात्रांचीं अदृष्टें जेव्हां फलोन्मुख होतात तेव्हां स्वभावतः निर्विकार असलेल्या परब्रह्माच्या ठिकाणीं संकल्पस्फूर्तीचा आविष्कार या मायारूपी अनिर्वचनीय शक्तीमुळेंच होतो आणि मग त्या मायाशक्तीच्या सहकार्यानें परब्रह्मांतून अहंभावाची अभिव्यक्ति होते व क्रमानें भूतभौतिक सृष्टीचा आविर्भाव होतो

उत्पन्न झालेल्या पांचभौतिक देहामध्यें तेंच परब्रह्मतत्त्व अथवा चित्तत्त्व जीवरूपानें प्रवेश करतें आणि मी कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी या स्वरूपाला प्राप्त होतें. या मायेच्या स्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊं शकत नाहीं म्हणून तिला अज्ञान किंवा अविद्या असेंहि म्हणतात, आणि म्हणूनच तत्त्ववेत्ते लोक हा सर्व विश्वप्रपंच अज्ञानाचा खेळ आहे असें म्हणतात. या सर्व खेळाच्या मुळाशीं अधिष्ठान असलेलें जें सत्तत्त्व तेंच सत्य आहे. त्यालाच आत्मा असें म्हणतात. हे श्वेतकेतो ! तेंच तूं आहेस. तू कोणी त्याच्याहून निराळा नाहींस. अशा रीतीनें निरनिराळे दृष्टान्त देऊन नऊ वेळां 'तत्त्वमसि' या महावाक्यानें श्वेतकेतूला उपदेश करून उद्दालकांनीं आत्मस्वरूपाचा साक्षात्कार करून दिला आहे.

आत्मसाक्षात्कार होण्यापूर्वी 'मी कोणी तरी जगाहून निराळा आहें, जगाच्या आगळा आहें' असा जो त्याला अहंकार वाटत होता तो त्याचा अहंकार आत्मसाक्षात्कारानें पार मावळला आणि तो पुढें जगाशीं समरस होऊन सर्वांत मिळून-मिसळून वागूं लागला जिज्ञासूंनी हा विषय छांदोग्य उपनिषदाच्या सहाव्या अध्यायांत विशेष रूपानें पहावा. अशा रीतीनें 'तत्त्वमसि'

या महावाक्यानें जीवात्मा आणि परमात्मा यांचें एकरूपत्व मोठ्या युक्तिवादानें सिद्ध केलेलें आहे. तेंच तत्त्व लक्षांत घेऊन या सदतिसाव्या श्लोकानें आचार्य श्रीहरीची स्तुति करीत आहेत.

'सत्तामात्र' म्हणजे अस्मि या शब्दानें प्रतीतीला येणारा केवळ सत्तास्वरूप – सत्स्वरूप, त्याचप्रमाणें 'केवळ विज्ञानस्वरूप' म्हणजे शुद्ध चैतन्यस्वरूप, 'अज' म्हणजे जन्मरहित, अनादि, त्याचप्रमाणें 'सत्' म्हणजे सत्यस्वरूप, निराबाध. 'सूक्ष्म' म्हणजे अव्यक्त, इंद्रियांना विषय न होणारा. 'नित्य' म्हणजे नाशरहित. 'विभु' म्हणजे सर्वव्यापक. 'आद्य' म्हणजे जगाचें मूळकारण. या जगाचें उपादानकारणहि तोच आहे व निमित्तकारणहि तोच आहे. अशा तऱ्हेचा जो आत्मस्वरूप भगवान् श्रीहरि विष्णु, त्याचेंच स्वरूप उद्दालक ऋषींनें श्वेतकेतु नांवाच्या आपल्या मुलाला वर्णन करून सांगितलें व शेवटीं हे श्वेतकेतो ! सत्यस्वरूप असलेला तो परमात्माच तूं आहेस. कारण या जगांत त्याच्याशिवाय कोणीच नाहीं व कांहींच नाहीं. अशा ज्या तत्त्वाचा उपदेश 'साम्नाम् अन्ते' म्हणजे छांदोग्योपनिषदांत पित्यानें पुत्राला केला आहे त्या आत्मस्वरूप असलेल्या – सर्वात्मस्वरूप असलेल्या आणि संसार-तिमिराचा नाश करणाऱ्या भगवान् श्रीहरीची मी स्तुति करीत आहें.

मूर्तामूर्ते पूर्वमपोह्याथ समाधौ
दृश्यं सर्वं नेति च नेतीति विहाय ।
चैतन्यांशे स्वात्मनि सन्तं च विद्रूपं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३८ ॥

बृहदारण्यकोपनिषदाच्या मूर्तामूर्तब्राह्मण प्रकरणांत प्रथम उपाधिभूत स्थूल सूक्ष्म पदार्थांचें प्रतिपादन करून नंतर 'नेति नेति' शब्दांनी तें ब्रह्म नव्हे तें ब्रह्म नव्हे अशा रीतीनें निषेध करीत शेवटीं निषेधाची मर्यादा जेथें परिसमाप्त होते तें स्थूल सूक्ष्म पदार्थांच्या पलीकडे असलेलें, शब्दांनी ज्याचें प्रतिपादन करतां येत नाहीं असें, अनिर्वचनीय ब्रह्म उपदेशिलें आहे. तेंच श्रीहरीचें स्वरूप होय अशा दृष्टीनें या श्लोकांत आचार्य श्रीहरीची स्तुति करीत आहेत.

समाधीयते चित्त अस्मिन् इति समाधिः या व्युत्पत्तीप्रमाणें समाधि म्हणजे विष्णु भगवान् श्रीहरि. कारण योगी लोक त्याच्या स्वरूपीं आपल्या

चित्ताला एकाग्र करीत असतात चित्ताला एकाग्र करणें म्हणजे समाधि ज्याच्या स्वरूपीं चित्ताला एकाग्र केलें जातें त्यालाहि पण समाधि असेंच म्हणतात अशा अभिप्रायानें प्रकृत स्थळीं समाधि शब्दाचा अर्थ भगवान् विष्णु असा करतात 'चैतन्याश' म्हणजे चैतन्यस्वरूप जड चेतनात्मक विश्व प्रपचातील अनात्मस्वरूप असलेल्या भूतभौतिक जड पदार्थांचा निरास झाला म्हणजे जो अश शिल्लक उरतो तें चैतन्यच होय या अभिप्रायानेंच येथें चैतन्याला अश म्हटलें आहे तो चैतन्याश म्हणजे भगवान् विष्णूच होय तो स्वात्मा आहे म्हणजे अतर्यामी जीवात्म्याशीं अभिन्न आहे एकरूप आहे त्या चित्स्वरूप श्रीहरीच्या ठिकाणीं आरोपित असलेले पचभूतात्मक मूर्त आणि अमूर्त पदार्थ वेदान्तामध्यें पृथ्वी, जल आणि तेज याना मूर्त म्हणतात व वायु आणि आकाश याना अमूर्त म्हणतात या सर्व मूर्तामूर्त दृश्य प्रपचाचा निषेध केल्यानतर त्या निषेधाचा अवधि म्हणून अधिष्ठान म्हणून जो आत्मा शिल्लक रहातो त्या आत्मस्वरूपानें सदा सर्वकाळ 'सत्' म्हणजे विराजमान असलेला जो सच्चिदानदघन पूर्ण प्रभु परमात्मा भगवान् श्रीहरि, ज्याचा साक्षात्कार झाला असता ससाराला कारणीभूत असलेल्या अज्ञानरूपी तिमिराचा नाश होतो त्याची मी भक्तिपूर्वक स्तुति करीत आहें

ओतं प्रोतं यत्र च सर्वं गगनान्तं
योऽस्थूलाऽनण्वादिषु सिद्धोऽक्षरसंज्ञः ।
ज्ञाताऽतोऽन्यो नेत्युपलभ्यो न च वेद्य-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ३९ ॥

जनक राजाच्या सभेमध्यें परब्रह्मस्वरूपाची चर्चा चालू असतान वादविवाद अगदी निकरावर आला याज्ञवल्क्य ऋषींनीं उषस्त, कहोल इत्यादि ऋषींचा वादात पराजय केल्यानतर गार्गी नावाची ब्रह्मविद्येंत निष्णात असलेली एक स्त्री तेथें आली तिनें सर्व ऋषींची अनुज्ञा घेऊन याज्ञवल्क्यांना प्रश्न केला तिची अशी कल्पना होती कीं, मी विचारलेल्या प्रश्नाचें याज्ञवल्क्यानीं उत्तर दिलें तरी पण त्याचा पराभव होईल व उत्तर नाहीं दिलें तरी पण त्याचा पराभव होईल अशा रीतीनें दोन्ही बाजूनीं याज्ञवल्क्याना पेंचात टाकणारा प्रश्न होता तो त्या प्रश्नाचें उत्तर दिलें तर जें बोलण्यास योग्य नाहीं तें बोलून दाखविल्याचा दोष येणार आणि उत्तर नाहीं दिलें तर उत्तर देण्याचें सामर्थ्य नाहीं,

प्रतिभा नाहीं, असा दोष येणार अशा कल्पनेनें तिनें प्रश्न केला ती म्हणाली याज्ञवल्क्य महाराज ! हें सर्व जग, जगांतील सर्व पदार्थ, भूतकाळांतले, भविष्य काळांतले व वर्तमानकाळांतले सर्व पदार्थ अव्याकृत आकाशतत्त्वामध्यें — अव्यक्त हिरण्यगर्भामध्यें सामावलेले आहेत असें आपण म्हणता, पण तें अव्याकृत आकाशतत्त्व किंवा तें अव्यक्त हिरण्यगर्भतत्त्व कशामध्यें सामावलेलें आहे ? अव्याकृत आकाशाचा किंवा अव्यक्त हिरण्यगर्भाचा अधिष्ठाता कोण आहे ? त्याचा आधार कोण आहे ? तें मला आपण सांगा

गार्गीचा हेतु असा कीं, अव्याकृताचें अधिष्ठान अनिर्वचनीय आहे तें शब्दानें प्रतिपादन करता येत नाहीं माझ्या प्रश्नाचें उत्तर म्हणून याज्ञवल्क्य जर प्रतिपादन करतील तर अनिर्वचनीयाचें निर्वचन करणें यांत वदतोव्याघात दोष येतो वादामध्यें हें एक निग्रहस्थान म्हणजे पराभवाचें कारण समजलें जातें बरें, प्रश्नाचें उत्तर न देता याज्ञवल्क्य जर स्वस्थ बसतील, तर 'अप्रतिभा' म्हणजे याज्ञवल्क्याना काहीं प्रतिभा नाहीं उत्तर सुचत नाहीं हें दुसरें निग्रह स्थान म्हणजे पराभवाचें द्योतक होय अशा अभिप्रायानें गार्गीनें प्रश्न केल्या नंतर याज्ञवल्क्यांनी तिचा हेतु लक्षांत घेऊन चटकन् उत्तर दिलें कीं, हे गार्गी ! अव्याकृत आकाशाचें किंवा अव्यक्त हिरण्यगर्भाचें अधिष्ठान कोण आहे ? असा तुम्हीं प्रश्न केला त्या अव्याकृताच्या अधिष्ठानाला 'अक्षर' असें तत्त्ववेत्ते म्हणतात

तें अक्षरतत्त्व स्थूलहि नाहीं, अणुहि नाहीं ऱ्हस्वहि नाहीं आणि दीर्घहि नाहीं त्याला रूप नाहीं, रंग नाहीं, आकार नाहीं त्याला रस नाहीं व गंधहि नाहीं जें दिसतें आहे, कळतें आहे असें तें नाहीं असें तत्त्ववेत्त्यांनीं त्याचें वर्णन केलें आहे तुम्हीं म्हणाल, हें नाहीं, तें नाहीं मग काय तें शून्यस्वरूप आहे ? नव्हे तें शून्यस्वरूपहि नाहीं नाहीं नाहीं म्हणता म्हणता शेवटीं सर्व निषेधाचें अधिष्ठान म्हणून जें शिल्लक रहातें तेंच तें अनिर्वचनीय अक्षरतत्त्व होय नाहीं नाहीं म्हणता म्हणता शेवटीं म्हणणारा तरी शिल्लक रहातोच ना ? तोच सर्व निषेधाचें अधिष्ठान होय तें तत्त्व केवळ अनुभवानेंच जाणावयाचें असतें

याज्ञवल्क्यांनीं दिलेल्या उत्तरांत तत्त्वज्ञानी ब्रह्मवेत्ते असें त्याचें वर्णन करतात असें म्हटलेलें असल्यामुळें याज्ञवल्क्यांनीं अनिर्वचनीयाचें निर्वचन केलें

असा त्यांच्यावर दोष येऊं शकला नाहीं. त्याचप्रमाणें कांहीं उत्तर न देतां ते स्वस्थहि बसले नाहींत. म्हणून त्यांच्या ठिकाणीं उत्तर देण्याची प्रतिभा नाहीं असाहि दोष येऊं शकला नाहीं. शेवटीं याज्ञवल्क्यांनीं सांगितलें कीं, हे गार्गी ! याच अक्षरतत्त्वाच्या सत्तेनें सूर्य, चन्द्र, अग्नि, वरुण, इंद्र, कुबेर आणि यम तसेंच ब्रह्मा, विष्णु आणि महेश इत्यादि सर्व देवता सृष्टींतील आपआपलीं कामें व्यवस्थित रीतीनें पार पाडीत आहेत. जे त्या अक्षरतत्त्वाचें ज्ञान करून घेत नाहींत ते संसार-दुःखें भोगीत रहातात. आणि जे त्या अक्षरतत्त्वाचा साक्षात्कार करून घेतात ते सर्व संसार-दुःखांतून मुक्त होतात. अशा अभिप्रायानें या श्लोकांत आचार्य श्रीहरीची स्तुति करीत आहेत.

तंतूंच्या ठिकाणीं पट जसा कल्पावा त्याचप्रमाणें अत्यंत स्थूल पदार्थांपासून अव्याकृत आकाशापर्यंत हें सर्व जग ज्याच्या स्वरूपांत ओतप्रोत म्हणजे कल्पिलेलें आहे, अधिष्ठित झालेलें आहे. जो 'अस्थूलं, अनणु' इत्यादि वाक्यांनीं उपनिषदांत वर्णिलेला आहे अविनाशी असल्यामुळें अथवा सर्व विश्वाला व्यापून रहात असल्यामुळें ज्याला 'अक्षर' असें नांव दिलें आहे, त्याच्याहून निराळा कोणी ज्ञाता द्रष्टा नाहीं. सर्व कांहीं तोच आहे. तो 'सिद्ध' म्हणजे प्रसिद्ध आहे. 'नेत्युपलभ्यः' म्हणजे निषेधानें अथवा अतद्व्यावृत्तीनें त्याचें ज्ञान होऊं शकतें. ज्ञानाचा विषय म्हणून तो भासत नाहीं, पण सर्वांचा साक्षी म्हणून विवेकानें तो प्रतीतीला येतो. असा जो सर्व साक्षी भगवान् विष्णु श्रीहरि त्याची मी स्तुति करीत आहें.

तावत्सर्वं सत्यमिवाभाति यदेतद्
यावत्सोऽस्मीत्यात्मनि यो ज्ञो न हि दृष्टः ।
दृष्टे यस्मिन्सर्वमसत्यं भवतीदं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ४० ॥

कोणी असें म्हणेल कीं, द्वैत हें प्रत्यक्ष प्रमाणानें सिद्ध असतां त्याचा निषेध करून ब्रह्मच तेवढें सत्य आहे असें कसें म्हणतां ? यावर या चाळिसाव्या श्लोकानें उत्तर देऊन श्रीहरीची स्तुति करीत आहेत. जागृत अवस्थेला येण्याच्या पूर्वी स्वप्नांत प्रतीतीला येणारे पदार्थ जसे सत्य आहेत असें वाटतें त्याचप्रमाणें देह आणि इंद्रियें यांच्या समुदायामध्यें जीवरूपानें तादात्म्य करणारा

देह, प्राण, इंद्रियें, मन, आणि बुद्धि इत्यादिकांचा साक्षी असलेला चिद्घन परमात्मा तो मीच आहें हें जोंपर्यंत कळलें नाहीं तोंपर्यंतच हें सर्व जें कांहीं दिसत आहे तें सत्य असल्यासारखें भासतें, पण जागें झाल्याबरोबर स्वप्नांत पाहिलेले पदार्थ खोटे आहेत अशी ज्याप्रमाणें खात्री होते त्याचप्रमाणें सर्व साक्षी सच्चिदानंदघन परमात्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला म्हणजे हें सर्व बाह्य पांचभौतिक जग आणि आंतर म्हणजे कर्तृत्व, भोक्तृत्वादि धर्म बाधित होतात ते असत्य असल्याची खात्री होते आत्मसाक्षात्कारापूर्वी देखील ते असत्यच असतात, पण आत्मसाक्षात्कारानें त्याचें असत्यत्व अनुभवाला येतें अशा रीतीनें ज्याचा साक्षात्कार झाला असतां हें सर्व असत्य म्हणून प्रतीतीला येतें तोच सर्व संसाररूपी तिमिराचा नाश करणारा भगवान् श्रीहरि त्याची मी प्रेमानें स्तुति करीत आहें

रागामुक्तं लोहयुक्तं हेम यथाग्नौ
योगाष्टाङ्गैरुज्ज्वलितज्ञानमयाग्नौ ।
दग्ध्वात्मानं ज्ञं परिशिष्टं च विद्युर्यं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥४१॥

कोणी म्हणेल कीं, हजारो वेळा वेदान्त ऐकला आणि वाचला तरी आत्मा हा राग-द्वेषविरहित झाला आहे असें कधीं दिसतच नाहीं सच्चिदानंदघन परब्रह्माचा साक्षात्कार होतच नाहीं मग मी शुद्ध ब्रह्मस्वरूप आहें असें कोणत्या साधनांनीं जाणावें ? यावर उत्तर असें कीं, अष्टांगयोगाचा अभ्यास, गुरुकृपा आणि ईश्वराच्या ठिकाणीं अनन्यभक्ति हींच ब्रह्मस्वरूपाच्या साक्षात्काराची उत्तम साधनें आहेत याच साधनांनीं परमात्मस्वरूपाचा साक्षात्कार होऊं शकतो असा अभिप्राय व्यक्त करीत आचार्य श्रीहरीची स्तुति करीत आहेत

लोखंड, पितळ इत्यादि हीन धातूंनीं मिश्रित असलेलें सुवर्ण जसें अग्नीमध्यें तापवितात, त्यांच्यातील हिणकस अंश घालवून टाकतात आणि मग शिल्लक राहिलेलें शुद्ध सोनें हस्तगत करून घेतात त्याचप्रमाणें अष्टांग योगाचा अभ्यास करून प्रदीप्त झालेल्या ज्ञानरूपी अग्नीमध्यें, रागद्वेषादि हीन संस्कारांनीं युक्त असलेल्या जीवात्म्याला तापवून म्हणजे ज्ञानप्राप्तीकरितां आवश्यक असलेल्या कष्टांनीं कष्टवून शुद्ध करावें ईश्वरकृपेनें व गुरुकृपेनें आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालें म्हणजे अज्ञानाचा निरास होतो रागद्वेषादि मलिन संस्कार

पार नाहींसे होतात आणि मग केवळ शुद्ध आत्माच प्रतीतीला येतो. तोच परमात्मा भगवान् श्रीहरि सर्व संसारतिमिराचा नाशकर्ता, त्याची मी भक्तियुक्त अंतःकरणानें स्तुति करीत आहें. ( अष्टांग-योगाचें स्वरूप दक्षिणामूर्ति स्तोत्राच्या नवव्या श्लोकाच्या विवेचनांत पहावें. )

यं विज्ञानज्योतिषमाद्यं सुविभान्तं
हृद्यर्केन्द्वग्न्योकसमीड्यं तडिदाभम् ।
भक्त्याऽऽराध्येहैव विशन्त्यात्मनि सन्तं
तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ४२ ॥

जो परमात्मा 'विज्ञानज्योति' म्हणजे स्वयंप्रकाश चैतन्यस्वरूप आहे, सूर्य, चंद्र, अग्नि किंवा दीप यांच्या प्रकाशाप्रमाणें तो जड प्रकाश स्वरूप नाहीं 'आद्य' म्हणजे सर्व विश्वाचें मूळ कारण. सूर्य, चंद्र, अग्नि वगैरे ज्याचीं 'ओकस्' म्हणजे आश्रयस्थानें आहेत. अर्थात् या ठिकाणीं त्याची उपासना केली असतां तो प्रसन्न होतो. वस्तुतः परमात्मा सर्वत्रच आहे, तथापि सूर्य, चंद्र, अग्नि हीं त्याच्या उपासनेचीं विशिष्ट स्थानें सांगितलीं आहेत. त्याच्यांतहि हृदय हें परमेश्वराच्या उपासनेचें सर्वांत अधिक उत्तम स्थान होय, म्हणून श्लोकामध्यें 'हृदि सुविभान्तम्' असें म्हटलें आहे. आपल्या हृदयांतच तें परमात्मतत्त्व उत्तम प्रकाशित होत असतें. आपल्या हृदयांतच त्याची उपासना केली असतां त्याचा साक्षात्कार होऊं शकतो. तो परमात्मा 'तडिदाभ' म्हणजे विद्युत्प्रकाशाप्रमाणें देदीप्यमान आहे. अंतर्यामी-रूपानें तो या देहांत प्रकाशत असतो. तोच 'ईड्य' म्हणजे स्तुति करण्याला योग्य आहे. भक्तजन स्वस्वरूपामध्यें विराजमान असलेल्या त्या परमेश्वराची अनन्यभक्तीनें आराधना करून याच जन्मांत याच देहांत त्याचा सक्षात्कार करून घेतात आणि सर्व संसार-दुःखांतून मुक्त होतात. असा जो भगवान् श्रीहरि त्याची मी प्रेमपूर्वक स्तुति करतों.

पायाद्भक्तं स्वात्मनि सन्तं पुरुषं यो
भक्त्या स्तौतीत्याङ्गिरसं विष्णुरिमं माम् ।
इत्यात्मानं स्वात्मनि संहृत्य सदैक-
स्तं संसारध्वान्तविनाशं हरिमीडे ॥ ४३ ॥

'य स्वात्मनि सन्त भक्त पुरुष पायात् स विष्णु आगिरस इम मा भक्त्या स्तौति इति पायात्' असा पूर्वार्धातील पदाचा अन्वय लावावा

जो भक्त मी विष्णूच आहें अशा अभेदभावनेनें विष्णूची भक्ति करतो तोच मुख्य भक्त होय तो परमेश्वराला अत्यत प्रिय असतो 'ज्ञानी त्वात्मैव मे मतम्' ज्ञानी भक्त हा माझा आत्माच आहे, असें श्रीहरीनें म्हटलेलें आहे श्रीहरि आपल्या स्वरूपामध्यें अभेदरूपानें रहाणाऱ्या आणि आपलें अत करण परमात्मस्वरूपाशीं सदा एकरूप करून असणाऱ्या त्या भक्तपुरुषाला नेहमीं सुरक्षित ठवतो मीहि त्या श्रीहरीचा आगिरस गोत्रात जन्मलेला अथवा प्राणाभिमानी भक्त आहें त्यानें माझेंहि सरक्षण करावें अथवा तो 'आगिरस' म्हणजे मुख्य आनदस्वरूप आहे त्याच्याच आनदाच्या लेशानें प्राणिमात्र आपल्या जीवनाचा निर्वाह करीत असतात त्याच आनदाच्य निधीतून इतर सर्व आनदाचा आविर्भाव होत असतो त्याच्या स्वरूपाशीं तादात्म्य पावलेला तत्त्ववेत्ता भक्तहि इतर सर्व उपाधींचें निरसन झाल्यामुळें त्याच्याचसारखा मुख्य आनदरूप होऊन रहातो अशारीतीनें आपल्या भक्ताचें सरक्षण आणि ससारतिमिराचा नाश करणाऱ्या त्या श्रीहरीची मी भक्तिपूर्वक स्तुति करीत आहें

इत्थं स्तोत्रं भक्तजनेड्यं भवभीति-
ध्वान्तार्काभं भगवत्पादीयमिदं यः ।
विष्णोर्लोकं पठति शृणोति व्रजति ज्ञो
ज्ञानं ज्ञेयं स्वात्मनि चाप्नोति मनुष्यः ॥ ४४ ॥

भगवत्पूज्यपाद श्रीशकराचार्य यानीं केलेलें अशा त हेचें हें 'हरिमीडे' स्तोत्र भक्तजनानीं नित्य म्हणावें व भगवताची स्तुति करावी अशा योग्यतेचें आहे सूर्यप्रकाशानें अधकाराचा जसा नाश व्हावा तसा या स्तोत्राच्या पाठानें व त्याच्या अर्थाच्या मननानें ससारभयाचा नाश होतो सर्व सासारिक दु खाचा नाश होतो हें स्तोत्र भक्तिपूर्वक जो म्हणेल अथवा श्रवण करील त्याला उत्तम गति मिळेल त्याला श्रीहरीचें सालोक्य व सामीप्य लाभेल 'ज्ञ' म्हणजे या स्तोत्राचा अर्थ जाणून त्याचें मनन करणारा तो जर मननपूर्वक या स्तोत्राचा पाठ करील तर त्याला आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊन त्याला परिपूर्ण परब्रह्मस्वरूपाचा लाभ होईल तो ब्रह्मस्वरूप होऊन राहील

• •

# दक्षिणामूर्तिस्तोत्रम्

[ दक्षिणामूर्तिस्तोत्र म्हणजे वेदांतशास्त्ररूपी क्षीरसागराचें युक्तिरूपी मंदर पर्वताच्या साहाय्यानें विचाररूपी आलोडन करून श्रीशंकराचार्यांनी मिळविलेल्या अद्वैतरूपी अमृतानें भरलेला पूर्ण कलशच होय. या जगांत आत्मलाभाइतका श्रेष्ठ असा दुसरा लाभ नाहीं. या स्तोत्राच्या रूपानें तोच लाभ अगदीं सुलभ रीतीनें जिज्ञासूंच्या पदरांत आचार्यांनीं घातला आहे.

भोक्ता जीव, भोग्य जग, भोगदाता परमात्मा आणि मोक्षदाता सद्गुरु हे सर्व तत्त्वतः एकरूपच आहेत. हा सिद्धान्त अगदीं सोप्या भाषेंत सहज लक्षांत येईल व मनांत ठसेल अशा रीतीनें या स्तोत्रांत प्रतिपादिलेला आहे. ईश्वर म्हणजे काय ? जीव म्हणजे काय ? ईश्वर हा सर्वस्वरूपानें कसा नटला ? जीव, जगत् आणि ईश्वर यांची एकरूपता कशी सिद्ध होऊं शकते ? जिवाला हें कसें कळणार ? आत्मसाक्षात्काराचीं साधनें कोणतीं ? या सर्व प्रश्नांचीं समर्पक उत्तरें या स्तोत्रांत पहावयास सांपडतील.

दक्षिणामूर्ति म्हणजे भगवान् श्रीशंकरच. लोकांना अद्वैत तत्त्वाचा उपदेश करण्याकरितां परमेश्वरानें दक्षिणामूर्तीचा अवतार घेतला. हा अवतार दक्षिणेकडे झाला व मूर्तीहि,पण दक्षिणाभिमुखच असते, म्हणून याला दक्षिणामूर्ति असें म्हणतात. दक्षिणा शब्दाचा अर्थ सुंदर असाहि आहे. दक्षिणामूर्ति म्हणजे सुंदर ध्यान असलेला सद्गुरु भगवान् श्रीशंकर. त्याचें हें स्तोत्र आहे. स्तोत्राची रचना शार्दूलविक्रीडित वृत्तांत आहे. स्तोत्र म्हणायला सुंदर आहे. पाठ करायला सोपें आहे. कानाला गोड लागतें. या स्तोत्रावर अनेक विद्वानांनीं विवरण केलेलें आहे. श्रीसुरेश्वराचार्यांचें मानसोल्लास नांवाचें वार्तिकहि या स्तोत्रावर प्रसिद्ध आहे. आपणहि आतां स्तोत्राचें अवलोकन आणि मनन करू या. ]

विश्वं दर्पणदृश्यमाननगरीतुल्यं निजान्तर्गतं
पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया ।
यः साक्षात्कुरुते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वयं
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥१॥

निद्रेच्या वेळीं स्वप्नांत भासणाऱ्या पदार्थांप्रमाणें हें सर्व विश्व ज्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं, आरशांत दिसणाऱ्या एखाद्या नगरीच्या प्रतिबिंबा सारखें दिसतें मायेमुळें जणु काहीं आत्मस्वरूपाच्या बाहेरच तें उत्पन्न झाल्या-सारखें प्रत्ययास येतें आणि आत्मसाक्षात्काररूपी जागृतीच्या क्षणीं नाहींसें होतें. त्या वेळीं केवळ एकमेव अद्वितीय अशा आत्मस्वरूपाचाच ज्याला साक्षात्कार होतो त्या आत्मस्वरूपी — परमात्मस्वरूपी श्रीगुरु दक्षिणामूर्तीला मी हा नमस्कार करीत आहें

विश्व म्हणजे विविध रूपानें प्रतीतीला येणारें सर्व भूतभौतिक जग हें सर्व जग अन्तर्यामी चित्स्वरूप जो आत्मा, ज्याला प्रत्यक्‌चैतन्य म्हणतात त्या आत्म्याच्या ठिकाणींच प्रतीतीला येतें तें 'निजान्तर्गत' म्हणजे आत्म-स्वरूपामध्येंच आहे, बाहेर नाहीं कारण आत्मा हा सर्वव्यापी परम महान् असल्यामुळें त्याच्या ठिकाणीं बाहेर हा शब्दप्रयोगच संभवत नाहीं

आतां प्रश्न असा येतो कीं, आत्मा हा निर्विकार चिद्‌घन आहे कोणत्याहि वस्तूशीं त्याचा संसर्ग नाहीं, म्हणून त्याला असंग म्हणतात तर मग अशा आत्म्या-मध्यें विश्व कसें प्रतीतीला येणार ? त्यावर उत्तर देतात 'दर्पणदृश्यमाननगरी-तुल्यम्' निरवकाश म्हणजे घनस्वरूप असलेल्या स्वच्छ आरशांत जशी एखादी नगरी दिसावी त्याप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं जग प्रतीतीला येतें आरशांत आपण देहादि वस्तूचीं प्रतिबिंबें पहातों व आरशांत देहादि वस्तु दिसतात असें आपण म्हणत असतों वस्तुत आरशांत काहींच नसतें, खोकें, पेटी, कपाट, कोनाडा इत्यादिकामध्यें वस्तु असू शकतात, कारण तेथें अवकाश आहे आरसा हा तर निरवकाश म्हणजे ठोस भरीव आहे त्यामुळें त्यांत कोणत्याहि वस्तु राहू शकणार नाहींत तरी पण बाह्य वस्तूची आरशांत पडलेली छाया पाहून आपण त्या बाह्य वस्तुच आरशांत दिसतात असें म्हणत असतों तात्पर्य, आरशांत दिसणारी नगरी जशी मिथ्या म्हणजे खोटी — असत्य असते त्याचप्रमाणें आत्म्याच्या ठिकाणीं प्रतीतीला येणारें विश्वहि मिथ्या म्हणजे खोटेंच आहे

यावर कोणी अशी शंका घेतील कीं, आरशांत दिसणाऱ्या वस्तु सत्य नसल्या तरी आरशाच्या बाहेर त्या सत्यस्वरूपांत आहेत त्याचप्रमाणें विश्व देखील सत्य आहे असें म्हणायला काय हरकत आहे ? यावर उत्तर असें कीं, उदाहरण बरोबर आहे, पण तें प्रकृतस्थलीं लागू पडत नाहीं एवढेंच आरशाच्या

बाहेर असलेल्या वस्तु सत्य आहेत ही गोष्ट खरी मानली, तरी आत्मा हा सदा सर्वकाळ सर्वत्र व्यापक स्वरूपानें विराजमान असल्यामुळें आत्म्याच्या बाहेर हा शब्दप्रयोगच संभवत नाहीं. मग बाहेरच्या विश्वाचें अस्तित्व कसें मानायचें ? जेथें अस्तित्वच [illegible] तेथें सत्यत्वाची काय कथा ? तेव्हां दर्पणांत दिसणाऱ्या नगरीप्रमाणें आत्मस्वरूपीं प्रतीतीला येणारें हें विश्व असत्यच आहे. यांत तिळमात्र संशय नाहीं.

यावर कोणी असें म्हणेल कीं, हें विश्व जर 'निजान्तर्गत' म्हणजे आत्मस्वरूपामध्यें प्रतीतीला येणारें असेल तर आत्म्यामध्यें राग, द्वेष, सुख, दुःख जसें प्रतीतीला येतात; मी सुखी, मी दुःखी, मी प्रेमी, मी द्वेषी असें जसें आपण म्हणतों त्याचप्रमाणें सारें विश्वहि जर आत्म्याच्याच ठिकाणीं आहे तर मग त्याचीहि तशीच प्रतीति यावयाला पाहिजे. पण तशी प्रतीति येत नाहीं. हत्ती घोडे, घरदार, वित्तवैभव, सूर्य, चंद्र, नदी, नाले, सागर, पर्वत हे सर्व माझ्या ठिकाणीं आहेत किंवा हें सर्व मी आहें असें आपण कधींच म्हणत नाहीं. याचें उत्तर असें कीं, हें सर्व विश्व जेव्हां आपण पहात असतों तेव्हां आपल्याला *आत्म्याच्या यथार्थ स्वरूपाचें भान नसतें. म्हणूनच हें विश्व तत्त्वतः आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं भासत असूनहि तें बाहेरचें असल्यासारखें दिसतें.* याला कारण आत्म्याच्या यथार्थ स्वरूपाचें अज्ञान. या अज्ञानालाच अविद्या, माया, प्रकृति असें म्हणतात. या अज्ञानाचें अधिष्ठान आत्माच असल्यामुळें व या अज्ञानानेंच सर्व कार्य घडत असल्यामुळें आत्म्याची ती एक विशिष्ट प्रकारची, अनिर्वचनीय शक्तिच समजली जाते.

या अज्ञानाचा विषयहि पण आत्माच आहे. या अज्ञानामुळेंच आपलें वास्तविक स्वरूप आपल्याला कळत नाहीं आत्म्याच्या ठिकाणीं राहून आत्मस्वरूपाला झांकणें व आत्म्याच्या ठिकाणीं विविध विश्वप्रपंचाला भासविणें *असा त्या अज्ञानाचा विलक्षण स्वभाव आहे. यालाच* अज्ञानाची आवरणशक्ति आणि विक्षेपशक्ति असें म्हणतात.

या अज्ञानाला सत् म्हणावें तर आत्मस्वरूपाच्या यथार्थ साक्षात्कारानें त्याचा बाध होतो, त्याचा निरास होतो. असत् म्हणावें तर त्याचें अनंतकोटि ब्रह्मांडांच्या घडामोडीचें अफाट कार्य सर्वांच्या अनुभवाला येत असतें. म्हणून तत्त्ववेत्त्यांनीं या अज्ञानाला, *अविद्येला किंवा मायेला* "सदसद्भ्यां

अनिर्वचनीयम् " म्हणजे सत्हि नाहीं आणि असत्हि नाहीं तें एक विलक्षण अनिर्वचनीय असें काही तरी आहे असेंच म्हटलें आहे अशा अनिर्वचनीय मायेनें हा विश्वप्रपञ्च तत्त्वतः निजान्तर्गत असूनहि आत्मस्वरूपामध्येंच भासत असूनहि जणु काय तो बाहेर आहे असें वाटत असतें तात्पर्य, हें सर्व जग आतल्या आतच आत्मस्वरूपातच उत्पन्न होत असताना बाहेर उत्पन्न झाल्यासारखें दिसतें याला कारण माया – अविद्या – अज्ञान मनुष्य देहालाच आत्मा समजतो अथवा आत्मा हा देहपरिमित आहे असें समजतो म्हणूनच हा भ्रम उत्पन्न होत असतो

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, आत्मस्वरूपात उत्पन्न होत असलेलें जग बाहेरचें म्हणून कसें प्रतीतीला येईल ? याला काहीं एखादें उदाहरण आहे काय ? उत्तर – होय स्वप्न हेंच या बाबतींत उत्कृष्ट उदाहरण आहे स्वप्न हा एक गाढ निद्रेच्या पूर्वकाळातला अथवा पूर्ण जागृतीच्या पूर्वकाळातला विशिष्ट प्रकारचा मनोव्यापार होय सर्व इंद्रियें आपआपला व्यापार अथवा व्यवहार करून थकलीं म्हणजे विश्रांति घेत असतात अशा वेळीं मनाचे हे व्यापार सुरू होत असतात ते प्राय पूर्वी वाचलेल्या, ऐकलेल्या अथवा अनुभवलेल्या पदार्थांच्या संस्कारावरच अवलंबून असतात इतर इंद्रियांच्या विश्रांति काळात चाललेले मनाचे व्यापार म्हणजेच स्वप्नें होत मनोरथाच्या काळात इतर इंद्रियें थकलेलीं नसतात विश्रांति घेत नसतात एवढेंच नव्हे, तर क्वचित् प्रसंगीं आपआपला व्यवहारहि तीं करीत असतात हाच स्वप्न आणि मनोरथ-याच्यातील फरक होय असो जागृति आणि निद्रा किंवा निद्रा आणि जागृति या दोन अवस्थांच्या मधल्या काळात आपण स्वप्न भ [illegible]त असतों त्या स्वप्नातहि नद्या, डोंगर, अ ण्यें, शहरें, खेडीं पाडीं हत्ती, घोडे, गायी, म्हैशी, आगगाड्या, मोटारी, विमानें, राजा, प्रजा, सैन्यें युद्धें, जय, पराजय सुकाळ, दुष्काळ, मान अपमान, सुखें, दु खें, शत्रु मित्र, लाभ हानि, सभा, समेलनें, वाद विवाद, इत्यादि सर्व काहीं अनुभवीत असतोंच, व हें सर्व स्वाप्निक जग 'निजान्तर्गत' म्हणजे आपल्या देहातच आपल्या मनातच आपण अनुभवीत असतों तेथें स्वप्नात भासणाऱ्या अथवा दिसणाऱ्या पदार्थांपैकीं बाहेर काहींच नसतें पण असें असूनहि स्वप्नाच्या काळात हें स्वाप्निक जग आपल्या देहात आहे आपल्या मनात आहे, तें निजान्तर्गत

आहे असें आपल्याला वाटतच नाहीं उलट आपण काशीला गेलों, रामेश्वरला गेलों, हिमालयात गेलों, जहाजात बसलों, विमानात बसलों, इंग्लंड, अमेरिका, चीन, जपान इत्यादि देशात फिरलों, आमच्या आमच्याच्या गाठीभेटी झाल्या, इत्यादि सर्व काहीं बाहेर आणि खरोखरीच घडून येत आहे असें वाटतें पण यात खरें काय आहे ! आणि बाहेरचें काय आहे ! याचा विचार करून पहा म्हणजे बाहेरचें काहीं नाही व खरेंहि काहीं नाहीं, असेंच आढळून येईल त्याचप्रमाणें जागृतीच्या काळात अनुभविल्या जाणाऱ्या विश्वप्रपचाचें स्वरूप समजावें जागृतीच्या काळात आत्मस्वरूपाची कल्पना देहापुरतीच परिसीमित असल्यामुळें त्या वेळीं प्रतीतीला येणारा विश्व प्रपच व त्याचा व्यवहार सर्व काहीं बाह्यस्वरूपानें प्रतीतीला येतो व सत्य स्वरूपाचा वाटतो तत्त्वत तो तसा नाहीं तात्पर्य, स्वप्नातील विश्वप्रपचाप्रमाणेंच जागृतींतील विश्वप्रपचहि 'निजान्तर्गत' म्हणजे आत्मस्वरूपामध्येंच प्रतीतीला येणारा व असत्यस्वरूपाचा आहे

यावर कोणी असें म्हणेल कीं, स्वप्नातील विश्वप्रपच अतर्गत व खोटा असला, तरी जागृतींतील विश्वप्रपच हा बाहेरचा व सत्यस्वरूपाचा मानायला काय हरकत आहे ! सर्वांचा प्रत्यक्ष अनुभवहि तसाच आहे जागृतींतील विश्वप्रपच बहिर्गत व सत्यस्वरूपाचा आहे असाच सर्वांना अनुभव येत असतो पण हें म्हणणें बरोबर नाहीं केवळ अनुभवावरून वस्तूचें सत्यत्व सिद्ध होत नसतें एखाद्या वस्तूचा अनुभव आला तरी तो अनुभव खरा आहे का खोटा आहे हें पहावें लागतेंच अनुभव खरा असला तर त्या अनुभूत वस्तूचें सत्यत्व सिद्ध होईल पण अनुभवच जर खोटा असला तर अनुभूत वस्तूचें सत्यत्व कसें सिद्ध होणार ! पण केवळ अनुभवावरूनच वस्तूचें सत्यत्व मानावयाचें असेल तर स्वप्नातील वस्तूचाहि आपल्याला प्रत्यक्ष अनुभव येतच असतो मग स्वप्नातील वस्तूहि आपणास सत्य मानाव्या लागतील पण आपण स्वप्नातील पदार्थ सत्य कोठें मानतों ! तीच गति जागृतींतील पदार्थांची समजावी

यावर कोणी असें म्हणेल कीं, अहो ! स्वप्नातील पदार्थ जागृत अवस्थे मध्यें बाधित होत असतात जागृतीनतर ते रहात नाहींत म्हणून ते खोटे आहेत हें म्हणणें बरोबर आहे पण जागृतींतील पदार्थ बाधित होत नाहींत

पुन पुन्हा व रोजच्या रोज तेच पदार्थ आपण जागृतींत पहात असतों, मग ते खोटे कसे म्हणावेत ? यावर उत्तर असें कीं, स्वप्नकालात जरी आपण आपल्याला असख्य लोकाच्या मेळा यात व विशाल वैभवात पहात असलों, तरी जागृतीच्या क्षणीं केवळ आपण एकटेच आहोंत, आपल्याशिवाय दुसरें कोणीहि नाहीं व काहींहि नाहीं, असाच अनुभव आपल्याला येत असतो आणि तो स्वप्नाच्या अपेक्षेनें निराबाध असल्यामुळें अर्थात् स्वप्नातला अनुभव जसा बाधित होतो तसा हा बाधित होत नसल्यामुळें आपण त्याला सत्य मानतों त्याचप्रमाणें आत्मसाक्षात्कार झाल्यानतर विश्वप्रपचाची कल्पना मावळते व आत्माच तेवढा निराबाध शिल्लक रहातो म्हणून तोच तत्त्वत सत्य होय

स्वप्नात आपण घाबरलों, गोंधळलों म्हणजे आपण बरळतों, ओरडतों आपली ती कष्टावस्था पाहून शेजारचे जागे असलेले लोक आपल्याला जागे करतात आपण जागे झालों म्हणजे आपली त्या दु खातून सुटका होते त्याचप्रमाणें जागृत अवस्थेंतील व्यवहारातहि आपण अधिक गोंधळलों, घाबरलों, म्हणजे शोक, दु ख, दैन्य, व्यक्त करीत रहातों माझें कसें होईल ? कोण मला विचारणार ? कोण मला खाऊ, पिऊ घालणार ? कोण मला औषधपाणी देणार ? इत्यादि प्रकारें आपण चिंता व्यक्त करीत असतों त्या वेळीं ईश्वरकृपेनें जवळ असलेले दयाळु ज्ञानी सतमहात्मे त्याला यथार्थ तत्त्वाचा उपदेश करून जागृत करतात सतकृपेनें तो जागृत होऊन पहातो तेव्हा ' आत्मैवेद सर्वं ' अरे ! हे सर्व आत्मस्वरूपच आहे ! ' सर्वं खल्विद ब्रह्म ' खरोखर हें सर्व ब्रह्मच आहे ! 'ब्रह्मैवाहमस्मि' ब्रह्मच मी आहें ' अह ब्रह्मैवास्मि ' मी ब्रह्मच आहें ' हस सोऽह शिवोऽहम् ' आत्मा शुद्ध आहे तोच मी आहें मी मगलमय आहें आनदमय आहें मी नित्य निरतिशय आनदमय परब्रह्म आहें, असें त्याच्या प्रत्ययाला येत असतें त्या वेळीं जागृत कालीं पाहिल्या गेलेल्या सर्व विश्वप्रपचाच्या सत्यत्वाचा बाध होतो त्या वेळीं त्याच्या दृष्टीनें जागृतकालीन विश्वप्रपचहि स्वाप्निक विश्वप्रपचाप्रमाणेंच बाधित होणारा म्हणून खोटा ठरतो

यावर कोणी असें म्हणेल कीं, अहो ! स्वप्नातले पदार्थ खोटे असले तरी ते दुसरीकडे कोठें न कोठें तरी सत्य असतातच बाहेर अनुभवलेले, पाहिलेले, ऐकलेले पदार्थच स्वप्नात दिसतात, तर मग एका आत्म्यव्यतिरिक्त

बाकीचे सर्वच पदार्थ खोटे आहेत असें कसें म्हणतां येईल ? हीच गोष्ट सर्व भ्रमाची आहे भ्रमात प्रतीतीला येणारे पदार्थ दुसरीकडे कोठें न कोठें तरी सत्यस्वरूपात असतातच दोरीवर भासणारा साप खोटा असला तरी तो दुसरीकडे वारुळात, बिळात अथवा पेटाऱ्यात कोठें तरी सत्यस्वरूपात असतोच सत्य पदार्थांचे पूर्वी अनुभव नसतील तर भ्रमात अथवा स्वप्नात त्याचें भान होणार नाहीं यावर उत्तर असें कीं, भ्रमात किंवा स्वप्नात दिसणारे पदार्थ पूर्वी आपण केव्हा तरी कोठें तरी अनुभविलेले असावे लागतात ही गोष्ट खरी आहे पण ते सत्यस्वरूपातच अनुभविलेले असावे लागतात असा काहीं नियम नाहीं खोटा पाहिलेला नाग किंवा चित्रात पाहिलेला नाग अथवा एखाद्यानें वर्णन करून सांगितलेला नाग स्वप्नात दिसतोच की नाहीं आपल्याला ? तात्पर्य, पदार्थांचे संस्कार चित्तावर असले की, भ्रम किंवा स्वप्न याची उपपत्ति लागते पदार्थ खरेच असावे लागतात असा काहीं नियम नाहीं म्हणून 'निजान्तर्गत' प्रतीतीला येणारे स्वप्नातले पदार्थ जसे खोटे असतात तसेंच जागृतकालीं आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं प्रतीतीला येणारें विश्वहि खोटेंच आहे असें म्हणावें लागतें।

यावर कोणी विचारील कीं, स्वप्नात भासणाऱ्या पदार्थांचे संस्कार चित्तावर होतात तरी केव्हा ? याला उत्तर असें कीं, पूर्वी केव्हा तरी होतात याच जन्मात अथवा मागच्या जन्मात अथवा त्याच्या मागच्या जन्मात केव्हा तरी होतात मूळ जन्माला केव्हा आरंभ झाला हें कोणालाच सांगता येणार नाहीं याच कारणामुळें तत्त्ववेत्ते लोक जग हें अनादि आहे असें मानतात कोणी म्हणेल ब्रह्मदेव सृष्टि उत्पन्न करतो ना ? मग ही सृष्टि अनादि कशी ? यावर उत्तर '– ब्रह्मदेव सृष्टि उत्पन्न करीत असला, तरी तो जशी पूर्वी होती तशीच पुढें निर्माण करतो, असें वेदात म्हटलें आहे 'धाता यथापूर्वमकल्पयत्' एवंच, मूळ सृष्टि केव्हा उत्पन्न झाली हें कोणालाच सांगता येत नाहीं म्हणून हें जग अनादि आहे असें म्हटलें जातें

खऱ्याखोट्याची कसोटी अशी आहे कीं, जे पदार्थ बाधित होतात ते खोटे व जे कधींहि बाधित होत नाहींत ते खरे या दृष्टीनें पाहिलें असता एका आत्म्याव्यतिरिक्त बाकीच्या सर्व पदार्थांचा बाध होतो म्हणून ते खोटे व आत्म्याचा मात्र कधींच बाध होत नाहीं म्हणून तोच तेवढा खरा आहे, अशी

वस्तुस्थिति आहे कोणत्याहि पदार्थाबद्दल तो खोटा आहे, खरा नाहीं, नाशवंत आहे असें कळणें किंवा त्याचा नाश होणें याला बाध असें म्हणतात

स्वप्नामध्यें आपल्याच स्वरूपात — देहात — मनात प्रतीतीला येणारें स्वाप्निक जग जसें आपल्याहून निराळें भासतें तसें तें जागृतींतहि आपल्याहून निराळें भासतें स्वप्नात प्रतीतीला येणारी पदार्थांची सत्ता ही आत्मसत्तेहून निराळी नाहीं, तशीच जागृतींतील पदार्थांचीहि सत्ता आत्मसत्तेहून निराळी नाहीं स्वप्नात प्रतीतीला येणारें विश्वाचें स्फुरण, ज्ञान किंवा भान हें आत्मस्फुरणाहून निराळें नाहीं स्वप्नातील व जागृतींतील विश्व आणि त्याचा व्यवहार हाहि सारखाच असतो फरक येवढाच आहे कीं, व्यावहारिक जागृतीनें स्वप्नातील विश्वाचा बाध होतो तर पारमार्थिक जागृतीनें व्यावहारिक विश्वाचा बाध होतो हा फरक आहे म्हणूनच स्वप्न आणि जागृति हीं दोन नावें व अवस्था निराळ्या आहेत आणि म्हणूनच एक अवस्था दुसऱ्या अवस्थेचा दृष्टान्त होऊं शकते असा हा सिद्धान्त या श्लोकात विवक्षित आहे

तात्पर्य, आरशात दिसणाऱ्या नगरीप्रमाणें हें सर्व विश्व आत्मस्वरूपात पहात असूनहि मायेनें जणु काहीं तें बाहेर निर्माण केलें आहे असें समजतों जसें निद्रेनें प्रतीतीला येणारें स्वप्नातील जग निजान्तर्गत असूनहि बाहेरचें आहे असें वाटतें; त्याचप्रमाणें जागें झाल्याबरोबर स्वप्नातील विश्वप्रपंच मावळतो व आपण एकटेच आहोंत असें प्रतीतीला येते, त्याचप्रमाणें आत्मसाक्षात्कारानंतरहि जागृतींतील विश्वप्रपंचाचा निरास होऊन आपण एकमेव अद्वितीय एकच एक शिल्लक आहोंत असा अनुभव येतो, या अनुभवाचा दाता आणि अधिष्ठाता असे जे श्रीगुरु दक्षिणामूर्ति भगवान् शंकर याना हा माझा नमस्कार असो

बीजस्यान्तरिवाङ्कुरो जगदिदं प्राङ्निर्विकल्पं पुन-
र्मायाकल्पितदेशकालकलनावैचित्र्यचित्रीकृतम् ।
मायावीव विजृम्भयत्यपि महायोगीव यः स्वेच्छया
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ २ ॥

बीजामध्यें जसा अंकुर, स्कंध, शाखा, पत्र पुष्प, फल इत्यादि समुदाय समावलेला असावा त्याप्रमाणें सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी हें जग नामस्वरूपात्मक विकल्प रहित असें आत्मस्वरूपामध्यें — परमात्मस्वरूपामध्यें सामावलेलें होतें

मायेनें कल्पिलेल्या देश, काल इत्यादिकांच्या संबंधाच्या वैचित्र्यामुळें तें विभिन्न रूपानें अभिव्यक्त झालें.

खेळ करणाऱ्या एखाद्या गारुड्याप्रमाणें किंवा महायोग्याप्रमाणें जो आपल्या इच्छेनें हें सर्व विश्व निर्माण करतो त्या परमात्मस्वरूप असलेल्या श्रीगुरू दक्षिणामूर्ति भगवान् शंकराला हा माझा नमस्कार असो.

जग हें आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं प्रतीतीला येतें असें सांगितलें, पण हें जग उत्पन्न झालें कसें हा प्रश्न रहातोच. याच प्रश्नाचें उत्तर या दुसऱ्या श्लोकांत दिलेलें आहे. तें आतां आपण पाहूं. सृष्टीची उत्पत्ति हें एक तत्त्ववेत्यांच्या पुढें मोठें कोडेंच आहे. त्याचा उलगडा समाधानकारकपणें होत नाहीं. त्यातल्या त्यांत अद्वैत तत्त्ववेत्यांची उपपत्ति अधिक सयुक्तिक आहे. आचार्य या श्लोकांत त्याच युक्तीचं तिपादन करीत आहेत.

पूर्वपक्षकारांचें म्हणणें असें कीं, अहो! आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं विश्व-प्रपंचाचें अस्तित्व कसें सिद्ध होणार? कारण हा विश्वप्रपंच कोण निर्माण करतो व कोठें निर्माण करतो? याचा कांहीं पत्ताच लागत नाहीं. काय आत्मा जग निर्माण करतो का जगाच्या रूपानें तो नटतो? का तो परिणत होतो? दूध जसें दह्याच्या रूपानें परिणत होतें तसा आत्मा जगाच्या रूपानें परिणत होतो काय?

आत्मा जग निर्माण करतो असें म्हणावें, तर एकच एक सर्वव्यापी चिद्रूप म्हणजे चैतन्यस्वरूप असलेला तो आत्मा जग कसें निर्माण करील? कुंभाराला घट निर्माण करतांना माती लागते, दंड लागतो, चक्र लागतें, पाणी लागतें व बसायला जागा लागते. या सर्व गोष्टी असाव्या लागतात. तेव्हां कुंभार घट निर्माण करूं शकतो. जग उत्पन्न होण्याच्यापूर्वी तुम्ही तर फक्त एक आत्माच मानतां मग तो एकटा कांहीं साधन-सामग्री नसताना जग कसें निर्माण करील? बरें जगाच्या रूपानें तोच नटतो अथवा परिणत होतो म्हणावें, तर तो आत्मा निरवयव, निर्विकार, निराकार आणि चिद्रूप असा आहे. तो कसा जडरूपानें परिणत होणार? तेव्हां जग हें आत्म्यापासून उत्पन्न होतें व आत्म्याच्याच ठिकाणीं रहातें असें म्हणण्यापेक्षां पृथ्वी, जल, तेज आणि वायु या चार महाभूतांच्या परमाणूंपासून जग बनतें व परमाणूंच्याच आश्रयानें तें रहात असेंच म्हणणें ठीक होईल. जन्माला येणाऱ्या प्राणिमात्रांच्या अदृष्टामुळें म्हणा अथवा ईश्वराच्या प्रेरणेनें म्हणा, दोन परमाणूंच्या ठिकाणीं क्रिया उत्पन्न

होते त्या क्रियेनें ते दोन परमाणु एकत्र होतात दोन परमाणु एकत्र झाले म्हणजे त्याचें द्व्यणुक बनतें अशीं तीन द्व्यणुकें एकत्र झालीं म्हणजे त्रसरेणु तयार होतो तो अत्यंत सूक्ष्म असतो, तरी पण खिडकींतून अथवा झरोक्यातून पडलेल्या कडोशात सूर्याच्या किरणात तो दिसू शकतो असे अनेक त्रसरेणु एकत्र झाले म्हणजे स्थूल द्रव्याची उत्पत्ति होते परमाणु ज्या जातीचे असतात त्याच जातीचें द्रव्य बनतें याप्रमाणें स्थूल भूताची व भौतिक विश्वाची उत्पत्ति होत रहाते असा हा नैयायिक, वैशेषिक इत्यादि तत्त्ववेत्त्यांचा पक्ष आहे यालाच आरंभवाद असें म्हणतात

आरंभवाद्याचें म्हणणें असें कीं, कोणतेंहि द्रव्य उत्पन्न होताना पृथ्वी, जल, तेज आणि वायु याचे परमाणु वर सांगितलेल्या पद्धतीनें यथायोग्य प्रमाणात एकमेकाशीं संयुक्त होतात आणि मग द्रव्य उत्पन्न होत असतें अशा रीतीनें एखादा मृत्पिंड म्हणजे मातीचा गाळा तयार झाला म्हणजे त्याच्यापासून गाडगीं, मडकीं, रांजण वगैरे पदार्थ तयार होतात मृत्पिंडापासून घटादि कार्यें उत्पन्न होत असल्यामुळें मृत्पिंड हा त्या घटादि कार्याचें उपादानकारण होय ज्याचें कार्य बनतें तें त्या कार्याचें उपादानकारण असतें मातीचा घट बनतो म्हणून माती हें त्या घटाचें उपादानकारण सोन्याचे अलंकार बनतात म्हणून सोनें हें त्या अलंकाराचें उपादानकारण होय त्याचप्रमाणें पृथ्वी, जल, तेज आणि वायु या चार महाभूताच्या परमाणूपासून जग बनतें म्हणून परमाणु हेच जगाचें उपादानकारण होत उपादानकारण हें कार्यात अन्वित असतें म्हणजे उपादानकारणाचा कार्याशीं नेहमीं संबंध असतो घटामध्यें मृत्तिका असते, अलंकारामध्यें सोनें असतें, त्याचप्रमाणें विश्वातील सर्व कार्यद्रव्यात पृथ्वी, जल, तेज आणि वायु याचे परमाणूच असतात म्हणून परमाणु हेच जगाचें उपादानकारण होत उपादान म्हणजे आश्रय विशेष जेथें कार्य समवायसंबंधानें रहातें त्याला उपादान कारण म्हणतात परमात्मा हा जगाचें उपादान कारण होऊ शकत नाहीं हें जग परमात्म्यापासून उत्पन्न झालें असें म्हणता येत नाहीं परमात्मा जर जगाचें उपादानकारण असता, तर तो जगातील सर्व पदार्थांत प्रतीतीला आला असता पण तशी प्रतीति येत नाहीं म्हणून परमात्मा हा जगाचें उपादानकारण आहे असें मानता येत नाहीं असें या आरंभवाद्याचें म्हणणें आहे

यावर परिणामवादी साख्याचें असें म्हणणें आहे की, त्रिगुणात्मक प्रकृति हेंच या जगाचें मूळकारण होय सत्त्व, रज आणि तम या तीन गुणाची जी साम्यावस्था तिलाच प्रकृति असें म्हणतात हीच प्रकृति सर्व विश्वाचें मूळकारण असल्यामुळें तिला मूळप्रकृति असेंहि म्हणतात मूळप्रकृति ही त्रिगुणात्मक असल्यामुळें तिच्यापासून उत्पन्न होणारें जगहि त्रिगुणात्मक असेंच उत्पन्न होत असतें कारणाऱ्या ठिकाणीं असलेले गुण हे कार्याच्या ठिकाणीं येत असतात हा सिद्धान्त सर्वमान्य आहे जग ज्या अर्थी त्रिगुणात्मक आहे त्या अर्थी त्याचें कारणहि त्रिगुणात्मक असलें पाहिजे, म्हणून प्रकृति प्रधान किंवा अव्यक्त हेंच जगाचें मूळ कारण होय प्रकृति हीच जगाचें मुख्य कारण असल्यामुळें तिला 'प्रधान' असें म्हणतात ती अत्यत सूक्ष्म आहे बाहिरिंद्रियानीं तिचें ग्रहण होत नाहीं म्हणून तिला 'अव्यक्त' म्हणतात प्रकृतीमध्यें घटक असलेल्या सत्त्व, रज आणि तम या तीन गुणाचे विशिष्ट परिणाम हेच विश्वातील पदार्थांच्या वैविध्याचें कारण होय अशा रीतीनें हें सर्व विश्व मूळप्रकृतीचाच परिणाम असल्यामुळें, परिणामवादच मानणें सयुक्तिक ठरतें.

निसर्गत च जग उत्पन्न होत असल्यामुळें निसर्ग हाच जगाचें कारण होय असेंहि काहींचें मत आहे तर काहीं लोक हा सर्व काळाचा खेळ आहे म्हणून काळच जगाचें कारण होय असेंहि म्हणतात सूक्ष्म विचार करून पाहिलें तर हे सर्व पक्ष बरोबर नाहींत असेंच म्हणावें लागतें एक तर हे पक्ष श्रुतीविरुद्ध आहेत श्रुति ही सर्व प्रमाणामध्यें श्रेष्ठ आहे ही गोष्ट सर्व आस्तिक तत्त्ववेत्त्याना मान्य आहे श्रुति तर सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी एकच तत्त्व होतें असें निक्षून प्रतिपादन करीत आहे 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' "आत्मा वा इदमेक एवाग्र आसीत्" सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी केवळ एक सत्तत्त्वच होतें सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी हें सर्व आत्माच होतें दुसरें काहीं नव्हतें असें श्रुतीचें म्हणणें आहे प्रशात सागराप्रमाणें निर्विकार असलेल्या आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं सृष्टिकाळात जन्माला येणाऱ्या अनत जीवाचे बीजभूत सस्कार अदृश्य — अव्यक्त अशा स्वरूपात असतात, हें मान्य करावें लागतें सस्काराच्या विविधपणामुळेंच सृष्टीमध्येंहि वैविध्य निर्माण झालें आहे कार्यावरून कारणाचें अनुमान करणें हें सर्व शास्त्रज्ञाना मान्य आहे

यावर कोणी असें विचारील कीं, सृष्टिकाळांत जन्माला येणाऱ्या जीवांचें बीजभूत सूक्ष्म संस्कार जर आत्मस्वरूपांत होते, तर मग जग उत्पन्न होण्याच्या पूर्वी आत्माच होता, दुसरें कांहीं नव्हतें असें कसें श्रुतीनें म्हटलें? याचें उत्तर असें कीं, ते बीजभूत संस्कार इतके सूक्ष्म असतात कीं, आत्मस्वरूपाहून त्यांचें निराळें अस्तित्व प्रतीतीलाच येत नाहीं. म्हणून सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी केवळ एक आत्माच होता असें म्हटलें आहे. उदाहरणाकरितां वट-बीजच घ्या- वट-बीजाचें अगदीं सूक्ष्मदर्शक यंत्रानेंहि निरीक्षण करून पाहिलें, तरी तेथें कांहींच प्रतीतीला येत नाहीं ना मुळें, ना फळें, ना खोड, ना फांद्या, ना पानें, ना पारंब्या! अशी त्या बीजाची अवस्था असते. अशा अवस्थेंत 'बीजमात्रं आसीत्'. असेंच आपण म्हणतों. खोड, फांद्या, पानें, पारंब्या इत्यादिकांचे संस्कार बीजा' मध्यें नसते, तर त्यांची बीजातून उत्पत्तीच झाली नसती पण ते बीजभूत संस्कार इतके सूक्ष्म असतात कीं, कितीहि निरीक्षण करून पाहिलें तरी त्यांची बीजाहून निराळी प्रतीति येतच नाहीं म्हणून वटवृक्ष निर्माण होण्याच्या पूर्वी 'बीजमात्र आसीत्' हें म्हणणें बरोबरच आहे. त्याचप्रमाणें सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी आत्मस्वरूपाव्यतिरिक्त कशाचीच प्रतीति येत नसल्यामुळें "आत्मै- वेद -- आसीत्" हें सर्व विविध रूपानें प्रतीतीला येणार जग आत्माच होतें हें श्रुतीचें म्हणणें अगदीं बरोबर आहे शिवाय गुरुकृपेनें -- ईश्वरकृपेनें आत्म- स्वरूपाचा साक्षात्कार झाल्यावर त्या बीजभूत संस्कारांचाहि बाध होतो व केवळ आत्मतत्त्वच शिल्लक रहातें. म्हणून 'सदेव सोम्येदमग्र आसीत्', 'आत्मैवेदं सर्वम्' सृष्टि उत्पन्न होण्यापूर्वी हें सर्व सत्स्वरूपच होतें. हें सर्व आत्माच आहे. इत्यादि श्रुतीनें केलेलें वर्णन अगदीं बरोबर आहे. तात्पर्य, जगाच्या उत्पत्तीच्या बाबतींत इतर पक्ष हे श्रुतिप्रमाणाशीं विरुद्ध असल्यामुळें आदरणीय नाहींत, तसेंच तर्काच्या कसोटीलाहि ते पक्ष टिकत नाहींत हेंहि लक्षांत घेण्यासारखें आहे.

नैयायिकांचे परमाणु काय किंवा सांख्यांची प्रकृति काय, दोन्ही जडच असल्यामुळें ते सृष्टीचें मूळकारण होऊं शकत नाहींत. परमाणु किंवा प्रकृति यांचाहि सृष्टीमध्येंच अंतर्भाव असल्यामुळें त्यांना कोणी उत्पन्न केलें? हा प्रश्न शिल्लक रहातोच. यावर कोणी असें म्हणेल कीं, अहो! परमाणु किंवा प्रकृति हे नित्य आहेत. त्यांच्या उत्पत्तीचा प्रश्नच संभवत नाहीं. यावर उत्तर असें कीं, या जगांत आत्मस्वरूपाशिवाय नित्य असें दुसरें कांहींच नाहीं. म्हणूनच

' नित्यं विज्ञानमानन्दं ब्रह्म ' असें आत्मस्वरूपाचें वर्णन केलेलें आहे. आत्म्याची नित्यता ही निरपेक्ष आहे. परमाणु प्रकृति वगैरे पदार्थांची नित्यता ही सापेक्ष आहे. स्थूल पदार्थांच्या मानानें सूक्ष्म पदार्थांचें अस्तित्व अधिक काळ असतें म्हणून त्यांना नित्य असें म्हटलें जातें. तात्पर्य, आत्माच खरा नित्य आहे व तोच सर्व जगाचें कारण आहे.

परमाणु किंवा प्रकृति स्वभावतःच जड असल्यामुळें सृष्टीचें ते कारण होऊ शकत नाहींत; त्या जडांना कार्यप्रवण करणारा — प्रेरक — कोणी तरी चेतन मानावाच लागतो. चेतनाच्या प्रेरणेशिवाय जड हें कांहींच कार्य करूं शकत नसतें. शिवाय नैयायिकांचे परमाणु हे निरवयव असतात. निरवयव अशा दोन द्रव्यांचा संयोग उपपन्न होत नाहीं. म्हणून परमाणूंच्या संयोगानें जग उत्पन्न होतें हें म्हणणें बरोबर नाहीं. परमाणु-परमाणूंचा संयोग होतो असें गृहीत धरलें, तरी परमाणु हे जड असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं हालचाल झाल्याशिवाय त्यांचा संयोग कसा घडून येणार ? तेव्हां परमाणूंचा संयोग होण्यासाठीं त्यांना प्रेरणा देणारा कोणी तरी चेतन मानावाच लागणार. त्या चेतनापासूनच जर सर्व विश्वाच्या उत्पत्तीची उपपत्ति लागत असेल, तर मग परमाणु हे जगाचें मूळकारण आहेत या म्हणण्याला काहीं अर्थ रहात नाहीं.

सांख्यांच्या प्रकृतीचीहि हीच स्थिति आहे. सांख्यांची त्रिगुणात्मक प्रकृति ही जडच असल्यामुळें तिलाहि कार्यप्रवण करणारा कोणी तरी चेतन मानायलाच पाहिजे. अशा रीतीनें जगाच्या मुळाशीं असलेलें चेतन तत्त्वच या जगाचें मूळकारण होऊं शकतें. निसर्ग किंवा काळ हेंच या जगाचें मूळकारण आहेत असें म्हणणाऱ्यांचा पक्षहि वर निर्दिष्ट केलेल्या युक्तिवादानेंच खंडित होतो तेहि स्वभावतः अचेतन असल्यामुळें सृष्टि निर्माण करूं शकत नाहींत. याप्रमाणें आरंभवाद, परिणामवाद, निसर्गवाद आणि कालवाद हे सर्वच वाद विश्वाच्या उत्पत्तीची उपपत्ति लावतांना लंगडे पडतात.

आमच्या मतें सर्व सृष्टीच्या मुळाशीं असलेलें चेतन तत्त्व म्हणजे आत्मा हाच आपल्या अनिर्वचनीय मायाशक्तीनें आपल्याच ठिकाणीं सर्व जग निर्माण करतो. अनिर्वचनीय मायाशक्तीनें विशिष्ट असलेला आत्मा हाच या जगाचें उपादानकारण आहे व निमित्तकारणहि तोच आहे. आणि म्हणूनच मायेच्या ठिकाणीं असलेले सत्त्व, रज आणि तम हे तीन गुण विश्वांतील सर्व पदार्थांत

श्रीदक्षिणामूर्ति



मौनव्याख्याप्रकटितपरब्रह्मतत्त्वं युवानं
वर्षिष्ठान्तेवसदृषिगणैरावृतं ब्रह्मनिष्ठैः ।
आचार्येन्द्रं करकलितचिन्मुद्रमानन्दरूपं
स्वात्मारामं मुदितवदनं दक्षिणामूर्तिमीडे ॥

## श्रीबालात्रिपुरसुंदरीसहित श्रीदक्षिणामूर्ति



स्फटिकरजतवर्णं मौक्तिकीमक्षमाला
ममृतकलशविद्यां ज्ञानमुद्रां कराग्रे ।
दधतमुरगकक्षं चन्द्रचूडं त्रिनेत्रं
विधृतविविधभूषं दक्षिणामूर्तिमीडे ॥

कमीअधिक प्रमाणात भरलेले दिसतात आणि आत्मस्वरूप असलेली सत्ता चैतन्य आणि आनंद यांचीहि पण विश्वातील सर्व पदार्थांत व्याप्ति आहेच आत्मस्वरूपाच्या साक्षात्कारानें मायेचा निरास झाला कीं, विश्वाचें त्रैगुण्य मावळतें आणि शिल्लक राहिलेली आत्मस्वरूपाची सत्ता, चैतन्य आणि आनंद हेच विश्वामध्यें सर्वत्र प्रतीतीला येतात यामुळें त्या तत्त्ववेत्त्या थोर पुरुषाचा अवघाच संसार सुखाचा होतो व त्रैलोक्य त्याला आनंदाचें वाटू लागतें

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, अहो! उपादानकारण आणि निमित्तकारण हीं परस्पर भिन्न असतात घटाचें उपादानकारण मृत्तिका आहे, तर निमित्तकारण कुंभार आहे पटाचें उपादानकारण तंतु आहेत, तर निमित्त कारण कोष्टी आहे अलंकाराचें उपादानकारण सोनें आहे, तर निमित्तकारण सोनार आहे या सर्व उदाहरणांवरून प्रत्येक कार्याचें उपादानकारण आणि निमित्तकारण हीं परस्पर भिन्न असतात तीं एक असू शकत नाहींत असें दिसतें मग आत्मा हा एकटाच या जगाचें उपादानकारणहि आहे आणि निमित्तकारणहि आहे असें कसें म्हणता येईल? यावर उत्तर असें कीं अनेक ठिकाणीं उपादानकारण आणि निमित्तकारण हीं जरी परस्पर भिन्न असलेलीं पहावयास सांपडतात, तरी सर्वच ठिकाणीं तीं परस्पर भिन्नच असायला पाहिजेत असा नियम नाहीं उदाहरणाकरितां एखादी गवतावरची अथवा झाडावरची मळूच्या आकाराची अळी पहा झाडावरून तिचा जेव्हां तोल जातो तेव्हां ती खालीं पडते पण जमिनीवर आदळत नाहीं ती चटकन् आपल्या तोंडांतून एक धागा – तंतु – निर्माण करते व त्या धाग्याच्या आधारानें लोंबत रहाते हळूहळू तो धागा आपल्याच देहांत आवरून ती आपल्या विवक्षित ठिकाणाला जाऊन पोहोंचते, असें आपण पहात असतों त्या धाग्याचा त्या अळीनें आधार घेतलेला असतो त्या धाग्याचें उपादानकारण ती अळीच आहे आणि निमित्त कारणहि पण तीच आहे तीच तो धागा निर्माण करते व ती आपल्यापासूनच निर्माण करते या उदाहरणावरून उपादानकारण आणि निमित्तकारण हीं एकमेकांहून भिन्न असायला पाहिजेत असा नियम दिसत नाहीं म्हणून उपादानकारण आणि निमित्तकारण हीं एकमेकांहून भिन्न असलीं पाहिजेत अशी शंका घेण्याचें कांहीं कारण नाहीं तात्पर्य, आत्मा हाच या विश्वाचें उपादानकारणहि आहे आणि निमित्तकारणहि आहे हाच सिद्धान्त खरा ठरतो वराल उदाहरणांतली अळी

चैतन्यशक्तीच्या द्वारा त्या धाग्याचें निमित्तकारण बनते व देहरूपी उपाधि शक्तीच्या द्वारा उपादानकारण बनते त्याचप्रमाणें आत्माहि चैतन्यद्वारा जगाचें निमित्तकारण बनतो व मायारूपी उपाधिशक्तीच्या द्वारा उपादानकारणहि बनतो ही सर्व उपपत्ति अद्वैत तत्त्वज्ञानात जशी लागते तशी ती इतर मतात लागत नाहीं

जें ज्याच्यातून उत्पन्न होत असतें तें त्याच्यातच लीन होत असतें असा सामान्य नियम आहे मृत्तिकेंतून निर्माण होणारे घटादि पदार्थ किंवा मातीची चित्रें हीं मृत्तिकेंतच लीन होतात व शेवटीं मृत्तिकाच शिल्लक उरते सोन्यातून निर्माण होणारे अलंकार सोन्यातच लीन होतात व शेवटीं सोनेंच शिल्लक रहातें त्याचप्रमाणें आत्म्यापासून निर्माण होणारें जग आत्म्यातच लीन होतें व शेवटीं आत्माच शिल्लक रहातो जग उत्पन्न होण्याच्या पूर्वी आत्मा एकटाच होता जगाचा लय झाल्यानंतरहि तो एकटाच शिल्लक रहातो तेव्हा मधल्याच काळात आत्म्याच्या ठिकाणीं मायेनें प्रतीतीला येणारें जग केवळ मायिक प्रातीतिक अथवा काल्पनिक आहे असेंच म्हणावें लागतें या कल्पनेलाच आभास किंवा विवर्त असेंहि म्हणतात म्हणूनच वेदांताला अभिमत असलेल्या या प्रक्रियेला आभासवाद किंवा विवर्तवाद असें म्हटलें जातें तात्पर्य, आत्माच सर्व जग उत्पन्न करतो व तो आपल्याच ठिकाणीं करतो हीच गोष्ट या स्तोत्राच्या दुसऱ्या श्लोकात दृष्टांत देऊन स्पष्ट केलेली आहे

'इदम्' म्हणजे हें सर्व प्रतीतीला येणारें जग 'प्राक्' म्हणजे सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी बीजामध्यें असलेल्या अंकुरादिकाप्रमाणें 'निर्विकल्पम्' म्हणजे भेदरहित होतें सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी द्रष्टा, दृश्य, भोक्ता, भोग्य, स्त्रीपुरुष, पशुपक्षी, वृक्षलता इत्यादि कोणत्याहि प्रकारचा विकल्प म्हणजे भेद नव्हता सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी केवळ आत्माच होता तो आत्माच या सर्व सृष्टीचें अधिष्ठान होय उदाहरणाकरिता वर उल्लेखिलेलें वट-बीजच घ्या किती सूक्ष्म असतें तें! खसखशीपेक्षाहि बारीक तें बीज आपण फोडून पाहिल्यावर त्यात आपल्याला काहीं दिसून येत नाहीं पण त्याच बीजातून अफाट वृक्षाचा पसारा अभिव्यक्त होतो वृक्ष उत्पन्न होण्याच्या पूर्वी बीजामध्यें कोणत्याहि प्रकारचा विकल्प — मूळ, खोड, फांदी, पालवी इत्यादि प्रकारचा भेद दिसून येत नाहीं वृक्ष जसा उत्पन्न होण्यापूर्वी बीजामध्यें निर्विकल्पस्वरूप होता त्याचप्रमाणें जग हें उत्पन्न होण्यापूर्वी आत्मस्वरूपामध्यें निर्विकल्प म्हणजे भेदरहित होतें बीजांकुराचा

दृष्टान्त फक्त जग हें उत्पन्न होण्यापूर्वी आत्मस्वरूपात निर्विकल्प म्हणजे भेदरहित होतें येवढेंच सांगण्यापुरता आहे.

प्रलयकाळीं अव्यक्तस्वरूपांत असलेले अनंत प्राण्यांचे सूक्ष्म संस्कार जेव्हां फलोन्मुख होतात तेव्हां प्रशान्त महासागराप्रमाणें केवळ चित्स्वरूप असलेल्या आत्म्याच्या ठिकाणीं संकल्पाचा तरंग निर्माण होतो, 'तदैक्षत' आत्मस्वरूपामध्यें विचाराचें स्फुरण होतें 'बहु स्यां प्रजायेय' मी बहुरूप व्हावें, मी जन्माला यावें, हाच तो संकल्प होय कोणी म्हणेल, या संकल्पात्मक विकारानें निर्विकार असलेला आत्मा विकारी नाहीं का होत ? यावर उत्तर असें कीं, हा संकल्पात्मक विकार देखील कल्पितच असल्यामुळें आत्म्याच्या निर्विकारपणाला बाध येत नाहीं हा संकल्प कोणी कल्पिला व कोठें कल्पिला ? असा प्रश्न केल्यास मायेनें कल्पिला व आत्म्याच्या ठिकाणीं कल्पिला असेंच परिणामावरून उत्तर द्यावें लागतें ही माया कोठून आली, केव्हां आली व कशी आली ? हें कांहीं सांगतां येत नाहीं ती अनिर्वचनीय आहे आहे मात्र खास !

'मायाकल्पितदेशकालकलनावैचित्र्यचित्रीकृतम्' आत्म्याच्या ठिकाणीं अधिष्ठित असलेल्या मायेनें प्रथम आत्म्याच्या ठिकाणीं देशाची व कालाची कल्पना केली 'देशकालकलना' म्हणजे देश आणि काल यांचा संबंध देश आणि काल यांच्या संबंधाच्या वैचित्र्यामुळेंच आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं विविधाकार विश्व अभिव्यक्त झालें तात्पर्य, त्रिगुणात्मक मायाशक्तिविशिष्ट आत्माच या विश्वाचें कारण होय विविधाकार विश्वाला अभिव्यक्त करणारा जो मायाशक्तिविशिष्ट आत्मा, त्यालाच ईश्वर असें म्हणतात

कोणी असें विचारील कीं, कुंभाराला घट निर्माण करतांना दंड, चक्र, मृत्तिका वगैरे बाह्य साधनें लागतात ईश्वरानें जग निर्माण करतांना कोणतीं बाह्य साधनें घेतलीं ? यावर उत्तर असें कीं, कुंभाराची शक्ति परिमित असल्यामुळें त्याला घटादि कार्ये निर्माण करतांना बाह्य साधनांची गरज लागते, पण ईश्वराचें तसें नाहीं अघटित घटना घडवून आणण्यात अत्यंत चतुर असलेली अनादि अनिर्वचनीय माया ही त्याची शक्ति आहे तिच्यामुळें तो 'कर्तुं अकर्तुं अन्यथाकर्तुं समर्थ' असा आहे त्याला कार्य निर्माण करतांना बाह्य साधनांची गरज लागत नाहीं आपल्या इच्छेनेंच तो सर्व कांहीं करू शकतो हाच अभिप्राय या श्लोकाच्या तिसऱ्या चरणात दृष्टान्त देऊन सांगितला आहे

'मायावीव विजृम्भयत्यपि महायोगीव य स्वेच्छया' आपल्या विद्येत निष्णात असलेला एखादा गारुडी किंवा जादूगार जसा मणिमन्त्रादिकांच्या साहाय्यानें आपल्या इच्छेप्रमाणें खेळातील पदार्थ निर्माण करून दाखवितो त्याचप्रमाणें ईश्वरहि आपल्या इच्छेप्रमाणें विश्वातील पदार्थ निर्माण करू शकतो विश्वामित्रासारखे महायोगी देखील आपल्या सकल्पबलानें प्रतिसृष्टि निर्माण करू शकतात, हें आपण पौराणिक इतिहासावरून जाणतोंच अलीकडच्या काळातील उदाहरण द्यावयाचें झाल्यास तें श्रीज्ञानेश्वर महाराजाचें देता येईल वाघावर बसून आपल्या भेटीस येणाऱ्या चागदेवाला सामोरे जाताना श्रीज्ञानेश्वर महाराजानीं आपल्या योगबलानें जड भिंत नाहीं का चालविली ? कोणी म्हणेल, श्रीज्ञानेश्वर महाराजानीं जड भिंत चालविली याला प्रमाण काय ? तर ज्या चाग देवासाठीं हा प्रसग घडून आला त्या चागदेवाचेच शब्द या बाबतींत प्रमाण आहेत चागदेवाचे शब्द खरे कशावरून ? असा जर कोणी आक्षेप घेईल, तर त्याला सर्व इतिहासालाच तिलाजलि द्यावा लागेल तेव्हा एखादा योगी महा-योगी जर आपल्या सकल्पबलानें एवढें कार्य करू शकतो, तर योग्याचा योगी योगेश्वर भगवान् श्रीहरि काय करू शकणार नाहीं ? तात्पर्य, एखाद्या जादूगारा प्रमाणें किंवा महायोग्याप्रमाणें परमात्मा देखील आपल्या इच्छेनें, सकल्पबलानें सर्व जग निर्माण करू शकतो यात तिळमात्र सशय नाहीं स्वसकल्पबलानें आपल्या ठिकाणीं सर्व विश्व निर्माण करणारा असा जो सच्चिदानदघन परमात्मा भगवान् श्रीशकर सद्गुरु दक्षिणामूर्ति, त्याना हा माझा नमस्कार असो

यस्यैव स्फुरणं सदात्मकमसत्कल्पार्थगं भासते
साक्षात्तत्त्वमसीति वेदवचसा यो बोधयत्याश्रितान् ।
यत्साक्षात्करणाद्भवेन्न पुनरावृत्तिर्भवाम्भोनिधौ
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ३ ॥

असत्तुल्य असलेल्या विश्वातील सर्व पदार्थांमध्यें ज्याचें सद्रूप स्फुरण प्रतीतीला येतें, 'तत्त्वमसि' 'अयमात्मा ब्रह्म' इत्यादि श्रुतिवाक्यांनीं जो आश्रि ताना – भक्ताना अपरोक्ष साक्षात्कार करून देतो, ज्याचा साक्षात्कार झाला असता जीवाना ससारसागरात पुन्हा सापडण्याची पाळी येत नाहीं, त्या दक्षिणामूर्ति भगवान् श्रीगुरूला माझा हा नमस्कार असो

मागच्या श्लोकांत सत्तत्त्व म्हणजे आत्मा हाच जगाचें मूळकारण आहे असें सांगितलें. यावर शंका अशी कीं, सत्तत्त्वापासून जग उत्पन्न झाल्याचें दिसत नाहीं बीजांचा विध्वंस होतो व त्यांतूनच वृक्ष-लता इत्यादिकांचा जन्म होतो. मृत्पिंडाचा नाश होतो व त्यांतूनच घट, रांजण वगैरे पदार्थ तयार होतात, यावरून अभावांतून भाव पदार्थांची उत्पत्ति होते असें दिसतें. श्रुति देखील सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी कांहीं नव्हतें असेंच सांगते. 'असद्वा इदमग्र आसीत्' सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी हें सर्व असत् होतें, त्या असतांतूनच हें सर्व सत्स्वरूपानें दिसणारें जग उत्पन्न झालें. यालाच असद्वाद असें म्हणतात. तो बौद्धांना अभिप्रेत आहे, पण हें बौद्धांचें म्हणणें बरोबर नाहीं. असतांतून सताची अथवा अभावांतून भाव-पदार्थांची उत्पत्ति होते असें जर मानलें, तर घट-पटादि सर्व भाव-पदार्थांमध्यें अभावाची अनुवृत्ति म्हणजे अभावाचा संबंध दिसून आला असता. मातीपासून निर्माण होणाऱ्या सर्व पदार्थांत मातीचा संबंध दिसून येतो. मातीचा घट, मातीचा रांजण, मातीचें मडकें असें आपण म्हणत असतों. सोन्याचें कडें, सोन्याची आंगठी, सोन्याच्या बांगड्या, सोन्याचा सर अशा रीतीनें सोन्यापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व पदार्थांत सोन्याचा संबंध दिसून येतो. यालाच अनुवृत्ति असें म्हणतात.

अभावांतून जग उत्पन्न झालें असतें, तर जगांतील सर्व पदार्थांत अभावाची अनुवृत्ति दिसून आली असती. घट-अभाव पट-अभाव असें कांहीं तरी प्रत्ययाला आलें असतें. पण याच्या उलटच सर्वांचा अनुभव आहे. घट आहे. पट आहे. हत्ती आहे घोडा आहे. असेंच आपण म्हणत असतों. याप्रमाणें आहे म्हणजे अस्ति म्हणजेच सत्ता सर्वत्र प्रतीतीला येते, सत्तेचीच सर्वत्र अनुवृत्ति दिसते यावरून उत्पन्न होणाऱ्या सर्व पदार्थांमध्यें सत्तत्त्व भरलेलें आहे असेंच सिद्ध होतें. म्हणून सत्तत्त्वांतूनच विश्वांतील सर्व पदार्थांची उत्पत्ति झाली आहे हेंच म्हणणें बरोबर आहे.

'असदेवेदमग्र आसीत्' सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी हें सर्व असत् होतें असें जें श्रुतिवाक्य, असत्कारणवादाचें प्रमाण म्हणून वर दिलें आहे, त्याचा अर्थ येवढाच कीं, हें सर्व जग उत्पन्न होण्याच्या पूर्वी 'असत्' म्हणजे न दिसणारें अव्यक्त अशा स्वरूपांत होतें. अव्यक्त होतें याचा अर्थ तें नव्हतें असा नाहीं, तर तें कारणरूप असलेल्या आत्मतत्त्वामध्यें — सत्तत्त्वामध्ये विलीन

'मायावीव विजृम्भयत्यपि महायोगीव यः स्वेच्छया' आपल्या विद्येंत निष्णात असलेला एखादा गारुडी किंवा जादूगार जसा मणिमंत्रादिकांच्या साहाय्यानें आपल्या इच्छेप्रमाणें खेळांतील पदार्थ निर्माण करून दाखवितो त्याचप्रमाणें ईश्वरहि आपल्या इच्छेप्रमाणें विश्वांतील पदार्थ निर्माण करूं शकतो विश्वामित्रासारखे महायोगी देखील आपल्या सकल्पबलानें प्रतिसृष्टि निर्माण करूं शकतात, हें आपण पौराणिक इतिहासावरून जाणतोंच अलीकडच्या काळांतील उदाहरण द्यावयाचें झाल्यास तें श्रीज्ञानेश्वर महाराजांचें देता येईल वाघावर बसून आपल्या भेटीस येणाऱ्या चांगदेवाला सामोरें जातांना श्रीज्ञानेश्वर महाराजांनी आपल्या योगबलानें जड भिंत नाहीं का चालविली ! कोणी म्हणेल, श्रीज्ञानेश्वर महाराजांनी जड भिंत चालविली याला प्रमाण काय ! तर ज्या चांगदेवासाठीं हा प्रसंग घडून आला त्या चांगदेवाचेच शब्द या बाबतींत प्रमाण आहेत चांगदेवाचे शब्द खरे कशावरून ! असा जर कोणी आक्षेप घेईल, तरें त्याला सर्व इतिहासालाच तिलांजलि द्यावी लागेल तेव्हां एखादा योगी महा-योगी जर आपल्या सकल्पबलानें येवढें कार्य करूं शकतो, तर योग्याचा योगी योगेश्वर भगवान् श्रीहरि काय करूं शकणार नाहीं ! तात्पर्य, एखाद्या जादूगाराप्रमाणें किंवा महायोग्याप्रमाणें परमात्मा देखील आपल्या इच्छेनें, सकल्पबलानें सर्व जग निर्माण करूं शकतो यांत तिळमात्र संशय नाहीं स्वसकल्पबलानें आपल्या ठिकाणीं सर्व विश्व निर्माण करणारा असा जो सच्चिदानंदघन परमात्मा भगवान् श्रीशंकर सद्गुरु दक्षिणामूर्ति, त्यांना हा माझा नमस्कार असो

> यस्यैव स्फुरणं सदात्मकमसत्कल्पार्थगं भासते
> साक्षात्तत्त्वमसीति वेदवचसा यो बोधयत्याश्रितान् ।
> यत्साक्षात्करणाद्भवेन्न पुनरावृत्तिर्भवाम्भोनिधौ
> तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ३ ॥

*असत्तुल्य असलेल्या विश्वांतील सर्व पदार्थांमध्यें ज्याचें सद्रूप स्फुरण प्रतीतीला येतें, 'तत्त्वमसि' 'अयमात्मा ब्रह्म' इत्यादि श्रुतिवाक्यांनीं जो आश्रितांना — भक्तांना अपरोक्ष साक्षात्कार करून देतो, ज्याचा साक्षात्कार झाला असतां जीवांना ससारसागरांत पुन्हा सापडण्याची पाळी येत नाहीं, त्या दक्षिणामूर्ति भगवान् श्रीगुरूंना माझा हा नमस्कार असो*

मागच्या श्लोकांत सत्तत्त्व म्हणजे आत्मा हाच जगाचें मूळकारण आहे असें सांगितलें. यावर शंका अशी की, सत्तत्त्वापासून जग उत्पन्न झाल्याचें दिसत नाहीं. बीजांचा विध्वंस होतो व त्यांतूनच वृक्ष-लता इत्यादिकांचा जन्म होतो. मृत्पिंडाचा नाश होतो व त्यांतूनच घट, रांजण वगैरे पदार्थ तयार होतात. यावरून अभावांतून भाव पदार्थांची उत्पत्ति होतें असें दिसतें. श्रुति देखील सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी कांहीं नव्हतें असेंच सांगते. 'असद्वा इदमग्र आसीत्' सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी हें सर्व असत् होतें. त्या असतांतूनच हें सर्व सत्स्वरूपानें दिसणारें जग उत्पन्न झालें. यालाच असद्वाद असें म्हणतात. तो बौद्धांना अभिमेत आहे, पण हें बौद्धांचें म्हणणें बरोबर नाहीं. असतांतून सताची अथवा अभावांतून भाव-पदार्थांची उत्पत्ति होते असें जर मानलें, तर घट-पटादि सर्व भाव-पदार्थांमध्यें अभावाची अनुवृत्ति म्हणजे अभावाचा संबंध दिसून आला असता. मातीपासून निर्माण होणाऱ्या सर्व पदार्थांत मातीचा संबंध दिसून येतो. मातीचा घट, मातीचा रांजण, मातीचें मडकें असें आपण म्हणत असतों. सोन्याचें कडें, सोन्याची आंगठी, सोन्याच्या बांगड्या, सोन्याचा सर अशा रीतीनें सोन्यापासून उत्पन्न होणाऱ्या सर्व पदार्थांत सोन्याचा संबंध दिसून येतो. यालाच अनुवृत्ति असें म्हणतात.

अभावांतून जग उत्पन्न झालें असतें, तर जगांतील सर्व पदार्थांत अभावाची अनुवृत्ति दिसून आली असती. घट-अभाव पट-अभाव असें कांहीं तरी प्रत्ययाला आलें असतें. पण याच्या उलटच सर्वांचा अनुभव आहे. घट आहे पट आहे. हत्ती आहे. घोडा आहे. असेंच आपण म्हणत असतों. याप्रमाणें आहे म्हणजे अस्ति म्हणजेच सत्ता सर्वत्र प्रतीतीला येते. सत्तेचीच सर्वत्र अनुवृत्ति दिसते यावरून उत्पन्न होणाऱ्या सर्व पदार्थांमध्यें सत्तत्त्व भरलेलें आहे असेंच सिद्ध होतें. म्हणून सत्तत्त्वांतूनच विश्वांतील सर्व पदार्थांची उत्पत्ति झाली आहे हेंच म्हणणें बरोबर आहे.

'असदेवेदमग्र आसीत्' सृष्टि उत्पन्न होण्याच्या पूर्वी हें सर्व असत् होतें असें जें श्रुतिवाक्य, असत्कारणवादाचें प्रमाण म्हणून वर दिलें आहे, त्याचा अर्थ येवढाच की, हें सर्व जग उत्पन्न होण्याच्या पूर्वी 'असत्' म्हणजे न दिसणारें अव्यक्त अशा स्वरूपांत होतें. अव्यक्त होतें याचा अर्थ तें नव्हतें असा नाहीं, तर तें कारणरूप असलेल्या आत्मतत्त्वामध्यें — सत्तत्त्वामध्य विलीन

झालेलें होतें असा समजावा. सत्त्वाहून त्याची निराळी सत्ता प्रतीतीला येत नाहीं म्हणूनच श्रुति 'सदेव सोम्येदमग्र आसीत्' जग उत्पन्न होण्याच्या पूर्वी हें सर्व सत्स्वरूपच होतें, असें प्रतिपादन करीत आहे अशाच अर्थाचे विचार श्रुतीमध्यें सर्वत्र पहावयास सापडतात

आहे आहे आहे या शब्दानीं सत्ता जशी सर्वत्र प्रतीतीला येते, त्याचप्रमाणें 'स्फुरण' म्हणजे चैतन्य यांचीहि पण सर्वत्र अनुवृत्ति असतेच कोणत्याहि वस्तूबद्दल 'आहे' अशी प्रतीति येणें यातच सत्ता आणि स्फुरण या दोहोंचाहि समावेश आहे 'आहे' या अशानें सत्ता व प्रतीति या अशानें 'स्फुरण' म्हणजे भान अथवा ज्ञान होत असतें, तेंच चैतन्य होय. चैतन्य म्हणजे जाणीव स्फुरण, ज्ञान किंवा भान असाच चैतन्य शब्दाचा अर्थ आहे सामान्य व्यवहारामध्यें हालचाल किंवा क्रियाशक्ति असली म्हणजे चैतन्य आहे असें समजतात पण तें बरोबर नव्हे हालचाल किंवा क्रियाशक्ति ही सामान्यत ज्ञानमूलक असल्यामुळें ज्ञान हाच चैतन्य शब्दाचा खरा अर्थ होय

सत्ता आणि चैतन्य हे समव्याप्त आहेत जेथें जेथें सत्ता असते तेथें तेथें चैतन्य – स्फुरण हें असतेंच, चैतन्य, स्फुरण, प्रकाश, ज्ञान, भान हे सर्व एकाच अर्थाचे शब्द आहेत समव्याप्त पदार्थामध्यें भेद नसतो बलवत्तर बाधक प्रमाण नसेल तर समव्याप्त पदार्थ हे एकरूपच असतात कोणतीहि वस्तु आस्ति म्हणून जेव्हा प्रतीतीला येते तेव्हा सत्ता आणि स्फुरण या दोन्ही गोष्टी बरोबरच सिद्ध होतात यावर कोणी असें विचारील कीं, पदार्थाची सत्ता असली म्हणजे स्फुरण असलेंच पाहिजे असा कोठें नियम आहे? पुष्कळ पदार्थ जगात असतात म्हणजे त्याचें अस्तित्व असतें, पण त्या सर्वांचें आम्हाला स्फुरण कोठें असतें? यावर उत्तर असें कीं, आम्हाला जरी त्या पदार्थाचें स्फुरण नसलें, तरी तें कोणाला न कोणाला तरी असतेंच अखेर सर्वज्ञ परमेश्वराच्या स्फुरणाचा तर सर्वत्र निराबाध संबध आहेच तेव्हा सत्ता आणि स्फुरण सर्व पदार्थांत अनुवृत्त आहेत यात शकाच नाहीं

यावर कोणी असें विचारील कीं, जड पदार्थाची सत्ता म्हणजे अस्तित्व हें त्या जड पदार्थाच्या ठिकाणीं असतें व स्फुरण हें ते जड पदार्थ ज्याला कळतात त्याच्या ठिकाणीं असतें सत्ता आणि स्फुरण याच्यामध्यें सामानाधिकरण्यच नाहीं, मग समव्याप्ति कोठून असणार? यावर उत्तर असें कीं, जड

पदार्थाचें जें स्फुरण होतें तें त्या जड पदार्थांच्या ठिकाणीं असतें म्हणूनच होतें. जड पदार्थांच्या ठिकाणी जर स्फुरण नसतें, तर तें कधींच कोणाला झालें नसतें. ज्या अर्थी जड पदार्थांचेंहि स्फुरण होतें त्या अर्थी तें त्या पदार्थांत असलेंच पाहिजे.

यावर कोणी असें विचारील कीं, अहो! घटादि जड पदार्थांमध्यें जर स्फुरण असेल, तर 'अहं घटं जानामि' मी घट जाणतों असें ज्याप्रमाणें आपल्या प्रतीतीला येतें त्याचप्रमाणें घटादि जड पदार्थांना देखील 'अहं आत्मानं जानामि' मी स्वतःला जाणतों अशी प्रतीति यावयाला पाहिजे. तशी तर येत नाहीं. मग घटादि जड पदार्थांमध्यें 'स्फुरण' आहे असें कसें म्हणावें? यावर उत्तर असें कीं, 'अहं घटं जानामि' मी घट जाणतों अशी प्रतीति आपल्याला येते त्याचें कारण आपल्याजवळ स्फुरण अभिव्यक्त करण्याकरितां आवश्यक असलेली जी देहेंद्रियादि समुदायस्वरूपाची सामग्री आहे ती सामग्री घटादि जड पदार्थांच्या ठिकाणीं नाहीं. घटादि जड पदार्थांना इंद्रियें नसतात म्हणून त्यांच्या ठिकाणीं 'अहं आत्मानं जानामि' मी स्वतःला जाणतों असें स्फुरण अभिव्यक्त होत नाहीं. तात्पर्य, आत्मस्वरूप असलेली सत्ता म्हणजे अस्तित्व आणि स्फुरण म्हणजे प्रकाश किंवा ज्ञान हीं दोन्हीं समव्याप्त व एकरूप आहेत यांत शंकाच नाहीं.

दुःखें भोगावीं लागतील ही कल्पनाच त्या दुःखाचें कारण होय. आपलें नुकसान झालें, आपल्याला कोण विचारणार ? आपलें कसें होईल ? ह्याच कल्पनेनें मनुष्य दुःख व शोक करीत असतो आपलें कसें होणार व आपल्याला कोण विचारणार ? या कल्पनेच्या मुळाशीं अज्ञानच असतें व तेंच अज्ञान सर्व दुःखाचें व शोकाचें कारण असतें पुत्रमरणानंतर समाचाराला गेले असता एक गृहस्थ म्हणाले, "अहो ! बरें झालें तो माझ्यादेखत गेला त्याच्या प्रकृतींत असे कांहीं दोष होते कीं, माझ्या मरणानंतर त्याचे मोठे हालच झाले असते माझ्या डोळ्यादेखत तो गेल्यामुळें त्याचे पुढचे हाल टळलें यातच मला समाधान वाटतें, ( बापूसाहेब दातार, वाई ) नारदमहर्षींची माता बालपणींच निवर्तली आपली माता निवर्तली हें लक्षात आल्यानंतर नारदानीं बरें झालें आपल्याला संसाराकडे खेंचू पहाणारा एकुलता एक मायेचा पाश तोहि ईश्वरकृपेनें नाहींसा झाला असें म्हणून समाधानच व्यक्त केलें असल्याचें इतिहास सांगत आहे लोकमान्य टिळकांनीं देखील प्लेगानें मुलगा निवर्तल्यानंतर समाचाराला आलेल्या लोकांचें 'सार्वजनिक होळीच्या वेळीं घरोघरच्या गोवऱ्या जातातच ना ? त्यातलाच हा एक प्रकार समजावा' असें म्हणून समाधान केल्याचें प्रसिद्धच आहे. तात्पर्य, शोक-दुःखाचें कारण ज्ञान नसून अज्ञानच आहे याच अज्ञानाला मोह असें म्हणतात या सर्व विवेचनावरून ज्ञान आणि आनंद याची व्याप्ति निराबाध असल्याचेंच सिद्ध होतें

यावर कोणी असें विचारील की, सत्ता आणि स्फुरण हीं सर्वत्र दिसतात त्याप्रमाणें आनंद हा सर्वत्र दिसत नाहीं त्यामुळें सर्व वस्तु सद्रूप आणि चिद्रूप असल्या, तरी त्या आनंदरूप आहेत असें म्हणता येत नाहीं एखादी वस्तु असली तरी तिच्यापासून आनंद होतोच असा नियम नाहीं यावर उत्तर असें कीं, एखादी वस्तु पाहिल्यानंतर जर त्यापासून आपल्याला आनंद होत नसेल तर आपल्याच अंतःकरणांतील त्या वस्तूबद्दलचा द्वेष अथवा उपेक्षावृत्ति हीच त्या आनंदाची प्रतिबंधक होय क्वचित्प्रसंगीं दोषदर्शन देखील आनंदाचें प्रतिबंधक होऊं शकतें एखादी वस्तु पाहून आपल्याला आनंद नाहीं वाटला, तरी तो दुसऱ्या कोणाला तरी वाटत असतोच यावरून प्रत्येक वस्तूमध्यें आनंद असल्याचेंच सिद्ध होतें तात्पर्य, सत्ता, चैतन्य आणि आनंद याची विश्वातील सर्व पदार्थांत अनुवृत्ति आहे यात शंकाच नाहीं

विश्वातील सर्व पदार्थांत ही सत्ता आणि स्फूर्ति त्याचप्रमाणें हा आनंद आला कोठून ? असें कोणी विचारल्यास सृष्टीच्या मुळाशीं असलेल्या आत्मतत्त्वातूनच सृष्टींतील सर्व पदार्थांत सत्ता, चैतन्य आणि आनंद आलेला आहे असेंच म्हणावें लागतें आत्मस्वरूपाव्यतिरिक्त कोणत्याहि पदार्थाला स्वतःसिद्ध सत्ता म्हणजे अस्तित्व नाहीं त्याचप्रमाणें स्वतःसिद्ध स्फुरणहि नाहीं व स्वतःसिद्ध आनंदहि नाहीं सर्व जग आत्मस्वरूपाच्या ठिकाणीं अध्यस्त असल्यामुळें आत्माच सर्व जगाच्या उत्पत्तीचें व प्रतीतीचें कारण होय तात्पर्य, ज्याचें सद्रूप स्फुरण असत्तुल्य असलेल्या आकाश, वायु, पृथ्वी, जल आणि तेज, त्याचप्रमाणें घट पट वृक्ष, लता इत्यादि पदार्थांमध्यें प्रतीतीला येतें तोच आत्मा हाच अभिप्राय या श्लोकाच्या पहिल्या चरणांत व्यक्त केला आहे 'यस्यैव' म्हणजे ज्या आत्म्याचेंच 'सदात्मकं' म्हणजे सत्स्वरूप असलेलें 'स्फुरणं' म्हणजे चैतन्य 'असत्कल्पार्थगं' म्हणजे असत्तुल्य अर्थात् स्वतःसिद्ध सत्तारहित असलेल्या विश्वातील सर्व पदार्थांत 'भासते' म्हणजे प्रतीतीला येतें तो आत्मा परमात्मा श्रीगुरु दक्षिणामूर्ति असा या श्लोकातील पहिल्या चरणाचा अर्थ झाला

'साक्षात्तत्त्वमसीति वेदवचसा यो बोधयत्याश्रितान्' आतां या श्लोकांतील या दुसऱ्या चरणाचा अर्थ पाहू 'यः' म्हणजे जो 'आश्रितान्' म्हणजे जवळ बसलेल्या शिष्यांना — भक्तांना 'तत्त्वमसि इति' म्हणजे तेंच सच्चिदानंद परब्रह्म तूं आहेस अशा, 'वेदवचसा' म्हणजे उपनिषद्वाक्यानें 'साक्षात्' म्हणजे प्रत्यक्ष साक्षात्काररूपानें 'बोधयति' म्हणजे ज्ञान करून देतो तो श्रीगुरु दक्षिणामूर्ति त्यांना माझा नमस्कार

पहिल्या चरणांत वर्णन केल्याप्रमाणें विश्वाचें अधिष्ठान असलेला सच्चिदानंदस्वरूप परमात्मा तोच सद्गुरूच्या रूपानें 'तत्त्वमसि' 'अयमात्मा ब्रह्म' इत्यादि श्रुतिवाक्यांनीं जिज्ञासु भक्तांना स्वस्वरूपाचा साक्षात्कार करून देतो 'तत्त्वमसि' या महावाक्यांत तत्, त्वं आणि असि असे तीन शब्द आहेत 'तत्' शब्दानें सर्वज्ञ सर्वशक्तिमान् परमात्मा 'त्वं' शब्दानें अल्पज्ञ अल्पशक्तिमान् जीव आणि 'असि' या शब्दानें त्याचें सामानाधिकरण्य म्हणजे एकत्व सांगितलें जातें तो परमात्मा तें परब्रह्मच तूं आहेस असा तत् त्वं असि — तत्त्वमसि या महावाक्याचा अर्थ आहे या महावाक्याच्या अर्थाचें बरोबर निःसंदिग्ध ज्ञान झालें की आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो

यावर कोणी असें म्हणेल की, या महावाक्याच्या अर्थाच्या ज्ञानानें आत्म्याचा अपरोक्ष साक्षात्कार कसा होणार ? शब्दार्थज्ञानानें शाब्दबोध होईल. प्रत्यक्ष ज्ञान होणार नाहीं. अपरोक्ष साक्षात्कार म्हणजे प्रत्यक्ष ज्ञान. तें वाक्यार्थज्ञानानें होत नसतें; पण हें म्हणणें बरोबर नाहीं. तत्त्वमसि या महावाक्यार्थाच्या ज्ञानानें प्रथम मी परब्रह्मस्वरूप आहें असें ज्ञान होईल. या ज्ञानाला शब्दज्ञान म्हणा पाहिजे तर. पण या ज्ञानानंतर हें श्रुतिवाक्य आहे, तें पूर्ण सत्य आहे, त्यांत कांहीं खोटें असणें शक्य नाहीं. त्याचा अर्थ सद्गुरूंनी सांगितलेला आहे. तो खोटा असणें शक्य नाहीं. अशा विश्वासानें त्या अर्थाचें मनन होऊं लागतें. पुढें त्याचें निदिध्यासन होत रहातें. मननानें व निदिध्यासनानें अंतःकरणांतील असंभावना आणि विपरीत भावना नाहींशा होतात. अंतःकरण निःसंदिग्ध होतें, निर्दोष होतें, निर्मल होतें. आणि शेवटीं श्रुतिवाक्यानें सांगितल्याप्रमाणें खरोखरच मी परब्रह्मस्वरूप आहें अशी मनाची खात्री होते. या निश्चयाला — दृढबोधालाच आत्मसाक्षात्कार असें म्हणतात. या साक्षात्काराला गुरूंनीं उपदेशिलेलें महावाक्यार्थाचें ज्ञानच कारणीभूत होतें. म्हणून हा आत्मसाक्षात्कार महावाक्यार्थाच्या ज्ञानानें झाला असें म्हणतात.

आतां कोणी अशी शंका घेईल की, 'तत्त्वमसि' या महावाक्यानें जीवात्मा व परमात्मा यांचें ऐक्यज्ञान कसें होईल ? कारण जिवात्मा आणि परमात्मा यांच्यांत फार मोठें अंतर आहे. सर्वज्ञ व सर्वशक्तिमान् असा परमात्मा हा तत्त्वमसि या वाक्यांतील 'तत्' या पदाचा वाच्यार्थ आहे. अल्पज्ञ व अल्पशक्तिमान् जीवात्मा हा 'त्वं' पदाचा वाच्यार्थ आहे. वाच्यार्थ म्हणजे शब्द उच्चारल्याबरोबर तत्काळ प्रतीतीला येणारा त्या शब्दाचा प्रत्यक्ष रूढ असलेला मुख्य अर्थ. 'असि' या शब्दानें जिवात्मा आणि परमात्मा या दोघांचें ऐक्य सांगितलें जातें. पण हें ऐक्य उपपन्न कसें होणार ? आकाश आणि पाताळ यांच्याइतकें महदंतर असलेल्या परस्पर विरुद्ध अशा या दोन आत्म्यांचें ऐक्य कसें असूं शकेल ? तेव्हां हा वाक्यार्थच उपपन्न होऊं शकत नाहीं. पण ही शंका बरोबर नाहीं.

वाक्यांचे अर्थ करतांना बहुतेक शब्दांचे वाच्यार्थ लक्षांत घेऊनच वाक्यार्थ करण्याची पद्धति आहे. पण शब्दांचा केवळ वाच्यार्थ लक्षांत घेऊन अर्थ जर बरोबर जुळत नसेल तर शब्दांचे वाच्यार्थ सोडून लक्ष्यार्थहि घ्यावे

लागतात आणि वाक्यार्थाची उपपत्ति लावावी लागते लक्ष्यार्थ म्हणजे लक्षणेनें होणारा अर्थ शब्दाचा अर्थाशीं जो मुख्य संबंध असतो त्याला शक्ति किंवा रूढि असें म्हणतात. शक्तीनें अथवा रूढीनें शब्दाचा जो अर्थ प्रचलित असेल तोच अर्थ शब्द उच्चारल्याबरोबर प्रथम लक्षात येतो शास्त्रानें एखाद्या शब्दाचा अर्थ जरी निराळा सांगितलेला असला, तरी लोकप्रसिद्ध असलेला अर्थच प्रथम लक्षात येत असतो, म्हणूनच 'शास्त्राद्रूढिर्बलीयसी' हा वाक्प्रचार प्रसिद्ध आहे

शब्दाचा अर्थाशीं जो गौण किंवा औपचारिक संबंध असतो त्याला लक्षणा असें म्हणतात ज्या ठिकाणीं वाक्याचा मुख्य अर्थ उपपन्न होत नसेल त्या ठिकाणीं लक्षणेनें वाक्याचा अर्थ करावा लागतो नदीवर गवळ्याची वसति आहे, पाळण्याला डोळे आले इत्यादि ठिकाणीं लक्षणेनेंच अर्थ केला जातो नदीवर वसति आहे याचा अर्थ नदीच्या काठीं वसति आहे पाळण्याला डोळे आले याचा अर्थ पाळण्यातील मूल जागें झालें, पाहू लागलें असा करतात तो लक्षणेनेंच केला जातो क्वचित्प्रसंगीं व्यजनेनेंहि अर्थ केला जातो शत्रूच्या घरीं जेवायला जाऊ का ? असें एखाद्या हितचिंतकाला विचारलें असता तो सांगतो, ' विष भुङ्क्ष्व ' विष खा आता तो हितचिंतक असल्यामुळें विष खा असें कसें सांगेल ? तेव्हा विष खा असें सांगण्यात शत्रूच्या घरीं जेवायला जाऊ नकोस हेंच त्याच्या सांगण्याचें तात्पर्य असतें व ऐकणाराहि त्याच्या वाक्याचा तोच अर्थ लक्षात घेत असतो वस्तुत ' विष भुङ्क्ष्व ' या वाक्यात जेऊ नकोस या अर्थाचे शब्द नाहीत, तथापि त्या शब्दातून व्यजनेनें हा अर्थ निघतो तात्पर्य, वाक्याच्या अर्थाचें ज्ञान होताना शब्दाचा अर्थ क्वचित् शक्तीनें क्वचित् लक्षणेनें तर क्वचित् व्यजनेनें लक्षात घेतला जातो शक्तीनें शब्दाचा जो अर्थ कळतो त्याला वाच्यार्थ किंवा शक्यार्थ असें म्हणतात. लक्षणेनें जो अर्थ कळतो त्याला लक्ष्यार्थ असें म्हणतात आणि व्यजनेनें जो अर्थ कळतो त्याला व्यग्यार्थ असें म्हणतात

प्रकृतस्थळीं 'तत्त्वमसि' या महावाक्याचा अर्थ करताना त्या वाक्यातील शब्दाचे वाच्यार्थ घेऊन वाक्याच्या अर्थाची उपपत्ति लागत नाहीं म्हणून लक्षणेनें अर्थ करावा लागतो याकरिता आपण आता लक्षणेचा विशेष विचार करू लक्षणा कशाला म्हणतात हें वर सांगितलेंच आहे. लक्षणा तीन प्रकारची

असते. एक जहल्लक्षणा, दुसरी अजहल्लक्षणा आणि तिसरी जहदजहल्लक्षणा जेथें शब्दाचा मुख्य अर्थ अजिबात सोडला जातो व मुख्य अर्थाशीं सलग्न असलेला गौण अर्थ स्वीकारला जातो तेथें जहल्लक्षणा समजतात. उदाहरणार्थ, 'गंगेवर गवळ्याची वसति आहे' या वाक्यात गंगा शब्दाचा मुख्य अर्थ गंगेचा प्रवाह असा आहे पण प्रवाहावर गवळ्याची वसति असूं शकत नाहीं म्हणून गंगा शब्दाचा अर्थ गंगेचा प्रवाह असा न करता प्रवाहाशीं सलग्न असलेलें गंगेचें तीर, गंगेचा काठ असा करतात आणि गंगेच्या काठावर गवळ्याची वसति आहे असा त्या वाक्याचा अर्थ लावतात याला जहल्लक्षणा म्हणतात

जेथें शब्दाचा मुख्य अर्थहि घेतात आणि गौण अर्थहि घेतात. मुख्य आणि गौण दोन्ही अर्थ घेऊन ज्या ठिकाणीं वाक्याचा अर्थ लावतात त्याला अजहल्लक्षणा असें म्हणतात उदाहरणार्थ, बहुसख्येनें छत्रीधारण केलेल्या लोकाचा मेळावा चाललेला पाहून आपण 'छत्रिणो यान्ति' म्हणजे छत्र धारण केलेले लोक चालले आहेत असें म्हणतों या ठिकाणीं छत्र धारण केलेल्या लोकाबरोबर छत्र धारण न केलेले लोकहि चाललेले असतात त्याचाहि पण बोध होत असतो तेव्हा छत्रधारी याचा मुख्य अर्थ छत्र धारण केलेले व गौण अर्थ छत्र धारण न करता छत्र धारण केलेल्या लोकाबरोबर चाललेले हे दोन्ही अर्थ लक्षात घेऊन 'छत्रिणो गच्छन्ति' या ठिकाणीं छत्र धारण केलेले लोक व छत्र धारण न केलेले लोक चालले आहेत असाच अर्थ केला जातो याला अजहल्लक्षणा म्हणतात

तिसरी लक्षणा जहदजहल्लक्षणा होय. उदाहरणार्थ, 'सोऽय देवदत्त' म्हणजे तोच हा देवदत्त किंवा 'तोच हा मनुष्य' असें आपण म्हणतों तो म्हणजे ˈ ˈˈ ˋ हा तरी कोठें तरी पाहिलेला आणि हा म्हणजे आता या वेळीं या ठिकाणीं दिसत असलेला या ठिकाणीं तो मनुष्य कसा असू शकेल ? तो काळ आणि तो देश आता या ठिकाणीं नाहीं व हा काळ आणि हा देश पूर्वी तेथें नव्हता मग तद्देश तत्काल विशिष्ट तो आणि एतद्देश एतत्काल विशिष्ट हा याचें ऐक्य कसें असू शकेल आणि तोच हा असें कसें म्हणता येईल ? तेव्हा तोच हा या ठिकाणीं वाक्याचा अर्थ करताना तो शब्दाच्या अर्थातील तो काळ आणि तो देश सोडून द्यायचा व फक्त व्यक्ति लक्षात घ्यायची

तसेंच हा या शब्दाच्या अर्थातील हा काळ आणि हा देश सोडून द्यायचा व व्यक्ति मात्र लक्षात घ्यायची आणि तीच ही व्यक्ति असा त्या वाक्याचा अर्थ करायचा या ठिकाणीं तो आणि हा या शब्दाच्या अर्थातील विरुद्ध अंश सोडला जातो व अविरुद्ध अंश घेतला जातो म्हणून याला जहदजहल्लक्षणा असें म्हणतात 'जहत्' म्हणजे सोडणें व 'अजहत्' म्हणजे घेणें या लक्षणेंत शब्दाच्या अर्थातील कांहीं अंशाचा त्याग केला जातो म्हणून या प्रकाराला कोणी 'भागत्यागलक्षणा' असेंहि म्हणतात

जहल्लक्षणेंत वाच्यार्थाचा सर्वांशीं त्याग केला जातो व जहदजहल्लक्षणेंत अंशतः त्याग केला जातो असा या दोन लक्षणेंत फरक आहे अजहल्लक्षणेंत वाच्यार्थाच्या बाहेरचाहि अर्थ घेतला जातो तसा तो जहदजहल्लक्षणेंत घेतला जात नाहीं असा या दोन लक्षणेंत फरक आहे

'तत्त्वमसि' या महावाक्यात 'तत्' शब्दाचा अर्थ सर्वज्ञत्व – सर्व शक्तिमत्त्व – विशिष्ट चैतन्य म्हणजे ईश्वर, परमात्मा असा आहे 'त्वं' शब्दाचा अर्थ अल्पज्ञत्व अल्पशक्तिमत्त्व विशिष्ट चैतन्य म्हणजे जीवात्मा असा आहे या ठिकाणीं सर्वज्ञत्व आणि अल्पज्ञत्व तसेंच सर्वशक्तिमत्त्व आणि अल्पशक्तिमत्त्व हे शब्दार्थातील विरुद्ध अंश सोडून द्यायचे व शुद्ध चैतन्य मात्र अर्थ लक्षात घ्यावयाचा अशा रीतीनें परमात्मचैतन्य व जीवचैतन्य याचा अभेद किंवा ऐक्य 'तत्त्वमसि' या महावाक्यानें प्रतिपादिलें जातें अशा रीतीनें 'तत्त्वमसि' हें महावाक्य जीवात्मा व परमात्मा याचें ऐक्यज्ञान करून देतें

आता कोणी असें विचारील कीं, आत्मा एकच आहे तोच सत्य आहे आणि सर्व विश्व असत्य म्हणजे मिथ्या – खोटें असत् आहे असें म्हटलें, तर या विश्वाची प्रतीति येता कामा नये असत् असलेलें शशशृंग कधीं तरी प्रतीतीला येतें का ? यावर उत्तर असें कीं, शशशृंग हें अत्यन्त असत् आहे म्हणून तें प्रतीतीला येऊ शकत नाहीं पण विश्व मात्र अत्यंत असत् नाहीं, त्याला प्रातिभासिक सत्ता आहे किंवा व्यावहारिक सत्ता आहे असेंहि म्हणा पाहिजे तर म्हणून जग हें शशविषाणतुल्य अत्यन्त असत् असें नसतें आत्मसाक्षात्कारानंतर जगाचें सत्यत्व बाधित होतें व अधिष्ठानभूत असा एकच एक आत्मा शिल्लक रहातो म्हणून 'आत्मैवेदं सर्वम्' हाच सिद्धांत खरा होय या आत्म्याचा साक्षात्कार ज्याला झाला तो ब्रह्मरूप होतो त्याला पुन्हा संसारा-

मध्यें भटकण्याची पाळी येत नाहीं. 'ब्रह्म वेद ब्रह्मैव भवति' 'न स पुनरावर्तते' ब्रह्म जाणतो तो ब्रह्मरूपच होतो. तो पुन्हां या संसारांत येत नाहीं, असें वेद सांगतात. अशी पूर्ण अवस्था ज्याच्या कृपेनें प्राप्त होतें तो आत्मस्वरूप असलेला श्रीगुरु दक्षिणामूर्ति भगवान् शंकर त्याला माझा हा नमस्कार असो.

नानाच्छिद्रघटोदरस्थितमहादीपप्रभाभास्वरं
ज्ञानं यस्य तु चक्षुरादिकरणद्वारा बहिः स्पन्दते ।
जानामीति तमेव भान्तमनुभात्येतत्समस्तं जगत्
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ४ ॥

अनेक छिद्रें असलेल्या रांजणांत जसा एखादा मोठा दिवा ठेवावा व त्याचा प्रकाश त्या छिद्रांतून बाहेर पडावा, याप्रमाणें देहांतील विश्वाच्या मुळाशीं असलेल्या सत्तत्त्वाचा देदीप्यमान प्रकाश डोळे, कान इत्यादि इंद्रियांच्या द्वारां बाहेर पडतो व विश्वांतील पदार्थांना जाऊन व्यापतो. त्यानंतर 'मला घट-पटादि पदार्थ दिसतात, कळतात, अशी प्रतीति येते. या प्रतीतींत आत्माच प्रत्ययाला येतो व त्याच्या पाठोपाठ विश्वांतील सर्व पदार्थ प्रतीतीला येतात. अशा रीतीनें ज्याचें ज्ञान सर्वावभासक ठरतें. त्या श्रीगुरु दक्षिणामूर्ति भगवान् शंकरांना माझा नमस्कार असो. असा या श्लोकाचा अन्वयानुसारी भावार्थ आहे.

तिसऱ्या श्लोकांत विश्वाच्या मुळाशीं असलेल्या तत्त्वाची सत्ता आणि प्रकाश – स्फुरण – ज्ञान यामुळेंच विश्वांतील सर्व पदार्थांना सत्ता व प्रकाश प्राप्त होतात. जग 'अस्ति' 'भाति' म्हणजे आहे, कळत आहे, यारूपानें प्रतीतीला येतें. जगाला स्वतःची सत्ता किंवा स्वतःचा प्रकाश नाहीं. जगांतील पदार्थ हे परप्रकाश्य म्हणजे आत्मप्रकाशानें प्रतीतीला येणारे व आत्मतत्त्वाच्याच सत्तेनें सत्स्वरूपाला प्राप्त झालेले असतात. 'सत्' म्हणून भासत असतात असें सांगितलें, तर यावर कोणी असें विचारील कीं, आत्म्याप्रमाणें जगाला सुद्धां स्वतःसिद्ध सत्ता आणि स्वयंप्रकाशत्व मानलें तर काय हरकत आहे? यावर उत्तर असें कीं, जगाला जर आत्म्याप्रमाणें स्वतःसिद्ध सत्ता आणि स्वयंप्रकाशत्व मानलें, तर जगाचा कधींच बाध होणार नाहीं. जग देखील आत्म्याप्रमाणें स्वतःसिद्ध व स्वयंप्रकाश मानलें तर तें नित्य आहे, निराबाध आहे असें म्हणावें लागेल. पण जग हें प्रवाहरूपानें नित्यासारखें भासत असलें तरी तें नित्य नाहीं. तें उत्पत्ति आणि विनाश यांनीं युक्त आहे. म्हणून जगाचा बाध होत असतो. जगाचा जसा

बाध होतो तसा आत्म्याचा होत नाहीं. जग हें उत्पत्तीच्या पूर्वी नव्हतें, पुढेंहि विनाशानंतर असूं शकणार नाहीं, तें मध्येंच प्रतीतीला येतें, जें पूर्वी नसतें, पुढेंहि असूं शकत नाहीं, मध्येंच प्रतीतीला येतें, तें सत्य नसतें. रज्जूवर म्हणजे दोरीवर भासणारा सर्प, शुक्तीवर म्हणजे शिंपल्यावर भासणारें रजत म्हणजे रुपें किंवा चांदी, त्याचप्रमाणें सूर्यकिरणांवर भासणारें मृगजल आणि आत्म्यावर भासणारें जग या सर्वांचें स्वरूप सारखेंच आहे. म्हणून जग सत्य म्हणतां येत नाहीं.

कोणी म्हणेल रज्जूवर भासलेल्या सापानें कधीं कोणाला कांहीं इजा झाली आहे काय? शुक्तीवर भासलेलें रुपें बाजारांत उपयोगाला येतें काय? मृगजलानें कधीं कोणाची तहान भागली आहे काय? तेव्हां दोरीवरचा साप, शुक्तीवरचें रुपें किंवा सूर्यकिरणांवरचें मृगजल हें खोटें असल्याचें पटतें, पण जगाला त्या मालिकेंत कसें गोवतां? जगांतील पदार्थांनीं सर्व लोकांचे सर्व व्यवहार सुव्यस्थित चाललेले असतात. मग जगाला खोटें कसें म्हणतां येईल? यावर उत्तर असें कीं, स्वप्नकालांतहि स्वप्नांतील पदार्थांनीं सर्व व्यवहार सुव्यवस्थित चालू असतातच. तेवढ्यावरून स्वप्नांतील जग सत्य मानतां येत नाहीं.

दोरीवरचा साप पाहूनहि जोंपर्यंत हा साप आहे असें वाटत असतें तोंपर्यंत भीति ही असतेच. शुक्तीवरचें रुपें खरें आहे असें वाटतें तोंपर्यंत मनुष्य तें हस्तगत करण्याकरितां धांवत असतोच. मृगजल पाहूनहि मृगांचा समुदाय किंवा भ्रांत झालेला तृषार्त मानव तहान भागविण्याकरितां त्या दिशेनें धावत असतोच. हातांत असलेला खोटा रुपया देणारा व घेणारा दोघेहि भ्रांत असतात व भ्रमानेंच त्यांचा देवघेवीचा व्यवहार होत असतो, पण तेवढ्यांवरून ते सर्व पदार्थ खरे आहेत असें म्हणतां येत नाहीं. कारण कालांतरानें त्यांचा बाध झाल्यानंतर ते खोटे आहेत असें प्रतीतीला येतें. त्याप्रमाणें जगांतील पदार्थांनीं कांहीं काळ व्यवहार होत असलेला दिसला, तरी ते पदार्थ सत्य मानतां येत नाहींत. कालांतरानें म्हणजे आत्मसाक्षात्कारानंतर त्या सर्व पदार्थांचा व व्यवहाराचाहि बाध होतो, असें आत्मसाक्षात्कारी मनुष्याच्या प्रतीतीला येतें. आत्म्याचा मात्र केव्हांहि बाध होत नाहीं. म्हणून आत्म्याची सत्ता ही स्वतःसिद्ध आहे. जगाचा बाध होत असल्यामुळें जगाची सत्ता स्वतःसिद्ध मानतां येत नाहीं.

आता आत्म्याप्रमाणें जगहि स्वयंप्रकाश मानलें तर काय होईल तें पाहू जग किंवा जगातील पदार्थ जर स्वयंप्रकाश असतील, तर आत्म्याप्रमाणें त्या पदार्थांच्या ज्ञानाला चक्षुरादि इंद्रियांची आवश्यकता वाटली नसती ते पदार्थ स्वत च प्रकाशित झाले असते आत्म्याच्या साक्षात्काराला चक्षुरादि कोणत्याहि इंद्रियाची आवश्यकता लागत नाहीं कारण तो स्वयंप्रकाश आहे अज्ञानाचें आवरण दूर झालें कीं आत्म्याचा साक्षात्कार होतो आत्म्याला पहाण्याकरिता दुसऱ्या कोणत्याहि साधनाची आवश्यकता नसते पण जगातील पदार्थांच्या बाबतीत तसें नसतें घट पटादि पदार्थांचें आवरण दूर झालें तरी सूर्य, चंद्र अग्नि किंवा दिवा वगैरेंचा प्रकाश नसेल तर घट पटादि पदार्थांचें प्रत्यक्ष ज्ञान होत नाहीं घटादि पदार्थ जर स्वयंप्रकाश असते तर आवरण दूर झाल्याबरोबर घटादि पदार्थांचा प्रत्यक्ष अनुभव आला असता, पण तसें होत नाहीं यावरून, घटादि पदार्थांना ते स्वयंप्रकाश आहेत असें म्हणता येत नाहीं

आता कोणी असें म्हणेल कीं, सूर्य, चंद्र, अग्नि आणि प्रदीप हे तरी पदार्थ स्वयंप्रकाश आहेत ना ? कारण त्यांना प्रकाशित करायला त्यांच्यापेक्षा निराळे कोणी लागत नाहीं, पण हेंहि म्हणणें बरोबर नाहीं कारण चंद्र, सूर्य वगैरे तेजस्वी पदार्थहि आत्म्याच्याच प्रकाशानें प्रकाशित होत असतात 'तमेव भान्तमनुभाति सर्वम्' 'यद्भासा सर्वमिदं विभाति' 'तो प्रकाशू लागला म्हणजे त्याच्या प्रकाशानें सर्व प्रकाशित होतात' 'ज्याच्या प्रकाशानें हें सर्व प्रकाशत आहे' हीं सर्व प्रमाणभूत वाक्यें आत्माच स्वयंप्रकाश असल्याचें सिद्ध करीत आहेत 'न तद्भासयते सूर्यो न शशाङ्को न पावक' या वाक्यानेंहि सूर्य, चंद्र, अग्नि वगैरे त्या आत्म्याला कोणीहि प्रकाशित करू शकत नाहींत असें स्पष्टच सांगितलें आहे सूक्ष्म निरीक्षण केल्यास अनुभवालाहि हें पटण्यासारखें आहे

आता कोणी असें विचारील कीं, आत्मा तरी स्वयंप्रकाश आहे हें कशावरून ? आत्म्याची सत्ताहि स्वत सिद्ध आहे हेंहि कशावरून ? याला उत्तर असें कीं, आत्मा जर स्वयंप्रकाश नसता किंवा आत्म्याची सत्ताहि स्वत सिद्ध नसती, तर आत्मा देखील विश्वातील घट पटादि पदार्थांप्रमाणें बाधित झाला असता पण तो कधींच बाधित होत नाहीं म्हणून आत्म्याची सत्ता स्वत सिद्ध आहे व त्याचप्रमाणें तो स्वयंप्रकाशहि आहे, ही गोष्ट निर्विवाद होय आत्मा

प्रकाशित होण्याकरिता दुसऱ्या कोणत्याहि साधनाची अपेक्षा लागत नाहीं 'सत्य ज्ञानमनन्त ब्रह्म ' ' नित्य विज्ञानमानन्द ब्रह्म ' ब्रह्म म्हणजे आत्मा तो सत्य ज्ञान आणि अनतस्वरूप आहे ' ' तो नित्य विज्ञान आणि आनदस्वरूप आहे ' इत्यादि श्रुतिवाक्येंहि पण आत्मा हा स्वयप्रकाश व स्वत सिद्ध सत्स्वरूप असल्याचेंच सागत आहेत तात्पर्य, आत्म्याची सत्ता आणि प्रकाश हे स्वत सिद्ध आहेत व आत्म्याच्या सत्तेमुळें आणि प्रकाशामुळेंच जगाला सत्ता आणि प्रकाश याचा लाभ होत असतो

जग अर्थात् जगातील सर्व पदार्थ जर आत्म्याप्रमाणें स्वयप्रकाश असतील तर मग या जगात ग्राह्य कोण आणि ग्राहक कोण ? दृश्य कोण आणि द्रष्टा कोण ? ज्ञेय कोण आणि ज्ञाता कोण ? कार्य कोण आणि कर्ता कोण ? हा विवेक रहाणार नाहीं सर्वच ग्राह्य आणि सर्वच ग्राहक असें म्हणण्याची पाळी येईल ग्राह्य ग्राहकव्यवस्था नसल्यामुळें सर्व इद्रियाना सर्वच विषय कळावेत अशी दुरवस्था होईल जगातील सर्वच पदार्थ स्वत सत्ताक व स्वयप्रकाश मानले तर सर्व पदार्थांचें सर्वकाळ सर्वांनाच ज्ञान होऊ लागेल, पण तसें असल्याचें दिसून येत नाहीं यावरून जगामध्यें आत्मा परमात्मा हाच एक स्वत सिद्ध व स्वय प्रकाश आहे आणि त्याच्या व्यतिरिक्त प्रतीतीला येणारें सर्व विश्व अन्याधीन सत्ताक आणि परप्रकाश्य आहे असेंच म्हणावें लागतें अन्याधीनसत्ताक म्हणजे ज्याची सत्ता दुसऱ्याच्या अधीन आहे असें विश्वातील सर्व पदार्थांची सत्ता ही अन्य म्हणजे आत्मा परमात्मा त्याच्या अधीन आहे म्हणून जगातील सर्व पदार्थ हे अन्याधीनसत्ताक झाले, आणि आत्मा-परमात्मा हा स्वत सिद्धसत्ताक झाला त्याचप्रमाणें इतर सर्व पदार्थ हे परमात्मप्रकाशानें प्रकाशित होणारे आहेत आणि परमात्मा मात्र स्वयप्रकाश आहे ही गोष्ट सिद्ध झाली अशा रीतीनें आत्मा हा ग्राहक व इतर विषय हे ग्राह्य, आत्मा हा द्रष्टा व इतर पदार्थ दृश्य, अशी व्यवस्था लागते भिन्न भिन्न विषयाचें ज्ञान होण्याकरिता भिन्न भिन्न इद्रियें हीं साधन असल्यामुळें भिन्न भिन्न ज्ञानाची उपपत्ति लागते व कोणतीहि दुरवस्था रहात नाहीं

आता कोणी असें म्हणेल कीं, तुमच्या मताप्रमाणें सर्व विश्व जर आत्म-स्वरूपाच्या ठिकाणीं कल्पित आहे व आत्मप्रकाशानें प्रकाशित आहे, तर मग विश्वातील पदार्थांचें भान—म्हणजे ज्ञान होण्यासाठीं इद्रियाची तरी काय आवश्य-

कता आहे? नित्यप्रकाशरूप असलेल्या आत्म्याशीं त्यांचा नित्य संबंध असल्यामुळें सदा सर्वकाळ घट-पटादि सर्व पदार्थांचें ज्ञान कां होत नाहीं? तुम्ही म्हणाल कीं, सर्वत्र असलेलें आत्मचैतन्य हें अज्ञानानें आवृत म्हणजे आच्छादित असल्यामुळें जगांतील सर्व पदार्थांचें सर्वकाळ भान होत नाही. पण हें उत्तर बरोबर नाहीं. आत्मा हा ज्ञानस्वरूप आहे. ज्ञान आणि अज्ञान यांचा विरोध असल्यामुळें आत्मचैतन्य अज्ञानानें आवृत कसें होऊं शकेल? उलट आत्मचैतन्यानें अज्ञानाचा निरासच व्हावयाला पाहिजे. आणि आत्मचैतन्य जर अज्ञानानें आवृत होत असेल, तर विश्वांतील पदार्थांचें कधीं ज्ञान होतें तर कधीं होत नाहीं असें कां व्हावें? आत्मचैतन्याशिवाय अज्ञानाचें निवर्तक दुसरें कोणीच नाहीं. आणि तुम्ही तर आत्मचैतन्य अज्ञानानें आवृत होतें असें म्हणतां. मग आत्मचैतन्य जर अज्ञानानें आवृत होत असेल, तर विश्वांतील पदार्थांचें कधींच भान होतां कामा नये असें म्हणावें लागेल. त्याचप्रमाणें अज्ञानाचें आवरण दूर झालें, तर आत्मचैतन्याच्या प्रकाशानें सर्वच पदार्थ एकदमच भासावयास पाहिजेत असें तरी म्हणावें लागेल, पण हे आक्षेप बरोबर नाहींत. या आक्षेपांचें निरसन करण्याकरितांच या स्तोत्रांतील हा चौथा श्लोक आहे.

अनेक छिद्रें असलेला एखादा मोठा घट किंवा रांजण घ्या. त्याच्या पोटांत एक मोठा दिवा ठेवा. त्या दिव्याचा प्रकाश जसा देदीप्यमान असावा त्याप्रमाणें आपल्या देहांत जगाचें अधिष्ठान असलेल्या सत्तत्त्वाचा – आत्म्याचा प्रकाशहि देदीप्यमान आहे. वर सांगितलेल्या घटाच्या छिद्रांतून जसा प्रकाश बाहेर पडतो व चोहींकडे फांकतो त्याचप्रमाणें देहरूपी घटांत असलेला आत्मचैतन्याचा प्रकाश चक्षुरिंद्रिय, श्रवणेंद्रिय म्हणजे डोळे, कान वगैरे छिद्रांच्याद्वारां – इंद्रियगोलकांच्या द्वारां बुद्धीसह बाहेर पडतो व पुढें असलेल्या घट पटादि विषयांना जाऊन व्यापतो बुद्धि ही इंद्रियांच्या द्वारां विषयाना जाऊन व्यापित असतां बुद्धीबरोबर बुद्धीमध्यें प्रतिबिंबित झालेलें चैतन्यहि विषयांना व्यापित असतें. शुद्ध म्हणजे निरुपाधिक ज्ञानस्वरूप असलेलें आत्मचैतन्य जेव्हां अंत:करणरूपी उपाधीमध्यें प्रतिबिंबित होतें तेव्हां त्याला साक्षिचैतन्य असें म्हणतात. या साक्षीचें स्वरूपभूत जें स्फुरण – ज्ञान – चैतन्य किंवा प्रकाश तें अंत:करणाबरोबरच चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारां बाह्य घट-पटादि विषयांना जाऊन व्यापतें. घट-पटादि हे जगांतील सर्व विषय बिंबभूत ब्रह्मचैतन्याच्या ठिकाणीं अध्यस्त किंवा

अधिष्ठित असतात अशा रीतीनें बुद्धिप्रतिबिंबित साक्षिचैतन्य व घट-पटादि विषयाचें आश्रयीभूत असलेलें शुद्धचैतन्य याचा विषयदेशीं मिलाफ होतो बुद्धि-प्रतिबिंबित साक्षिचैतन्यानें अज्ञानाचा निरास झाला कीं, साक्षिचैतन्य आणि विषयचैतन्य एकरूप होतात व मग घट पटादि विषयाचें ज्ञान होतें चक्षुरादि इंद्रियांच्या द्वारा बुद्धि ज्या विषयाला जाऊन व्यापते त्याच विषयाचें अज्ञानाचें आवरण नाहींसें होत असतें व विषयचैतन्य आणि बुद्धिप्रतिबिंबित साक्षिचैतन्य एक होऊन त्याच विषयाचा बुद्धीमध्यें प्रकाश पडत असतो व तो विषय मी जाणत आहें किंवा जाणला आहे अशी प्रतीति येऊं लागते अंतःकरण ज्या वेळीं ज्या विषयाला जाऊन व्यापतें त्याच वेळीं त्याच विषयाचें भान होऊं शकतें इतर वेळीं भान होऊं शकत नाहीं व इतर विषयाचेंहि भान होऊं शकत नाहीं

बुद्धि म्हणजे अंतःकरण हें सूक्ष्म देहातलें एक प्रधान घटक आहे पंचमहाभूतांच्या सात्त्विक सूक्ष्मतम समष्ट्यंशापासून याची उत्पत्ति झालेली असते म्हणून हें स्वभावतः आरशाप्रमाणें स्वच्छ असतें तथापि अंतःकरणांत अंशतः रजोगुण आणि तमोगुणहि असतोच आरशाचा जसा एक भाग मलिन असावा व एक भाग निर्मळ असावा त्याचप्रमाणें अंतःकरणाचा राजस अंश मलिन आहे आणि सात्त्विक अंश निर्मल आहे राजस अंशातून क्रियाशक्तीचा व सात्त्विक अंशातून ज्ञानशक्तीचा आविर्भाव होत असतो अंतःकरणाचा क्रिया शक्तिरूप जो राजस भाग त्याला प्राण असें म्हणतात व ज्ञानशक्तिरूप जो सात्त्विक भाग त्याला मन आणि बुद्धि असें म्हणतात त्यांच्यातहि मनांत रजोगुणाचा आविष्कार अधिक आहे व बुद्धीमध्यें सत्त्वगुणाचा आविष्कार अधिक आहे या ठिकाणीं प्राण म्हणजे शरीरान्तःसंचारी वायु नसून तो एक अंतःकरणाचाच भाग आहे ही गोष्ट लक्षांत घ्यावी

आत्मचैतन्य हें सर्वव्यापी असल्यामुळें अंतःकरणा या मलिन असलेल्या प्राणरूप राजस अंशामध्येंहि तें प्रतिबिंबित होत असतें व अंतःकरणाच्या निर्मळ असलेल्या मन आणि बुद्धिरूप सात्त्विक अंशामध्येंहि तें प्रतिबिंबित होत असतें प्राण हा क्रियाशक्तिरूप असल्यामुळें प्राणोपाधिक चैतन्याला 'कर्ता' हें नांव प्राप्त होतें तर मनोबुद्धिरूप अंतःकरण हें ज्ञानशक्तिरूप असल्या मुळें बुद्ध्युपहित चैतन्याला 'ज्ञाता' असें म्हटलें जातें तात्पर्य, एकाच चैतन्याला अवस्थाभेदानें कर्ता आणि ज्ञाता अशीं दोन नांवें प्राप्त झालीं

जशा चाकातील आरा तुंब्याशीं संलग्न असाव्यात त्याप्रमाणें अतः-करणाच्या ज्ञानशक्तींतून आविर्भूत होणारीं कर्मेंद्रियें हीं अंतःकरणाशींच संलग्न असतात. अंतःकरणाचें सामान्यतः हृदय हें स्थान असलें, तरी अंतःकरणाचा सर्व शरीरभर संचार असतो. ज्या स्रोतसातून अंतःकरण शरीरभर संचार करतें त्या स्रोतसांना मनोवहस्रोतसें असें म्हणतात. पिंपळाचें पान मुळापासून शेंड्याच्या शेवटच्या टोकापर्यंत जसें स्थूल सूक्ष्म तंतूंच्या जाळ्यानी व्यापलेलें दिसतें तसेंच आपलें स्थूल शरीर स्थूल व सूक्ष्म स्रोतसांनी नखशिखान्त व्यापलेलें आहे. या स्रोतसांना सिरा, नाडी, धमनी अशीं नावें आहेत. यानाच कांहीं ठिकाणीं स्नायु असेंहि म्हटलें आहे. त्यांचीं उगमस्थानें मूलाधारचक्र, मणिपूरचक्र आणि अनाहतचक्र हीं आहेत. या स्रोतसांच्या द्वाराच सर्व इंद्रियें आपआपल्या विषय ग्रहण करण्यासाठीं धावत असतात. त्यांच्या पाठोपाठ अंतःकरणहि पण धावत असतें. आत्मचैतन्याचाहि या सर्वांशीं अधिष्ठानरूपानें संबंध असतोच.

मूलाधारचक्र हें चतुर्दल असलें तरी त्याचा आकार त्रिकोण आहे. हें चक्र देहाच्या मध्यभागीं गुदस्थानापासून दोन अंगुलें वर आणि जननेंद्रियापासून दोन अंगुलें खालीं आहे. त्याचा अग्रकोण हा अधोमुख असून दक्षिणोत्तर बाजूचे दोन कोण किंचित् उन्नत आहेत. अधोमुख असलेल्या त्रिकोणाच्या अग्रभागीं कुंडलाकृति सर्पाप्रमाणें कुंडलिनी नावाची नाडी आहे. तिला परा शक्ति किंवा मूलप्रकृति असें म्हणतात. ती चिच्छक्तीनें उद्दीपित झाली म्हणजे प्राण, अग्नि, बिंदु आणि नाद यांना अभिव्यक्त करते. या कुंडलिनीपासून आवि-र्भूत होणारी प्राणशक्ति हीच वायुविशेषरूपानें सर्व देहभर संचार करते. तिलाच स्थानभेदानें व कार्यभेदानें प्राण, अपान, व्यान, उदान आणि समान अशीं नावें दिलीं आहेत. अग्नि हा प्राधान्यानें कोठ्यामध्यें ऊष्म्याच्या रूपानें रहातो आणि अन्नपानाचें पचन करतो. याहि ठिकाणीं चिच्छक्ति ही सर्वत्र अनुस्यूत आहेच हें लक्षांत घेतलें पाहिजे. किंबहुना तिच्या जिवावरच शरीरांतील अन्नपचनाचें व विभजनाचें कार्य चालू असतें. म्हणूनच गीतेमध्यें 'अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः। प्राणापानसमायुक्तः पचाम्यन्नं चतुर्विधम्॥' मीच वैश्वानर अग्नीच्या रूपानें सर्व प्राण्यांच्या देहांत रहातों. मीच प्राणापानादि वायूंशीं संयुक्त होऊन चतुर्विध अन्नपानादिकाचें पचन करतों. मीच सर्वांच्या हृदयांत रहातों. माझ्यामुळेंच अनुभव, स्मृति, तर्क इत्यादि सर्व कांहीं होत आहे. 'सर्वस्य चाहं हृदि संनिविष्टो मत्तः स्मृतिर्ज्ञानमपोहनं च।'

हच प्राण आणि अग्नि, अग्नि आणि सोम (अग्निषोम) किंवा चंद्र आणि सूर्य या नावानें ओळखले जातात प्राणाला चंद्र किंवा सोम म्हणतात आणि अग्नितत्त्वाला सूर्य म्हणतात हें योगशास्त्रामध्यें प्रसिद्ध आहे पुढें सांगितल्या जाणाऱ्या इडा आणि पिंगला ह्या ज्या दोन नाड्या आहेत त्यांच्या सूर्य आणि चंद्र या दोन अधिष्ठात्री देवता आहेत

बिंदु म्हणजे अव्यक्त अवस्थेंतला एक प्रकारचा ध्वनि आणि नाद म्हणजे अपासून ज्ञपर्यंत सर्ववर्णसाधारण प्रणवात्मक किंवा ओंकारात्मक घोष कान झाकल्यानंतर या घोषाचें श्रवण होत असतें प्राण, अग्नि, बिंदु आणि नाद या सर्वांना संचलनसामर्थ्य देणारी जी परा शक्ति ती कुंडलिनीच होय हीच परा शक्ति मणिपूरचक्र आणि विशुद्धचक्र म्हणजेच नाभि, हृदय आणि कंठ या उपाधींशीं संलग्न होऊन अकारादि वर्णरूपानें अभिव्यक्त होते तेव्हा तिला सरस्वती असें म्हणतात अकरादि सर्व वर्ण तत्त्वत एकरूप असूनहि कंठ, तालु, मूर्धा, दंत आणि ओष्ठ या उपाधींशीं संलग्न होऊन अभिव्यक्त होतात तेव्हा त्या वर्णांना कंठ्य, तालव्य, मूर्धन्य, दंत्य आणि ओष्ठ्य इत्यादि नांवें मिळतात ही वैखरी वाणी वागिंद्रियाच्या द्वारा व्यक्त होते तेव्हा तिचा अधिष्ठाता आत्मा हा 'वक्ता' या नावानें ओळखला जातो भिन्न भिन्न स्वरूपाच्या हालचाली आणि भिन्न भिन्न स्वरूपाच्या संवेदना शरीरांतील चक्रसमूहाच्या द्वारा व इंद्रियसमूहाच्या द्वाराच होत असतात त्या सर्व हालचालींच्या व संवेदनांच्या मुळाशीं अधिष्ठानभूत असलेलें आत्मचैतन्यच सर्व कार्यांचें निमित्त आहे म्हणूनच आत्मा हाच सर्व क्रियांचा कर्ता, सर्व विषयांचा ज्ञाता आणि सर्व विषयांचा भोक्ता असें म्हटलें जातें तत्त्वत तो कर्ता नाहीं, ज्ञाता नाहीं, आणि भोक्ताहि नाहीं

मूलाधार चक्राच्या अग्रभागीं असलेल्या कोणामध्यें सुषुम्ना नावाची नाडी उगम पावत व मस्तकामध्यें असलेल्या ब्रह्मरंध्राशीं जाऊन मिळते शिर कपालाच्या संधिस्थानीं मस्तकाच्या मध्यप्रदेशीं असलेल्या छिद्राला ब्रह्मरंध्र असें म्हणतात सुषुम्ना नाडी ही मूलभागीं अर्ध्या तोडलेल्या कळका-प्रमाणें 'सुषिर' म्हणजे पोकळ आहे चतुर्दल मूलाधारचक्र चार पाकळ्यांचें आहे षड्दल स्वाधिष्ठानचक्र हें सहा पाकळ्यांचें आहे हें मूलाधारचक्राच्या अगदी शेजारीं वरच्या बाजूला लागूनच आहे त्याच्या वरच्या बाजूस

नाभिप्रदेशीं दशदल म्हणजे दहा पाकळ्यांचें मणिपूरचक्र आहे. त्याच्या वरच्या बाजूस हृदयप्रदेशीं द्वादशदल म्हणजे बारा पाकळ्यांचें अनाहत चक्र आहे. त्याच्याहि वरच्या बाजूस म्हणजे कंठस्थानीं षोडशदल अर्थात् सोळा पाकळ्यांचें एक चक्र आहे, त्याला विशुद्धचक्र असें म्हणतात. त्याच्याहि वर भ्रूमध्यप्रदेशीं दोन्ही भुवयांच्या मध्यभागीं एक द्विदल म्हणजे दोन पाकळ्यांचें चक्र आहे, त्याला आज्ञाचक्र असें म्हणतात. या सगळ्यांच्याहि वर मस्तकामध्यें मेंदूच्या ठिकाणीं एक सहस्रदल म्हणजे हजार पाकळ्यांचें कमळ आहे, त्याला सहस्रदल कमळ असेंच म्हणतात. त्याच्याहि वर शिरःकपालांच्या म्हणजे कवटीच्या संधिस्थानीं मधोमध एक छिद्र आहे, त्याला ब्रह्मरंध्र असें म्हणतात. मूलाधारादि सहाहि चक्रांचा आधार घेऊन एकच एक अतिदीर्घ व सरळ असलेली सुषुम्ना नाडी ही सहस्रदलकमलांतून ब्रह्मरंध्राला जाऊन मिळते.

सुषुम्ना नाडीच्या दोन्ही बाजूस किंचित् वर असलेल्या मूलाधारचक्राच्या दक्षिणोत्तर कोणांतून इडा आणि पिंगला या दोन नाड्या निघतात. डाव्या बाजूला इडा नांवाची नाडी व उजव्या बाजूला पिंगला नांवाची नाडी असते. या दोन्ही नाड्या कपाळापर्यंत वर गेलेल्या आहेत. जेथें अनेक नाड्यांचा एकत्र सन्निवेश असतो त्या चक्राला नाडीचक्र असें म्हणतात. मूलाधारचक्र, मणिपूरचक्र आणि अनाहतचक्र अशा या तीन चक्रांतून शरीरांतील अनेक मुख्य मुख्य नाड्या उगम पावत असतात. याच नाड्यांशीं सूक्ष्मातिसूक्ष्म अशा असंख्य नाड्या संलग्न झालेल्या असतात. याच नाड्यांच्या द्वारां शरीरांतील मांस, मेद, अस्थि, मज्जा आणि शुक्र या धातूंची उत्पत्ति आणि परिपोष होण्याला आवश्यक असलेल्या अन्नरसाचें व रसरक्तादि धातूंचें अभिसरण होत असतें. वात, पित्त आणि कफ या तीन दोषांचाहि सर्व शरीरभर संचार याच नाड्यांच्या द्वारां चाललेला असतो

मूलाधारचक्रापासून आणखी बऱ्याच नाड्या निघालेल्या आहेत. गांधारी आणि हस्तिजिह्वा या दोन नाड्या डोळ्यापर्यंत येऊन पोहोंचलेल्या आहेत. रूपग्रहण करण्याला यांचा उपयोग होतो. इडा आणि पिंगला यांच्या द्वारां श्वासोच्छ्वासांची क्रिया चालू असते. ती चालू असतां गांधारी आणि हस्तिजिह्वा यांचा नाकाशींहि संबंध येतो. त्यामुळें गंधग्रहणाचेंहि कार्य यांच्याच द्वारां होत असतें. कांहींच्या मतें या दोन नाड्यांचा उगम स्वाधिष्ठान

चक्रांतून आहे नाभिमंडलालाच मणिपूरचक्र असें म्हणतात. नाभिमंडल हें दीर्घवर्तुळ असून तें उभ्या केलेल्या कुक्कुटांडासारखें आहे. पूषा आणि अलंबुषा नांवाच्या नाड्या येथूनच निघतात. त्या कानापर्यंत जाऊन पोहोंचलेल्या आहेत. या शब्दग्रहणाला उपयोगी पडतात. येथूनच निघालेली एक शुक्ला नांवाची नाडी भ्रूमध्यप्रदेशापर्यंत जाऊन पोहोंचते. भ्रूमध्यप्रदेश हा ध्यानाला अत्यंत उपयुक्त मानला जातो. या ठिकाणीं ध्येयतत्त्वाचा, उपास्यदेवतेचा उपासकाला साक्षात्कार होत असतो. या ठिकाणीं असलेल्या चक्राला आज्ञाचक्र असें म्हणतात. 'आ' म्हणजे सामान्यपणें, 'ज्ञायते' म्हणजे अवलोकिलें जातें, अर्थात् उपास्यतत्त्वाचा साक्षात्कार आपाततः साधकाला याच चक्रांत होत असतो. म्हणून याला 'आज्ञा'चक्र असें म्हटलें आहे. या ठिकाणीं 'आज्ञा' म्हणजे कोणी कोणाला आदेश करणें किंवा कोणी कोणाचा आदेश ऐकणें असा अर्थ नाहीं हें लक्षांत घ्यावें.

नाभिमंडलापासूनच एक सरस्वती नांवाची नाडी निघते. ती जिभेच्या अग्रभागापर्यंत जाते. वाचेचा प्रसार तिच्याचमुळें होत असतो. विश्वोदरी नांवाची नाडी ही आपल्या शरीरांत भक्ष्य, भोज्य, चोष्य आणि लेह्य अशा सर्व प्रकारच्या अन्नरसाचें धारण करते. अर्थात् ती जठरामध्यें असतें. पयस्विनी नाडी कंठामध्यें राहून जलाचें ग्रहण करते, तिच्याचमुळें उचकी लागते. जल हें स्वाभाविक अधोगामी असल्यामुळें जठरात घेतलेल्या अन्नाच्या खालीं तें जाऊन पोहोंचतें. तेथें जाठराग्नीनें त्याची वाफ होऊन त्या वाफेवर जठरांतील अन्नाचें पचन होत रहातें. कुकरसारखीच कल्पना आहे ही! नाभिमंडलात्मक नाडीचक्रापासून उत्पन्न झालेल्या तीन नाड्या ह्या अधोमुख आहेत. राका सिनीवाली आणि कुहू अशीं त्यांचीं नावें आहेत. राका नाडी ही शुक्रधातूचें विमोचन करते व कुहू नाडी मलाचें विमोचन करते. या सर्व क्रियांच्या मुळाशीं आत्मचैतन्य हेंच निमित्त असल्यामुळें आत्माच सर्व कांहीं करतो असें लोक समजत असतात. वस्तुतः तो कांहींच करीत नाहीं.

मणिपूरचक्रापासून आणखी एक महत्त्वाची नाडी उगम पावत असते. हिला शंखिनी असें म्हणतात ही नाडी आपण खाल्लेल्या अन्नरसानें ओजोधातूपेक्षाहि अत्युत्तम असलेलें सार कपालापर्यंत वाहून नेते. ओजोधातूचें स्थान हृदय असल्याचें आयुर्वेदांत सांगितलेलें आहे, तर या साराचें स्थान मूर्धा

अथवा 'कपालकुहर' असल्याचें योगशास्त्र सांगत आहे. कवटीलाच कपालकुहर असें म्हणतात. याच ठिकाणीं सहस्रदलकमल असतें. याला चंद्रमंडल असेंहि म्हणतात. येथें संचित झालेल्या अन्नरसाच्या साराला सुधा म्हणजे अमृत असें म्हणतात. लंबिकायोगाच्या द्वारा योगी लोक या अमृताचा लाभ घेऊं शकतात. समाधिअवस्थेमध्यें योगी लोकांच्या देहाची धारणा याच अमृतानें होत असते.

गवळी जसा गोस्तनाला स्नेह लाऊन त्याचें दोहन करतो त्याचप्रमाणें योगी लोक लोणी व हळद लाऊन जिभेचें दोहन करून जीभ लांब करण्याचा अभ्यास करतात. एवढ्यानें जीभ लांब न झाल्यास जिभेला बांधून ठेवणारा जिभेखालचा शिरेसारखा भाग दर्भांकुरानें किंचित् छेदतात, नंतर जिभेला उलटें वळवून पडजिभेजवळ असलेल्या तालुकुहरांत नेतात. या तालुकुहरालाच सुधाकूप किंवा अमृतकूप असें म्हणतात. योगी लोक आपल्या जिभेच्या शेंड्यानें तेथील अमृताचें सेवन करीत असतात. यामुळेंच त्यांचा देह सर्व व्याधींतून मुक्त होतो व ते जरा व्याधि यांच्यातून मुक्त होऊन देवासारखे देदीप्यमान दिसतात. या योगाला लंबिकायोग म्हणतात. लंबिका म्हणजे जीभ. हा सर्व विषय गुरुगम्य आहे हें वाचकांनीं लक्षांत घ्यावें.

एकशेंएक नाड्या हृदयाशीं संलग्न आहेत. यांहि नाड्यांतून प्राण, इंद्रियें आणि मन त्याचप्रमाणें रस रक्तादि धातु यांचें संचलन होतच असतें. त्यांतील एक नाडी मस्तकाच्या ऊर्ध्वभागीं असलेल्या ब्रह्मरंध्राला जाऊन मिळते. हीच ती मूलाधारचक्रापासून उगम पावलेली सुषुम्ना नाडी होय. हृदय हें तिचें प्रधान स्थान असल्यामुळें तिला हृदयाची नाडी असें म्हटलें आहे. या नाडीच्या साहाय्यानें जीव प्राण ब्रह्मरंध्राच्या द्वारा बाहेर पडला तर अर्चिरादि मार्गानें तो ब्रह्मलोकाला जातो व मुक्त होतो. संसारबंधनांतून तो सुटतो. आजूबाजूच्या नाड्यांनीं प्राणोत्क्रमण झालें तर त्याला पुन्हा संसारांत यावें लागतें, असें वेद सांगतात. 'शतं चैका हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका। तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विश्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति ॥' (छांदोग्य)

हा विषय इतक्या विस्तारानें लिहिण्याचें कारण येवढेंच कीं, एकच चैतन्यतत्त्व देहामध्यें राहून इंद्रियवह, प्राणवह व मनोवह इत्यादि स्रोतसांच्या द्वारा अंतर्बाह्य विषयांशीं संलग्न होऊन त्या त्या विषयांना प्रकाशित करीत असतें व निरनिराळ्या क्रियांचें तें निमित्तहि होत असतें म्हणूनच त्या त्याला

अथवा 'कपालकुहर' असल्याचें योगशास्त्र सांगत आहे. कवटीलाच कपालकुहर असें म्हणतात. याच ठिकाणीं सहस्रदलकमल असतें. याला चंद्रमंडल असेंहि म्हणतात. येथें संचित झालेल्या अन्नरसाच्या साराला सुधा म्हणजे अमृत असें म्हणतात. लंबिकायोगाच्या द्वारा योगी लोक या अमृताचा लाभ घेऊं शकतात. समाधिअवस्थेमध्यें योगी लोकांच्या देहाची धारणा याच अमृतानें होत असते.

गवळी जसा गोस्तनाला स्नेह लाऊन त्याचें दोहन करतो त्याचप्रमाणें योगी लोक लोणी व हळद लाऊन जिभेचें दोहन करून जीभ लांब करण्याचा अभ्यास करतात. एवढ्यानें जीभ लांब न झाल्यास जिभेला बांधून ठेवणारा जिभेखालचा शिरेसारखा भाग दर्भांकुरानें किंचित् छेदतात. नंतर जिभेला उलटें वळवून पडजिभेजवळ असलेल्या तालुकुहरांत नेतात. या तालुकुहरालाच सुधाकूप किंवा अमृतकूप असें म्हणतात. योगी लोक आपल्या जिभेच्या शेंड्यानें तेथील अमृताचें सेवन करीत असतात. यामुळेंच त्यांचा देह सर्व व्याधींतून मुक्त होतो व ते जरा व्याधि यांच्यातून मुक्त होऊन देवासारखे देदीप्यमान दिसतात. या योगाला लंबिकायोग म्हणतात. लंबिका म्हणजे जीभ. हा सर्व विषय गुरुगम्य आहे हें वाचकानीं लक्षांत घ्यावें.

एकशेंएक नाड्या हृदयाशीं संलग्न आहेत. यांहि नाड्यांतून प्राण, इंद्रियें आणि मन त्याचप्रमाणें रस रक्तादि धातु यांचें संचलन होतच असतें. त्यांतील एक नाडी मस्तकाच्या ऊर्ध्वभागीं असलेल्या ब्रह्मरंध्राला जाऊन मिळते. हीच ती मूलाधारचक्रापासून उगम पावलेली सुषुम्ना नाडी होय. हृदय हें तिचें प्रधान स्थान असल्यामुळें तिला हृदयाची नाडी असें म्हटलें आहे. या नाडीच्या साहाय्यानें जीव प्राण ब्रह्मरंध्राच्या द्वारा बाहेर पडला तर अर्चिरादि मार्गानें तो ब्रह्मलोकाला जातो व मुक्त होतो. संसारबंधनांतून तो सुटतो. आजूबाजूच्या नाड्यांनीं प्राणोत्क्रमण झालें तर त्याला पुन्हा संसारांत यावें लागतें, असें वेद सांगतात. 'शतं चैका हृदयस्य नाड्यस्तासां मूर्धानमभिनिःसृतैका। तयोर्ध्वमायन्नमृतत्वमेति विश्वङ्ङन्या उत्क्रमणे भवन्ति ॥' (छांदोग्य)

हा विषय इतक्या विस्तारानें लिहिण्याचें कारण येवढेंच कीं, एकच चैतन्यतत्त्व देहामध्यें राहून इंद्रियवह, प्राणवह व मनोवह इत्यादि स्रोतसांच्या द्वारा अंतर्बाह्य विषयांशीं संलग्न होऊन त्या त्या विषयांना प्रकाशित करीत असतें व निरनिराळ्या क्रियांचें तें निमित्तहि होत असतें. म्हणूनच त्या आ त्याला

सर्व जग आनंदमय आहे. त्याच्या प्रकाशानेंच सूर्य, चंद्र वगैरे प्रकाशत असतात त्याच्याच अस्तित्वामुळें विश्वातील सर्व पदार्थांचें अस्तित्व प्रतीतीला येत असतें तात्पर्य, 'अहम्' म्हणजे मी या शब्दानें प्रतीतीला येणारें तत्त्वच तत्त्वत आत्मा, परमात्मा, परब्रह्म होय हा प्रकाश ज्याच्या कृपेनें हृदयामध्यें प्रकाशतो त्या श्रीगुरु दक्षिणामूर्तींना माझा नमस्कार असो

देहं प्राणमपीन्द्रियाण्यपि चलां बुद्धिं च शून्यं विदुः
स्त्रीबालान्धजडोपमास्त्वहमिति भ्रान्ता भृशं वादिनः।
मायाशक्तिविलासकल्पितमहाव्यामोहसंहारिणे
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ५ ॥

कोणी स्थूल देहाला आत्मा मानतात तर कोणी प्राणाला आत्मा मानतात. कोणी इंद्रियाना आत्मा मानतात तर कोणी क्षणिक बुद्धीलाहि आत्मा मानतात. 'अहं' म्हणजे मी या शब्दानें प्रतीतीला येणाऱ्या आत्म्याच्या बाबतींत सर्व लोकांची स्थिति स्त्रिया, लहान मुलें, आंधळे किंवा मूर्ख लोक यांच्यासारखी झालेली असते ते भ्रांत होऊन काहीं तरी पुष्कळ बोलत असतात मायेच्या शक्तीच्या विलासानें कल्पिलेला हा बुद्धीचा मोठा व्यामोह जो आपल्या कृपेनें नाहींसा करून टाकतो, त्या श्रीगुरु दक्षिणामूर्ति भगवान् शंकराला माझा नमस्कार असो असा या श्लोकाचा सरळ अन्वयार्थ आहे

मागच्या श्लोकांत आत्म्याची सत्ता ही स्वतःसिद्ध आहे व स्फुरणहि स्वतःसिद्ध आहे अर्थात् आत्मा हा स्वयंभू आणि स्वयंप्रकाश आहे असें सांगितलें पण देहाव्यतिरिक्त आत्मा निराळा प्रतीतीला येत नसल्यामुळें हें सर्व म्हणणें निरर्थक आहे असें चार्वाक म्हणतात मी जातों मी येतों मी उभा आहें मी बसतों मी स्थूल आहें मी कृश आहें मी गोरा आहें मी काळा आहें असा व्यवहार नेहमीं होत असल्यामुळें या व्यवहारांत प्रतीतीला येणाऱ्या जाणें येणें इत्यादि क्रिया व कृशत्व स्थूलत्व इत्यादि धर्म हे देहाच्याच ठिकाणीं असल्यामुळें देहच आत्मा आहे असें म्हणावें लागतें दहीं आणि गूळ एकत्र केलें म्हणजे जसें त्या ठिकाणीं मादकत्व निर्माण होतें त्याचप्रमाणें पृथ्वी जल, तेज आणि वायु या चार महाभूतांचे परमाणु देहाच्या आकारानें नटले म्हणजे त्या ठिकाणीं चैतन्य उत्पन्न होतें तोच आत्मा होय आत्मा देहाहून

ज्ञान होत नसल्यामुळें व इतर प्रमाणें चार्वाक मानीत नसल्यामुळें त्याच्या मतानें चैतन्याचें ज्ञानच होणें शक्य नाहीं विशेषणाचें ज्ञान जर नाहीं तर मग विशिष्टाचें ज्ञान कसें असू शकेल ? याप्रमाणें चैतन्यविशिष्ट देह म्हणजे आत्मा, हेंहि चार्वाकाचें म्हणणें सिद्ध होत नाहीं

पृथ्वी, जल, तेज आणि वायु याचे परमाणु देहाच्या आकारानें नटले म्हणजे तेथें चैतन्य निर्माण होतें या म्हणण्यातहि काहीं अर्थ नाहीं प्रेतामध्यें देखील भूतचतुष्टयाचे परमाणु देहाच्या आकारानें सयुक्त झालेले असतातच मग मृत्यूनतर देहामध्यें चैतन्य प्रतीतीला का येऊ नये ? यावरून आत्मा देहापेक्षा कोणी तरी निराळा आहे ही गोष्ट निश्चित यावर चार्वाक असें म्हणतील कीं, आत्मा जर देहाहून निराळा असता तर तो दिसला असता पण या म्हण्यातहि काहीं अर्थ नाहीं जगात असलेले सर्व पदार्थ आपल्याला कोठें दिसू शकतात ? ते दिसत नाहींत म्हणून ते नाहींत असें का आपल्याला म्हणतां येणार ? त्याचप्रमाणें आत्मा दिसला नाहीं म्हणून तो नाहीं असें म्हणता येणार नाहीं

प्रत्यक्ष हेंच एक प्रमाण मानून सर्व व्यवहार उपपन्न होत नाहीं जगात किती तरी अशा गोष्टी आहेत कीं, त्या प्रत्यक्ष प्रमाणानें कळत नाहींत मन कोठें प्रत्यक्ष प्रमाणानें कळतें ? प्रेम, द्वेष, मत्सर, क्रोध वगैरे अत करणाचे विकार कोठें प्रत्यक्ष प्रमाणानें कळतात ? ते आपल्याला तर्कानेंच जाणावे लागतात, म्हणून तर्क-अनुमान हेंहि एक प्रमाण म्हणजे यथार्थ ज्ञानाचें साधन मानलेंच पाहिजे याडवडिलानीं पराक्रम करून जहागिऱ्या मिळविल्या या गोष्टी सनदेवरून ताम्रपटावरून किंवा अधिकृत कागदपत्रावरूनच आपण जाणतों मग शब्द प्रमाण नाहीं असें कसें म्हणता येईल ? परगावीं किंवा परदेशीं असलेल्या आप्तेष्टाचें कुशल पत्रावरूनच कळतें आपल्याला आनद होतो दु खद बातमी असल्यास दु ख होतें मग शब्द प्रमाण नाहीं असें कसें म्हणता येईल ? प्रत्यक्ष आपले वडील कोण या बाबतीतहि आईचा शब्दच प्रमाण मानावा लागतो तेव्हा प्रत्यक्ष हें एकच प्रमाण आहे असें म्हणणें हें पोरकटपणाचें लक्षण होय, तात्पर्य, प्रत्यक्ष अनुमान आणि शब्द हीं तीन तरी प्रमाणें मानावींच लागतात

चार्वाक म्हणतात, मरण म्हणजे मोक्ष पण मोक्ष इतका सोपा नव्हे * मृगाजिनाप्रमाणें आकाशाची घडी करता येईल, पण आत्मसाक्षात्काराशिवाय

असें म्हणतात. शरीरांत सर्वत्र होणाऱ्या रस-रक्तादि धातूंच्या अभिसरणादि क्रियांचें तो साधन आहे. तो आत्मा कसा होऊं शकेल ? देह, इंद्रियें, प्राण हें सर्वच जडस्वरूप असल्यामुळें त्यांच्या ठिकाणीं कर्तृत्व, भोक्तृत्व संभवत नाहीं. आत्मा तर त्यांच्या मतानें कर्ता, भोक्ता आहे म्हणून देह, इंद्रियें आणि प्राण यांना आत्मा म्हणतां येत नाहीं.

सौषुप्त अवस्थेमध्यें श्वसनादि रूपानें प्राणाचें कार्य स्पष्टच चालू असतें. सौषुप्तकालीं प्राणाचें कार्य चालू असतां इतर इंद्रियांना विराम कसा घेतां येईल ? राजा किंवा सेनापति काम करीत असतील, तर सेनेंतील शिपायांना विराम घेतां येत नाहीं. सुषुप्तिकालीं तर सर्व इंद्रियें आपआपल्या स्थानीं विश्रांति घेत असतात हें सर्वमान्य आहे. अशा स्थितींत प्राणाला आत्मा मानलें, तर सौषुप्त अवस्थाच उपपन्न होत नाहीं. म्हणून प्राणाला आत्मा म्हणतां येत नाहीं.

मला भय वाटतें, मला लाज वाटते, मला संशय येतो, मी संकल्प करतों, असें आपण म्हणत असतों. भीति, लज्जा, संशय, संकल्प हे सारे मनाचे धर्म आहेत. म्हणून मनालाच आत्मा म्हणावें असे कोणी म्हणतात, पण हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. मन जर आत्मा असता, तर माझें मन असा प्रयोग झाला नसता. 'माझें मन दुसरीकडे होतें, माझें लक्ष नव्हतें, म्हणून मला हें कळलें नाहीं,' असें आपण म्हणत असतों यावरून आत्मा हा मनाहून निराळा, मनाच्या पलीकडचा आहे ही गोष्ट सिद्ध होते

बौद्ध लोकांच्या मतें बुद्धि किंवा विज्ञान हाच आत्मा होय 'सर्वं क्षणिकं क्षणिकम्' असा त्यांचा सिद्धान्त असल्यामुळें विज्ञान किंवा बुद्धि ही देखील क्षणिकच आहे. तेव्हां क्षणिक बुद्धीला जर आत्मा म्हटलें, तर ज्या बुद्धीनें पदार्थांचे अनुभव घ्यावेत ती बुद्धि पुढें रहात नाहीं व जी बुद्धि पुढें निर्माण होत असते तिला मागचे अनुभव नसतात. त्यामुळें मागें अनुभविलेल्या पदार्थांचें आपल्याला कधींच स्मरण होणार नाहीं. आरंभ केलेला अभ्यास वगैरे सर्व व्यर्थ होण्याची पाळी येईल. क्षणाक्षणाला बुद्धि नाश पावते. मग अभ्यासाचा काय उपयोग ? यावर बौद्ध असे म्हणतात की, मागची बुद्धि आपल्यावरचे सर्व संस्कार पुढच्या बुद्धीला अर्पण करते आणि मग नष्ट होते. त्यामुळें पूर्वी अनुभवलेल्या पदार्थांचें पुढें स्मरण व्हावयाला कांहीं हरकत नाहीं, आणि केलेला अभ्यासादि व्यर्थ होण्याची आपत्ति येत नाहीं. पण हें बौद्धांचें

म्हणतां येत नाहीं. इंद्रियांचीं हीं कार्यें असल्यामुळें इंद्रियेंच आत्मा होत. असें इंद्रियात्मवादी म्हणतात. पण हेंहि त्यांचें म्हणणें बरोबर नाहीं. कारण जागृत अवस्थेमध्यें व्यवहार करून थकलेलीं इंद्रियें जेव्हां विश्रांति घेत असतात तेव्हां झोंप लागत असते. झोंपेमध्यें मी पहातों, मी ऐकतों, अशी प्रतीति येत नाहीं. मग त्या वेळीं आत्मा नाहीं असें म्हणावें लागेल. यावर कोणी असें म्हणेल कीं, अहो झोंपेमध्यें देखील पहाणें, ऐकणें इत्यादि क्रिया घडत असतातच. होय. ही शंका बरोबर आहे. या ठिकाणीं झोप म्हणजे स्वप्न, पण झोंपेंत घडणाऱ्या पहाणें, ऐकणें इत्यादि क्रिया या आपल्या बहिरिंद्रियांनीं होत नसतात. किंबहुना स्वप्नांत कांहीं क्रिया घडतच नसतात. स्वप्नांतील सर्व व्यवहार हा आभासात्मक असल्यामुळें तो सत्य नसतो. स्वप्नांतील सृष्टि ही कांहीं निराळीच असल्यामुळें स्वप्नांतील वस्तु जशा स्वाप्निक त्याचप्रमाणें स्वप्नांतील वस्तूंना पहाणारे डोळेहि पण स्वाप्निकच म्हणजे मिथ्याच असतात. म्हणून स्वप्नांतील इंद्रियांनाहि आत्मा म्हणतां येणार नाहीं. शिवाय इंद्रियें हाच आत्मा असें मानलें तर एखादें इंद्रिय नष्ट झालें तर आत्मा नष्ट झाला असें म्हणावें लागेल, पण जागृतीमध्यें एक इंद्रिय नष्ट झालें तरी दुसऱ्या इंद्रियांनीं व्यवहार होतच असतो. तेव्हां इंद्रियांच्या नाशानें आत्मा नष्ट झाला असें कोणी म्हणत नाहीं. यावरून इंद्रियें म्हणजे आत्मा असें म्हणतां येत नाहीं.

इंद्रियें हीं ज्ञानाचीं साधनें आहेत. या साधनांनीं ज्याला ज्ञान होत असतें तो त्यांच्यापेक्षां निराळाच असणें स्वाभाविक आहे. इंद्रियांना आत्मा म्हटलें तर कोणतें इंद्रिय आत्मा समजावें ? चक्षुरिंद्रियाला आत्मा म्हटलें, तर आंधळ्याला आत्मा नाहीं असें म्हणावें लागेल. श्रवणेंद्रिला आत्मा म्हटलें, तर बहिऱ्याला आत्मा नाहीं असें म्हणावें लागेल. सर्व इंद्रियांचा समुदाय म्हणजे आत्मा असें म्हटलें, तर एखादें इंद्रिय नष्ट झालें तरी इंद्रियांचा समुदाय नष्ट झाला म्हणून आत्माहि नष्ट झाला असें म्हणावें लागेल. तात्पर्य, इंद्रियांना आत्मा समजणें हेंहि अज्ञानाचेंच द्योतक आहे.

मला तहान लागली, मला भूक लागली, मी श्वासोच्छ्वास करतों, असें आपण म्हणत असतों, तहान, भूक, श्वासोच्छ्वास हें प्राणाचें कार्य आहे म्हणून प्राण हाच आत्मा, असेंहि कांहीं लोक म्हणतात. पण हेंहि म्हणणें बरोबर नाहीं. कारण प्राण हा वायुरूप आहे, शरीरांत संचार करणाऱ्या वायूला प्राण

आहे, हें सांगितलें. त्यात बौद्धांच्या शून्यवादाचाहि ओझरता उल्लेख येऊन गेला. या श्लोकात शून्यवादाचें मामुख्यानें खंडण करीत आहेत. शून्यवादी बौद्ध म्हणतात, *आत्मा हा कोणालाहि कधीं कोठें उपलब्ध होत नाहीं. तो असता तर उपलब्ध झाला असता. सौषुप्तकालीं तर काहींच प्रतीतीला येत नाहीं. यावरून आत्मा हा शून्यस्वरूप आहे असेंच म्हणावें लागतें.*

आचार्य म्हणतात, हें बौद्धाचें म्हणणें बरोबर नाहीं. सूर्याला किंवा चंद्राला ग्रहण लागतें. तेव्हा सूर्यबिंब किंवा चंद्रबिंब दिसत नसतें. तें दिसत नाहीं म्हणून आकाशात चंद्र किंवा सूर्य नाहीं असें म्हणता येईल काय? ते आकाशात असूनहि छायाक्रान्त असतात म्हणून दिसत नाहींत. ग्रहणाच्या निमित्तानें त्यांच्या प्रकाशाचें जरी ग्रहण होत नसलें तरी स्वरूपतः सूर्यबिंबाची किंवा चंद्रबिंबाची सत्ता नाहींशी होत नाहीं. ते आकाशात असतातच. आणि *म्हणूनच ग्रहण सुटल्यानंतर पुन्हा पूर्ववत् त्यांच्या प्रकाशाचें आपण ग्रहण करू शकतों.* ते जर आकाशात नसते तर पुन्हा त्यांचें ग्रहण आपल्याला झालें नसतें. ज्या अर्थी ग्रहण सुटल्यानंतर पुन्हा आपल्याला ते दिसतात त्या अर्थी ग्रहणकालीहि ते आकाशात असलेच पाहिजेत. आपली दृष्टि आच्छादली गेलेली असल्यामुळें म्हणा अथवा पृथ्वीच्या छायेमुळें म्हणा ग्रहणकालीं सूर्यबिंब किंवा चंद्रबिंब आपल्याला दिसत नाहीं, एवढेंच फार झालें तर म्हणता येईल, पण चंद्र, सूर्य दिसत नाहींत म्हणून आकाशात ते नाहींत असें मात्र *म्हणता यणार नाहीं. तोच न्याय आत्म्याच्याहि बाबतींत आहे.*

सौषुप्तकालीं आत्मा भासत नाहीं. मी आहें अशी प्रतीति येत नाहीं. येवढ्यावरून आत्मा नाहींच. तो शून्यरूप आहे असें कसें म्हणता येईल? ज्याप्रमाणें ग्रहणकालीं चंद्र, सूर्य छायेनें आच्छादले जातात त्याचप्रमाणें सौषुप्तकालीं आत्मा मायेनें आच्छादला जातो. माया म्हणजे अज्ञान हें मागें सांगितलेंच आहे. गाढ झोंपेच्या वेळीं सर्व इंद्रियें विश्रान्ति घेत असतात. आप आपल्या कारणात लीन झालेलीं असतात. म्हणून त्या कालीं मी चालतों, मी बोलतों, मी पहातों किंवा मी ऐकतों इत्यादि कोणत्याहि प्रकारचे व्यवहार होऊ शकत नाहींत. कर्मेंद्रियावाचून किंवा ज्ञानेंद्रियावाचून कोणतीहि क्रिया किंवा कोणतेंहि ज्ञान होऊ शकत नाहीं. इंद्रियें हीं क्रियेचीं आणि ज्ञानाचीं साधनें आहेत. म्हणूनच त्यांना 'करण' म्हणजे साधन असें म्हणतात. आत्मज्ञानाचें अगदीं

आत्मा जर शून्यस्वरूप असेल, तर तो जगाचें कारण कसा होऊं शकेल? शून्यापासून जग उत्पन्न होणें शक्य नाहीं व जगाच्या कारणाला शून्य म्हणणेंहि योग्य होणार नाहीं कारण कोणत्याहि कार्याचें मूळ कारण हें त्या कार्यामध्यें अनुवृत्त असतेंच अनुवृत्त असणें याचा अर्थ संलग्न किंवा संबद्ध असणें असा आहे सोन्याचे अलंकार बनले तरी अलंकारामध्यें सोनें असतेंच गाडगें, मडकें, रांजण इत्यादि मृण्मय पदार्थांत माती ही असतेच त्याचप्रमाणें सत्स्वरूप आत्म्यापासून निर्माण झालेल्या जगातील पदार्थांत सत्स्वरूपानें आत्मा विराजमान असतोच सोन्याची आंगठी, सोन्याचें कडें, सोन्याचा सर किंवा मातीचें मडकें, मातीचा रांजण अशा रीतीनें सोनें किंवा मृत्तिका जशी कार्यांत प्रतीतीला येते त्याचप्रमाणें 'घट सन्' 'पट सन्' म्हणजे घट आहे, पट आहे, अशा रीतीनें प्रतीतीला येणारें अस्तित्व म्हणजे सत्ता, ती जगातील सर्व पदार्थांशीं संलग्न असलेली दृष्टीस पडते यावरून जगातील सर्व पदार्थांत सत्तत्व म्हणजे *आत्माच अनुस्यूत असलेला दृष्टीस पडतो तोच या जगाचें मूळ कारण आहे* शून्य हें जगाचें कारण होऊं शकत नाहीं

शून्यवादी बौद्धांना सुद्धां 'शून्य अस्ति' असेंच म्हणावें लागतें *अर्थात् शून्याची सत्ता म्हणजे अस्तित्व हें मानावें लागतेंच* तें जर मानलें नाहीं तर शून्यहि प्रतीतीला येणार नाहीं शून्य हें जर जगाचें मूळ कारण असेल तर 'घट शून्य' 'पट शून्य' म्हणजे घट नाहीं, पट नाहीं अशा रीतीनें सर्वत्र शून्याची म्हणजे अभावाचीच प्रतीति येऊं लागेल पण जगांत विद्यमान असलेल्या व अनुभवाला येणा या पदार्थांबद्दल ते शून्य आहेत अशी प्रतीति कोणालाच येत नसते म्हणून जगाचें कारण शून्य आहे असें म्हणता येत नाहीं

विविध नामांनीं व विविध रूपांनीं नटलेल्या विश्वातील सर्व पदार्थांत सत्ता, स्फुरण म्हणजे चैतन्य आणि आनंद हे सर्वत्र अनुवृत्त असल्याचें दृष्टीस पडतें आणि म्हणूनच जगाचें कारण सच्चिदानंद आत्माच आहे असें मानावें लागतें बौद्धांचा शून्य वाद कोणत्याहि दृष्टीनें उपपन्न होत नाहीं आत्मा जर शून्यस्वरूप असेल, तर कोणताहि व्यवहार उपपन्न होणार नाहीं सर्व शून्यच जर असेल, तर कोण कोणाला काय सांगणार? कोण कोणाचें काय करणार? सांगणारा व करणारा आणि जें सांगायचें व जें करायचें तें

जवळचें जें साधन — अन्तःकरण, मन तेंहि झोंपेच्या वेळीं पुरीतत् नावाच्या नाडीमध्यें प्रवेश करून विश्रांति घेत असतें. अशा रीतीनें मनासह सर्व इंद्रियें अंतर्हित होऊन आपआपल्या स्थानीं जेव्हा विश्रांति घेतात त्याच वेळेला आपल्याला गाढ झोंप लागते. हीच आपली सौषुप्त अवस्था होय. या वेळेला ज्ञानाचीं साधनें कार्यक्षम नसतात. आत्म्यावर अज्ञानाचें आवरण असतें म्हणून आत्मा प्रतीतीला येत नाहीं. तो नाहीं म्हणून प्रतीतीला येत नाहीं असें म्हणता येत नाहीं. जागृतीच्या क्षणीं अंतःकरण पुरीतत् नावाच्या नाडींतून बाहेर आल्याबरोबर अंतःकरणवृत्तींत प्रतिबिंबित झालेल्या चैतन्यानें अज्ञानाचें आवरण नाहींसें होऊन 'मी आहें' अशा तऱ्हेनें मीची आत्म्याची प्रतीति येऊं लागते. मी झोंपलों होतों, मी सुखानें झोंपलों होतों असें आपण म्हणत असतों. झोंप लागण्यापूर्वी डोकें दुखत असतें, कान ठणकत असतात, दाढ दुखत असते, पण झोंप लागल्याबरोबर हें सर्व नाहींसें होऊन जातें. डोकें दुखायचें थांबतें. दाढ दुखत नाहीं, कान ठणकत नाहींत, असा सर्वांचा अनुभव आहे. मला कांहीं कळलें नाहीं, असें आपण झोंपेंतून उठल्याबरोबर म्हणतों. मग झोंपेच्या वेळीं होणाऱ्या अनिर्वचनीय सुखाचा साक्षी अनुभविता कोण आहे? दुःखाभावाचा साक्षी कोण आहे? 'न किंचिदवेदिषम्' मला कांहीं कळलें नाहीं अशी जी जागे झाल्याबरोबर प्रतीति येते, त्या प्रतीतीनें सिद्ध होणाऱ्या अज्ञानाचा साक्षी कोण?

तात्पर्य, सौषुप्तकालीं आत्मा स्पष्टरूपानें प्रतीतीला आला नाहीं, तरी तो साक्षीरूपानें आहेच. तो नसता तर मी आतापर्यंत झोंपलों होतों, मी आता जागा झालों, अशी प्रतीति आलीच नसती. जो झोंपलेला असतो तोच जागा होतो म्हणून झोंपेच्या काळीं तो नाहीं, तो शून्यस्वरूप आहे, हें शून्यवादी बौद्धाचें म्हणणें बरोबर नाहीं. जो मी आतापर्यंत झोंपलों होतों तोच मी आ[illegible] जागा झालों, असें आपण म्हणत असतों. या ज्ञानाला प्रत्यभिज्ञा म्हणतात. या प्रत्यभिज्ञेमध्यें आत्माच प्रतीतीला येतो. मी जागा होतों, मला झोंप लागली, मला स्वप्नें पडलीं, मी जागा झालों या सर्व प्रतीतीवरून जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही कालांत एकच आत्मा असल्याचें सिद्ध होतें. यावरूनहि आत्मा शून्यस्वरूप आहे असें म्हणता येत नाहीं.

दुसरी गोष्ट अशी कीं, आत्मा हा सर्व जगाचें कारण आहे, तो सर्व विश्वाचें अधिष्ठान आहे, असें वेद वर्णन करतात. बौद्धाच्या म्हणण्याप्रमाणें

आणि सुषुप्ति त्याचप्रमाणें मूर्च्छा आणि समाधि इत्यादि सर्व अवस्था परस्पर भिन्न असल्या तरी या सर्व अवस्थांतून या देहांत नांदणारें आत्मतत्त्व अभिन्न म्हणजे एकरूप असेंच असतें. याच न्यायानें मृत्यूच्या पूर्वकाळची अवस्था आणि मृत्यूच्या उत्तरकाळची अवस्था म्हणजेच पूर्वजन्म आणि पुनर्जन्म या दोन्ही अवस्था परस्पर भिन्न असल्या, तरी त्याहि अवस्थेंत अनुस्यूत असलेलें आत्मतत्त्व हें एकच आहे याच कारणामुळें कित्येकांना आपल्या पूर्व जन्मांतील कांहीं गोष्टी विद्यमान जन्मांत स्मरत असल्याचें क्वचित् दिसून येतें.

एखाद्याची बुद्धि एखादा विषय ग्रहण करण्याला चटकन् समर्थ होते, तर एखाद्याला प्रयत्नांची पराकाष्ठा करूनहि एखादा विषय ग्रहण होत नाहीं. याला कारण पूर्वजन्मांतील संस्कारांची अनुकूलता असणें किंवा नसणें हेंच मानावें लागतें. ज्याच्या ठिकाणीं अनुकूल संस्कार असतात त्याच्याच ठिकाणीं ते संस्कार उद्बुद्ध म्हणजे जागृत झाल्यानंतर चटकन् विषय ग्रहण करण्याचें कार्य घडून येत असतें. तात्पर्य, जन्म जरी बदलला तरी संस्कारांचा अधिष्ठाता जो आत्मा तो सर्व जन्मांत एकच असतो. याच आत्म्याचें 'अहम्' म्हणजे मी या शब्दानें स्फुरण होत असतें. स्फुरण म्हणजे ज्ञान हें मागें सांगितलेंच आहे. मी लहान होतों, मी तरुण आहें मी तरुण होतों, मी आतां म्हातारा झालों. अशा तऱ्हेनें भिन्न भिन्न अवस्थांतूनहि एकाच मीची प्रतीति येत असते. मी जागा होतों, मी झोंपलों, मला स्वप्न पडलें, मी जागा झालों, या सर्व अवस्था भिन्न असल्या तरी त्या सर्व अवस्थांतून मी म्हणजे आत्मा हा एकच आहे, असेंच मानावें लागतें.

असें सांगतात कीं, एक मोठे योगी होते. एका राजाकडून पांच हजार रुपये बक्षीस मिळविण्याची प्रतिज्ञा करून पुष्कळ वर्षे ते समाधिअवस्थेंत प्रविष्ट झाले. पुढें व्युत्थानअवस्थेंत आल्याबरोबर पहिल्या प्रथम त्यांनीं राजाकडे पांच हजार रुपयांची याचना केली! यावरून समाधिपूर्व अवस्था, समाधि, अवस्था आणि व्युत्थानअवस्था या जरी भिन्न असल्या, तरी पांच हजार रुपये बक्षिसाची आशा धेऊन बसलेला आत्मा एकच आहे असें सिद्ध होतें. याप्रमाणें सर्व अवस्थेमध्यें एकरूपानें असणें याला अनुवृत्ति असें म्हणतात. 'अनुवर्तमान' म्हणजे सर्व काळ सर्व अवस्थेमध्यें एकरूपानें असणारा आणि 'मी' या शब्दानें ज्याचें अंतःस्फुरण होत असतें तो आत्मा देह, प्राण, इंद्रियें, मन आणि बुद्धि यांच्याहून निराळा व या सर्वांचा साक्षी आहे. हें ज्यांनीं समजून

होते याच न्यायानें बाल्य, तारुण्य, वार्धक्य या तिन्ही अवस्थांचा विचार केल्यास तिन्ही अवस्थेंत अनुस्यूत असलेलें व 'मी' या शब्दानें प्रतीतीला येणारें आत्मतत्त्व एकच आहे हेंहि पण सिद्ध होतें

या सर्व विवेचनावरून 'सोऽहमस्मि' तोच मी आहें ही प्रत्यभिज्ञा तोच हा दिवा किंवा तोच हा प्रवाह या प्रतीतीप्रमाणें भ्रांति आहे असें म्हणता येत नाहीं प्रत्यभिज्ञा ही अज्ञात प्रत्यक्षस्वरूप असल्यामुळें, बलवत्तर बाधक प्रमाण नसेल तर प्रत्यक्ष प्रमाणाइतकीच ती प्रबल आहे श्रुतीचें व साक्षात्कारी लोकाच्या अनुभवाचें तिला पाठबळ असल्यामुळें 'सोऽहम्' तोच मी ही प्रत्यभिज्ञा पूर्ण सत्यस्वरूप आहे ती भ्रांति नव्हे अशा प्रत्यभिज्ञाबलानें, युक्तिबलानें व श्रुतिबलानें आत्मा हा शून्यस्वरूप नसून तो सत्ता व चैतन्य यांचें अधिष्ठान असलेला नित्य, निरंतर एकमेव, अद्वितीय, आनंदस्वरूप असाच आहे हेंच सिद्ध होतें आहेहि तो तसाच, यांत संशय नाहीं हा सर्व विचार स्तोत्र पंजा असलेल्या 'ब्रह्मज्ञानावलीमाला' या प्रकरणांत वाचकांनी अवश्य पहावा

आत्म्याचें हें यथार्थस्वरूप कळण्याकरिता ईश्वरकृपेची व गुरुकृपेची आवश्यकता आहे साधे व्यावहारिक ज्ञान देखील गुरुवाचून — शिक्षकावाचून नीट नि संदिग्धपणानें मिळविता येत नाहीं, तर मग पारमार्थिक ज्ञानाकरिता गुरूची आवश्यकता मानण्यांत कमीपणा कसला ? गुरुवाजी सर्वस्वीं त्याज्य असली तरी गुरु मात्र त्याज्य नाहीं हें अवश्य लक्षांत घ्यावें ज्याला आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान झालेलें असतें तो ईश्वरकृपेबद्दल आणि गुरुकृपेबद्दल कृतज्ञता व्यक्त करीत असतोच ज्याला ईश्वरकृपेची आवश्यकता वाटत नाहीं त्याचें अंतःकरण अहंकारानें स्तब्ध झालेलें असतें त्याला कांहींच कळत नाहीं त्याची अवस्था दयनीय असते

तात्पर्य, प्रत्यभिज्ञाबलानें आत्मा हा शून्यस्वरूप नसून तो सदा सर्वकाळ सर्व अवस्थामध्यें एकरूपानें विद्यमान आहे बालपणीं आपण जें पाहिलेलें असतें तेंच तारुण्यांत व वार्धक्यांत आपल्याला स्मरत असतें झोंपेपूर्वी आपण जें पहातों तेंच जागे झाल्याबरोबर आपल्याला स्मरत असतें मूर्च्छा किंवा समाधि या अवस्थेच्या पूर्वकाळीं आपण जें पाहिलेलें किंवा ऐकलेलें असतें तेंच मूर्च्छेच्या किंवा समाधीच्या उत्तरकाळीं आपल्याला स्मरत असतें, असा आपला अनुभव आहे बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य, जागृति, स्वप्न

**स्वप्ने जाग्रति वा य एष पुरुषो मायापरिभ्रामित-**
**स्तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ८ ॥**

कार्य आणि कारण या रूपानें, मालक आणि चाकर या रूपानें, गुरु आणि शिष्य:या रूपानें त्याचप्रमाणें पिता आणि पुत्र तसेंच माता, भगिनी, पत्नी आणि कन्या इत्यादि, नात्यांच्या रूपानें अनेक प्रकारें विश्वामध्यें व्यवहार करीत असताना भेद प्रतीतीला येत असतो. विश्व हें सर्वस्वी वैशिष्ट्यानें नटलेलें भिन्न भिन्न स्वरुपानें प्रतीतीला येत असतें. स्वप्नांत काय किंवा जागृतीच्या काळांत काय, भिन्न भिन्न रूपानें प्रतीतीला येणारा हा विश्वप्रपंच म्हणजे मायेनें निर्माण केलेला केवळ भ्रम होय. मायेनें भ्रमविलेला हा आत्मा तत्त्वतः नित्य निरतिशय सच्चिदानंदस्वरूप आहे. तेच श्रीगुरुदक्षिणामूर्ति भगवान् श्रीशंकर होत. त्यांना माझा नमस्कार असो.

अद्वैततत्त्वाचा विचार करताना, असा एक महत्त्वाचा प्रश्न पुढें येतो कीं, खरोखर, अद्वैत मताप्रमाणें ब्रह्मच जर एक सत्य आणि त्याच्या व्यतिरिक्त सर्वच जर मिथ्या म्हणजे खोटें असेल तर मग तत्त्वज्ञानाच्या उपदेशाचा तरी काय उपयोग ? तो तरी सत्य कोठें आहे ? कोण गुरु नि कोण शिष्य ? कसला बंध आणि कसला मोक्ष ? बंधच जर सत्य नाहीं तर बंधांतून मुक्त होण्यासाठीं प्रयत्न तरी कशाला ? बंधाचीं कारणें कोठें सत्य आहेत तर बंध सत्य असूं शकणार ? आणि शास्त्रें तरी कोठें सत्य आहेत ? कशाला त्या शास्त्रांचा उपदेश ऐकायचा किंवा करायचा ? फक्त ब्रह्म तेवढें सत्य व त्याव्यतिरिक्त सर्व मिथ्या म्हणजे खोटें असें म्हटलें कीं, सर्व प्रयत्नांचें क्षेत्र संपलें ! प्रयत्न कोणी करायचा आणि कशाकरितां करायचा ? माता, पिता, गुरु, बंधु, देव धर्म, पूजा, अर्चा, भक्ति, श्रद्धा, वेद, शास्त्र इत्यादि सर्वच मिथ्या म्हटल्यावर विश्वांतील सर्व व्यवहारच लुप्त होण्याचा प्रसंग येईल. तेव्हा ब्रह्म हेंच तेवढें सत्य आणि त्याव्यतिरिक्त सर्व कांहीं मिथ्या हें म्हणणें बुद्धीला पटत नाहीं.

यावर उत्तर असें कीं, एकमेव, अद्वितीय, अखंडानंद, सच्चिद्रूप आत्म्याच्या ठिकाणीं प्रतीतीला येणारा विविध विश्वप्रपंच हा अनादि अनिर्वचनीय असलेल्या अविद्येमुळें भासत असतो. जोंपर्यंत आत्मस्वरूपाच्या साक्षात्कारानें अविद्येचा निरास होत नाहीं तोंपर्यंत सर्व व्यवहार हा आत्म्याच्या ठिकाणीं विश्वप्रपंचाप्रमाणेंच अज्ञानाचा निरास म्हणूनच होत असतो. या सर्व

तरी तो असतोच तो अत्यंत प्रिय आहे प्रिय म्हणून समजल्या जाणाऱ्या वित्तवैभवापेक्षा, मित्रापेक्षा, पुत्रापेक्षा, पत्नीपेक्षा, फार काय सांगावें, आपल्या देहापेक्षाहि तो अत्यंत प्रिय आहे तो निरपेक्ष प्रेमाचें स्थान आहे नित्य आणि निरतिशय आनंद हेंच त्याचें रूप आहे 'अहम्' म्हणजे मी या शब्दानें त्याचें नेहमींच अन्तःस्फुरण होत असतें

यावर कोणी अशी शंका घेईल कीं, अहो! 'मी' शब्दानें आम्हाला नेहमींच आत्म्याची प्रतीति येत असते मग आत्मज्ञानाकरिता ईश्वरकृपेची काय आवश्यकता आहे? आणि सद्गुरूची तरी काय आवश्यकता आहे? पण ही शंका बरोबर नाहीं कारण आपल्याला 'मी' या शब्दानें जें आत्म्याचें भान होत असतें तें काहीं शुद्ध आत्मस्वरूपाचें ज्ञान नव्हे तें देह, प्राण, मन व बुद्धि या उपाधीशीं संलग्न झालेल्या आत्म्याचें ज्ञान होय उपाधीशीं संलग्न झाल्यामुळें मालिन्यानें मलिन झालेल्या आत्म्याचें तें ज्ञान आहे क्वचित् स्थूल देहालाच आपण आत्मा समजतो क्वचित् इंद्रियादि समुदायाला आपण आत्मा समजतों क्वचित् माझा देह, माझीं इंद्रियें असाहि आपण व्यवहार करीत असतों यावरून आपल्याला शुद्ध, निरुपाधिक, निर्मल अशा आत्मस्वरूपाची स्पष्ट कल्पनाच नसते असेंच म्हणावें लागतें आत्मा तर शुद्ध आहे निर्मळ आहे निर्विकार आहे निराकार आहे निर्गुण आहे शोक, दैन्य दारिद्र्य, मोह इत्यादिकांचा त्याच्याशीं तिळमात्रहि संबंध नाहीं तो स्वयंप्रकाश आहे सच्चिदानंदस्वरूप आहे पण ही गोष्ट मात्र ईश्वरकृपेशिवाय आणि सद्गुरुकृपेशिवाय कळणार नाहीं म्हणून या श्लोकाच्या उत्तरार्धांत श्रीगुरु दक्षिणामूर्ति यांचें वर्णन करताना 'स्वात्मानं प्रकटीकरोति भजतां यो मुद्रया भद्रया' असें म्हटलें आहे स्व म्हणजे सत्य ज्ञान अनंत, तसेंच नित्य विज्ञान आणि आनंदस्वरूप ब्रह्म हेंच ज्याचें 'आत्मा' म्हणजे स्वरूप आहे कर्ता, भोक्ता, सुखी, दुःखी म्हणून जो प्रतीतीला येतो तो सोपाधिक आत्मा आहे त्यालाच जीवात्मा म्हणतात तें आत्म्याचें वास्तव स्वरूप नव्हे हें जो आपल्या लोककल्याणकारक अशा रमणीय ज्ञानमुद्रेनें शरण आलेल्या भक्तजनाच्या प्रतीतीला आणून देतो त्या श्रीगुरु दक्षिणामूर्तीला माझा नमस्कार असो

विश्वं पश्यति कार्यकारणतया स्वस्वामिसम्बन्धतः
शिष्याचार्यतया तथैव पितृपुत्राद्यात्मना भेदतः।

व्यवहार कार्यकारणभाव मूलकच असतो, पण जागे झाल्याबरोबर आपण म्हणत असतोंच की, हें सर्व स्वप्नच होतें, यात तत्त्वत सत्य काहींच नाहीं तीच स्थिति जागृतींतील सर्व व्यवहाराची समजावी तत्त्वज्ञानाच्या परिपाकानें अथवा गुरुकृपेनें जीव तत्वत जागृत झाला की त्याला शुद्ध आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो शुद्ध आत्मस्वरूपाचा साक्षात्कार झाल्याबरोबर जागृतींतील सर्व व्यवहारहि स्वप्नातील व्यवहाराप्रमाणेंच मिथ्या स्वरूपाचे होते अशी प्रतीति येते जागृतींतील सर्व व्यवहाराचा व सत्यत्वानें प्रतीतीला येणाऱ्या वस्तूचा बाध होतो ते परमार्थत सत्य नाहींत अशी प्रतीति येते हाच त्याचा बाध होय ज्याप्रमाणें जागृतीच्या क्षणीं स्वप्नांतील सर्व जग नाहींसें होऊन आपण एकटेंच आहोंत असें प्रतीतीला येतें त्याचप्रमाणें आत्मसाक्षात्कार झाल्यानतर जागृतींतीलहि सर्व विश्व बाधित होत असतें 'आत्मैवेद सर्वम्' हें सर्व आत्मस्वरूपच आहे आपण एकच एक आत्मा आहों अशी प्रतीति येते व तिचा पुढें केव्हाहि बाध होत नसल्यामुळें ती सत्यस्वरूप आहे, आत्मस्वरूप आहे, असें म्हणावें लागतें

यावर कोणी असें म्हणेल की, अहो! जागे झाल्यावर स्वप्नांतील सर्व सृष्टि नाहींशी होते, पण आत्मसाक्षात्कार झाल्यानतर जग नाहींसें होत नाही तेव्हा वर दिलेलें स्वप्नाचें उदाहरण हें काही बरोबर नाहीं यावर उत्तर असें कीं, जागे झाल्याबरोबर स्वप्नातील सृष्टि जशी मावळते तसच आत्मसाक्षात्कारानतरहि त्या थोर साक्षात्कारी महापुरुषाच्या दृष्टीनें हें सर्व जग मावळलेलेंच असतें तो विविध नामरूपानीं नटलेल्या विश्वप्रपचाला सत्य मानीत नसतो ते सर्व त्याच्या दृष्टीनें आत्मस्वरूपच असतात 'ब्रह्मार्पणं ब्रह्म हविर्ब्रह्माग्नौ ब्रह्मणा हुतम्। ब्रह्मैव तेन गन्तव्य ब्रह्मकर्मसमाधिना' या श्लोकात जगद्गुरु भगवान् श्रीकृष्णानें ब्रह्मवेत्याचा सर्व व्यवहार ब्रह्मस्वरूपच असल्याचें स्पष्ट सांगितलें आहे ब्रह्मवेत्ता स्वत ब्रह्म असतो त्याचा अग्नि ब्रह्म, त्याचीं हविर्द्रव्यें ब्रह्म, त्याची हवनक्रिया ब्रह्म, यज्ञ करून त्यानें जें फळ मिळवायचें तेंहि ब्रह्म त्याचीं यज्ञपात्रें, स्रुक् स्रुवा, साम्हण वगैरे इत्यादि सर्व ब्रह्मच होय सर्वत्र ब्रह्म पहाणें हेंच ब्रह्मकर्म त्यातच त्याचें चित्त तन्मय झालेलें असतें म्हणूनच त्याला 'ब्रह्मकर्मसमाधि' हें अन्वर्थ विशेषण दिलेलें आहे तत्त्वसाक्षात्कारी पुरुषाला एका आत्मस्वरूपाशिवाय दुसरें काहींच उरलेलें दिसत नसतें तात्पर्य, वर दिलेलें स्वप्नाचें उदाहरण हें अगदीं बरोबर आहे

व्यवहाराला कारण अविद्या, माया, प्रकृति, अव्यक्त किंवा अज्ञान हेंच होय विद्येनें अविद्येचा निरास होत नाहीं तोंपर्यंत गुरु, शिष्य, माता, पिता, शास्त्र, उपदेश, धर्म, अधर्म, कर्तव्य, अकर्तव्य, शत्रु, मित्र इत्यादि सर्व व्यवहार हा होतच रहातो त्याला काहीं प्रतिबंध येत नाहीं अज्ञान असेतोंपर्यंत हा सर्व व्यवहार सत्य म्हणून प्रतीतीला येतो अज्ञान मावळलें म्हणजे या सर्व व्यवहाराचें मिथ्यात्व प्रतीतीला येतें स्वप्नकाळीं स्वप्नातील सर्व व्यवहार – माता, पिता, पत्नी, पुत्र, मित्र यांच्या गांठीभेटी, संयोग-वियोग, जय पराजय, सुख दु ख इत्यादि सर्व गोष्टी सत्यच वाटत असतात जोंपर्यंत जागृति नाहीं तोंपर्यंत ते सत्य वाटतात, पण जागृतीच्या क्षणीं स्वप्नातील सर्व व्यवहाराचें मिथ्यात्व प्रतीतीला येतें, हें सर्वानुभवसिद्धच आहे तोच न्याय आपल्या जागृतींतील व्यवहारालाहि लागू पडतो एकच आत्मा मायेच्या साहाय्यानें उपास्य, उपासक, गुरु, शिष्य, सेव्य, सेवक इत्यादि रूपानें सर्व व्यवहार करीत असतो अज्ञान आहे तोंपर्यंत हा सर्व व्यवहार सत्य स्वरूपाच्या अभिनिवेशानें चाललेला असतो परमार्थत पाहू गेलें असता एकच आत्मा आहे भेदाची प्रतीति ही मिथ्या आहे ही मायेनें आत्म्याच्या ठिकाणीं कल्पिलेली आहे, हीच गोष्ट सिद्ध होते

कोणी म्हणेल, अहो ! मिथ्या म्हणजे तरी काय ? सर्व व्यवहार आणि कार्यकारणभाव हे जर उत्पन्न होत असतील तर त्याना मिथ्या कसें म्हणावें ? यावर उत्तर असें आहे की, मिथ्या म्हणजे ज्याचा बाध होतो तें हें तत्त्वत सत्य नाहीं अशी ज्याच्याबद्दल प्रतीति येते त्याला मिथ्या असें म्हणतात अथवा जी वस्तु ज्या ठिकाणीं तत्त्वत नाहीं त्या ठिकाणीं त्या वस्तूची प्रतीति येणें यालाहि मिथ्या असेंच म्हणतात सम्यग् ज्ञान म्हणजे आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान आत्मस्वरूपाचा साक्षात्कार तो झाला म्हणजे शिष्य, आचार्य, बंध, मोक्ष, शास्त्र, उपदेश इत्यादि सर्व स्वप्नतुल्य मिथ्या भासतात

स्वप्नामध्यें सुद्धा खाणें पिणें, निजणें बसणें, जाणें येणें, शत्रु मित्र आपला, परका, प्रेम द्वेष सुख दु ख इत्यादि सर्व व्यवहार होतच असतात स्वप्नातील व्यवहारातहि कार्यकारणभाव असतोच स्वप्नातहि भूक लागली असता अन्न मिळविण्याचा प्रयत्न होतो भय वाटण्यासारखें काहीं दिसलें असता तेथून बाजूला होण्याचा अथवा पळून जाण्याचा प्रयत्न होतो इष्ट गोष्टी घडून आल्या म्हणजे सुख होतें किंवा अनिष्ट गोष्टी घडून आल्या म्हणजे दु ख होतें स्वप्नातील हा सर्व

पदार्थ तयार झाले नैवेद्य-वैश्वदेव, सवाष्ण ब्राह्मण याच्या अगोदरच बाईंनी आपला एक एक पदार्थ तोंडात टाकायला आरंभ केला ते यजमानांनी पाहिलें ते त्या बाईवर रागावले "काय चालवलें आहे तुम्ही हें" असें त्यांनी दरडाऊन विचारलें अजून नैवेद्य नाहीं, वैश्वदेव नाहीं, स्वैंपाकातील पदार्थ तुम्हीच अगोदर कसा खायला आरंभ केला? बाई म्हणाल्या "एवढें रागावता का?" 'अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रित' देहाचा आश्रय करून रहाणारा आत्मा हा ईश्वरच आहे बाईचें हें उत्तर ऐकल्यावरोबर यजमानांनी चुलींतलें जळकें लाकूड काढलें व त्या बाईवर उगारलें बाई घाबरल्या। उगारलेल्या येण्याचे तळहात यजमानाकडे करून जमिनीकडे उताण्या झुकल्या आणि डोळे व आ वासून मेलें मेलें म्हणून ओरडल्या! यजमान म्हणाले, अहो बाई! 'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः' हें तुम्हाला माहीत नाहीं काय? आत्म्याला शस्त्रें तोडू शकत नाहींत व अग्नि जाळू शकत नाहीं बाई निरुत्तर झाल्या व त्यांची चांगलीच फटफजीती झाली! तात्पर्य, खरा साक्षात्कारी पोकळ बडबड करीत नसतो व ढोंगहि करीत नसतो

आता कोणी अशी शंका घेतील की, ज्याच्या अंतःकरणांत स्वत्वाभिमान नाहीं, कर्तव्याबद्दल अभिनिवेश नाहीं, जयापजयाची अथवा मानापमानाची ज्याला परवा नाहीं, असला आत्मसाक्षात्कारी तत्त्ववेत्ता राष्ट्राच्या दृष्टीनें काय कामाचा? असल्या लोकामुळें राष्ट्राच्या उत्कर्षाऐवजीं अपकर्षच नाहीं का घडून येणार? पण हीहि शंका बरोबर नाहीं शहाणा मनुष्य ज्या नावेंत बसून पैलतीराला जातो ती नाव तो काहीं मोडून तोडून टाकीत नाहीं आपल्या प्रमाणें इतरालाहि तिचा उपयोग होईल या सद्भावनेनें, परोपकारबुद्धीनें तो ती सुरक्षितच ठेवीत असतो याच न्यायानें दया, परोपकार, शांति, समाधान, संतोष, मनोनिग्रह, इन्द्रियनिग्रह, सदाचार, सुविचार इत्यादि ज्या सद्गुणाच्या अभ्यासानें आपण आनंदपदाला पावलों त्याच सद्गुणाचा उपयोग इतरानाहि व्हावा या सद्भावनेनें प्रवृत्त झालेली त्याची बुद्धि आपल्या स्वाभाविक संस्कारानेंच प्रेरित होऊन राष्ट्राच्या खऱ्या अर्थी उत्कर्षाला कारणीभूत असलेल्या सर्व सद्गुणाचा व दैवी संपत्तीचा प्रसार व प्रचार करण्यात सदा सर्वकाळ तत्परच असते वर सांगितलेल्या सर्व सद्गुणाचा अभ्यास साक्षात्कारी तत्त्ववेत्त्याला अंगवळणींच पडलेला असतो 'पडलें वळण इंद्रिया सकळां' या न्यायानें साक्षात्कारी

कोणी म्हणेल कीं, अहो तुम्हा आम्हा सर्व सामान्य लोकांचे व्यवहार व तत्त्ववेत्याचे व्यवहार सारखेच असतात मग त्याच्यात व आपल्यात फरक काय राहिला ? यावर उत्तर असें कीं, तुमचे आमचे व्यवहार मी व माझें या अभिनिवेशावर आणि द्वैतबुद्धीवर आधारलेले असतात, तर तत्त्ववेत्याच्या व्यवहारात मी व माझें हा अभिनिवेश नसतो व द्वैतभावहि नसतो अभिनिवेश आणि द्वैतभाव असेल, तर तो तत्त्वसाक्षात्कारीच न व्हे

कोणी असें विचारील कीं, खाणें पिणें इत्यादि सर्व व्यवहार तत्त्ववेत्याचेहि आमच्याप्रमाणेंच चालू असतात मग आमच्यात व त्याच्यात काय फरक राहिला ? यावर उत्तर असें कीं, विद्युत्प्रवाह बद केल्यानंतरहि कांहीं काळ पर्यंत विजेचा पखा फिरतच असतो आगगाडीला पूर्ण ब्रेक दिला तरी कांहीं काळ गाडी चालतच रहाते त्याचप्रमाणें तत्त्वसाक्षात्कारानंतरहि तत्त्ववेत्याच्या देह इंद्रियादि सघाताकडून कांहीं काळ खाणें, पिणें, निजणें, बसणें इत्यादि व्यवहार हे होत रहातात त्याला कारण देह इंद्रियादि सघाताच्या ठिकाणीं असलेले सस्कार हेच होय कोणी म्हणेल कीं, मग आमच्याप्रमाणेंच तत्त्ववेत्ता कसाहि वागला तरी चालेल काय ? त्याला उत्तर – छे ! तत्त्ववेत्ता हा तुमच्या प्रमाणें वागेल तसा वागणारच नाहीं कारण त्याच्या देहेन्द्रियादि सघाताला तत्त्वसाक्षात्काराला अनुरूप अशा शांति, दया, अहिंसा, परोपकार आणि शुद्ध आचरण याचेच सस्कार झालेले असतात इंद्रियनिग्रह, मनोनिग्रह याचा अभ्यास त्याचा दृढ झालेला असतो वैराग्याचे सस्कार त्याचे प्रबळ असतात म्हणून सर्वसामान्य अज्ञ लोकाप्रमाणें त्याचें आचरण सदोष असू शकणार नाहीं तो अज्ञ जनाप्रमाणें वाटेल तसें वागणार नाहीं इतकेंहि करून क्वचित् प्रसगी तत्त्ववेत्याच्या वागण्यात दोष घडलाच तर तो अकस्मात् होणा या अपघाताप्रमाणें त्याच्या बलवत्तर प्रारब्धकर्माचाच तो दुष्परिणाम होय अपवादानें सर्वसामान्य नियमाचा बाध होत नाहीं तत्त्ववेत्याच्या आचरणात सहसा दोष आढळणार नाहीं अपवादाच्या आड लपून कोणींहि आपण साक्षात्कारी असल्याचें ढोंग मात्र करू नये

असें सागतात कीं, एक रंगोपाकीणबाई होत्या मोठ्या तत्त्वज्ञानाच्या गोष्टी सागायच्या त्या यजमानाच्या येथें कांहीं नैमित्तिक प्रसग होता त्या-निमित्तानें पाकनिष्पत्ति झाली गोडधड आणि खमग अशा स्वरूपानें अनेक

पदार्थ तयार झाले. नैवेद्य-वैश्वदेव, सवाष्ण ब्राह्मण यांच्या अगोदरच बाईनीं आपला एक एक पदार्थ तोंडांत टाकायला आरंभ केला. तें यजमानानीं पाहिलें. ते त्या बाईवर रागावले. "काय चालवलें आहे तुम्ही हें" असें त्यांनी दरडाऊन विचारलें. अजून नैवेद्य नाहीं, वैश्वदेव नाहीं, स्वैंपाकातील पदार्थ तुम्हींच अगोदर कसा खायला आरंभ केला? बाई म्हणाल्या, "एवढें रागावतां कां?" 'अहं वैश्वानरो भूत्वा प्राणिनां देहमाश्रितः' देहाचा आश्रय करून रहाणारा आत्मा हा ईश्वरच आहे. बाईचें हें उत्तर ऐकल्यावरोबर यजमानानीं चुलींतलें जळकें लाकूड काढलें व त्या बाईवर उगारलें. बाई घाबरल्या! उभारलेल्या बोटांचे तळहात यजमानाकडे करून जमिनीकडे उताण्या झुकल्या आणि डोळे व आ वासून मेलें मेलें म्हणून ओरडल्या! यजमान म्हणाले, अहो बाई! 'नैनं छिन्दन्ति शस्त्राणि नैनं दहति पावकः' हें तुम्हांला माहीत नाहीं काय? आत्म्याला शस्त्रें तोडू शकत नाहींत व अग्नि जाळू शकत नाहीं. बाई निरुत्तर झाल्या व त्यांची चांगलीच फटफजीती झाली! तात्पर्य, खरा साक्षात्कारी पोकळ बडबड करीत नसतो व ढोंगहि करीत नसतो.

आता कोणी अशी शंका घेतील कीं, ज्याच्या अंतःकरणांत स्वत्वाभिमान नाहीं, कर्तव्याबद्दल अभिनिवेश नाहीं, जयापजयाची अथवा मानापमानाची ज्याला परवा नाहीं, असला आत्मसाक्षात्कारी तत्त्ववेत्ता राष्ट्राच्या दृष्टीनें काय कामाचा? असल्या लोकांमुळें राष्ट्राच्या उत्कर्षाऐवजीं अपकर्षच नाहीं का घडून येणार? पण ही शंका बरोबर नाहीं. शहाणा मनुष्य ज्या नावेंत बसून पैलतीराला जातो ती नाव तो कांहीं मोडून-तोडून टाकीत नाहीं. आपल्याप्रमाणें इतरांनाहि तिचा उपयोग होईल या सद्भावनेनें, परोपकारबुद्धीनें तो ती सुरक्षितच ठेवीत असतो. याच न्यायानें दया, परोपकार, शांति, समाधान, संतोष, मनोनिग्रह, इन्द्रियनिग्रह, सदाचार, सुविचार इत्यादि ज्या सद्गुणांच्या अभ्यासानें आपण आनंदपदाला पावलों त्याच सद्गुणांचा उपयोग इतरांनाहि व्हावा या सद्भावनेनें प्रवृत्त झालेली त्यांची बुद्धि आपल्या स्वाभाविक संस्कारानेंच प्रेरित होऊन राष्ट्राच्या खऱ्या अर्थी उत्कर्षाला कारणीभूत असलेल्या सर्व सद्गुणांचा व दैवी संपत्तीचा प्रसार व प्रचार करण्यांत सदा सर्वकाळ तत्परच असते. वर सांगितलेल्या सर्व सद्गुणांचा अभ्यास साक्षात्कारी तत्त्ववेत्याच्या अंगवळणींच पडलेला असतो. 'पडलें वळण इंद्रियां सकळां' या न्यायानें साक्षात्कारी

तत्त्ववेत्ता स्वत कृतार्थ झाला, तरी त्याचा देह, मन बुद्धि, हे सर्व सद्गुणाचाच विकास घडवून आणण्याचें कार्य करीत असतात या दृष्टीनें तत्त्ववेत्ता, साक्षात्कारी महात्मा राष्ट्राला अत्यत उपयुक्त असतो म्हणून राष्ट्राच्या किंवा समाजाच्या दृष्टीनें त्याच्या उपयुक्ततेबद्दल शका घेणें हें अत्यत अनुचित असून तें एक अज्ञानाचेंच द्योतक होय

आता कोणी अशी शका घेतील कीं, अहो! एका ब्रह्माव्यतिरिक्त 'सर्व मिथ्या' म्हणजे सर्वच खोटें आहे असें तुम्ही म्हणता, मग तुमचा वेदान्त तरी खरा आहे का? तो जर खरा असेल तर 'सर्व मिथ्या' ही तुमची प्रतिज्ञा किंवा हा तुमचा सिद्धान्त खोटा ठरतो बरें, वेदान्त जर खोटा आहे असें म्हणाल, तर मग खोट्या वेदान्तानें खऱ्या आत्म्याचें ज्ञान कसें होणार? खोट्या वेदान्तानें आत्मस्वरूपाचें जें ज्ञान होईल तें सत्य कसें असू शकेल? बोलाचीच कढी बोलाचाचि भात, जेवोनिया तृप्त कोण झाला?

यावर वेदान्ततत्त्ववेत्ते म्हणतात कीं, ही शका काहीं बरोबर नाहीं यथार्थ आत्मस्वरूपाच्या ज्ञानाचें वेदान्त हें एक साधन आहे साधन खोटें असलें तरी त्यानें सत्य स्वरूप असलेल्या साध्याची प्राप्ति होऊ शकते सत्य साध्याच्या प्राप्तीकरिता साधनहि सत्यच असायला पाहिजे असा काहीं नियम नाहीं शेता मध्यें शेतकरी बुजगावणें करून ठेवीत असतात बुजगावणेंच तें बोलून चालून. तो काहीं खरा राखणदार नसतो तरी पण त्यानें काहीं काळपर्यंत शेताचें अशत तरी सरक्षण होत असतें ही गोष्ट खरी आहे बागुलबुवा खोटा असला तरी त्याच्या भीतीनें लहान मुलें रडायची थाबतात ही गोष्ट खरी आहे मद अधकारात दिसणारा दोरीवरचा साप हा खोटा असला, तरी त्याच्या भीतीनें हृदय धडधडतें व शरीराचा थरकाप होतो ही गोष्ट खरी आहे अतिमेदस्वी मनुष्याचा मेद कमी करण्याकरिता त्या मेदस्वी मनुष्याला खोट्यानाट्या गोष्टी सागून त्याला शोक व दु ख होईल असा प्रयत्न करावा म्हणजे त्याचा मेद कमी होतो असें आयुर्वेदानें सागितलेलें आहे अशा रीतीनें पुष्कळ ठिकाणी साधनें खोटीं असलीं तरी त्यानी खरीं साध्यें सिद्ध होत असल्याचें दृष्टीस पडतें याच न्यायानें विचार केला असता वेदान्त हा मिथ्या असला, तरी त्यानें पारमार्थिक सत्य असलेल्या आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान होऊ शकतें असें मानण्यास काहींच हरकत नाहीं देह मिथ्या असला तरी आत्म-

स्वरूपाचें सत्य ज्ञान होण्याला तो साधन होऊ शकतो देह स्वतः नाशवत असला तरी अविनाशी अशा आत्मतत्त्वाचा लाभ त्यानें होऊ शकतो देह हा मरण पावणारा असला तरी त्याच्या योगानें अमरस्वरूप असलेल्या आत्म्याची प्राप्ति होत असते ही गोष्ट सर्वमान्य आहे शरीररूपी साधन असत्यस्वरूप आणि मर्त्यस्वरूप असलें, तरी त्यानें सत्यस्वरूप व अमरस्वरूप असलेल्या, अशा माझा लाभ करून घेणें यातच खरी बुद्धिमानाची बुद्धिमत्ता व विद्वानाची विद्वत्ता आहे असें भागवतातहि श्रीहरीनें म्हटलेलें आहे 'एषा बुद्धिमतां बुद्धिर्मनीषा च मनीषिणाम् । यत्सत्यमनृतेनेह मर्त्येनाप्नोति माऽमृतम् ॥' तात्पर्य, साधनें असत्य असलीं तरी सत्य साध्याच्या प्राप्तीला तीं कारणीभूत होऊ शकतात याप्रमाणें वरच्या कोणत्याहि शंकांना अवसर उरत नाहीं

आता स्वप्नात अथवा जागृतींत ज्या मायेमुळें विश्वप्रपंचाचा हा व्यवहार होऊ शकतो ती माया तरी काय आहे ? कोणत्याहि युक्तीचें जिला पाठबळ नाहीं, अशा त हेची अनुभवाला येणारी, आभासात्मक प्रतीतीचें साधन म्हणजे माया, मायेनेंच सर्व पदार्थ भिन्न भिन्न नामरूपानें प्रतीतीला येतात मायेमुळेंच सर्व व्यवहार होतो, पण तात्त्विक विचार केला असता ते पदार्थ, ती प्रतीति आणि तो व्यवहार सर्वच बाधित होतात तत्त्वतः जेथें जें नाहीं तेथें तें प्रतीतीला आणून देणारी ती माया म्हणूनच मायेला अविद्या, अज्ञान, अध्यास, प्रकृति इत्यादि पर्याय दिले जातात हीच माया पूर्वकाळच्या संस्काराना जागृत करून उत्तरोत्तरकालीं जीवाना भ्रमवीत असते पुन पुन्हा जागृति, स्वप्न सुषुप्ति पुन पुन्हा जन्म व मरण, पुन पुन्हा बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य या अवस्थाचें चक्र या मायेमुळेंच चाललेलें असतें या मायेमुळेंच विश्व दिसतें विश्वातील कार्यकारणभाव प्रतीतीला येतात सेव्य आणि सेवक, शिष्य आणि आचार्य, तसेंच पिता आणि पुत्र इत्यादि सर्व भेद प्रतीतीला येत असतात कोणताहि व्यवहार अनुपपन्न होत नाहीं हें सर्व मायेचेंच कार्य होय असा या आठव्या श्लोकातील पहिल्या व दुसऱ्या चरणाचा अभिप्राय आहे

आत्मा हा तत्त्वतः गुणत्रयातीत आणि अवस्थात्रयातीत आहे म्हणजे तो सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणाच्या पलीकडचा व जागृति, स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थाच्या अथवा बाल्य, तारुण्य, वार्धक्य या अवस्थाच्या पलीकडचा असूनहि तिन्ही गुणात गुरफटलेला व तिन्ही अवस्थेंत

भटकत असलेला दिसतो तो मायेचाच प्रभाव होय असा हा या श्लोकातील तिसऱ्या चरणाचा अभिप्राय आहे

अशा रीतीनें मायेनें कांहीं काळ आत्म्याला भ्रमविलेलें असलें, तरी तो स्वरूपत शुद्ध, सच्चिदानन्दघन आणि परिपूर्ण परब्रह्मस्वरूपच आहे हें श्रीगुरूंच्या कृपेशिवाय कळणार नाहीं परब्रह्मस्वरूप असलेल्या त्या श्रीगुरु दक्षिणामूर्तीला हा माझा नमस्कार असो

भूरम्भांस्यनलोऽनिलोऽम्बर महर्नाथो हिमांशुः पुमा-
नित्याभाति चराचरात्मकमिदं यस्यैव मूर्त्यष्टकम् ।
नान्यत्किंचन विद्यते विमृशतां यस्मात्परस्माद्विभो-
स्तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥९॥

पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश तसेंच सूर्य आणि चंद्र हे सात आणि आठवा सर्व कर्मांचा आणि विद्येचा अधिकारी असलेला जीव किंवा अंतर्यामी आत्मा ( पुमान् ) अशा रीतीनें हें सर्व चराचर जग ज्याचीं मूर्तिमंत आठ रूपें आहेत व तीं सर्वांच्या प्रतीतीला येत असतात तत्वत विचार करू गेलें असता विचारवंताना सर्वश्रेष्ठ अशा विश्वव्यापी परमात्मतत्त्वाशिवाय दुसरें कांहींच दिसून येत नाहीं त्या परब्रह्म परमात्म स्वरूप असलेल्या, श्रीगुरु दक्षिणामूर्ति भगवान् शंकर याना माझा नमस्कार असो असा या श्लोकाचा सरळ अन्वयानुसारी भावार्थ आहे

आतापर्यंत सांगितलेल्या शुद्ध सच्चिदानंदघन परिपूर्ण परब्रह्मस्वरूपाचा अपरोक्ष साक्षात्कार होण्याकरिता मंद अधिकारी लोकाना अष्टमूर्ति स्वरूपानें श्रीशंकराची उपासना हेंच उत्तम साधन होय त्यानेंहि क्रमश मुक्ति प्राप्त होते उत्तम अधिकारी असलेल्या लोकाना मात्र आत्मसाक्षात्कारासाठीं 'आत्मा वा अरे द्रष्टव्य श्रोतव्यो मन्तव्य ' आत्मस्वरूपाचें श्रवण करावें, मनन करावें असें वरील श्रुतिवाक्यानें सांगितलेलें असल्यामुळें नित्य, सिद्ध व स्वयंप्रकाश असलेल्या पण अज्ञानामुळें आकलन न होणाऱ्या आत्मस्वरूपाचा विचार करणेंच श्रेयस्कर होय उत्तम अधिकारी असलेल्या गुरूंच्या मुखातून 'सत्यं ज्ञानमनन्तं ब्रह्म ', 'नित्यं विज्ञानमानन्दं ब्रह्म ', 'अयमात्मा ब्रह्म ', 'प्रज्ञानं ब्रह्म ', 'तत्सत्यं, स आत्मा, तत्त्वमसि श्वेतकेतो ' इत्यादि श्रुतिवाक्यांनीं

आत्मस्वरूपाचें सोपपत्तिक श्रवण करावें श्रवण केल्यानतर साधकबाधक सर्वांनीं त्याचें मनन करावें मननानें आत्मस्वरूपाचा दृढ निश्चय झाला म्हणजे त्याचें सतत ध्यान करावें या क्रमानें प्रयत्न केल्यानतर आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो 'श्रोतव्य श्रुतिवाक्येभ्यो मन्तव्यश्चोपपत्तिभि । मत्वा च सतत ध्येय एते दर्शनहेतव ' श्रुतिवाक्याच्या आधारानें श्रवण, युक्तिप्रयुक्तींच्या आधारानें मनन आणि निरतर ध्यान हीं आत्मसाक्षात्काराचीं साधनें आहेत असा हा एक आत्मसाक्षात्काराचा मार्ग आहे ज्याना हा मार्ग सुकर वाटत नसेल त्यानीं सर्व ससार दु खातून मुक्त होण्याकरिता शास्त्रानें सागितलेल्या पद्धतीनें अष्टमूर्ति शकराची उपासना करावी उपासनेनेंहि इष्टसिद्धि प्राप्त होत असते

अष्टमूर्ति शकराची उपासना करावयाची म्हटल्यानतर स्वाभाविकच शकराच्या आठ मूर्ति कोणत्या असा प्रश्न येतो याच प्रश्नाचें उत्तर या नवव्या श्लोकाच्या पहिल्या व दुसऱ्या चरणात दिलेलें आहे भू म्हणजे पृथ्वी, अभस् म्हणजे पाणी, अनल म्हणज तेज किंवा अग्नि, अनिल म्हणजे वायु आणि अबर म्हणजे आकाश, हीं पचमहाभूतें तसेंच अहर्नाथ म्हणजे सूर्य, हिमाशु म्हणजे चद्र आणि पुमान् म्हणजे अतर्यामी असलेला आत्मा, किंवा कर्म आणि उपासना याचा अधिकारी असलेला जीव, हे आठ पदार्थ सर्व शक्तींनें विराजमान असलेला सर्वज्ञ सच्चिदानदस्वरूप भगवान् श्रीसदाशिव याच्याच या आठ मूर्ति आहेत म्हणूनच शकराला अष्टमूर्ति असें म्हणतात ह्या शकराच्या आठ मूर्ति सर्वत्र विराजमान असल्याच्या प्रतीतीला येतात

अष्टमूर्ति शकराची उपासना करणाऱ्यानें आपल्या देहात विराजमान असलेलीं पृथक् पृथक् व्यक्तिस्वरूप अथवा व्यष्टिस्वरूप पाच महाभूतें म्हणजे पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश याना, समष्टिस्वरूप असलेल्या पचमहाभूताशीं म्हणजे बाह्य समुदायस्वरूप असलेल्या पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश याच्याशीं एकरूप समजावें अर्थात् आपल्या शरीरातील पृथ्वी आणि बाह्य पृथ्वी, आपल्या शरीरातील जलतत्त्व आणि बाह्य जलतत्त्व याचप्रमाणें शरीरातील तेज, वायु आणि आकाश आणि बाहेरच तेज, वायु आणि आकाश हे सर्व एकरूप आहेत अशी भावना करावी शरीरामध्यें सचार करणारे प्राण आणि अपान हे दोन वायु याना अनुक्रमें सूर्य आणि चद्र असें समजावें तसेंच पचमहाभूतात्मक शरीराचा अभिमानी जो जीव

त्याला म्हणजे आपण स्वतःला अष्टमूर्ति भगवान् श्रीशंकर याच्याशीं एकरूप समजावें आणि सर्व विश्वाला व्यापून असणारा अष्टमूर्तिस्वरूप भगवान् श्रीसदाशिव तोच मी आहें असें सतत चिंतन करावें. चिंतनाचा प्रवाह सूक्ष्म असलेल्या तेलाच्या धारेप्रमाणें अखंड — अविच्छिन्न असावा. या चिंतनानें चित्त अष्टमूर्तिस्वरूप शंकराशीं एकरूप होतें. मृत्यूनंतर त्याला शंकराशीं सायुज्य प्राप्त होतें. तो शंकराप्रमाणेंच सर्व ऐश्वर्यानें संपन्न होतो व शेवटीं शंकराच्याच कृपेनें प्राप्त झालेल्या तत्त्वज्ञानानं त्याला आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो आणि या साक्षात्कारानें तो सर्वसंसारबंधनातून मुक्त होतो. त्याचीं सर्व सांसारिक दुःखें पार नाहींशीं होऊन तो सच्चिदानंद परमात्मस्वरूप होतो.

याप्रमाणें सद्गुरूच्या कृपेनें जीव आणि शिव यांच्या ऐक्याचा साक्षात्कार होतो. 'तत्त्वमसि' तें परमात्मतत्त्वच तू आहेस. 'अहं ब्रह्मास्मि' मी परब्रह्म स्वरूप आहें इत्यादि श्रुतिवाक्यांचा गुरूंनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें विचार करून मननानें प्राप्त झालेल्या विवेकानें आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर त्याला या जगांत सर्व विश्वाचें आदिकारण असलेला विश्वप्रपंचाच्या रूपानें नटलेला आणि विश्वाचें अधिष्ठान असलेला सच्चिदानंदघन परिपूर्ण परमात्मा जो भगवान् शंकर त्याच्या शिवाय या जगांत दुसरें काहीं निराळें तत्त्वच दिसत नाहीं. सर्वच भूतभौतिक प्रपंच परमेश्वराच्या ठिकाणीं अध्यस्त — अर्थात् कल्पित असल्यामुळें तत्त्वतः परमेश्वराशिवाय दुसरें काहींच असू शकत नाहीं. म्हणूनच शंकराची स्तुति करतांना पुष्पदंतानीं देखील शिवमहिम्नस्तोत्रांत 'त्वमर्कस्त्वं सोमस्त्वमसि पवनस्त्वं हुतवहस्त्वमापस्त्वं व्योम त्वमु धरणिरात्मा त्वमिति च। परिच्छिन्नामेवं त्वयि परिणता बिभ्रति गिरं, न विद्मस्तत्तत्त्वं वयमिह तु यत्त्वं न भवसि॥' हे शंकरा! तुझें वर्णन करतांना काहीं विद्वान् तुला, तू सूर्यस्वरूप आहेस, तू चंद्रस्वरूप आहेस, तू वायुस्वरूप आहेस, तू अग्निस्वरूप आहेस, तू जलस्वरूप आहेस, आकाश आणि पृथ्वी पण तूच आहेस, आणि सर्व प्राणिमात्राच्या शरीरांत रहाणारा जीव अंतर्यामी आत्माहि पण तूच आहेस, असें म्हणतात. याप्रमाणें तुझें परिच्छिन्न परिमित स्वरूप लक्षांत घेऊन ते तुझें वर्णन करीत असतात. पण आम्हाला मात्र या जगांत असें एकहि तत्त्व दिसत नाहीं कीं, जें तुझें स्वरूप नव्हे. हे शंकरा! या जगांत तुम्हींच विश्वरूपानें नटलेले आहात. अशा तऱ्हेनें शंकराचें वर्णन केलेलें आहे.

वेदहि पण शंकराचें असेंच वर्णन करतात 'सर्वो ह्येष रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु' हें सर्व विश्व भगवान् रुद्र म्हणजे शंकरच आहे त्या शंकराला नमस्कार असो अशा रीतीनें विचार करणाऱ्यांना या जगांत सर्वश्रेष्ठ असलेल्या आणि विश्वरूपानें नटलेल्या परमात्मतत्त्वाशिवाय दुसरें कांहींच शिल्लक रहात नाहीं हें ज्याच्या कृपेनें कळतें त्या श्रीगुरु दक्षिणामूर्तींना माझा नमस्कार असो

मायेनें भ्रांत झाल्यामुळेंच जीव हा द्वैतप्रपंचाच्या जाळ्यांत सापडला आहे त्या मायेचा निरासहि ईश्वरकृपेशिवाय होणार नाहीं आणि ईश्वराची कृपा ही ईश्वराच्या उपासनेशिवाय होणार नाहीं हाच अभिप्राय लक्षांत घेऊन या नवव्या श्लोकांत आचार्यांनी ईश्वरोपासनेचा मार्ग निर्दिष्ट केला आहे निर्गुण निराकार स्वरूपाची उपासना होणें हें अत्यंत कठिण असल्यामुळें या श्लोकाच्या पहिल्या दोन चरणांनीं परमेश्वराचें, पृथ्वी जल इत्यादि पंचमहाभूतें तसेंच सूर्य, चंद्र आणि आत्मा या अष्टमूर्तींच्या रूपानें नटलेलें सगुण आणि विराट् स्वरूपहि पण आपल्यापुढें ठेवलें आहे

आतां यावर कोणी असें विचारील कीं, अहो! ईश्वर हा तर नित्य आहे त्रिगुणातीत आहे पंचमहाभूतांच्या पलीकडचा आहे अव्यक्त आहे आणि विश्व हें तर भौतिक आहे, अनित्य आहे, त्रिगुणात्मक आहे, तसेंच तें व्यक्तहि आहे मग पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें, तसेंच सूर्य आणि चंद्र हे भौतिक पदार्थ परमेश्वराची मूर्ति कशी असूं शकेल यावर उत्तर असें कीं, सूक्ष्म विचार केला असतां परमात्मा हा या सर्व विश्वाचें मूळ कारण असल्यामुळें व कार्य आणि कारण यांच्यामध्यें तत्त्वतः भेद नसल्यामुळें परमेश्वराहून भिन्न रूपानें प्रतीतीला येणारें विश्वहि तत्त्वतः परमात्मस्वरूपच आहे सोन्याव्यतिरिक्त अलंकाराची स्वातंत्र्यानें प्रतीति येत नसल्यामुळें अलंकार जसे सुवर्ण स्वरूप असतात, त्याचप्रमाणें परमात्मस्वरूपाव्यतिरिक्त स्वातंत्र्यानें जगाची प्रतीति येत नाहीं म्हणून सर्व जग हें परमात्मस्वरूपच आहे

भूतभौतिक विश्व हें कल्पित आहे व परमात्मा हा त्या कल्पनांचें व कल्पितांचें अधिष्ठान आहे कल्पितांची सत्ता ही अधिष्ठान सत्तेशिवाय निराळी असूं शकत नाहीं म्हणून विश्व आणि परमात्मा यांच्यांत तत्त्वतः भेद नाहीं अशा अभिप्रायानें सर्व विश्व ही परमेश्वराची मूर्ति आहे असें म्हटलें होतें विश्वाचें अनित्यत्व, भौतिकत्व, त्रिगुणत्व इत्यादि धर्म कल्पित असल्या

त्याला म्हणजे आपण स्वतःला अष्टमूर्ति भगवान् श्रीशंकर यांच्याशीं एकरूप समजावें आणि सर्व विश्वाला व्यापून असणारा अष्टमूर्तिस्वरूप भगवान् श्रीसदाशिव तोच मी आहें असें सतत चिंतन करावें. चिंतनाचा प्रवाह सूक्ष्म असलेल्या तेलाच्या धारेप्रमाणें अखंड -- अविच्छिन्न असावा. या चिंतनानें चित्त अष्टमूर्तिस्वरूप शंकराशीं एकरूप होतें. मृत्यूनंतर त्याला शंकराशीं सायुज्य प्राप्त होतें. तो शंकराप्रमाणेंच सर्व ऐश्वर्यांनें संपन्न होतो व शेवटीं शंकराच्याच कृपेनें प्राप्त झालेल्या तत्त्वज्ञानानें त्याला आत्मस्वरूपाचा साक्षात्कार होतो आणि या साक्षात्कारानें तो सर्वसंसारबंधनांतून मुक्त होतो. त्याचीं सर्व सांसारिक दुःखें पार नाहींशीं होऊन तो सच्चिदानंद परमात्मस्वरूप होतो.

याप्रमाणें सद्गुरूच्या कृपेनें जीव आणि शिव यांच्या ऐक्याचा साक्षात्कार होतो. 'तत्त्वमसि' तें परमात्मतत्त्वच तूं आहेस. 'अहं ब्रह्माऽस्मि' मी परब्रह्मस्वरूप आहें इत्यादि श्रुतिवाक्यांच्या गुरूंनीं केलेल्या उपदेशाप्रमाणें विचार करून मननानें प्राप्त झालेल्या विवेकानें आत्मसाक्षात्कार झाल्यानंतर त्याला या जगांत सर्व विश्वाचें आदिकारण असलेला विश्वप्रपंचाच्या रूपानें नटलेला आणि विश्वाचें अधिष्ठान असलेला सच्चिदानंदघन परिपूर्ण परमात्मा जो भगवान् शंकर त्याच्याशिवाय या जगांत दुसरें कांहीं निराळें तत्त्वच दिसत नाहीं. सर्वच भूतभौतिक प्रपंच परमेश्वराच्या ठिकाणीं अध्यस्त -- अर्थात् कल्पित असल्यामुळें तत्त्वतः परमेश्वराशिवाय दुसरें कांहींच असूं शकत नाहीं. म्हणूनच शंकराची स्तुति करतांना पुष्पदंतानीं देखील शिवमहिम्नस्तोत्रांत 'त्वमर्कस्त्वं सोमस्त्वमसि पवनस्त्वं हुतवहस्त्वमापस्त्वं व्योम त्वमु धरणिरात्मा त्वमिति च। परिच्छिन्नामेवं त्वयि परिणता बिभ्रति गिरं, न विद्मस्तत्तत्त्वं वयमिह तु यत्त्वं न भवसि॥' हे शंकरा! तुझें वर्णन करतांना कांहीं विद्वान् तुला, तूं सूर्यस्वरूप आहेस, तूं चंद्रस्वरूप आहेस, तूं वायुस्वरूप आहेस, तूं अग्निस्वरूप आहेस, तूं जलस्वरूप आहेस, आकाश आणि पृथ्वी पण तूंच आहेस, आणि सर्व प्राणिमात्राच्या शरीरांत रहाणारा जीव अंतर्यामी आत्माहि पण तूंच आहेस, असें म्हणतात. याप्रमाणें तुझें परिच्छिन्न परिमित स्वरूप लक्षांत घेऊन ते तुझें वर्णन करीत असतात. पण आम्हाला मात्र या जगांत असें एकहि तत्त्व दिसत नाहीं कीं, जें तुझें स्वरूप नव्हे. हे शंकरा! या जगांत तुम्हींच विश्वरूपानें नटलेले आहांत. अशा तऱ्हेनें शंकराचें वर्णन केलेलें आहे.

वेदहि पण शंकराचें असेंच वर्णन करतात. 'सर्वो ह्येष रुद्रस्तस्मै रुद्राय नमो अस्तु ' हें सर्व विश्व भगवान् रुद्र म्हणजे शंकरच आहे. त्या शंकराला नमस्कार असो. अशा रीतीनें विचार करणाऱ्यांना या जगांत सर्वश्रेष्ठ असलेल्या आणि विश्वरूपानें नटलेल्या परमात्मतत्त्वाशिवाय दुसरें कांहींच शिल्लक रहात नाहीं. हें ज्याच्या कृपेनें कळतें त्या श्रीगुरु दक्षिणामूर्तींना माझा नमस्कार असो.

मायेनें भ्रांत झाल्यामुळेंच जीव हा द्वैतप्रपंचाच्या जाळ्यांत सांपडला आहे. त्या मायेचा निरासहि ईश्वरकृपेशिवाय होणार नाहीं. आणि ईश्वराची कृपा ही ईश्वराच्या उपासनेशिवाय होणार नाहीं. हाच अभिप्राय लक्षांत घेऊन या नवव्या श्लोकांत आचार्यांनी ईश्वरोपासनेचा मार्ग निर्दिष्ट केला आहे. निर्गुण निराकार स्वरूपाची उपासना होणें हें अत्यंत कठिण असल्यामुळें या श्लोकाच्या पहिल्या दोन चरणांनीं परमेश्वराचें, पृथ्वी-जल इत्यादि पंचमहाभूतें तसेंच सूर्य, चंद्र आणि आत्मा या अष्टमूर्तींच्या रूपानें नटलेलें सगुण आणि विराट् स्वरूपहि पण आपल्यापुढें ठेवलें आहे.

आतां यांवर कोणी असें विचारील कीं, अहो! ईश्वर हा तर नित्य आहे. त्रिगुणातीत आहे. पंचमहाभूतांच्या पलीकडचा आहे. अव्यक्त आहे आणि विश्व हें तर भौतिक आहे, अनित्य आहे, त्रिगुणात्मक आहे, तसेंच तें व्यक्तहि आहे. मग पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें, तसेंच सूर्य आणि चंद्र हे भौतिक पदार्थ परमेश्वराची मूर्ति कशी असूं शकेल. यावर उत्तर असें कीं, सूक्ष्म विचार केला असतां परमात्मा हा या सर्व विश्वाचें मूळकारण असल्यामुळें व कार्य आणि कारण यांच्यामध्यें तत्त्वतः भेद नसल्यामुळें परमेश्वराहून भिन्न रूपानें प्रतीतीला येणारें विश्वहि तत्त्वतः परमात्मस्वरूपच आहे. सोन्याव्यतिरिक्त अलंकाराची स्वातंत्र्यानें प्रतीति येत नसल्यामुळें अलंकार जसे सुवर्ण स्वरूप असतात, त्याचप्रमाणें परमात्मस्वरूपाव्यतिरिक्त स्वातंत्र्यानें जगाची प्रतीति येत नाहीं म्हणून सर्व जग हें परमात्मस्वरूपच आहे.

भूतभौतिक विश्व हें कल्पित आहे व परमात्मा हा त्या कल्पनांचें व कल्पितांचें अधिष्ठान आहे. कल्पितांची सत्ता ही अधिष्ठान सत्तेशिवाय निराळी असूं शकत नाहीं म्हणून विश्व आणि परमात्मा यांच्यांत तत्त्वतः भेद नाहीं. अशा अभिप्रायानें सर्व विश्व ही परमेश्वराची मूर्ति आहे असें म्हटलें होतें. विश्वाचें अनित्यत्व, भौतिकत्व, त्रिगुणत्व इत्यादि धर्म कल्पित असल्या-

मुळें ते विश्वाच्या तात्त्विक परमात्मस्वरूपतेच्या आड येऊ शकत नाहींत. तात्पर्य, अष्टमूर्तिस्वरूप सर्व जग हें परमेश्वराचें विराट् स्वरूप आहे या विराट् स्वरूपालाच ब्रह्मांड असें म्हणतात हें चौदा भुवनाचें ब्रह्मांड परमेश्वराचें समष्टिशरीर होय प्रत्येक प्राण्याचा पृथक् पृथक् देह हें परमेश्वराचें व्यष्टिशरीर होय या व्यष्टिशरीरालाच पिंड असें म्हणतात पिंड म्हणजे आपला वैयक्तिक देह आणि ब्रह्मांड म्हणजे चौदा भुवनाचा समुदाय व्यष्टि आणि समष्टि हे दोन्ही परमेश्वराच्याच स्वरूपाचे भाग आहेत व्यष्टींचा समूह म्हणजे समष्टि आणि समष्टीचें पृथक्करण केलेलें रूप म्हणजेच व्यष्टि समष्टीच्या पृथक् केलेल्या अंशालाच व्यष्टि असें म्हणतात ब्रह्मांडातूनच पिंडाची उत्पत्ति होत असल्यामुळें पिंड आणि ब्रह्मांड याचा कार्यकारणभाव आहे ज्या दोन वस्तूंचा कार्यकारणभाव असतो त्या वस्तु तत्त्वत अभिन्न म्हणजे एकरूप असतात माति आणि घट, सोनें आणि अलंकार तत्त्वत एकच असतात त्याचप्रमाणें पिंड आणि ब्रह्मांड यांच्यामध्यें तादात्म्य म्हणजे एकरूपता आहे जें पिंडीं तें ब्रह्मांडीं हा वाक्प्रचारहि या दृष्टीनें पूर्ण सत्य आहे

आपलें मन आपल्या शरीरात समावलेलें आहे व आपल्या मनात सर्व विश्व समावलेलें आहे अशा रीतीनें सर्व विश्वाचा समावेश आपल्या शरीरात असल्याचें लक्षात घ्यावें मी विश्वात आहें व विश्व माझ्यात आहे मी विश्वाहून निराळा नाहीं व विश्व माझ्याहून निराळें नाहीं विश्व परमात्म्याहून निराळें नाहीं आणि म्हणून मीहि परमात्मस्वरूपाहून निराळा नाहीं अशा रीतीनें मी परब्रह्म-स्वरूप आहें असा विचार करावा आणि अशा विचारानें आपलें चित्त पूर्ण स्वरूपीं स्थिर करावें म्हणजे आपल्याला पूर्णस्वरूपाची — ब्रह्मस्वरूपाची प्राप्ति होते मनाला पूर्ण समाधान मिळतें

आता पिंड आणि ब्रह्मांड याच्या ऐक्याचें चिंतन कसें करावें, या विषयाचा आपण अधिक सूक्ष्म विचार करू ब्रह्मांडाच्या उदरात चौदा भुवनाचा समावेश असतो हीं चौदा भुवनें म्हणजे भूर्लोक, भुवर्लोक, स्वर्लोक, महर्लोक, जनलोक, तपोलोक आणि सत्यलोक, असे हे वरचे सात लोक आणि अतल, वितल सुतल, तलातल, महातल रसातल आणि पाताल हे खालचे सात लोक, याना सप्तपाताल असें म्हणतात आपल्याहि शरीरात गुदस्थानापासून मूर्द्धस्थाना पर्यंत जीं सात चक्रें आहेत त्यानाच भूर्लोक भुवर्लोक इत्यादि सप्तलोक समजावेत मूलाधारचक्र, स्वाधिष्ठानचक्र, मणिपूरचक्र, अनाहतचक्र, विशुद्धचक्र, आज्ञाचक्र आणि सहस्रारचक्र, हींच तीं सप्त चक्रें होत याच्या ठिकाणीं क्रमानें भूर्लोक भुवर्लोक इत्यादि सप्त लोकाची कल्पना करावी कटि म्हणजे कमरेचा भाग हा अतल समजावा ऊरु म्हणजे माड्या ह्या वितलस्थानीं समजाव्यात जानु म्हणजे गुडघे हे सुतलस्थानीं समजावेत जंघा म्हणजे पिंड्या ह्या तलातलस्थानीं समजाव्यात घोटे हे महातलस्थानीं समजावेत पायाच्या पुढचा भाग हा रसातल समजावा आणि तळपायाना पाताळ लोक असें समजावें याप्रमाणें पिंडब्रह्मांडाच्या ऐक्याची भावना करावी पिंडब्रह्मांडाच्या ऐक्याचें चिंतन करताना शरीरातील रस, रक्त मेद मास अस्थि, मज्जा आणि शुक्र या सप्तधातूची क्रमश जंबूद्वीप, प्लक्षद्वीप, शाल्मलीद्वीप, कुशद्वीप, क्रौंचद्वीप, शाकद्वीप आणि पुष्करद्वीप याच्या ठिकाणीं कल्पना करावी इडा पिंगला आणि सुषुम्ना ह्या तर गंगा, यमुना आणि सरस्वती आहेतच इतरहि नाड्याच्या ठिकाणीं गोदावरी, नर्मदा, ब्रह्मपुत्रा, कृष्णा तुंगभद्रा इत्यादि पवित्र नद्याची कल्पना करावी स्वेद, बाष्प इत्यादि जलीय द्रव्याच्या ठिकाणीं सप्तसमुद्राची कल्पना करावी

मूलाधाराच्या ठिकाणी 'संवर्त' म्हणजे प्रलयकालचा अग्नि रहातो. अस्थिसंघामध्यें स्वेदादिकाचें शोषण करणारा वाडवाग्नि रहातो सुषुम्ना नाडीमध्यें 'वैद्युत' म्हणजे दिव्य अग्नि असतो सर्व नाड्यांचा ऊष्मा त्यावरच अवलंबून आहे. पृथ्वीधातूचें शोषण करणारा पार्थिवाग्नि हा नाभिमंडलामध्यें रहातो हृदयामध्यें सूर्याग्नि रहातो ललाटस्थळीं म्हणजे कपाळांत चंद्र मंडल आहे, असें चिंतन करावें सूर्य आणि चंद्र यांच्याव्यतिरिक्त मंगळ, बुध इत्यादि ग्रह आणि अश्विनी, भरणी इत्यादि सत्तावीस नक्षत्रें यांची देखील कान, नाक, डोळे इत्यादि इंद्रियस्थानीं कल्पना करावी प्रवहण, संवहन इत्यादि बाह्य सप्त वायु ज्याप्रमाणें ब्रह्मांडाची धारणा करतात त्याचप्रमाणें पिंडाची म्हणजे आपल्या देहाची धारणा प्राण, अपान इत्यादि पांच वायूंनीं होत असते ब्रह्मांडातील आणि पिंडातील वायु एकच आहेत अशी भावना ठेवावी

मूळाधारचक्रापासून निघालेल्या इडा आणि पिंगला नावाच्या ज्या दोन नाड्या आहेत त्यांच्याशीं संलग्न होऊन ऊष्मरूप झालेला प्राणवायु नाकपुड्यांच्या द्वारा शरीराच्या बाहेर पडतो आणि बारा अंगुलांच्या अंतरानें बाह्य आकाशांत लीन होतो आकाशालाच 'विष्णुपद' असें म्हणतात या विष्णुपदांतील अमृत सेवन करून तोच वायु नासापुटाच्या द्वारा शरीरांत प्रवेश करतो व इडा पिंगला यांच्या द्वारा मूलाधार चक्रापर्यंत जाऊन पोहोचतो आणि जठरानलाला जीवन देऊन सर्व शरीराचें पोषण करतो. सर्व शरीरभर प्राणवायूचेंच प्रामुख्यानें कार्य चाललेलें असतें म्हणूनच प्राणवायूला मुख्य प्राण असें म्हणतात हा प्राणवायूच शरीरांतील निरनिराळ्या स्थानीं निरनिराळीं कार्यें करीत असतो म्हणून त्याला अपान, उदान, व्यान आणि समान इत्यादि नांवें मिळालेलीं आहेत.

हाच वायु नाभिस्थानाच्या खालीं राहून मलमूत्रादिकांना शरीराच्या बाहेर टाकण्याचें कार्य करतो म्हणून त्याला अपान असें म्हटलें आहे प्राणवायु हा सूर्यस्वरूप आहे तर अपानवायु हा चंद्रस्वरूप आहे तोच वायु अग्निसोम स्वरूप होऊन ( अग्नियोमौ मूलवा ) सुषुम्ना नाडीच्या विवरांत प्रवेश करतो आणि ब्रह्मरंध्रापर्यंत वर जातो तसेंच कंठाच्या व मस्तकाच्या ठिकाणीं राहून कार्य करीत असतो म्हणून त्याला उदान असें म्हणतात सर्व शरीराला व्यापून रहाणाऱ्या वायूला व्यान असें म्हणतात रसरक्तादि धातूचें सर्व शरीर भर अभिसरण याच वायूमुळें होत असतें समान वायु हा नाभिस्थानीं राहून

जठराग्नीला प्रदीप्त करीत असतो नाग नावाच्या वायूनें उचकी लागते कूर्म नावाचा वायू पापण्याची उघडझाप करतो कृकर नावाच्या वायूमुळें शिंका येतात. देवदत्त नावाचा वायु जांभई आणतो आणि धनंजय नावाचा वायु शरीरात स्थूलता निर्माण करतो देहाला वाढवितो

आकाशतत्त्वामुळें आपल्याला आतबाहेर अवकाशाचा लाभ होतो ब्रह्माण्डामध्यें आकाशात विराजमान असलेले सूर्य आणि चंद्र हे आपल्या शरीरात प्राण आणि अपान या रूपानें विराजमान आहेत अंतर्यामीपुरुष साक्षी आत्मा हा या देहात जीवरूपानें विराजमान आहे अशा रीतीनें पृथ्वी, जल, तेज, वायु आणि आकाश हीं पंचमहाभूतें तसेंच सूर्य, चंद्र आणि आत्मा हे तीन मिळून अष्टमूर्ति महेश्वराचें रूप सिद्ध होतें सर्व स्थिरचर विश्वच अष्टमूर्ति महेश्वर समजावा जीं तत्त्वें समष्टींत भरलेलीं आहेत तींच व्यष्टींत असल्यामुळें समष्टि आणि व्यष्टि यांचें ऐक्य उपपन्न होतें तात्पर्य, व्यष्टि आणि समष्टि किंवा पिंड आणि ब्रह्मांड हे एकच आहेत व तेंच आपल्या उपास्य महेश्वराचें स्वरूप आहे अशी भावना ठेवून त्याचें मनानें चिंतन करावें हें चिंतन म्हणजे महेश्वराची समनस्क उपासनाच होय या ठिकाणीं महेश्वर हें उपलक्षण म्हणजे दिग्दर्शन मात्र आहे महेश्वराऐवजी साधकाला जें दैवत उपास्य म्हणून इष्ट वाटेल त्या दैवताचीहि उपासना वर सांगितलेल्या पद्धतीनें करावयास हरकत नाहीं अद्वैततत्त्वज्ञानाच्या क्षेत्रात सर्व दैवतें सारखींच आहेत येथें कोणत्याहि प्रकारें अभिनिवेशाला वाव नाहीं या उपासनेनें उपासकाला इंद्रियें, मन आणि बुद्धि यांच्याहि पलीकडे असलेल्या शुद्ध आनंदमय अशा परतत्त्वाचा लाभ होतो मनाला अत्यंत समाधान मिळतें

आतून पोकळ असलेल्या शरीरातील पृष्ठवंशाला वीणादंड असें म्हणतात तो शरीरात मध्यवर्ती आणि उंच असल्यामुळें त्याला महामेरू असेंहि म्हटलें आहे त्याच्या दोन्ही बाजूंना असलेल्या पार्श्वास्थि म्हणजे पासळ्या मेरु पर्वताच्या भोंवतालचे कैलास निकुंज पारियात्रादि कुलपर्वत समजावेत शरीरातील इडा, पिंगला आणि सुषुम्ना या नाड्या गंगा, यमुना आणि सरस्वती समजाव्यात मेरु पर्वताच्या म्हणजे पृष्ठवंशाच्या बाह्य भागीं डावीकडे इडानावाची नाडी असते तिला योगी लोक चंद्र असें समजतात मरुदंडाच्या म्हणजेच पृष्ठवंशाच्या बाह्य भागीं उजव्या बाजूस जी पिंगला नावाची नाडी असते तिला योगी लोक सूर्य

क्षयरोगासारखे महारोगहि जिंकले जातात आणि अकालवार्धक्याला आळा बसतो प्राणायामाच्या अभ्यासानें मनुष्य दीर्घकाल आरोग्यपूर्ण असें आयुष्य भोगू शकतो 'पश्येम शरद शतम्', 'जीवेम शरद शतम्', 'शृणुयाम शरद शतम्' मी शभर वर्षे जगावें पहाण्याची ऐकण्याची व उत्तम बोलण्याची शक्ति माझ्यामध्यें शभर वर्षे अव्याहत असावी ही आकांक्षा प्राणायामाच्या अभ्यासानें साध्य होऊ शकते असा प्राणायामाच्या अभ्यासाचा व्यावहारिक दृष्ट्याहि फार मोठा उपयोग आहे प्राणायामाचा अधिकार स्त्री पुरुष बालवृद्ध व तरुण या सर्वांना आहे फक्त प्राणायामाच्या वेळीं कोणत्या मंत्राचा उपयोग करावा हें मात्र गुरूच्या आज्ञेप्रमाणें अथवा अधिकारपरत्वें आपआपल्या अधिकाराप्रमाणें ठरवावें प्राणायामाचा अभ्यास सकाळीं सूर्योदयाच्या पूर्वी व सध्याकाळीं सूर्यास्ताच्या वेळीं करणें उत्तम होय

प्राणायामाचा अभ्यास करणाऱ्यानीं फार जेऊ नये व उपाशींहि राहू नये पद्मासन, सिद्धासन किंवा स्वस्तिकासन या आसनावर चिरकाल सुखानें बसून रहाता येईल इतका अभ्यास करावा प्रसन्न आणि निर्मळ अशा एकान्त स्थळीं जमिनीवर प्रथम गवताचें किंवा दर्भाचें आसन घालावें त्यावर मृगा जिन, व्याघ्रावर किंवा ऊर्णा म्हणजे लोकरी वस्त्राची घडी घालावी त्याच्यावरहि मृदु वस्त्राची घडी ठेवून आसन तयार करावें शुचिर्भूत होऊन त्या आसनावर पद्मासन, स्वस्तिकासन किंवा सिद्धासन घालून सरळ बसावें पृष्ठवंश, मान आणि मस्तक एका रेषेंत असावें दृष्टि किंचित् खालीं नासाग्रीं ठेवावी ओठ मिटलेले असावेत शरीर निश्चल असावें, आपलें तोंड पूर्वेकडे अथवा उत्तरेकडे करावें चित्त शान्त ठेवावें विघ्नहर्त्या श्रीगजाननाची पंचोपचार मानसपूजा करून इष्टदेवतेचें ध्यान करावें नतर प्राणायामाच्या अभ्यासाला आरंभ करावा प्रथम उजव्या हाताच्या आंगठ्यानें उजवी नाकपुडी दाबून प्रणवाचा, गायत्रीमंत्राचा अथवा आपल्या इष्टदेवतेच्या मंत्राचा किंवा नाममंत्राचा आपआपल्या अधिकाराप्रमाणें अथवा गुरूनी सांगितल्याप्रमाणें मनातल्या मनात उच्चार करीत डाव्या नाकपुडीनें हळूहळू श्वास वर घ्यावा जितक्या मात्रेनें आपण श्वास वर घेऊ त्याच्या चौपट मात्रेनें तो शरीरात स्थिर ठेवता आला पाहिजे, अशा बेतानेंच श्वास वर घेण्याची क्रिया करावी या क्रियेला 'पूरक' असें म्हणतात पूरक झाल्यानतर उजव्या हाताच्या कनिष्ठिका व अनामिका म्हणजे करंगळी व तिच्या शेजारचें बोट याना जुळवून त्याच्या अग्रभागानीं डावी

नाकपुडी दाबून धरावी आणि वर घेतलेला श्वास शरीरामध्यें कोंडून ठेवावा पूरक करताना जितक्या प्रणवाचा, गायत्री मंत्राचा किंवा इष्टदेवतेच्या मंत्राच्या उच्चार झाला असेल त्याच्या चौपट मनातल्या मनात प्रणवादिकाचा उच्चार करावा अशा रीतीनें प्रणवादि मंत्राचा उच्चार करीत प्राणवायूला शरीरात कोंडून ठेवणें या क्रियेला 'कुंभक' असें म्हणतात कुंभक पूर्ण झाल्यानंतर उजव्या नाकपुडीवरील आंगठ्याचा दाब अगदीं हळूहळू कमी करीत व वरील प्रणवादिकाचा मनातल्या मनात उच्चार करीत प्राणवायूला शरीराच्या बाहेर हळूहळू सोडावें ही क्रियापूरकाच्या दुप्पट मात्रेनें करावी या क्रियेला 'रेचक' म्हणतात याप्रमाणें पूरक, कुंभक आणि रेचक या तीन क्रिया पूर्ण झाल्या म्हणजे एक प्राणायामाची क्रिया पूर्ण झाली असें समजावें

वर सांगितलेल्या पद्धतीनें डाव्या नाकपुडीवर ठेवलेल्या करंगळी व अनामिका या दोन बोटाचा दाब तसाच कायम ठेवून उजव्या नाकपुडीनें पूर्वीप्रमाणेंच मनातल्या मनात प्रणवादि मंत्राचा उच्चार करीत हळूहळू श्वास वर घ्यावा या वेळीं उजव्या हाताचा आंगठा उजव्या नाकपुडीवर दाब न देता नाममात्र टेकलेला असावा अशा रीतीनें उजव्या नाकपुडीनें पूरक क्रिया पूर्ण झाल्यावर उजव्या हाताच्या आंगठ्यानें उजवी नाकपुडी घट्ट दाबून ठेवावी व प्रणवादि मंत्राचा मनातल्या मनात उच्चार करीत पूर्वीप्रमाणेंच पूरकाच्या चारपट कुंभक करावा, म्हणजे प्राणवायूला शरीरात कोंडून ठेवावें नंतर हळूहळू प्रणवादि मंत्राचा मनातल्या मनात उच्चार करीतच डाव्या नाकपुडीवरील करंगळी व अनामिका या दोन बोटाचा दाब हळूहळू कमी करावा व शरीरात कोंडलेल्या प्राणवायूला हळूहळू पूरकाच्या दुप्पट मात्रेनें बाहेर सोडावें ही रेचकक्रिया पूर्ण झाली म्हणजे हा दुसरा प्राणायाम पूर्ण झाला असें समजावें यानंतर दोन्ही नाकपुड्यावरील बोटाचे दाब सैल करून दोन्ही नाकपुड्यानीं बाहेरचा वायू प्रणवादि मंत्राचा उच्चार करीत हळूहळू शरीरात खेचावा, नंतर दोन्ही नाकपुड्या घट्ट दाबून पूरकाच्या चारपटीनें कुंभक करावा कुंभक पूर्ण झाल्यानंतर दोन्ही नाकपुड्यावरचा दाब हळूहळू कमी करीत पूरकाच्या दुप्पट मात्रेनें प्राणवायूला शरीराच्या बाहेर सोडावें हा प्राणायामाचा तिसरा प्रकार झाला याप्रमाणें अनुलोम, विलोम आणि उभयात्मक अथवा संकलित अशा तीन प्रकारच्या प्राणायामाचा अभ्यास करावा जसा जसा प्राणायामाचा अभ्यास

अधिक होईल तशी तशी इडा, पिंगला व सुषुम्ना या नाड्यांची व इतरहि नाड्यांची शुद्धि होऊन वर निर्दिष्ट केल्याप्रमाणें आरोग्याचा लाभ होतो. मनाची चंचलता नाहींशी होऊन मनहि स्थिर आणि प्रसन्न होतें, असें या प्राणायामाचें फल आहे.

उपासकाला योगी होऊन या परतत्त्वाची उपासना करावी लागते. अभ्यास केल्यास संसारांत राहूनहि मनुष्याला योगी होतां येतें. इतकें या राजयोगाचें स्वरूप सुलभ आहे. मात्र चिकाटीनें अभ्यास केला पाहिजे. या योगाचीं आठ अंगें आहेत. यम, नियम, आसन, प्राणायाम, प्रत्याहार, धारणा, ध्यान आणि समाधि हींच तीं आठ अंगें होत. उपासनेची योग्यता प्राप्त होण्यासाठीं प्रायः केवळ मनानें आचरल्या जाणाऱ्या व्रतांना 'यम' म्हणतात. यम शब्द उच्चारल्याबरोबर मृत्यूची अधिष्ठात्री देवता लक्षांत येते, पण या ठिकाणीं यम शब्दाचा तो अर्थ नव्हे. यम म्हणजे मानसिक व्रतें आणि नियम म्हणजे कायिक व वाचिक व्रतें, असा या ठिकाणीं यम आणि नियम या शब्दांचा सामान्यपणें अर्थ आहे.

मन प्रसन्न ठेवावें, स्वल्प प्रयत्नानें मिळेल त्यांत संतोष मानावा. अनावश्यक भाषण करण्याच्या प्रवृत्तीपासून मनाला व वाणीलाहि दूर ठेवावें. इंद्रियांचा निग्रह करावा. अर्थात् इंद्रियांना विषयोन्मुख होऊं न देतां आपल्या ताब्यांत ठेवण्याचा अभ्यास करावा. दया म्हणजे करुणा. दीन, दुःखी, कष्टी, आर्त, असमर्थ व अडीअडचणींत सांपडलेले लोक यांच्या उपयोगीं पडावें. दाक्षिण्य म्हणजे व्यवहारदक्षता. सर्व कामें योग्य वेळीं व योग्य रीतीनें करण्याचा अभ्यास करून दाक्षिण्य संपादन करावें लागतें. दाक्षिण्य शब्दाचा अर्थ चांगुलपणा असाहि आहे. आस्तिक्य म्हणजे गुरु आणि शास्त्रें यांनीं सांगितलेल्या गोष्टींवर विश्वास ठेवणें. आर्जव म्हणजे सरलता. कोणाहिविषयीं अंतःकरणांत कुटिल भाव न ठेवतां सरळपणानें वागणें. व्यवहारामध्यें आर्जव म्हणजे लाचारीपणा किंवा ' हांजी हांजी ' करणें असा अर्थ आहे, पण तो या ठिकाणीं विवक्षित नाहीं. सर्वांविषयीं सरळ भाव ठेवणें हाच या ठिकाणीं आर्जव शब्दाचा अर्थ आहे. 'मार्दव' म्हणजे मृदुता. कोणाशींहि कठोर भाषण न करणें किंवा कठोर वृत्ति न ठेवणें. क्षमा म्हणजे कोणाच्याहि कारणें पडून आपणाशीं अगतीहि न संतापणें. मात्र माता-भगिनी, दीन-दुबळे, साधु संत यांचा छळ करणारे व राष्ट्राचा तेजोभंग करणारे जे दुष्ट समाजकंटक अर्थात् अशांना

योग्य दंड करणें क्षमावताच्या आड येत नाहीं. 'मोदेत साधुरपि वृश्चिक-सर्पहत्या' हें भागवतकारांनीं प्रल्हादाच्या तोंडीं घातलेलें वाक्य विचार करण्यासारखें आहे 'भावशुद्धि' म्हणजे सर्वांविषयीं अन्तःकरणांत शुद्ध भावना ठेवणें. 'स्वस्त्यस्तु विश्वस्य खलः प्रसीदताम्' अथवा 'दुरितांचें तिमिर जावो। विश्व स्वधर्मसूर्यें पाहो' अशी वृत्ति असणें हें भावशुद्धीचें लक्षण होय. 'सर्वेऽपि सुखिनः सन्तु' हा सर्वतोमुखी असलेला श्लोक अन्तःकरणांत खरोखरीच्या अर्थानें रुजला तर तेंहि एक भावसंशुद्धीचें उत्कृष्ट लक्षण होय. 'अहिंसा' म्हणजे कोणालाहि कोणत्याहि प्रकारें न दुखविणें. 'ब्रह्मचर्य' म्हणजे ग्राम्य विषयांच्या चिंतनापासून व सेवनापासून अलिप्त रहाणें 'स्मृति' म्हणजे जन्म, मृत्यु, वार्धक्य, नाना प्रकारचे रोग व त्यांच्यापासून होणारीं दुःखें आणि दोष म्हणजे विषयांचा नाशवंतपणा किंवा दुष्परिणाम, या सर्वांची चित्तांत जाणीव ठेवणें. 'धृति' म्हणजे धैर्य. मन, बुद्धि आणि इंद्रियें हीं निरुत्साही झालीं असतां त्यांना उत्साहित ठेवणें, याला धैर्य म्हणतात. किंवा मनाला विकृत-अस्थिर करून सोडणारी परिस्थिति निर्माण झाली असतां मनाला विकृत किंवा अस्थिर होऊं न देणें हें धैर्याचें लक्षण होय. दंभ, मान, द्वेष, इत्यादि अनिष्ट गोष्टींपासून परावृत्त होणें इत्यादि सर्व गोष्टींचा काळजीपूर्वक अभ्यास करणें याला यम म्हणतात.

नियम म्हणजे कायिक व्रतें. रोज नियमानें एक वेळ, दोन वेळ अथवा तीन वेळ स्नान करणें, अपवित्र वस्तूंचा स्पर्श झाला असतां स्नान करणें, देह पवित्र ठेवणें, स्वच्छ ठेवणें, सर्वे धोलणें, देवाची पूजा व स्तुति करणें, जप तप, होम हवन, संध्या-तर्पण आणि यथाशक्ति दानधर्म करणें, शीतोष्ण, सुखदुःख इत्यादि द्वंद्वांना सहन करणें, व्रत, उपवास करणें. देव, गुरु, साधुसंत माता-पिता व वयोवृद्ध यांना नमस्कार करणें या सर्व गोष्टींना नियम असें म्हणतात. या यम-नियमांची भूमिका असेल तरच आसनांचा व प्राणायामाचा अभ्यास साधकाच्या मनाला समाधान देऊं शकेल. यमनियमांची भूमिका नसतांना केला जाणारा आसनांचा अभ्यास हा केवळ शरीराचा खेळ ठरेल. आत्मसमाधानाच्या दृष्टीनें त्याचा कांहीं उपयोग होणार नाहीं.

अभ्यास करून शरीराला सहज रीतीनें कोणत्या विशिष्ट आकारांत स्थिर ठेवणें याला आसन असें म्हणतात. आसनें अनेक प्रकारचीं आहेत स्वस्ति-

कासन, गोमुखासन, पद्मासन, हसासन, नृसिंहासन, गरुडासन, कूर्मासन, नागासन, वीरासन, मयूरासन, वज्रासन आणि सिद्धासन हीं आसनें अवश्य अभ्यासावीत तसेंच पूर्वोत्तान, पश्चिमोत्तान, सर्वांगासन आणि शीर्षासन यांहि आसनाचा अभ्यास अवश्य करावा आसनाच्या अभ्यासानें शरीर हलकें रहातें, निरोगी बनतें व मनाला उत्साह वाटतो शरीरस्वास्थ्याच्या व मन स्वास्थ्याच्या दृष्टीनें आसनाचा फार मोठा उपयोग होतो प्रत्यक्ष उपासनेच्या वेळीं मात्र स्वस्तिकासन, पद्मासन किंवा सिद्धासन यापैकीं कोणत्या तरी एकाच आसनाचा उपयोग करावा

योगतारावलीच्या विवेचनात आसनाचें विवेचन केलेलें आहे तें अवश्य पहावें ( सुबोधस्तोत्रसग्रह भाग २ रा )

सर्व आसनात निरालंबासन हें श्रेष्ठ मणलें जातें हात पाय वगैरे अवयवाना विशिष्ट आकारात ठेवण्याचा ज्यामध्यें नियम नाहीं, त्याला निरालंबासन म्हणतात शरीराला सहज अनायासानें अधिकात अधिक ठेवता येईल त्या आकारात ठेऊन श्रीसाब सदाशिवाचें — महेश्वराचें — परमेश्वराचें शात चित्तानें चिंतन करणें याला निरालंबनयोग म्हणतात या निरालंबनयोगाचें आसनहि निरालंबनच आहे या आसनावर बसून निरालंबाचेंच ध्यान करावयाचें असतें पण निरालंब कोणाला म्हणावें? '*निरालम्बः सदाशिवः*' सदाशिव म्हणजे निरुपाधिक निर्विशेष शुद्धसच्चिदानदघन परमात्मा त्याचेंच ध्यान 'सोऽहं' या शब्दानी सतत आपल्या मनात करावयाचें असतें म्हणून या ध्यानयोगाला निरालंबन योग असें म्हटलेलें आहे 'सोऽहं' हा एक मोठा मन्त्रच आहे '*मननात् त्रायते इति मन्त्रः*' अशी मन्त्र शब्दाची व्युत्पत्ति आहे ज्याचें मनन चिंतन केलें असता जीवाचीं सर्व दु खें नाहीशीं होतात व जीव पूर्ण आनदरूप होतो त्यालाच मन्त्र म्हणतात उपनिषदातील महावाक्याचें तात्पर्यहि 'सोऽहं' या मन्त्रातच समावलेलें आहे या मन्त्रात 'स' आणि 'अहम्' असे दोन शब्द आहेत 'स' म्हणजे तो सुप्रसिद्ध श्रुतिसिद्ध सच्चिदानदघन परमात्मा 'अहम्' म्हणजे मी स्थूल, सूक्ष्म, शरीराभिमानी जीवात्मा अर्थात् 'अस्मि' म्हणजे आहें हें क्रियापद या ठिकाणीं अध्याहृत आहे 'सर्वं वाक्य सावधारणम्' या न्यायानें *तोच मी आहें. तो मीच आहें आणि तो मी* आहेंच अशा रीतिनें तिन्ही प्रकारें 'सोऽहं' या मन्त्रानें निश्चय प्रतीतीला येतो सशयाला अवसरच

उरत नाहीं. शेवटीं ध्यान करणारा अखंड ध्यानानें ध्येयाशीं तदाकार होऊन जातो. तो आनंदरूप बनतो. हा निरालंबनयोग अनुष्ठानाला सोपा पण फलाच्या दृष्टीनें फार मोठा आहे.

प्राणायाम :— शरीरामध्यें संचार करणाऱ्या वायूला प्राण असें म्हणतात. त्याचा 'आयाम' म्हणजे नियंत्रण अर्थात् विशिष्ट पद्धतीनें प्राणवायूचें नियमन करणें याला प्राणायाम असें म्हणतात. आयाम या शब्दाचा अर्थ दीर्घता असाहि आहे. स्वाभाविकपणें वेगानें चालणाऱ्या प्राणवायूच्या क्रियेला अभ्यासानें संथ करणें दीर्घ करणें असाहि प्राणायाम शब्दाचा अर्थ आहे. प्राणवायूची क्रिया संथ आणि दीर्घ होण्यानें आयुर्मानहि निरोगी आणि दीर्घ होत असतें. ही गोष्ट प्राणायामाच्या अभ्यासानें साध्य होते. प्राणायामाची प्रक्रिया आणि उपयोग यांचें विवेचन वर केलेलेंच आहे, तें वाचकांनीं अवश्य लक्षांत घ्यावें.

प्रत्याहार म्हणजे सर्व इंद्रियांना आपआपल्या विषयापासून परावृत्त करून मनाशीं संलग्न करून ठेवणें. मन इष्ट ध्येयाशीं संलग्न झाल्यानंतर सर्व इंद्रियांच्या वृत्ति मनाला अनुकूल रहातील असा प्रयत्न करणें. 'घेई घेई माझे वाचे गोड नाम विठोबाचें। तुम्ही आइका रे कान माझ्या विठोबाचें गुण॥ डोळे तुम्ही घ्यारे सुख पहा विठोबाचें मुख। मना तेथें धांव घेई राहे विठोबाचे पायीं॥' अशा तऱ्हेचा प्रयत्न करणें हें प्रत्याहाराचें स्वरूप होय. सामान्यतः मन अंतर्मुख बनलें कीं, त्याच्या पाठोपाठ इतर इंद्रियेंहि अंतर्मुख होतातच. मनाप्रमाणें इंद्रियांनीं देखील अंतर्मुख होऊन रहाणें याला प्रत्याहार म्हणतात.

धारणा :— नाभिस्थानीं असलेल्या मणिपूरचक्रामध्यें अथवा आपल्या हृदयरूपी अनाहतचक्रस्वरूप असलेल्या द्वादशदल कमलामध्यें किंवा द्विदल आज्ञाचक्रस्वरूपी भ्रूमध्यप्रदेशामध्यें तसेंच सहस्रदल कमलस्वरूप असलेल्या मूर्द्धस्थानामध्यें किंवा आपल्याला अभीष्ट असलेल्या उपास्यदेवतेच्या स्वरूपामध्यें, चंद्र, सूर्य, अग्नि, साधु, संत, महात्मे व गुरु यांच्या स्वरूपामध्यें चित्ताला स्थिर करणें याला धारणा म्हणतात.

ध्यान :— आपली इष्ट देवता अथवा उपास्यतत्त्व हें शुद्ध सच्चिदानंदघन परिपूर्ण परब्रह्मस्वरूप आहे अशी भावना ठेवून त्या इष्ट देवतेचें अथवा उपास्य तत्त्वाचें शांत चित्तानें सतत अखंड धारावाही प्रवाहानें चिंतन करणें याला ध्यान असें म्हणतात.

समाधि म्हणजे चित्ताची तन्मयता. ध्येयाशीं चित्त पूर्णपणें तन्मय होणें चित्त पूर्णपणें एकाग्र होणें हेंच समाधीचें लक्षण होय. ध्यानाचाच परिपाक म्हणजे समाधि अवस्था होय, ध्यान करतां करतांच चित्त ध्येयवस्तूशीं तदाकार पावतें यालाच समाधि असें म्हणतात. हा समाधि दोन प्रकारचा असतो. एक सविकल्पक समाधि व दुसरा निर्विकल्पक समाधि कोणी कोणी सबीज समाधि व निर्बीज समाधि असेंहि म्हणतात. चित्तामध्यें ध्याता, ध्यान आणि ध्येय हा भेद जोंपर्यंत स्फुरत असतो तोंपर्यंत ही अवस्था सविकल्प समाधि या नांवानें ओळखिली जाते. याला समनस्क समाधि असेंहि म्हणतात. सविकल्प समाधि हा निर्विकल्प समाधीचें अंग आहे व निर्विकल्प समाधि हा अंगी म्हणजे मुख्य किंवा साध्य आहे. तो फलस्वरूप आहे. निर्विकल्प समाधीच्या वेळीं चित्तामध्यें कोणत्याहि प्रकारची वृत्ति उत्पन्न होत नसते. ध्याता, ध्यान व ध्येय ही त्रिपुटीहि मावळलेली असते. तेथें मन हें आपल्या स्वरूपाला म्हणजे स्वत:-लाच विसरलेलें असतें. हे निर्विकल्प समाधीचें स्वरूप आहे. यालाच अमनस्क समाधि असेंहि म्हणतात. सर्व चिंताविवर्जित अशी ही मोठी स्पृहणीय अवस्था आहे.

आतां यावर कोणी अशी शंका घेईल की, सौषुप्त अवस्था आणि निर्विकल्प समाधि यात काय फरक आहे ? गाढ झोंपेमध्यें आपल्याला कशाचेंहि भान नसतें ज्ञाता ज्ञान, आणि ज्ञेय इत्यादि त्रिपुटीची कल्पनाहि मावळलेली असते कोणत्याहि प्रकारची चिंता किंवा सुखदु:खाची जाणीव वगैरे कांहीं असत नाहीं तेव्हा निद्रा आणि निर्विकल्प समाधि या दोन्ही अवस्था सारख्याच होत ! पण हें म्हणणें बरोबर नाहीं निर्विकल्प समाधीची अवस्था प्राप्त होण्याकरिता आपल्याला यमनियमापासून तें सविकल्प समाधीपर्यंत योगाच्या अष्टांगाचा पुष्कळ काळ अभ्यास करावा लागतो पुष्कळ वेळेला या अभ्यासात अनेक जन्म देखील घालवावे लागतात, तेव्हा कोठें निर्विकल्प समाधीची अवस्था लाभू शकते. निर्विकल्प समाधीच्या पूर्वकाळात इंद्रियनिग्रह, मनोनिग्रह, चित्ताची एकाग्रता, मलिन सस्कारांचा निरास व निर्मल सस्काराचा विकास या सर्व गोष्टी दृढ अभ्यासानें साधाव्या लागतात सौषुप्त अवस्था प्राप्त होण्याकरिता या कोणत्याहि गोष्टींची आवश्यकता नसते. अविश्रांत श्रम करून देह, इंद्रियें आणि मन थकलें म्हणजे झोंप आपोआप लागते. गोडधड

प्राणवायूला शरीरामध्यें कोंडावें आणि लंबिका म्हणजे तालुमूल प्रदेशामध्यें असलेली मासपिंडी — पडजीभ त्या पडजिभेजवळ मोठ्या प्रयासानें जिभेला नेऊन ठेवावें या क्रियेनें देखील चित्तवृत्तींचा निरोध होऊन योग सिद्ध होतो असा योगीजनांचा अनुभव आहे. योगाभ्यासानें चित्त निश्चल झालें म्हणजे प्राणवायूहि सुषुम्नानाडीमध्यें प्रविष्ट होऊन निश्चल होतो. मनाच्या स्थैर्यानें प्राणाचें स्थैर्य व प्राणाच्या स्थैर्यानें मनाचें स्थैर्य संपादन करता येतें

आपल्या शरीरामध्यें पायापासून गुदद्वारापर्यंत पृथ्वीचें स्थान आहे. गुदद्वारापासून नाभिस्थानापर्यंत जलाचें स्थान आहे नाभीपासून कंठापर्यंत तेजाचें स्थान आहे. कंठापासून भ्रूमध्यापर्यंत वायूचें स्थान आहे आणि भ्रूमध्या पासून ब्रह्मरंध्रापर्यंत आकाशाचें स्थान आहे या पंचमहाभूतांचीं शरीरातील त्या त्या स्थानीं भावना करून तेथें चित्ताची धारणा करावी या धारणेनें योग्याला पंचमहाभूतांवर जय संपादन करता येतो या योग्याच्या पाच भूमिका समजल्या जातात पृथ्वी नावाची पहिली भूमिका सिद्ध झाली असता शरीरातील मल, मूत्र आणि कफ हे कमी होतात आरोग्य प्राप्त होतें शरीर, हलकें होतें त्याच्या शरीराचा सुगंध दरवळतो अंगकांति सोन्याप्रमाणें देदीप्यमान होते कंठ मधुर होतो गुदद्वारापासून नाभिस्थानापर्यंत जलाची धारणा करून दुसरी योगभूमि सिद्ध झाली म्हणजे त्या योग्याला काटे बोचत नाहीत तो योगी गाळात फसत नाहीं किंवा पाण्यात बुडत नाहीं त्याला भुकेचा किंवा तहानेचा त्रास होत नाहीं नाभीपासून कंठापर्यंतच्या प्रदेशांत तेजाभूताची धारणा करून तिसरी भूमिका सिद्ध झाली म्हणजे तो योगी प्रमाणातीत अन्न जल सेवन करण्यास समर्थ होतो उन्हाची आणि अग्नीची त्याला पीडा होत नाहीं अत्यंत दूरचें पहाण्याला व ऐकण्याला तो समर्थ होतो कंठापासून भ्रूमध्यापर्यंत वायुमहा भूताची धारणा करून चौथी भूमिका सिद्ध झाली म्हणजे त्या योग्याला पृथ्वी वर मंडूकाप्रमाणें किंवा वृक्षावर वानराप्रमाणें उड्या मारण्याचें सामर्थ्य येतें व तो योगी आकाशातूनहि गमन करू शकतो भ्रूमध्यापासून ब्रह्मरंध्रापर्यंत आकाश महाभूताची धारणा केली असता पाचवी भूमिका सिद्ध होते तो योगी त्रिकालज्ञ होतो अणिमा महिमा इत्यादि अष्ट सिद्धि म्हणजे चमत्काराचीं सामर्थ्यें त्याला प्राप्त होतात व तो अनंतशक्तीनें संपन्न होतो ब्रह्मरूपीं चित्ताचा लय करून घेण्याऱ्या शुद्ध भावनेनें प्रवृत्त झालेले महात्मे या

सिद्धींच्या मोहात गुरफटत नाहीत आपल्या वैराग्यबलानें सिद्धींना कस्पटाप्रमाणें तुच्छ लखून त्याच्यापासून ते अलिप्त रहातात कारण या सिद्धि साधकाला अतिम साध्य प्राप्त करून घेण्याच्या बाबतींत विघ्नस्वरूप असतात.

सुषुम्ना नाडीमध्यें प्राणवायूचा निरोध करून मनाची धारणा केली असता अतर्नाद ऐकू येतात. ते अतर्नाद आठ प्रकारचे असतात घटानाद, दुदुभीनाद, शखनाद, वीणानाद, वेणुनाद, मृदगनाद, मेघनाद आणि समुद्रनाद ( गर्जना ), इतकेच काय, अशा त हेचे अनेक प्रकारचे अतर्नाद कानानें ऐकू येतात नादानुसधानाचा विषय योगतारावलि प्रकरणात ( सु स्तो स भाग २ रा ) अवश्य पाहावा या नादाच्या अनुसधानानेंहि चित्त चैतन्याशीं एकरूप होऊन जातें हें सुषुम्नानाडीमध्यें धारणा सिद्ध झाल्याचें लक्षण होय. सुषुम्ना नाडीलाच ब्रह्मनाडी असें म्हणतात हा योग सिद्ध झाला असता अग्नि, विद्युत्, नक्षत्रें चद्र आणि सूर्य याच्या तेजाप्रमाणें विंबरूप चैतन्याचा प्रकाश प्रतीतीला येतो असा योग्याचा अनुभव आहे

सूर्योदयापासून पुन्हा सूर्योदय होईपर्यंत मनुष्याचे साधारणपणें एकवीस हजार सहाशें वेळा श्वासोच्छ्वास होत असतात शरीरातून प्राणवायु बाहेर पडतो या क्रियेला श्वास असें म्हणतात व वायूचें बाहेरून शरीरात प्रवेश करणें या क्रियेला उच्छ्वास असें म्हणतात श्वास टाकताना आणि उच्छ्वास घेताना एकप्रकारचा ध्वनि अभिव्यक्त होत असतो श्वासाच्या वेळेला अभिव्यक्त होणा या ध्वनीचें स्वरूप 'ह' असें असतें तर उच्छ्वासाच्या वेळेला व्यक्त होणा या ध्वनीचें स्वरूप 'स' असें असतें ह आणि स हीं दोन्ही अक्षरें एकत्रित केलीं कि, 'हस' हा मत्र तयार होतो हस. या मत्राचा विलोम अर्थात् उलटा उच्चार केला म्हणजे सस्कृत भाषेंतील सधिनियमाप्रमाणें स या अक्षरापुढील विसर्गाचा सधि होऊन 'सोऽहम्' हा मत्र तयार होतो अशा रीतीनें 'हस सोहम्' 'हस सोऽहम्' या मत्राचा आपल्याला नकळतच आपल्याकडून जप होत असतो याच जपाला शास्त्रामध्यें 'अजपाजप' असें नाव दिलेलें आहे 'सोह सोह' या मत्राचाहि अखड उच्चार करीत राहिलें तर त्यातहि 'हस' या मत्राचा अतर्भाव होतोच हस हा अत्यत स्वच्छ निर्मल असतो हस शब्दाचाच अर्थ शुद्ध स्वच्छ निर्मल असा आहे. या जगात अत्यत शुद्ध, स्वच्छ, निर्मल असें एकच तत्त्व आहे त्या तत्त्वाला चित्तत्त्व

किंवा चैतन्य असें म्हणतात. त्यालाच आत्मा असेंहि म्हणतात. तात्पर्य, 'हंस' म्हणजे शुद्ध चित्स्वरूप आत्मा आणि 'सोऽहम्' म्हणजे तोच मी आहें, असा या मंत्राचा अर्थ आहे. अशा उदात्त तत्त्वाचा आविष्कार करणा-या या मंत्राचा जप आपल्याकडून श्वासोच्छ्वासाच्या रूपानें नकळतच अहोरात्र होत असतो. वाचकानीं अजपागायत्रीजपाचा विधि अवश्य समजून घ्यावा आणि आपल्या हातून नकळत होणाऱ्या या क्रियेला बुद्धिपूर्वक व विधिपूर्वक करण्याचा प्रयत्न करावा.

फलसिद्धीच्या दृष्टीनें अर्थाचें अनुसंधान ठेवणें हें अत्यंत उपयुक्त असल्यामुळें वर सांगितलेल्या पद्धतीनें अर्थाचेंहि चिंतन करावें. हंस हाच मंत्र प्रतिलोम केल्यास सोऽहम् या मंत्राच्या रूपानें परिणत होतो हें वर सांगितलेंच आहे. 'सोऽहम्' या मंत्रातील सकार आणि हकार यांचा लोप केल्यावर ओ + अ + म् अशीं अक्षरें शिल्लक रहातात. संस्कृत भाषेंतील संधि-नियमाप्रमाणें ओमध्यें अ मिळून जातो व 'ओम्' असें रूप तयार होतें. त्यालाच प्रणव असें म्हणतात. प्रणवामध्यें अकार, उकार, मकार, बिंदु आणि नाद अशीं पांच अक्षरें असतात. ब्रह्मा, विष्णु, रुद्र, ईश्वर आणि सदाशिव या पांच देवता क्रमशः प्रणवातील पांच अक्षरांच्या अधिष्ठात्री देवता समजाव्यात. तीं अक्षरें त्या देवतांचीं वाचक होत व त्या देवता त्या त्या अक्षरांचा वाच्यार्थ होत. या पांचहि अक्षरांचा क्रमवार समुच्चय केला कीं, ओंकार अथवा प्रणव सिद्ध होतो. तो शुद्ध सच्चिद्घन परिपूर्ण आनंदमय असलेल्या परमात्मतत्त्वाचा वाचक — द्योतक आहे. सर्व शब्द विश्वांतील पदार्थांचे वाचक आहेत व विश्वांतील सर्व पदार्थ हे कोणत्या न कोणत्या तरी शब्दाचे वाच्यार्थ आहेत. सर्व वाक्प्रपंच हा प्रणवानें व्यापलेला आहे. तर सर्व विश्वप्रपंच हा परब्रह्मानें व्यापलेला आहे. म्हणून प्रणव आणि परमात्मा, ॐकार आणि परब्रह्म हें एकच होत. चित्त शांत आणि एकाग्र करून जसें जसें मनन करावें तसा तसा या तत्त्वाचा प्रकाश चित्तामध्यें आविर्भूत होतो. शेवटीं 'सर्वं खल्विदं ब्रह्म, ब्रह्मैवाहमस्मि', 'अहं ब्रह्मैवास्मि', 'हंस सोऽहं' 'शिवोऽहम्' हें सर्व ब्रह्मच आहे. ब्रह्मच मी आहें. मी ब्रह्मच आहे. जो शुद्धसद्घन चिद्घन परमात्मा तोच मी आहें. मी अद्वितीय आनंदस्वरूप आहें, असा दृढ निश्चय होतो. त्यालाच आत्मसाक्षात्कार म्हणतात. हा सद्‌गुरूच्या कृपेशिवाय होणार नाहीं. गुरुकृपा ही परमेश्वराच्या कृपेशिवाय होणार नाहीं. याकरितां अनन्यचित्तानें

परमेश्वराची भक्ति अवश्य करावी तशीच ती गुरूचीहि पण करावी. याप्रमाणें जो वागेल त्याच भाग्यशाली थोर पुरुषाच्या अन्तःकरणात या तत्त्वाचा प्रकाश पडतो 'यस्य देवे परा भक्तिः, यथा देवे तथा गुरौ। तस्यैते कथिता ह्यर्थाः प्रकाशन्ते महात्मनः' अशा आत्मतत्त्वाचा चित्तामध्यें प्रकाश प्राप्त करून देणाऱ्या श्रीगुरू दक्षिणामूर्ति भगवान् शंकर याना माझा नमस्कार असो

सर्वात्मत्वमिति स्फुटीकृतमिदं यस्मादमुष्मिंस्तवे
तेनास्य श्रवणात्तदर्थमननाद्ध्यानाच्च संकीर्तनात् ।
सर्वात्मत्वमहाविभूतिसहितं स्यादीश्वरत्वं ततः
सिध्येत्तत्पुनरष्टधा परिणतं चैश्वर्यमव्याहतम् ॥१०॥

म्हणतात मनन करताना जे संशय येतील त्यांचें निरसन करून घ्यावें मननानंतर निदिध्यासन करावें लागतें श्रवण आणि मनन करून जो अर्थ निश्चित केलेला असतो त्याचें सतत तन्मयत्वेनें चिंतन करणें याला निदिध्यासन म्हणतात

प्रकृतस्थली 'तत्त्वमसि' तें परमात्मतत्वच तू आहेस 'अयमात्मा ब्रह्म' या देहात मी म्हणून प्रतीतीला येणारा हा जीवात्मा ब्रह्मस्वरूपच आहे इत्यादि श्रुतिवाक्याचें व त्याच्या अर्थाचें श्रवण केल्यानंतर आणि साधक-बाधक युक्तिप्रयुक्तींनी मनन करून हा सिद्धान्त बरोबर आहे असें निश्चित झाल्यानंतर श्रुतिसिद्ध सच्चिदानंदघन परिपूर्ण परमात्मा मी आहें, मी सर्वात्मस्वरूप आहें, मी सत्यस्वरूप आहें, मी शिवस्वरूप आहें अशा तऱ्हेचा सारखा एकरूप प्रत्यय येत राहिला पाहिजे अंतःकरणात दुसऱ्या कोणत्याहि विषयाचें स्फुरण होता कामा नये अंतःकरणात दुसऱ्या कोणत्याहि विषयाचें स्फुरण होणें याला चित्तवृत्तीचा विजातीय प्रवाह म्हणतात चित्तामध्यें एकच एक विषय सतत अविरत परंपरेनें स्फुरत रहाणें याला चित्तवृत्तीचा अखंड सजातीय प्रवाह म्हणतात अंतःकरणामध्यें विजातीय प्रवाह उत्पन्न न होता कोणत्याहि वस्तूचा सारखा सजातीय प्रवाह उत्पन्न होत रहाणें हेंच निदिध्यासाचें स्वरूप आहे यालाच ध्यान असेंहि म्हणतात जिज्ञासूनीं या स्तोत्रातील श्लोकांत सांगितलेल्या परमात्मतत्त्वाचें निरंतर ध्यान करावें या स्तोत्राचें संकीर्तनहि करावें आपण वरच्यावर म्हणावें व दुसऱ्यालाहि म्हणावयास सांगावें त्याच्या अर्थाचेंहि विवरण करावें याप्रमाणें या स्तोत्राचें श्रवण, मनन, निदिध्यासन आणि संकीर्तन केलें असता सर्वात्मता प्राप्त होते सर्वात्मत्वाची प्राप्ति होणें ही एक महाविभूति म्हणजे मोठें ऐश्वर्य अथवा मोठी सिद्धीच आहे कारण तिच्यापुढें बाकीच्या अष्टविध महासिद्धि देखील तुच्छ ठरतात अथवा सर्वात्मत्वरूपी महाविभूतीच्या योगानेच त्यांचा अंतर्भाव होत असल्यामुळें त्यांची प्राप्ति सहजच होते

फळांच्या हेतूनें आंब्याचीं झाडें लावलेलीं असलीं तरी छाया आणि सुगंध यांचा लाभ सहजच होतो थंडीच्या दिवसात रात्रीच्या वेळीं अरण्यात पाकनिष्पत्तीकरिता अग्नि तयार केला असता त्यापासून प्रकाश आणि उष्णता यांचा सहजच लाभ होतो आणि हिंस्र पशूचें भयहि रहात नाहीं याच न्यायानें सर्वात्मरूपी महाविभूतिसहित ईश्वरभाव प्राप्त झाल्यावर अणिमा

महिमा इत्यादि सिद्धींचाहि लाभ सहजच होतो. अणिमा म्हणजे आपल्या इच्छेप्रमाणें सूक्ष्म रूप धारण करतां येणें. महिमा म्हणजे आपल्या इच्छेप्रमाणें मोठमोठीं रूपें धारण करतां येणें. लघिमा म्हणजे आपल्या इच्छेप्रमाणें अगदीं पिंजलेल्या कापसासारखें हलकें होता येणें. गरिमा म्हणजे आपल्या इच्छेप्रमाणें रूप जड होतां येणें. प्राप्ति म्हणजे पाताळापासून तों ब्रह्मलोकापर्यंत सर्व वस्तूंचें प्रत्यक्ष इंद्रियांनीं आकलन होणें. प्राकाम्य म्हणजे आकाशगमनासारख्या अलौकिक गोष्टी आपल्या इच्छेप्रमाणें घडवूनआणण्याचें सामर्थ्य असणें. ईशित्व म्हणजे आपल्या संकल्प बलानें सृष्टि, स्थिति आणि प्रलय करण्याचें आणि सूर्य-चंद्रादिकांचाहि निग्रह करण्याचें सामर्थ्य असणें, तसेंच वशित्व म्हणजे लोकपालासह सर्व लोकांना अधीन करून घेण्याचें सामर्थ्य असणें. ह्याच त्या अष्टसिद्धि होत. सर्वात्मत्वरूपी साम्राज्यवैभवाचा लाभ झाल्यानंतर हीं अवांतर वैभवें सहजच प्राप्त होतात. अवांतर वैभवें हीं महावैभवाचेच परिणाम होत. सर्व वैभवांचें वैभव असलेल्या ब्रह्मपदाचा लाभ झाल्यानंतर बाकीचीं वैभवें प्राप्त झालीं काय आणि न झालीं काय ? त्याला दोन्ही सारखेंच आहे. सूर्याचा प्रकाश उपलब्ध झाल्यानंतर दिवे असले काय नि नसले काय ? दोन्ही सारखेंच ! ' सूरजको प्रकाश भयो तब दीपकज्योत जले न जले ' असा हा ब्रह्मज्ञानाचा महिमा आहे. तेंच ब्रह्मज्ञान या दक्षिणामूर्तिस्तोत्रांत सामावलेलें आहे. वाचकांनीं याचा अवश्य लाभ घ्यावा.

वटविटपिसमीपे भूमिभागे निषण्णं
सकलमुनिजनानां ज्ञानदातारमारात् ।
त्रिभुवनगुरुमीशं दक्षिणामूर्तिदेवं
जननमरणदुःखच्छेददक्षं नमामि ॥ ११ ॥

वडाच्या झाडाजवळ भूप्रदेशावर बसून सर्व ऋषि-मुनि लोकांना सहज लीलेनें ज्ञानदान करीत असलेले त्रैलोक्याचे गुरु सर्वसमर्थ श्रीदक्षिणामूर्ति देव, जन्ममरणरूपी संसारदुःखाचा नाश करण्यांत कुशल असलेले, त्यांना मी नमस्कार करतों.

चित्रं वटतरोर्मूले वृद्धाः शिष्या गुरुर्युवा ।
गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु च्छिन्नसंशयाः ॥

वटवृक्षाच्या मुळाशी एक मोठें आश्चर्य दिसत आहे. शिष्य लोक म्हातारे म्हातारे दिसत आहेत आणि गुरुमात्र तरुण दिसत आहेत. गुरूचें भाषण मौन आहे व सर्व शिष्य निःशङ्क होत आहेत; शिष्यांच्या अन्तःकरणातील सर्व संशय आपोआप मावळत आहेत.

चिद्घनाय महेशाय वटमूलनिवासिने ।
सच्चिदानन्दरूपाय दक्षिणामूर्तये नमः ॥

वटवृक्षाच्या मुळाशीं वास्तव्य करणारे चिन्मय सच्चिदानंदरूप असे जे दक्षिणामूर्ति भगवान् शंकर महेश त्यांना माझा नमस्कार असो



## दक्षिणामूर्तिस्तोत्रम्

[ दक्षिणामूर्तिस्तोत्र वाचकांना रोज म्हणण्यास सुलभ जावें म्हणून तें मूळमात्र या ठिकाणीं देण्याचा प्रयत्न केला आहे ]

विश्वं दर्पणदृश्यमाननगरीतुल्यं निजान्तर्गतं
पश्यन्नात्मनि मायया बहिरिवोद्भूतं यथा निद्रया ।
यः साक्षात्कुरुते प्रबोधसमये स्वात्मानमेवाद्वयं
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ १॥

बीजस्यान्तरिवाङ्कुरो जगदिदं प्राङ्निर्विकल्पं पुन-
र्मायाकल्पितदेशकालकलनावैचित्र्यचित्रीकृतम् ।
मायावीव विजृम्भयत्यपि महायोगीव यः स्वेच्छया
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ २ ॥

यस्यैव स्फुरणं सदात्मकमसत्कल्पार्थगं भासते
साक्षात्तत्त्वमसीति वेदवचसा यो बोधयत्याश्रितान् ।
यत्साक्षात्करणाद्भवेन्न पुनरावृत्तिर्भवाम्भोनिधौ
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ३ ॥

नानाच्छिद्रघटोदरस्थितमहादीपप्रभाभास्वरं
ज्ञानं यस्य तु चक्षुरादिकरणद्वारा बहिः स्पन्दते ।
जानामीति तमेव भान्तमनुभात्येतत्समस्तं जगत्
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ४ ॥

देहं प्राणमपीन्द्रियाण्यपि चलां बुद्धिं च शून्यं विदुः
स्त्रीबालान्धजडोपमास्त्वहमिति भ्रान्ता भृशं वादिनः ।
मायाशक्तिविलासकल्पितमहाव्यामोहसंहारिणे
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ५ ॥

राहुग्रस्तदिवाकरेन्दुसदृशो मायासमाच्छादनात्
सन्मात्रः करणोपसंहरणतो योऽभूत्सुषुप्तः पुमान् ।
प्रागस्वाप्समिति प्रबोधसमये यः प्रत्यभिज्ञायते
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ६ ॥

बाल्यादिष्वपि जाग्रदादिषु तथा सर्वास्ववस्थास्वपि
व्यावृत्तास्वनुवर्तमानमहमित्यन्तः स्फुरन्तं सदा ।
स्वात्मानं प्रकटीकरोति भजतां यो मुद्रया भद्रया
तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ७ ॥

विश्वं पश्यति कार्यकारणतया स्वस्वामिसम्बन्धतः
शिष्याचार्यतया तथैव पितृपुत्राद्यात्मना भेदतः ।
स्वप्ने जाग्रति वा य एष पुरुषो मायापरिभ्रामित-
स्तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ८ ॥

भूरम्भांस्यनलोऽनिलोऽम्बरमहर्नाथो हिमांशुः पुमा-
नित्याभाति चराचरात्मकमिदं यस्यैव मूर्त्यष्टकम् ।
नान्यत्किंचन विद्यते विमृशतां यस्मात्परस्माद्विभो-
स्तस्मै श्रीगुरुमूर्तये नम इदं श्रीदक्षिणामूर्तये ॥ ९ ॥

सर्वात्मत्वमिति स्फुटीकृतमिदं यस्मादमुष्मिंस्तवे
तेनास्य श्रवणात्तथार्थमननाद्ध्यानाच्च संकीर्तनात् ।
सर्वात्मत्वमहाविभूतिसहितं स्यादीश्वरत्वं ततः
सिध्येत्तत्पुनरष्टधा परिणतं चैश्वर्यमव्याहतम् ॥ १० ॥

वटविटपिसमीपे भूमिभागे निषण्णं
सकलमुनिजनानां ज्ञानदातारमारात् ।
त्रिभुवनगुरुमीशं दक्षिणामूर्तिदेवं
जननमरणदुःखच्छेददक्षं नमामि ॥ ११ ॥

चित्रं वटतरोर्मूले वृद्धाः शिष्या गुरुर्युवा ।
गुरोस्तु मौनं व्याख्यानं शिष्यास्तु छिन्नसंशयाः ॥ १२ ॥
चिद्घनाय महेशाय वटमूलनिवासिने ।
सच्चिदानन्दरूपाय दक्षिणामूर्तये नमः ॥१३॥

॥ इति श्रीमत्परमहंस-परिव्राजकाचार्यश्रीमच्छंकराचार्यविरचितं
श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रं संपूर्णम् ॥



# एकश्लोकी

[ हें एकाच श्लोकाचें आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून देणारें आचार्यांचें अध्यात्म प्रकरण आहे. स्तोत्राप्रमाणें हा श्लोक पाठ करून अर्थज्ञानपूर्वक रोज म्हणत राहिल्यास सर्वसाक्षी व स्वयंप्रकाश असा जो आत्मा त्याचें यथार्थ ज्ञान होऊन मनाला अत्यंत समाधान लाभेल. या एकाच श्लोकावरून आचार्यांची उपदेश पद्धति कशी होती हें सहज लक्षांत घेण्यासारखें आहे. आचार्य हे कान फुंकून उपदेश करीत बसले नाहीत. कोणीहि जिज्ञासू त्यांच्या दर्शनाला आला की त्याच्याशीं संभाषण करीत करीत सहजच ते त्याला आत्मज्ञानाचा उपदेश देत असत. असाच एक संवाद या श्लोकांत पहावयास सांपडतो. ]

यावर तो गृहस्थ म्हणाला, महाराज ! 'चक्षु' म्हणजे डोळा डोळा हेंच माझें ज्ञानाचें साधन डोळा हेंच सर्व दृश्य वस्तूंच्या ज्ञानाचें साधन आहे या ठिकाणीं डोळा हें उपलक्षण म्हणजे उदाहरण मात्र आहे आपल्याला कांहीं पदार्थाचें ज्ञान त्वगिंद्रियानें म्हणजे स्पर्शानेंहि होत असतें कान, नाक आणि जीभ हींहि पण ज्ञानाचीं साधनें आहेत, हें लक्षात घ्यावें. आचार्य म्हणाले, अरे ! डोळा हें ज्ञानाचें साधन आहे असें तू म्हणतोस पण '*तस्य निमीलनादिसमये किम् ?*' डोळे झाकले तर तुला कांहीं ज्ञान होत असतें का नाहीं ? तो म्हणाला, होत असतें आचार्य म्हणाले, तें कशानें होत असतें ? तो गृहस्थ म्हणाला, हात, पाय, कान, नाक इत्यादिकांच्या साहाय्यानें होत असतें आचार्य म्हणाले, अरे ! नाक दाबलें, कान झाकले, हात-पाय बांधले, तर तुला ज्ञान होतें कीं नाहीं ? तो गृहस्थ म्हणाला, होतें महाराज ! आचार्य म्हणाले, अरे ! कशानें होतें तें ? तो म्हणाला, 'धी' धी म्हणजे बुद्धि महाराज ! मला बुद्धीनें ज्ञान होत असतें आचार्य, म्हणाले, '*धियो दर्शने किम् ?*' बुद्धीचें ज्ञान होण्याला कोणतें साधन आहे ? बुद्धीचें ज्ञान कशानें होतें ? तो गृहस्थ म्हणाला, महाराज ! 'तत्राहम्' बुद्धीचें ज्ञान होण्याला मीच कारण आहें मी आहें म्हणूनच डोळे, हात, पाय, कान नाक व बुद्धि इत्यादि साधनांचा उपयोग होऊं शकतो मी आहें म्हणूनच मला सर्व कांहीं कळूं शकतें यावर आचार्य म्हणाले, '*अतो भवान् परमकं ज्योतिः*' अरे ! म्हणूनच तर तू सूर्य, चंद्र, प्रदीप, डोळे, बुद्धि इत्यादि सर्व वस्तूंना प्रकाशित करणाऱ्या प्रकाशकाचाहि प्रकाश झालास सर्वांना तू प्रकाशित करतास, पण तुला प्रकाशित करणारा तुझ्याशिवाय दुसरा कोण आहे ? कोणीच नाहीं म्हणूनच तर तू स्वयंप्रकाश आहेस '*परमकं ज्योतिः*' म्हणजे परंज्योति सर्वश्रेष्ठ प्रकाशस्वरूप तूच आहेस तू शुद्ध चित्स्वरूप आहेस तो गृहस्थ म्हणाला, '*तदस्मि प्रभो*' महाराज ! आपण म्हणतां तें अगदीं बरोबर आहे मी परंज्योति स्वयंप्रकाश आत्मा आहें आचार्य म्हणाले तुझ्याव्यतिरिक्त प्रमेतीला येणार सर्व पदार्थ दृश्य आहेत म्हणूनच ते नाशवंत आहेत तू मात्र त्या सर्वांचा द्रष्टा साक्षी असल्यामुळें नित्य आहेस, अविनाशी आहेस ही गोष्ट अर्थातच सिद्ध झाली ' याप्रमाणें आचार्यांनीं आत्म्याचें अविनाशित्व व स्वयंप्रकाशत्व म्हणजे संभाषणानें सिद्ध केलें ' तो गृहस्थ संतुष्ट झाला, धन्य झाला व आचार्यांच्या चरणीं त्यानें प्रणिपात केला

• •

# ब्रह्मज्ञानावलीमाला

[ आतापर्यंत आपण अनेक स्तोत्रांच्या द्वारा स्वतःची ब्रह्मस्वरूपता लक्षात घेतलेलीच आहे. तिचेंच दृढ चिंतन या ब्रह्मज्ञानावलीमालेच्या रूपानें आपल्याला करावयाचें आहे. या स्तोत्राचें अर्थात् त्याच्या अर्थाचें चिंतन केल्यास आपल्याला खात्रीनें आत्मसमाधान लाभेल. आपण कोण आहोंत व कसे आहोंत हें खात्रीनें लक्षात घेता येईल अशीच रचना आचार्यांनीं या स्तोत्राची केलेली आहे. ब्रह्मज्ञानावलीमाला हें एक आत्मस्वरूपाचें यथार्थ ज्ञान करून देणारें लहानसें पण अत्यंत सुंदर असें अध्यात्म प्रकरणच आहे. ]

सकृच्छ्रवणमात्रेण ब्रह्मज्ञानं यतो भवेत् ।
ब्रह्मज्ञानावलीमाला सर्वेषां मोक्षसिद्धये ॥ १ ॥

जिचें एकदा लक्षपूर्वक श्रवण केलें तरी निश्चित ब्रह्मज्ञान होईल, अशी ही ब्रह्मज्ञानावलीमाला सर्वांना मोक्षसुखाचा लाभ करून देण्याला उपयुक्त आहे.

या ठिकाणीं श्रवण या शब्दाचा अर्थ सदाचारपूर्वक श्रवण, मनन आणि निदिध्यासन करून, आत्मसाक्षात्कार करून घेणें असाच केला पाहिजे. मुलें सांगितल्याप्रमाणें वागेनाशीं झालीं म्हणजे बाप म्हणत असतो, आता मुलें माझें कांहीं ऐकत नाहींत. या ठिकाणीं ऐकणें या शब्दाचा अर्थ सांगितल्याप्रमाणें वागणें असाच करावा लागतो. त्याचप्रमाणें प्रकृत श्लोकांतील श्रवण शब्दाचा अर्थ वर निर्दिष्ट केल्याप्रमाणेंच करणें आवश्यक आहे.

असङ्गोऽहमसङ्गोऽहमसङ्गोऽहं पुनः पुनः ।
सच्चिदानन्दरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ २ ॥

कोणत्याहि विषयाशीं अथवा कोणाशींहि माझा तत्त्वतः कांहीं संबंध नाहीं, नाहीं, नाहीं, हें मी त्रिवार सांगतों. पुनः पुनः सांगतों. मी सच्चिदानन्दरूप आहें. जिकडे तिकडे मीच आहें. मी अव्यय म्हणजे विनाशरहित आहें.

नित्यशुद्धविमुक्तोऽहं निराकारोऽहमव्ययः ।
भूमानन्दस्वरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ ३ ॥

मी स्वभावतःच नित्य शुद्ध म्हणजे निर्मळ आहें. विमुक्त म्हणजे संसाराच्या बंधनांतून सोडलेला आहें. मला कांहीं आकार नाहीं व माझा कधीं

नाशहि होत नाहीं मी विश्वव्यापी महान् आनंदस्वरूप आहें मीच सर्वत्र आहें सर्व कांहीं मीच आहें मी अविनाशी आहें.

नित्योऽहं निरवद्योऽहं निराकारोऽहमच्युतः ।
परमानन्दरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ ४ ॥

मी नित्य आहें माझा कधींच नाश होत नाहीं व बाधहि होत नाहीं. मी निर्दोष आहें कोणत्याहि दोषाचा तत्त्वतः माझ्याशीं कांहीं संबंध नाहीं मी निराकार आहें मी अच्युत म्हणजे सदा सर्वकाळ स्वस्वरूपानेंच रहाणारा आहें सर्वांपेक्षा श्रेष्ठ असलेला आनंद हेंच माझें रूप आहे मीच सर्वत्र ओतप्रोत भरलों आहें मी अव्यय आहें

शुद्धचैतन्यरूपोऽहमात्मारामोऽहमेव च ।
अखण्डानन्दरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ ५ ॥

मी शुद्ध चैतन्यस्वरूप आहें मी आत्माराम आहें आत्मस्वरूपामध्यें रमणें हाच माझा स्वभाव आहे मी अखंड आनंदस्वरूप आहे जिकडे तिकडे मीच आहें मी अव्यय आहें

प्रत्यक्चैतन्यरूपोऽहं शान्तोऽहं प्रकृतेः परः ।
शाश्वतानन्दरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ ६ ॥

मी प्रत्यक् म्हणजे सर्वान्तर्यामी आत्मस्वरूप आहें चैतन्य म्हणजे ज्ञान हेंच माझें स्वरूप आहे मी शान्त म्हणजे पूर्ण स्थिरस्वरूप आहें माझ्या ठिकाणीं चंचलता अस्थिरता हें कांहीं नाहीं मी प्रकृतीच्या म्हणजे मायेच्या पलीकडचा आहें मी मायातीत आहें मी शाश्वत म्हणजे निरंतर टिकणारा, अविनाशी आनंदरूप आहें मीच सर्वत्र विराजत आहें मी अव्यय आहें

तत्त्वातीतः परात्माहं मध्यातीतः परः शिवः ।
मायातीतः परं ज्योतिरहमेवाहमव्ययः ॥ ७ ॥

शास्त्रज्ञ लोक तत्त्व म्हणून ज्या विषयाचें प्रतिपादन करतात त्याच्याहि पलीकडचा मी आहें मी प्रतिपादनाचा किंवा वर्णनाचा विषय होऊं शकत नाहीं अथवा तत्त्व म्हणजे सर्वज्ञत्व सर्वेश्वरत्व सर्वनियन्तृत्व सर्वशक्तिमत्त्व इत्यादि गुणांनीं विशिष्ट असलेलें, अव्यक्त अंतर्यामी जगाचें कारण असलेलें

असें जें ईश्वरचैतन्य, त्याच्याहि पलीकडचा मी आहें ईश्वरचैतन्य हें जरी सर्वश्रेष्ठ असलें तरी अखेर तें सोपाधिकच आहे अज्ञानसमष्टि — अज्ञानसमूह अथवा माया हा त्याचा उपाधि आहे मी मात्र निरुपाधिक शुद्ध चैतन्यस्वरूप असल्यामुळें त्या ईश्वरतत्त्वाच्याहि पलीकडचा आहे मी मध्यातीतहि आहें अर्थात् माझ्या ठिकाणीं आदि मध्य असा काहीं विभाग नाहीं मी पर म्हणजे सर्वश्रेष्ठ आहें. मी शिव म्हणजे कल्याणस्वरूप अथवा मंगलमय, आनंदमय आहे मी मायेच्या पलीकडचा आहें मी परज्योति म्हणजे सर्वोत्कृष्ट प्रकाशस्वरूप आहें मीच मी सर्वत्र विराजमान आहें मी अव्यय आहें

नानारूपव्यतीतोऽहं चिदाकारोऽहमच्युतः ।
सुखरूपस्वरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ ८ ॥

मी अनेक रूपांना अतिक्रांत केलेलें आहें मी अनेक रूपें धारण केलेलीं असूनहि मी त्या सर्व रूपांच्या पलीकडचा आहें मी सर्व रूपातीत आहें शुद्धचैतन्य हेंच माझें रूप आहे मी नेहमीं स्वस्वरूपींच विराजमान आहें मी कधीं आपल्या स्वरूपापासून भ्रष्ट होत नाहीं सुखाचें, आनंदाचें जें रूप आहे, तेंच माझें स्वरूप आहे मीच सर्वत्र आहे मी अव्यय आहें

मायातत्कार्यदेहादि मम नास्त्येव सर्वदा ।
स्वप्रकाशैकरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ ९ ॥

माया आणि तिचीं कार्यें देह, इंद्रियें इत्यादिकांचा समुदाय, तसेंच पुत्र, मित्र, कलत्र इत्यादि हे कोणी तत्त्वतः माझे नव्हेत आणि तत्त्वतः त्यांचा माझ्याशीं केव्हांहि काहींहि संबंध नव्हता आणि नाहीं मी स्वयंप्रकाश आहें सदा सर्वकाळ एकरूप आहें मीच सर्व काहीं आहें मी अव्यय आहें

गुणत्रयव्यतीतोऽहं ब्रह्मादीनां च साक्ष्यहम् ।
अनन्तानन्दरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ १० ॥

मी सत्त्व, रज आणि तम या तिन्ही गुणांच्या पलीकडचा आहें मी त्रिगुणातीत आहें मी ब्रह्मा, विष्णु आणि महेश यांचा साक्षी आहें माझ्यापासूनच ते प्रकट झालेले आहेत व माझ्याच प्रेरणेनें ते आपआपलीं कार्यें करीत आहेत मी त्याच्याहि पलीकडचा आहें मी अनंत आहें मी आनंदस्वरूप आहें अथवा ज्याचा कधींहि अंत होत नाहीं असा जो अविनाशी आनंद तोच

मी आहें नित्य आणि निरतिशय आनद हेंच माझें रूप आहे सर्वत्र मीच आहें मी अ यय आहें

**अन्तर्यामिस्वरूपोऽहं कूटस्थः सर्वगोऽस्म्यहम् ।**
**परमात्मस्वरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ ११ ॥**

मी अतर्यामीस्वरूप आहें सर्वांच्या देहात मी जीवरूपानें विराजमान आहें मी कूटस्थ म्हणजे विर्विकार आहें मी सर्वत्र विराजमान आहें मी सर्वत्र विलसत आहें मी परमात्मस्वरूप आहें मीच सर्व काहीं आहें मी अ यय आहें

**निष्कलोऽहं निष्क्रियोऽहं सर्वात्माद्यः सनातनः ।**
**अपरोक्षस्वरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ १२ ॥**

मी निष्कल म्हणजे निरवयव आहें कला म्हणजे अश किंवा भाग ते माझ्या ठिकाणीं नाहींत मी निष्क्रिय आहें म्हणजे कोणत्याहि क्रियेचा माझ्या ठिकाणीं तत्वत तिळमात्रहि सबध नाहीं मी सर्वांचा आत्मा आहें मी सर्व रूपानें नटलों आहें मी सर्वस्वरूप आहें मी आद्य म्हणजे सर्वा या अगोदरचा आहें मी सनातन म्हणजे सदा सर्वकाळ टिकणारा अर्थात् कधींहि नाश न पावणारा असा आहें मी सर्वांच्या आधीं असून, सर्वांच्या पलीकडचा—सर्वांच्या शेवटचा आहें माझ्या शेवटीं कोणीच नाहीं मला शेवटच नाहीं म्हणून मी अनत आहें म्हणजेच सनातन आहें मी अपरोक्षस्वरूप आहें सर्वांनाच मी प्रत्यक्ष आहें सर्वांचा आत्माच मी आहें सर्व काहीं मीच आहें मी अव्यय आहें

**द्वन्द्वादिसाक्षिरूपोऽहमचलोऽहं सनातनः ।**
**सर्वसाक्षिस्वरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ १३ ॥**

मी सुख आणि दु ख, शीत आणि उष्ण, मान आणि अपमान जय आणि पराजय लाभ आणि हानि इत्यादि सर्व द्वद्वाचा साक्षी आहें साक्षी म्हणजे द्रष्टा मी अचल म्हणजे कूटस्थ निर्विकार आहें मी सनातन म्हणजे सर्वकाळ अ याहत असणारा असा आहें मी सर्वांचा साक्षी आहें मीच सर्व आहें मी अ यय आहें

**प्रज्ञानघन एवाहं विज्ञानघन एव च ।**
**अकर्ताहमभोक्ताहमहमेवाहमव्ययः ॥ १४ ॥**

प्रज्ञानघन म्हणजे सुषुप्त अवस्थेचा अभिमानी जो ईश्वर, तो मीच आहें. मी विज्ञानघन म्हणजे केवळ ज्ञानस्वरूपच आहें. मी तत्त्वतः कर्ता नाहीं व भोक्ताहि नाहीं, पण शास्त्रज्ञाच्या दृष्टीनें सर्वकर्ता मीच आहें. मी सर्वभोग-स्वरूप असल्यामुळें सर्वभोक्ता आहें. तत्त्वतः पाहू गेलें असतां मी कर्तृत्व भोक्तृत्वविरहित शुद्धस्वरूपच आहें. मीच सर्व कांहीं आहें मी अव्यय आहें.

निराधारस्वरूपोऽहं सर्वाधारोऽहमेव च ।
आप्तकामस्वरूपोऽहमहमेवाहमव्ययः ॥ १५ ॥

मी निराधार आहें. मला कोणाचा आधार नाहीं, पण सर्वांचा आधार मीच आहें. सर्व विश्वप्रपंचाचें अधिष्ठान मी आहें, पण माझें अधिष्ठान मात्र माझ्याशिवाय दुसरें कोणीच नाहीं. 'स्वे महिम्नि प्रतिष्ठितः' मी आपल्याच स्वरूपात प्रतिष्ठित आहें अर्थात् मला माझ्याशिवाय दुसरा कोणीच आधार नाहीं म्हणून मी निराधारस्वरूप आहें. मी स्वतः निराधार, असलों तरी मी सर्वांना आधार आहें! विश्व आणि विश्वांतील सर्व प्राणी ज्याच्यापासून उत्पन्न होतात, ज्याच्या आधारावर जगतात आणि शेवटीं मृत्युसमयीं अथवा प्रलयकालीं ज्याच्या स्वरूपात लीन होतात त्याचाच विचार करावा. तेंच लक्षांत ध्यावें, त्यालाच ब्रह्म म्हणतात. तेंच मी आहें म्हणून मी स्वतः निराधार असलों तरी पण सर्वांचा आधार आहें. माझ्या सर्व इच्छा परिपूर्ण झालेल्या असल्यामुळें अथवा माझ्यामुळेंच भक्तांच्या सर्व इच्छा परिपूर्ण होत असल्यामुळें मी आप्त-कामस्वरूप आहें. फलें, फलांचीं साधनें, फल मिळविणें, फल भोगणें आणि फलांचा भोक्ता सर्व काहीं मीच आहें. मी अव्यय आहें.

तापत्रयविनिर्मुक्तो देहत्रयविलक्षणः ।
अवस्थात्रयसाक्ष्यस्मि ह्यहमेवाहमव्ययः ॥ १६ ॥

भूतप्रेत, पिशाच, चोर, दरोडेखोर, मारामारी व युद्धें इत्यादिकांपासून होणाऱ्या दुःखांना आधिभौतिक दुःखें म्हणतात या तापत्रयाचा संबंध स्थूल सूक्ष्म शरीराशी व शरीराभिमानी असलेल्या जीवचैतन्याशीं आहे मी शरीराहून निराळा व शुद्धचैतन्यस्वरूप असल्यामुळें त्रिविध तापातून मुक्त आहें दुःखाचा संबंध देहाशीं आहे - मी देह नव्हे स्थूल, सूक्ष्म आणि कारण या तिन्ही प्रकारच्या देहाहून मी विलक्षण म्हणजे निराळा आहें जागृति स्वप्न आणि सुषुप्ति या तिन्ही अवस्थांचा किंवा बाल्य, तारुण्य आणि वार्धक्य या तिन्ही अवस्थांचा मी साक्षी आहें मी अव्यय आहें

**दृग्दृश्यौ द्वौ पदार्थौ स्तः परस्परविलक्षणौ ॥**
**दृग्ब्रह्म दृश्यं मायेति सर्ववेदान्तडिण्डिमः ॥ १७ ॥**

या जगात दृग् आणि दृश्य हे दोनच पदार्थ आहेत ते एकमेकाहून अत्यंत भिन्न आहेत दृग् म्हणजे ब्रह्म, चैतन्य किंवा आत्मा आणि दृश्य म्हणजे जड अचेतन माया आणि मायिक प्रपंच ( सुबोधस्तोत्रसंग्रह, भाग दुसरा, दशश्लोकी स्तोत्रातील आठव्या श्लोकाचें विवरण अवश्य पहावें ) या जगात ब्रह्म तेवढें सत्य आहे माया आणि मायिक प्रपंच हे सर्व मिथ्या म्हणजे कालांतरानें बाधित होणारे, नाहींसे होणारे आहेत असें सर्व वेदान्तशास्त्रें दौंडी पिटवून सांगत आहेत

**अहं साक्षीति यो विद्याद्विविच्यैवं पुनः पुनः ।**
**स एव मुक्तः सन् विद्वानिति वेदान्तडिण्डिमः ॥ १८ ॥**

गीता उपनिषदें आणि ब्रह्मसूत्रें इत्यादि वेदान्त प्रकरणांत सांगितल्याप्रमाणें पुनः पुन्हा विचार करून ' मी सर्वसाक्षी आत्मा आहें ' असें दृढ निश्चयानें जो जाणील तोच खरा विद्वान् होय तोच सर्व संसारदुःखातून मुक्त होतो तोच सन् – सद् म्हणजे ब्रह्मस्वरूप होय अशी वेदान्तशास्त्राची दौंडी आहे

**घटकुड्यादिकं सर्वं मृत्तिकामात्रमेव च ।**
**तद्वद् ब्रह्म जगत्सर्वमिति वेदान्तडिण्डिमः ॥ १९ ॥**

गाडगें, मडकें, रांजण, परळ, विटा, कवलें, भिंती, बुरूज आणि मातीचीं चित्रें हें सर्व मातीच होय मोहनमाळ, बोरमाळ, पुतळी माळ, वज्रटीक, एकदाणी, चपलाहार, गोफ, पाटल्या, बांगड्या, बिलवर, बिंदीबिजवरा, केकत-

केवडा, अगठी, कडीं, तोडे इत्यादि सर्व अलकार सोनेंच आहेत त्याचप्रमाणें विविध नामरूपानीं प्रतीतीला येणारें हें सर्व जग ब्रह्मच आहे अशी सर्व शास्त्राचा राजा असलेल्या वेदान्ताची दौंडी आहे

**ब्रह्म सत्यं जगन्मिथ्या जीवो ब्रह्मैव नापरः ।**
**अनेन वेद्यं सच्छास्त्रमिति वेदान्तडिण्डिमः ॥ २० ॥**

ब्रह्म सत्य आहे, ब्रह्मच सत्य आहे जग मिथ्या म्हणजे बाधित होणारें आहे जीव ब्रह्मस्वरूपच आहे तो ब्रह्माहून निराळा नाहीं याच सिद्धान्तावरून हें शास्त्र किती उत्तम आहे हें लक्षात घ्यावें अद्वैत वेदान्तशास्त्र हें सर्व शास्त्रात अत्यत उत्तम शास्त्र आहे तें सच्छास्त्र आहे हें लक्षात घ्यावें अशी वेदाताची दौंडी आहे

**अन्तर्ज्योतिर्बहिर्ज्योतिः प्रत्यग्ज्योतिः परात्परः ।**
**ज्योतिर्ज्योतिः स्वयंज्योतिरात्मज्योतिः शिवोऽस्म्यहम् ॥२१॥**

आत प्रकाशस्वरूप असलेला, बाहेरहि प्रकाशस्वरूप असलेला, जिकडे तिकडे चोहीकड प्रकाशस्वरूप असलेला, अन्तर्यामीरूपानें प्रकाशस्वरूप असलेला, श्रेष्ठापेक्षाहि श्रेष्ठ, सर्वांपेक्षा श्रेष्ठ प्रकाशकाचाहि प्रकाशक सर्व प्रकाशक आणि स्वयप्रकाश असा जो शिव म्हणजे मगलमय, आनदमय, चित्स्वरूप आत्मा तोच मी आहें



## शंकरदेशिकाष्टकम्

[ आचार्यांच्या चार पट्टशिष्यापैकीं तोटकाचार्य हे एक पट्टशिष्ट होते काहीं ठिकाणीं त्रोटक असाहि शब्द उपयोगात आणलेला आहे त्याचा अधिकार फार मोठा होता हें सागणें नकोच श्रीशकराचार्यांनीं स्थापन केलेल्या चार दिशाच्या मुख्य मठापैकीं उत्तरेकडील ज्योतिर्मठाच आद्य आचार्य म्हणून त्याची योजना झालेली होती तोटक वृत्त हे त्याचें फार आवडतें वृत्त होतें त्याची ग्रथरचनाहि प्राय तोटक वृत्तातच आढळते ते आचार्यांचे एकनिष्ठ भक्त होते त्यानींच हे आचार्यांचें स्तोत्र तोटक वृत्तात केलेलें आहे यात पराकाष्ठेची निष्ठा, दृढ भक्ति व अनन्य प्रेम याचा उत्तम आविष्कार झालेला दृष्टीस पडतो सद्गुरूच्या उपकारातून उतराई व्हावें असे शब्दच उपलब्ध

हात नसतात तथापि, तोटकाचार्यांनीं केलेलें हें श्रीशंकराचार्यांचें स्तोत्र कृतज्ञतेचें द्योतक आहे, यांत संशय नाहीं आचार्यांनीं सुलभ स्तोत्रवाङ्मयाची निर्मिति करून आपल्यावर जे अपरिमित उपकार केलेले आहेत त्याबद्दलची कृतज्ञता आपणहि तोटकाचार्यांच्याच शब्दांनीं प्रकट करावी अर्थात् हें स्तोत्र अर्थाकडे लक्ष ठेवून नित्य म्हणावें ]

विदिताखिलशास्त्रसुधाजलधे
महितोपनिषत्कथितार्थनिधे ।
हृदये कलये विमलं चरणं
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ १ ॥

हे सद्गुरो ! आपण सर्व शास्त्ररूपी अमृताचा महासागर आकलन केलेला आहे आपण अत्यंत पूज्य, श्रेष्ठ व आदरणीय अशा उपनिषदांच्या अर्थाचा गंभीर निधि सर्व लोकांना प्रकट करून दिला आहे अर्थात् अत्यंत गंभीर अशा उपनिषदांचा अर्थ सर्वांना स्पष्ट करून सांगितला आहे मी आपल्या निर्मल चरणकमलांना हृदयामध्यें धारण करीत आहें हे सद्गुरो शंकराचार्य महाराज ! आपण माझें रक्षण करावें मला आधार द्यावा माझा उद्धार करावा

करुणावरुणालय पालय मां
भवसागरदुःखविदूनहृदम् ।
रचयाखिलदर्शनतत्त्वविदं
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ २ ॥

हे सद्गुरो ! आपण करुणेचे महासागर आहां आपण माझें परिपालन करा या अपार भवसागराच्या दुःखानें माझें हृदय अत्यंत व्यथित झालेलें आहे आपण कृपा करून माझ्या हृदयामध्यें सर्व दर्शनांचीं तत्त्वें अत्यंत स्पष्ट प्रकाशतील असा माझ्यावर अनुग्रह करावा मी सर्व दर्शनांचा—सर्व शास्त्रांचा तत्त्ववेत्ता होईन अशी माझ्यावर कृपा करावी माझें अज्ञान दूर करावें हे सद्गुरो श्रीशंकराचार्य महाराज ! आपण माझें रक्षण करा ! मी आपल्या चरणीं शरण आलों आहें

भवता जनता सुहिता भविता
निजबोधविचारणचारुमते ।

कलयेश्वरजीवविवेकविदं
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ ३ ॥

हे सद्गुरो ! खरोखर आपणांकडूनच हा सर्व जनसमुदाय चांगल्या मार्गाला लागणार आहे. आपणच सर्वांना सन्मार्ग दाखवून सर्वांचें कल्याण करणारे आहां. आत्मबोधाचा विचार करण्यामध्यें आपली बुद्धि अत्यंत चारु म्हणजे सुंदर अर्थात् निष्णात आहे. आपण मला जीवशिवाचा विवेकी बनवा. जीवात्मा आणि परमात्मा यांचें मला यथार्थ ज्ञान होईल असा अनुग्रह करा. हे सद्गुरो श्रीशंकराचार्य महाराज ! माझें आपण रक्षण करा.

भव एव भवानिति मे नितरां
समजायत चेतसि कौतुकिता ।
मम वारय मोहमहाजलधिं
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ ४ ॥

हे सद्गुरो, आपण साक्षात् श्रीशंकरच आहां आणि म्हणूनच माझ्या मनाला अत्यंत आनंद झाला आहे. आपल्या सान्निध्यानें माझें मन अत्यंत उत्साहित झालेलें आहे. आपण माझा मोहरूपी महासागर दूर करा. आपण यथार्थ आत्मस्वरूपाचा उपदेश करून माझ्या महामोहाचें निरसन करा. हे सद्गुरो श्रीशंकराचार्य महाराज ! मी आपणास शरण आलों आहें. आपण माझें रक्षण करा.

सुकृतेऽधिकृते बहुधा भवतो
भविता पददर्शनलालसता ।
अतिदीनमिमं परिपालय मां
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ ५ ॥

हे सद्गुरो, ज्याच्या पदरीं पुण्याचें भक्कम पाठबळ असेल अशा अधिकारी पुरुषाच्याच ठिकाणीं प्राय: आपल्या चरणकमलांच्या दर्शनाची लालसा उत्पन्न होऊं शकेल. ज्याच्या पदरीं पुण्य नसेल त्याला आपल्या दर्शनाची उत्कंठा वाटणें शक्य नाहीं. अर्थात् आपल्या दर्शनाची इच्छा होणें हें भाग्याचें लक्षण होय. ज्यांना आपलें सान्निध्य लाभलें त्यांच्या भाग्याबद्दल काय सांगावें ! महाराज ! मी अति दीन आहें आपण माझें रक्षण करा. हे सद्गुरो शंकराचार्य

महाराज ! मी आपणांस अनन्य प्रेमानें शरण आलों आहें. आपण माझा उद्धार करा आपण मला कृतार्थ करा.

जगतीमवितुं कलिताकृतयो
विचरन्ति महामहसश्छलतः ।
अहिमांशुरिवात्र विभासि गुरो
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ ६ ॥

हे सद्गुरो, विश्वाचें संरक्षण करण्याकरितां नाना रूपें धारण करून परमेश्वराच्या विभूति मोठ्या तेजस्वी स्वरूपानें या जगांत वावरत असतात. विहरत असतात आपण मात्र मला माझ्यापुढें शारदीय पौर्णिमेच्या पूर्ण चंद्राप्रमाणें परम आल्हाददायक नयनमनोहर अशा स्वरूपात विराजमान असलेले दिसत आहां हे सद्गुरो श्रीशंकराचार्य महाराज ! मी आपल्या चरणीं शरण आलों आहें आपण माझें रक्षण करा. मला कृतार्थ करा.

गुरुपुंगव पुंगवकेतन ते
समतामयतां नहि कोऽपि सुधीः ।
शरणागतवत्सल तत्त्वनिधे
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ ७ ॥

हे सद्गुरो ! आपण परम श्रेष्ठ गुरु आहां आपण सर्व श्रेष्ठ पुरुषांमध्यें अत्यंत श्रेष्ठ आहां अथवा सर्व श्रेष्ठांचें आश्रयस्थान आहां. सर्व श्रेष्ठ लोकांनींहि आपला आश्रय घ्यावा अशी आपली योग्यता आहे. किंवा आपण श्रेष्ठ लोकांचें केतन म्हणजे ध्वज अथवा पताका आहां. ध्वज जसा उंचावर फडकत असतो त्याप्रमाणें आपण सर्व श्रेष्ठ लोकांमध्येंहि अत्यंत उच्चस्थानीं विराजत आहां. आपली बरोबरी करूं शकेल किंवा ज्याला आपली उपमा द्यावी असा एकहि बुद्धिमान् या जगांत सांपडणार नाहीं हे सद्गुरो ! आपण शरणागतवत्सल आहां गाय ज्याप्रमाणें आपल्या वासरावर प्रेम करते त्याचप्रमाणें आपणहि आपल्या भक्तावर प्रेम करतां आपण तत्त्वांचें प्रत्यक्ष निधीच आहां तत्त्व म्हणजे ब्रह्म किंवा शास्त्रीय सत्य सिद्धान्त. त्यांचे आपण निधि म्हणजे सांठा अथवा कोश किंवा खनिनाच आहां. हे सद्गुरो श्रीशंकराचार्य महाराज ! आपण माझें रक्षण करा.

विदिता न मया विशदैककला
न च किंचन काञ्चनमस्ति गुरो ।
द्रुतमेव विधेहि कृपां सहजां
भव शंकर देशिक मे शरणम् ॥ ८ ॥

॥ इति श्रीमत्तोटकाचार्यविरचितं श्रीशंकरदेशिकाष्टकं संपूर्णम् ॥

हे सद्गुरो ! मी अगदीं अज्ञान आहें. मी शास्त्राचा अंशहि स्पष्टपणें जाणलेला नाहीं. या अज्ञान्यावर कृपा करावी. महाराज ! मी आपणांस अर्पण करावें असें माझ्याजवळ कांहीं सुवर्ण, धन, द्रव्य, वस्तु किंवा पदार्थ कांहींच नाहीं महाराज ! आपण सहज दयाळु आहां. दया करणें — कृपा करणें हा आपला सहजसिद्ध स्वभाव आहे. माझ्यावर आपण सत्वर कृपा करावी. हे सद्गुरो शंकराचार्य महाराज ! मी आपल्या चरणीं अनन्यभावानें शरण आलों आहें. आपण माझें रक्षण करा. आपण मला कृतार्थ करा.

• •

## जिव्हाप्रार्थना

[ ही जिह्वाप्रार्थना भगवत्पूज्यपाद श्रीआद्यशंकराचार्य यांनींच केलेली आहे असें कळतें. माझे परम स्नेही भारतीय मानसशास्त्राचे लेखक श्री. कृ. के. ऊर्फ बाबासाहेब कोल्हटकर, सातारा, यांच्याकडून ही प्रार्थना मला ऐकावयास सांपडली. चौकशीअंतीं ती एका अधिकृत पीठस्थ श्रीशंकराचार्यांचे शिष्य असलेल्या स्वामींकडून त्यांना मिळाल्याचें समजलें सदरहू स्वामीमहाराज अत्यंत तेजस्वी, तपस्वी, विरक्त व विद्वान् होते. ' ही प्रार्थना आद्यशंकराचार्यांनींच केलेली असल्याचें गुरुजींच्या सांगण्यावरून मी सांगतों ' असें ते म्हणाले होते. ही प्रार्थना अत्यंत सुंदर आहे भाषाशैलीवरून ती आद्यशंकराचार्यांची असावी असें वाटतें. यांतील प्रार्थना मोठी रमणीय आहे परमेश्वराचा अनन्यभक्त आपल्या जिह्वेला यापेक्षां निराळी काय प्रार्थना करणार ? "हे जिह्वे रससारज्ञे सर्वदा मधुरप्रिये। नारायणाख्यपीयूषं पिब जिह्वे निरन्तरम्" हे जिह्वे तूं सर्व रसांचें सार जाणण्यांत निष्णात आहेस. तुला सदा सर्वकाळ मधुर पदार्थच आवडतात. या जगांत 'नारायण' नांवाच्या अमृताइतका गोड 'पदार्थच नाहीं तेंच अमृत तूं निरंतर प्राशन करीत रहा. दहीं, मध, द्राक्षें, दहीं-साखर इत्यादि अनेक मधुर पदार्थ आहेत, पण त्या सर्वांत अधिक मधुर जर

काहीं असेल तर तें श्रीहरीचें नामसंकीर्तन होय, असा अनुभवी संतांचा सिद्धान्त आहे आपणहि आपल्या जिह्वेला आचार्यांच्या या शब्दांतच नित्य प्रार्थित असावें, अशा अभिप्रायानें उपलब्ध झालेले हे चार श्लोक वाचकांपुढें ठेवीत आहें. पांचवाहि श्लोक असल्याचें कळतें कोणाला तो उपलब्ध झाल्यास त्यांनी लेखकाला अवश्य कळवावें ]

मत्प्रियसखि मज्जिह्वे मय्यनुकम्पां कुरुष्व नौमि त्वाम् ।
अन्यापवादरहिता भज सततमों नमः शिवायेति ॥ १ ॥

हे जिह्वे ! खरोखर तू माझी अत्यंत आवडती मैत्रीण आहेस मी तुला नमस्कार करतों माझ्यावर दया कर आणि माझी एक प्रार्थना ऐक दुसऱ्या कोणाचीहि निंदा, चहाडी न करतां ' ॐ नमः शिवाय ' हा मंत्र सतत जपत जा

वाणीगुणानुनिलये त्वां वन्दे मा कुरुष्व परनिन्दाम् ।
त्यज सकललोकवार्तां भज सततमों नमः शिवायेति ॥ २ ॥

ओज, प्रसाद, माधुर्य, सत्यत्व इत्यादि जे वाणीचे गुण आहेत ते सर्व तुझ्या ठिकाणीं विराजमान आहेत त्या गुणाचें तू आश्रयस्थान आहेस मी तुला नमस्कार करतों दुसऱ्याची निंदा करूं नकोस लोकांच्या सर्व व्यवहाराचीहि चर्चा सोडून दे लोकनिंदेत किंवा लोकांच्या अवगुणांची चर्चा करण्यात व्यर्थ काळ घालवूं नकोस ' ॐ नमः शिवाय ' या मंत्राचा सतत जप करीत रहा

कट्वम्ललवणतिक्तस्वादुकषायादिसर्वरसवाञ्छाम् ।
जिह्वे विहाय भक्त्या भज सततमों नमः शिवायेति ॥ ३ ॥

तिखट, आंबट, खारट, कडू, गोड आणि तुरट इत्यादि सर्व रसांची इच्छा, षड्रस पक्वान्नांची अभिलाषा सोडून देऊन हे जिह्वे अगदीं प्रेमानें सर्व काळ ' ॐ नमः शिवाय ' हा मंत्र जपत जा हीच माझी तुला कळकळीची विनंती आहे

रसने रचितोऽयमञ्जलिस्ते परनिन्दापरुषैरलं वचोभिः ।
दुरितापहं नमः शिवायेत्यमुमादिप्रणवं भजस्व मन्त्रम् ॥ ४ ॥

हे जिह्वे ! मी तुला नमस्कार करतों माझी कळकळीची विनंती ऐक परनिंदेचें कठोर शब्द बोलण्याचें काम सोडून दे सर्व पातकांचा निरास करणारा प्रणवपूर्वक ' नमः शिवाय ' हा मंत्र सर्व पापांचा नाश करणारा आहे, त्याचाच सतत उच्चार करीत रहा या ठिकाणीं ' ॐ नमः शिवाय ' हा मंत्र एक उदाहरण म्हणून निर्दिष्ट केला आहे राम राम, शिव शिव, दत्त, दत्त, दुर्गा दुर्गा, श्रीहरि

श्रीहरि इत्यादि कोणत्याहि इष्ट देवतेच्या नाममंत्राचा सतत जप करावा, असाच अभिप्राय आहे.

• •

## मननीयश्लोकत्रयम्

स्नातं तेन समस्ततीर्थसलिले दत्ता च सर्वाऽवनिः
यज्ञानां च सहस्रमिष्टमखिला देवाश्च संपूजिताः ।
संसाराच्च समुद्धृताः स्वपितरस्त्रैलोक्यपूज्योऽप्ययं
यस्य ब्रह्मविचारणे क्षणमपि स्थैर्यं मनः प्राप्नुयात् ॥ १ ॥

ज्याचें मन क्षणभर जरी ब्रह्मचिंतनात तन्मय झालें, त्यानें तरी सर्व तीर्थांत स्नान केल्यासारखें होतें पृथ्वीचें दान केल्याचें पुण्य लागतें हजार यज्ञ केल्याचें फळ मिळतें सर्व देवांची पूजा केल्यासारखी होते, सर्व पितरांचा संसारातून उद्धार होतो तो त्रैलोक्यामध्यें पूज्य होतो।

कुलं पवित्रं जननी कृतार्था विश्वम्भरा पुण्यवती च तेन
अपारसंवित्सुखसागरेऽस्मिन् लीनं परे ब्रह्मणि यस्य चेतः ॥२॥

ज्याचें मन चिदानंदाचा अपार सागर असलेल्या परब्रह्मस्वरूपीं लीन झालें, त्याचें सर्व कुल पवित्र झालें माता कृतार्थ झाली संपूर्ण पृथ्वीच त्याच्यामुळें पुण्यक्षेत्र बनते.

संपूर्णं जगदेव नन्दनवनं सर्वेऽपि कल्पद्रुमाः
गाङ्गं वारि समस्तवारिनिवहः पुण्याः समस्ताः क्रियाः ।
वाचः प्राकृतसंस्कृताः श्रुतिशिरो वाराणसी मेदिनी
सर्वावस्थितिरस्य वस्तुविषया दृष्टे परे ब्रह्मणि ॥ ३ ॥

परब्रह्मस्वरूपाचा साक्षात्कार झाला असतां आपणास सर्व जग नंदनवनच वाटेल सर्व वृक्ष कल्पद्रुम होतील सर्व जलाशय गंगोदक बनतील जी क्रिया आपल्या हातून घडेल ती पुण्यकारकच होईल आपण संस्कृत अथवा प्राकृत जें बोलाल तींच उपनिषद्वचनें होतील सर्व पृथ्वी काशीक्षेत्र होईल आपण ज्या अवस्थेंत असाल ती ब्रह्मसमाधीच होय ! केवढा हा आत्मसाक्षात्काराचा महिमा आहे ? वाचकांनीं त्याचा अवश्य लाभ घेऊन कृतार्थ व्हावें.

— समाप्त —

# आशीर्वाद आणि अभिप्राय

## श्रीमत्परमहंसपरिव्राजकाचार्य भगवान
## श्रीधरस्वामी यांचा आशीर्वाद

श्रीशंकरो विजयतेतराम

आशिश समुल्लसन्तु शं तनोतु प्रभुरीशः। अयि गोस्वामिन् ! परमेश्वरप्रेरणया भवता श्रीमच्छंकराचार्यविरचितानां भक्तिज्ञानपराणां स्तोत्राणां, प्राकृतजनानां कृते सुबोधतामापादयितुं यो महाराष्ट्रभाषानुवादः कृतः स खलु श्लाघनीय एव। आसीदस्यावश्यकताऽत्रैव। अथ परं वेदान्तगर्भितस्य श्रीदक्षिणामूर्तिस्तोत्रस्य हरिमीडेस्तोत्रस्य च विस्तृतं विवेचनमपि कृतमिति भवत्पत्रद्वारेण सुविदितम्। पश्चात्सर्वमप्येतत्प्रौढीकृत्य श्रीमच्छंकरभगवत्पादानां संक्षिप्तचरित्रेण साकं मुद्रयित्वा ग्रन्थरूपेण प्रकाशनीयमिति भवत्स्तुत्यसंकल्पोऽपि तत्पत्रत एव सुस्पष्टः। "यादृशी भावना कुर्यात्सिद्धिर्भवति तादृशी" भवत्सद्भावप्रभावतो निश्चयेनैव शीघ्रमेवेदं ग्रन्थप्रकाशनकार्यं सुकरं भवेदित्यत्र नास्ति सन्देहः।

अत्र धीमन्तः श्रीमन्तः स्वीयं धनं 'अहमहमिकया' मुक्तहस्तेन समर्प्य कृतार्थाः स्युरिति दृढं विश्वसिमि। उदात्तभावनया कृतमिदं महत्कार्यं शीघ्राति शीघ्रतया सर्वमानुकूल्यं लब्ध्वा संसारसन्तप्तजीवानामात्यन्तिकहितरूपं मोक्षसाधनं स्यादितीहे। इति शिवम्।

शं कर्तुं शंकरेण स्वकवचनसुधां वर्षितुं स्वेन नाम्ना
भूमावागत्य यद्यत्कृतमपि लिखितं ज्ञायते संस्कृतं हि।

तत्स्पष्टं प्राकृतानां भवितुमधिकृतं सुष्ठु गोस्वामिभिर्यत्
कार्यं भाषान्तरं तत्कृतममृतमिदं मृत्युदंष्ट्राङ्कितानाम्॥

प्राप्य मोक्षमथापि कृतार्थतां वाचनाज्जनताऽस्य भजेत्प्रियम्।
ब्रह्मसौख्यस्मोऽत्र वितीर्यते विश्वभाग्यरवे सुसुग्रादय॥

जगाचें सर्वश्रेष्ठ कल्याण साधावें म्हणून व त्याकरिता आपल्या तात्त्विक वचनामृताचा यथेष्ट वर्षाव करावा म्हणून साक्षात् शंकरानेंच ज्याने आपल्या

नावानें भूलोकात येऊन ज्या ज्या काहीं दिव्य लीला केल्या, गद्यपद्यात्मक असे जे जे दिव्य ग्रंथ लिहून ठेवले, ते सर्व काही सत्कृतज्ञानाच विदित आहेत प्राकृत-ज्ञानाहि ते स्पष्ट कळावेत म्हणून प्रथम प. गोस्वामीनीं त्यापैकीं मोक्षसाधनीभूत अशा श्रीशंकराचार्यांनीं रचलेल्या भक्तिज्ञानपर काहीं दिव्य स्तोत्राचें जें अत्यवश्य उत्कृष्ट मराठी भाषांतर करून दिलें तें हें मृत्युग्रस्ताना अमृत दिल्याप्रमाणेंच झालें आहे

याच्या वाचनानें जनता मोक्षाची व तदनुषगानें प्राप्त होणाऱ्या कृतार्थतेची प्राप्ति करून घेवो शास्त्रविहित पवित्र इच्छेचीहि पण प्राप्ति करून घेवो ब्रह्मसौख्य रसच या ठिकाणीं सर्वांना एकसारखा वाटला जात आहे विश्वभाग्याच्या सूर्याचा हा जणु सुसुखोदयच होय ॐ तत्सत्

सर्वेऽत्र सुखिन सन्तु सर्वे सन्तु निरामया ।
सर्वे भद्राणि पश्यन्तु मा कश्चित दु खमाप्नुयात ।

॥ इति शम ॥

---

## अवतार मेहेरबाबाका आशीर्वाद

माननीय श्रीगोस्वामीजी, आपका दिनाक २६-६-१९६१ का पत्र मिला और वह तुरन्त बाबाके पास गुरुप्रसाद भेजा गया।

यद्यपि एकान्तवासकी अवधिमें बाबा पत्र व्यवहारसे अलग रहते हैं, तो भी आपका पत्र उन्हें पढकर सुनाया गया। पत्र सुनकर, बाबाको अत्यन्त प्रसन्नता हुई और आपके प्रेमके प्रति उन्होंने सन्तोष प्रकट किया। पुस्तक में मुद्रित करने के लिए बाबा निम्नलिखित सन्देश भेज रहे हैं।

"सत्य अस्तित्व है और अस्तित्व निरन्तर, सर्व व्यापि, अनन्त और अपरिवर्तनशील है। उसीको सत्ता कहते हैं।"

"अस्तित्व में द्वैत नहीं है। द्वैत केवल भ्रम है।"

जीवनका लक्ष्य अद्वैत को प्राप्त करना है। जिसकी प्राप्तिमें अखण्ड और अनन्त आनन्द है। मैं ही लक्ष्य हूँ और मैं ही साधन हूँ। इसलिये मुझसे प्रेम करो और मुझे पा जाओ'। 'चिदानन्दरूप शिवोऽहं शिवोऽहम्।'

" जो मुझमें अपना सर्वस्व खोते हैं वे उसके पश्चात् अपना सर्वस्व मुझमें पाते हैं। "

— मेहेरबाबा

*बाबा इस कार्यके लिए अपना प्रेम—आशीर्वाद आपको भेजते हैं और* आपके प्रति प्रसन्नता प्रकट करते हैं।

प्रेमाभिवादन।

भवदीय स्नेही
अदी. के. इरानी

---

## श्री श्री देवी आनन्दमयी माँ यांचा

### श्रीस्वामी दत्तात्रेयानन्दजी महाराज यांच्या हस्तें आलेला शुभ आशीर्वाद आणि संदेश

श्रीमान् आद्य शंकराचार्यजीके भक्ति, ज्ञान और वैराग्य विषयक सभी स्तोत्र बड़े प्रसन्न और भावगर्म्भीर होते हैं। उन्हें कण्ठस्थ करके उनका हर दिन पाठ करना तथा उनके अर्थोंका मनन करना चित्तशान्तिके लिए बड़ाहि उपकारक है। चित्तको धीरे धीरे नश्वर विषयोंसे अलगकर भगवत्प्रवण करना तथा सत्, चित् और आनन्दघन परमात्मस्वरूपका चिन्तन करना यही चित्त-शान्तिका सच्चा उपाय है।

प्रस्तुत सुबोधस्तोत्र संग्रहमें भगवत्पूज्यपाद श्रीशंकराचार्यजीके स्तोत्रोंका मराठी भाषामें बडा सरस सुगम अनुवाद और विवेचन हुआ है। इसके पठन श्रवण और मननसे निश्चित ही साधकको आध्यात्मिक शान्ति मिलेगी।

इस कार्यके लिए प्रसन्नताके साथ आशीर्वचन भेजा जाता है।

—श्री श्री देवी आनन्दमयी माँ
श्री माँ आनन्दमयी आश्रम
हरद्वार

---

## *Translation Quite Reasonable and Reflecting the Basic Intention of the Great Acharya*

I have gone through all the lyrical poems of Shri Shankaracharya translated from the original Sanskrit into Marathi by Shri P G Goswami I have found the translation quite readable and reflecting the basic intention of the great Acharya Shri Goswami has done a real service to Marathi readers by providing such a lucid translation with exhaustive notes His explanations are also very illuminating and should prove immensely useful to scholars who are not acquainted with the original Sanskrit

— S. M Katre, M A. Ph D (London),
Director, Deccan College,
Post-Graduate & Research Institute, Poona 6

---

## Success in Conveying the Meaning Admirably of the Abstruse Philosophy

I do not know how far I am competent to express my opinion on Shri Nyayacharya Panduranga Shastri Goswami's free translation of Shri Adya Shankaracharya's Stotras What I felt as a layman that he had succeeded in conveying the meaning admirably of the abstruse philosophy of the Acharya This is by no means a mean feat Hence Shri Goswami deserves to be congratulated

— H. D Sankalia, M A LL B Ph D, (London)
Joint Director, Deccan College,
Post-Graduate & Research Institute, Poona 6

---

## Signal Service to Sanskrit Literature and Indian Philosophy

I have perused very carefully the manuscript of this Subodha Stotra Sangraha composed by M M. Pandit Pandurangashastri Goswami I do not hesitate to say that the Mahamahopadhyaya has taken great pains in elucidating in Marathi selected Stotras of Adya Shri Shankaracharya

The hymnological literature of Shri Shankaracharya is varied and vast. In each hymn the thought content is supreme. Each again is composed in mellifluous Sanskrit and the recitation is melodious to the ear. Each hymn acts like a soothing balm to the ailing heart and refreshes the spirit. The task of selecting only a few good hymns was also very difficult. But the Shastriji has selected with great acumen so as to make his book useful to the readers of philosophy in general and of Sanskrit literature in particular.

His Marathi translation is simple and lucid while his exposition of the philosophical Stotras like the 'Harimide' and the 'Daksinamurtistotra' deserve a very careful study. Here his exposition has become a veritable treatise on Shankaracharya's Advaita philosophy.

Pandit Goswamiji has no doubt done signal service to Sanskrit literature and Indian Philosophy. I shall go a step further and say that the book deserves to be prescribed as a University text book for pre degree and degree courses. I congratulate Mahamahopadhyaya Goswamishastri on the accomplishment of this task and implore God to urge him more and more on this path.

I appeal to the Government and the public to help Shastriji munificently in bringing out more and more valuable books o this type.

—Prof. Dr. V. G. Rahurkar, M.A., Ph.D.
Sub Editor Sanskrit Dic. Dept., Deccan College,
Editor 'Ekta' and Chief Editor 'Bharatvani'.

---

## प्रसादपूर्ण आशीर्वाद अनुवाद

प्राचार्य ह. भ. प. सोनोपंत दांडेकर यांचा अभिप्राय

म्हणून अभिप्राय न देतां, मी वे. शा. स. पांडुरंगशास्त्री यांनीं हा ग्रंथ लिहून काढला एवढेंच नव्हे तर तो प्रकाशित केला यांत जी श्रीमत् आचार्यांच्या ग्रंथावरील निष्ठा दाखविली व जें धैर्य दाखविलें त्याबद्दल त्यांचें हार्दिक अभिनंदन करतों.

शास्त्रीबोवांनीं धैर्य दाखवलें असें म्हणण्याचें कारण असें कीं, श्रीशंकराचार्य यांचें स्तोत्रवाङ्मय म्हणजे 'सत्यं शिव सुन्दरम्' असें आहे. 'याचे बरवें कवित्व। कवित्वीं बरवें रसिकत्व। रसिकत्वीं परतत्त्व। स्पर्श जैसा।' या ओंवीत श्रीज्ञानदेवांनीं वर्णन केल्याप्रमाणें तें उत्कृष्ट काव्य आहे व त्याचा शास्त्रीबोवांनीं प्रसादपूर्ण भाषेंत अनुवादहि केला आहे; पण या ग्रंथास आज गिऱ्हाईक कोठें आहे?

आज लोकांची अभिरुचि ज्या दिशेनें वहात आहे त्याचा विचार केला, तर हजार-पांचशें प्रती खपल्या तरी मिळवली, असें म्हणण्याचा काळ आहे. अशा स्थितींत शास्त्रीबोवांनीं ग्रंथ फार खपणार नाहीं याची जाणीव असूनहि पदरचे पैसे लावूनहि हा ग्रंथ छापून प्रसिद्ध केला यांत त्यांनीं धैर्य दाखविलें नाहीं असें कोण म्हणेल?

या त्यांच्या कृतीवरून त्यांची श्रीमत् आचार्यांच्या ग्रंथावरील निष्ठा, लोकांमध्यें या वाङ्मयाचा प्रसार झाल्यास 'विवेकाची वाणी' फिटेल, लोक सद्वस्तूचा विचार व सदाचार, यांकडे वळतील व समाजाची नैतिक पातळी उंचावून समाज सुखी होईल, या समेयावरील विश्वासच व्यक्त होतो.

या संग्रहामध्यें लहानमोठीं ४५ स्तोत्रें आहेत. त्यांत श्रीमत् शंकराचार्यांचीं 'षट्पदी' 'गोविंदाष्टक' यासारखीं उत्कृष्ट लहान लहान स्तोत्रें आहेतच; पण 'हरिमीडे' व 'दक्षिणामूर्ति' यासारखीं मोठीं स्तोत्रेंहि आहेत. शास्त्रीबोवांनीं त्यांचें महत्त्व व काठिण्य जाणून त्या स्तोत्रांचा नुसताच अर्थ दिला नाहीं, तर त्यांवरील अर्थानें विस्तारहि केलें आहे. त्या योगानें या महत्त्वाच्या स्तोत्रांचा अर्थ समजण्यास सुलभ झालें आहे.

'हरिमीडे' स्तोत्राच्या अर्थाचीं पुस्तकें क्वचित् मिळतात पण 'दक्षिणामूर्ति' स्तोत्र तर दुर्मिळच झालें आहे. तें विस्तारासह छापून शास्त्रीबोवांनीं जिज्ञासूंची मोठी सोय केली आहे. आचार्यांच्या ग्रंथाचा अभ्यासु वर्ग त्यांचा याबद्दल ऋणी राहील यांत शंका नाहीं.

— डॉ. पा. शंडिकर

## पांडित्याची उत्कट साक्ष

### तर्कतीर्थ लक्ष्मणशास्त्री जोशी यांचे मत

श्रीआद्यशंकराचार्य यांचा स्तोत्रसंग्रह सुबोध मराठींत तुम्हीं प्रसिद्ध करीत आहात हें वाचून फार समाधान वाटलें तुम्हीं पाठविलेली मुद्रित प्रत नीट रीतीनें दृष्टीखालीं घातली स्तोत्रांच्या प्रारंभीं दिलेल्या प्रस्तावना अत्यंत उचित अशा आहेत काहीं स्तोत्रांचा आचार्यांच्या पवित्र चरित्राशीं कसा संबंध आहे हें तुम्हीं संक्षेपानें दाखवून दिलें आहे उदाहरणार्थ, श्रीकृष्णाष्टकाची प्रस्तावना पहावी-भाषांतर प्रसन्न व स्तोत्रांतील लालित्य राखून केलें आहे हें भाषांतर शब्दशः असलें तरी अर्थबोध सुलभ व्हावा म्हणून पदोपदीं विवरणहि त्यांत आलें आहे म्हणजे 'हरिमीडे', 'दक्षिणामूर्ति' इत्यादि महत्त्वाच्या स्तोत्रांचें विवरण अधिक विस्तारानें तुम्हीं केलें तें अत्यंत उपयुक्त असें विवरण आहे हीं स्तोत्रें शांकरतत्त्वज्ञानाचे संक्षिप्त असे आधार-ग्रंथच होत असें म्हणता येईल ही विवरणें जिज्ञासू साधकास चांगली सहायक ठरतील

श्रीशंकराचार्यांनीं काहीं स्तोत्रें अत्यंत सुगम भाषेंत ग्रथित केलेलीं आहेत त्यांत प्रतिभा, विद्वत्ता व प्रसन्नता यांचा पावन संगम झाला आहे संस्कृतमध्यें विशेष व्युत्पन्न नसलेल्या व्यक्तींनाहि सहज बोध व्हावा इतकी साधी रचना त्या स्तोत्रांची आहे उदाहरणार्थ, चर्पटपंजरी, द्वादशपंजरिका, गुर्वष्टक इत्यादि स्तोत्रें होत या स्तोत्रांची शैली मोकळी व खेळकर आहे त्यांत एक प्रकारची अभिनयपूर्ण नाट्यमयता आहे संसारांत गाढ निमग्न मनुष्याला खडबडून जागें करून पायावर ताठ उभें करून सुनवावे असे खडे बोल त्यांत आहेत

' अरे वेड्या, गोविंदाला भज, गोपालकृष्णाला भज मूर्खा, मरण जवळ आल्यानंतर हें व्याकरण तुझें रक्षण ईश्वरखर करणार नाहीं, मुळींच करणार नाहीं " किंवा " तुझ्यापाशीं सर्व काहीं आहे पण मन जर सद्गुरूंच्या चरण कमलीं मग्न झालेलें नसेल तर काय उपयोग ? "

आचार्यांचीं काहीं स्तोत्रें संस्कृतच्या उत्कृष्ट पंडित कवींचा गर्वपरिहार करतील अशा प्रौढ शैलींत लिहिलेलीं आहेत भाषेवरील अलौकिक प्रभुत्व, कल्पनावैभव आणि विशाल तत्त्वचिंतन यांचा मिलाफ या पारमार्थिक कवितेंत

झालेला आहे तुम्ही भाषांतर मात्र मराठीला पेलेल इतकें सरळ करण्यात यश मिळविलें आहे, हें खरोखर अभिनन्दनास्पद होय

या प्रसगानें मला एक दोन सूचना यासबधात करावयाच्या आहेत नवीन आवृत्तीचा योग आल्यास — या अशा सुदर मराठी अनुवादाची नवी आवृत्ति लवकर निघणें शक्य आहे — या सूचनाचा तुम्ही अवश्य विचार करावा पहिली सूचना अशी कीं, मराठी वाचकाच्या दृष्टीनें कठीण असलेले सस्कृत शब्द भाषातरात स्वतत्र टिप्पणी देऊन अर्थासह द्यावेत, जे समास दीर्घ व कठीण दिसतील त्यांचीहि उकल टिप्पणींत द्यावी म्हणजे मूळ सस्कृत श्लोक लावण्यास वाचकाला अशा टिप्पण्यानीं चागलें साहाय्य होईल उदा "त्राणशौण्डम्" येथें शौण्ड शब्द भाषातरात अर्थासह द्यावा षट्पदी स्तोत्रातील " दनुजकुलामित्र, मित्रशशिदृष्टे " अशा समासाचे विग्रहयुक्त विवरण असावें

'चर्पटपजरी'मधील भजगोविंदम् या पालुपदावर व गोविंदाष्टकावर एक टिप्पणी पाहिजे. त्यात आचार्यांनीं गुरु व परमेश्वर या दोघाचा गोविद या शब्दानें निर्देश केला आहे असा श्लेषअलकार सूचित करावा

तुमचे 'दक्षिणामूर्ति' स्तोत्राचें भाषातर व विवरण तुमच्या पाडित्याची उत्कृष्ट साक्ष देते त्यातील एका श्लोकाच्या भाषातराबद्दल माझा मतभेद आहे तो श्लोक म्हणजे आठवा — ' विश्वं पश्यति ' हा होय माझे म्हणणे असें की, " य एष पुरुष मायापरिभ्रामित तस्मै श्रीगुरुमूर्तये नम " असा अन्वय सरळ धरून भाषातर तुम्ही केलें नाहीं कारण श्रीगुरुमूर्तीला 'मायापरिभ्रामित' म्हणायला तुम्ही भ्यायला अद्वैतवाद्यानें असें भिऊ नये मी भाषातर असें करतों — " जो हा माणूस मायाभ्रमात सापडून स्वप्नात व जागृतींत भेदसबधानीं ( ते सबध श्लोकात स्पष्ट केले आहेत ) विश्व पहातो त्या श्रीगुरुमूर्तीला, दक्षिणामूर्तीला हा नमस्कार असो " या माझ्या भाषातराशिवाय दुसऱ्या प्रकारचे भाषातर शक्य नाहीं, हे ध्यानात ठेवणें जरूर आहे तसें असल्यास कळवावें

तुम्ही या भाषातरानें मराठी साहित्याची सेवा करून मुमुक्षु जनावर घोर उपकार केले आहेत तुमचें मनपूर्वक अभिनदन करून हें पत्र सपवितों.

—लक्ष्मणशास्त्री जोशी

---

## भाविक, आस्तिक, भक्तिप्रवणजनांची सोय

### म. म. द. वा. पोतदार, कुलगुरु, पुणे विद्यापीठ, यांचा अभिप्राय

'सुबोधस्तोत्रसंग्रह' या नावाचा सुमारें ४०० पानाचा एक नवा ग्रंथ श्री पांडुरंगशास्त्री गोस्वामी न्यायाचार्य यानीं प्रसिद्धीसाठीं छापण्यास दिलेला मला दाखविला. शास्त्रीबुवानीं कांहीं निवडक स्तोत्रें बहुतांशीं श्रीमत्-शंकराचार्यांच्या नावावर प्रसृत असलेलीं घेऊन त्यांचा अर्थ मराठी भाषेत दिला आहे. प्रौढ मराठी समजणाऱ्याला तीं सुबोध वाटतील, पण आज संस्कृताचें अध्ययन आमच्या अध्ययनांतून ऐच्छिक झालें आहे त्यामुळें याहूनहि बालसुबोध अर्थ किंवा निवरण कोणीं केलें तर तें उपकारकच होईल. 'हरिमीडे' व 'दक्षिणामूर्ति' या दोन स्तोत्रांवर तर शास्त्रीबुवानीं विस्तृत विवरण सुमारें १००–१५० पृष्ठें केलें आहे, त्यावरून अद्वैत वेदान्ताची भूमिका विशद होईल. कारण इतर स्तोत्रांतहि ती अनुस्यूतच आहे.

स्तोत्रवाङ्मय हें फार प्रासादिक, श्रुतिमनोहर, पठणसुलभ असें आहे. अशीं स्तोत्रें मराठींतहि आढळतात. पण मूळ संस्कृतांतहि एक निराळी गोडी आहे. ही स्तोत्रें पठणांत असावीं, वेळ फावेल तेव्हां त्याचें मनन करावें. यानें फार लाभ होतो. मनाला टवटवी प्राप्त होते. तें पापभीरु ईश्वरपरायण होऊं लागतें. म्हणून आजवर अनेक लहानमोठे स्तोत्रसंग्रह प्रसिद्ध झाले आहेत. संस्कृत, प्राकृत, संस्कृत प्राकृत, सार्थ, केवळमूल सविवरण इत्यादि पुष्कळ प्रकार त्यांत आढळतात. हजारों आवृत्त्याहि बृहत्स्तोत्ररत्नाकरासारख्यांच्या निवतात. पंडित न्यायाचार्यं पांडुरंगशास्त्री गोस्वामी यानीं सार्थ सुबोधस्तोत्रसंग्रह प्रसिद्ध करून मोठीच सोय भाविक, आस्तिक भक्तिप्रवणजनांची केली आहे यांत शंका नाहीं. जर शक्य झालें, तर स्तोत्रसंग्रहांतील कठीण शब्दांचा अर्थवाचक कोश जोडावा, शिवाय थोडं समासस्पष्टीकरण प्रकरण यावें. कांहीं मूळ अद्वैत सिद्धान्त विवरण करावें आणि मग सोपें साराश सलगस्तोत्रें एका बाजूस व एका बाजूस साराश विवरण इत्यादि अशी रचना करावी. यांचा सामान्य जनास अधिक उपयोग होईल.

— दत्तो वामन पोतदार

साहाय्यानें ज्या परमेश्वराचें ज्ञान होतें त्याला दक्षिणामूर्ति म्हणतात. श्रीदक्षिणामूर्त्युपनिषदात म्हटलें आहे.

शेमुषी दक्षिणा प्रोक्ता सा यस्याभीक्षणे मुखम ।
दक्षिणाभिमुखः प्रोक्तः शिवोऽसौ ब्रह्मवादिभिः ॥

श्रीदक्षिणामूर्तीचें आचार्यांनीं केलेलें एक सुंदर विग्रहस्तोत्रहि उपलब्ध आहे. श्रीदक्षिणामूर्ति ही गुरुदेवता असून तिची भिन्न भिन्न ध्यानें व तदनुरूप वेगवेगळे विग्रह आहेत.

असो प्रस्तुत सुंदर व सुलभ ग्रंथाचा वाचक उपयोग करून घेऊन प. गोस्वामी याचे श्रम सफळ करतील असा विश्वास आहे.

— बाळशास्त्री हरदास

वरील अभिप्रायात थोडासा गैरसमज होण्यासारखा असल्यामुळें नम्रपणें खुलासा करीत आहें.

' हा अवतार दक्षिणेकडे झाला व मूर्तीहि पण दक्षिणाभिमुखच असते म्हणून या अवताराला दक्षिणामूर्ति असें म्हणतात हें विधान बरोबर नाहीं " असें प बाळशास्त्री हरदास याचें म्हणणें आहे थोडासा सूक्ष्म विचार केल्यास मूळ विधानच बरोबर आहे असें दृष्टीस पडतें दक्षिणामूर्ति हा शंकराचा अवतार आहे भगवान् श्रीशंकर ही ज्ञानाची अधिष्ठात्री देवता आहे शंकराचें मूळ वसतिस्थान इलावृतवर्ष होय इलावृतवर्षांतून लोकांना ज्ञान दान करण्याकरिता भगवान् शंकर हे हिमाचल प्रदेशात कैलास पर्वतावर आले कैलासपर्वत हा इलावृतवर्षाच्या दक्षिणेकडे आहे अशा रीतीनें शंकराची मूर्ति ज्ञानदानाच्या इच्छेनें दक्षिणेकडे प्रगट झाल्यामुळें त्याना दक्षिणामूर्ति हें अन्वर्थ नाव पडलें आपल्या दृष्टीनें हिमाचल प्रदेश उत्तरेकडे असला तरी इलावृत वर्षाच्या दृष्टीनें तो दक्षिणेकडेच येतो म्हणून हिमाचल प्रदेशावर प्रगट झालेल्या श्रीशंकराना दक्षिणामूर्ति म्हणणें योग्यच आहे. हिमाचल प्रदेशात कैलासपर्वतावर प्रगट झाल्यानतर भारतालाच उद्देशून श्रीशंकरानीं अद्वैत तत्त्वज्ञानाचा उपदेश केला भारत हा हिमाचल प्रदेशाच्या दक्षिणेकडे असल्यामुळें स्वाभाविकरून शंकराना दक्षिणाभिमुख व्हावें लागलें. ह्याच अभिप्राय लक्षात घेऊन शंकरांना किंवा दक्षिणामूर्तींना 'दक्षिणाभिमुखः'

'दक्षिणदिङ्मुखः' 'दक्षिणाशामुखः' अशीं अन्वर्थक विशेषणें ठिकठिकाणीं दिलेलीं आढळतात "कैवल्यानन्दयोगीन्द्रमुद्धानन्दयतीश्वरो। नत्वारभे लघुव्याख्यां दक्षिणाशामुख – स्तुतेः" "आदौ प्रतीच. सकलजगदधिष्ठानत्वेन परमेश्वरतां दर्शयन् दक्षिणाशामुखं परमेश्वरं मनसा पूजयति विश्वं दर्पणमिति" "श्रीदक्षिणामूर्तये – दक्षिणा दक्षिणदिगभिमुखा मूर्तिः विग्रहः यस्य तस्मै नमः" हीं वचनें वरील विधानाला पोषक आहेत. तात्पर्य, दक्षिणामूर्ति भगवान् शंकर हे दक्षिणाभिमुखच आहेत यांत संशय नाहीं.

आतां क्वचित् मंदिरांतून दक्षिणामूर्ति देवाची मूर्ति पूर्वाभिमुख दिसल्यास त्याचा वरील विधानाशीं विरोध मानण्याचें कारण नाहीं. "स्थिरप्रतिमाः प्राङ्मुखीः उदङ्मुखो यजेत" इत्यादि शास्त्राच्या आदेशाप्रमाणें उपास्यदेवतेच्या मूर्तीची स्थिर प्रतिष्ठापना करावयाची झाल्यास ती मूर्ति पूर्वाभिमुख अशी स्थापिली जात असते. या दृष्टीनें मंदिरांतील दक्षिणामूर्ति देवाची मूर्ति पूर्वाभिमुख असणें स्वाभाविक आहे.

आतां "शेमुषी दक्षिणा प्रोक्ता" या वचनाच्या आधारें दक्षिणा शब्दाचा अर्थ बुद्धि होतो व बुद्धि ही परमेश्वराचा साक्षात्कार करून घेण्याचें मुख म्हणजे द्वार आहे म्हणूनहि श्रीशंकरांना दक्षिणामुख किंवा दक्षिणामूर्ति असें म्हणतात. बुद्धीला उपास्यप्रवण करण्याच्या दृष्टीनें हाहि अर्थ उत्तमच आहे, पण यानें मूळ विधानाला बाध येत नाहीं. एके ठिकाणीं तर श्रीदक्षिणामूर्ति या शब्दाचा मोठा गमतीचा व सुंदर अर्थ केला आहे. श्री म्हणजे अनादि अचिन्त्य मायाशक्ति तिच्यामुळें जो दक्षिण म्हणजे विश्वाच्या उत्पत्तीचें स्थितीचें आणि प्रलयाचें कार्य करण्यामध्यें निपुण, तो श्रीदक्षिण समजावा सार्‍या विश्वाची घडामोड करूनहि तो परमात्मा स्वतः 'अमूर्ति' म्हणजे अव्यक्त आहे म्हणूनहि त्याला दक्षिणामूर्ति असें म्हटलें आहे. ( दक्षिण + अमूर्ति = दक्षिणामूर्ति ).

– पांडुरंगशास्त्री गोस्वामी

* * *

साहाय्यानें ज्या परमेश्वराचें ज्ञान होतें त्याला दक्षिणामूर्ति म्हणतात. श्रीदक्षिणामूर्त्युपनिषदांत म्हटलें आहे

शेमुषी दक्षिणा प्रोक्ता सा यस्याभीक्षणे मुखम्।
दक्षिणाभिमुखः प्रोक्तः शिवोऽसौ ब्रह्मवादिभिः॥

श्रीदक्षिणामूर्तीचें आचार्यांनीं केलेलें एक सुंदर विग्रहस्तोत्रहि उपलब्ध आहे. श्रीदक्षिणामूर्ति ही गुरुदेवता असून तिचीं भिन्न भिन्न ध्यानें व तदनुरूप वेगवेगळे विग्रह आहेत.

असो. प्रस्तुत सुंदर व सुलभ ग्रंथाचा वाचक उपयोग करून घेऊन प. गाल्वामी यांचे श्रम सफळ करतील असा विश्वास आहे.

— बाळशास्त्री हरदास

वरील अभिप्रायांत थोडासा गैरसमज होण्यासारखा असल्यामुळें नम्रपणें खुलासा करीत आहें.

' हा अवतार दक्षिणेकडे झाला व मूर्तीहि पण दक्षिणाभिमुखच असते म्हणून या अवताराला दक्षिणामूर्ति असें म्हणतात हें विधान बरोबर नाहीं ' असें प. बाळशास्त्री हरदास यांचें म्हणणें आहे. थोडासा सूक्ष्म विचार केल्यास मूळ विधानच बरोबर आहे असें दृष्टीस पडतें. दक्षिणामूर्ति हा शंकराचा अवतार आहे. भगवान श्रीशंकर ही ज्ञानाची अधिष्ठात्री देवता आहे. शंकराचें मूळ वसतिस्थान इलावृतवर्ष होय. इलावृतवर्षांतून लोकांना ज्ञान दान करण्याकरितां भगवान् शंकर हे हिमाचल प्रदेशांत कैलास पर्वतावर आले. कैलासपर्वत हा इलावृतवर्षाच्या दक्षिणेकडे आहे. अशा रीतीनें शंकराची मूर्ति ज्ञानदानाच्या इच्छेनें दक्षिणेकडे प्रगट झाल्यामुळें त्यांना दक्षिणामूर्ति हें अन्वर्थ नाव पडलें. आपल्या दृष्टीनें हिमाचल प्रदेश उत्तरेकडे असला तरी इलावृत वर्षाच्या दृष्टीनें तो दक्षिणेकडेच येतो. म्हणून हिमाचल प्रदेशावर प्रगट झालेल्या श्रीशंकरांना दक्षिणामूर्ति म्हणणें योग्यच आहे. हिमाचल प्रदेशांत कैलासपर्वतावर प्रगट झाल्यानंतर भारतालाच उद्देशून श्रीशंकरांनी अद्वैत तत्त्वज्ञानाचा उपदेश केल[illegible] हा हिमाचल प्रदेशाच्या दक्षिणेकडे असल्यामुळें स्वाभाविकच शंक[illegible] अभिमुख व्हावें लागतें. हाच अभिप्राय लक्षांत घेऊन शंकरांना कि[illegible] ना 'दक्षिणाभिमुख'